

# अमरवाणी

अर्थेभ्यो हि विवृद्धेभ्य:,
संवृत्तेभ्य स्तत स्तत:
क्रिया स्सर्वा: प्रवर्तन्ते
पर्वतेभ्य इवापगा: ॥ १ ॥

[ज्याप्रमाणे नद्यांचा उगम पर्वतातून होतो त्याप्रमाणे धर्मकार्याची उत्पत्ति धनापासून होते.]

अर्थेन हि वियुक्तस्य
पुरुष स्याल्पतेजस:,
व्युच्छिद्यन्ते क्रिया स्सर्वा
ग्रीष्मे कुसरितो यथा ॥ २ ॥

[ज्याप्रमाणे लहान नद्या उन्हाळ्यात आटतात त्याप्रमाणे निर्धन माणसाची तेजस्विता कमी होऊन त्याचे प्रयत्न फुकट जातात.]

सोय मर्थम् परित्यज्य
सुखकाम स्सुखेदित:
पाप मारभते कर्तुम्
ततो दोष प्रवर्तते ॥ ३ ॥

[सुखाने राहण्याची संवय झाली असल्याकारणाने धनहीन झाल्यावर माणूस अधर्माकडे वळतो. (धर्मविरुद्ध कामे करु लागतो.)]

---



# मित्रलाभ

[ ४१ ]

हिरण्यक (उंदीर) मंथरकला दैवाधीनाची गोष्ट सांगून पुढे म्हणाला–"बृहस्पती चूणाकर्णला म्हणाला–'मित्रा, त्याचे सर्वस्व तो घालवून बसला आहे, म्हणून तो शक्तिहीन दुर्बल झाला असतां तू निश्चितपणे झोपायला काहीच हरकत नाही.'

"ते ऐकून माझे हातपायच गळले. कारण तो म्हणाला ते खरे होते! स्वत:चे घर व वैभव घालवून बसल्यावर कोणीही दुर्बल होऊन जातो. मला पूर्वीसारखे त्या घरात पोटभर खायला मिळण्याची आशा उरली नाही. माझे अनुयायी असंतुष्ट होऊन विचार करू लागले, 'आतां आपल्याला आहार मिळवून देण्याचे सामर्थ्य याच्या अंगात राहले नाही. स्वत:च्या पोटापुरते मिळविणेसुद्धां ज्याला अशक्य त्याच्या आश्रयाला राहाण्यात काहीच अर्थ नाही.''

त्यानंतर मी ती जागा सोडून दूर कोठे तरी जाण्याचे मनाशी ठरविले. कारण त्यापुढे त्या जागी आपल्याला पहिल्यासारखा आदर मिळणार नाही किंवा आपली मान प्रतिष्ठा राहणार नाही. म्हणून मी आपले जुने घर सोडून एका जंगलात येऊन राहू लागलो. तेथे एका जाळ्यात सांपडलेला चित्रग्रीव आपल्या अनुयायांसह माझ्याकडे आला. त्याला मी जाळ्यातून कसे सोडविले हे तू पहिल्यानेच ऐकले आहेस. त्यानंतर लघुपतनकशी माझी ओळख झाली व मैत्रीपण झाली. त्यानेच मला इकडे यायला सुचविले. म्हणून मी त्याच्याबरोबर तुझ्या भेटीला आलो."

मंथरक हिरण्यकाची ती गोष्ट ऐकून त्याचे सांत्वन करुन म्हणाला–"तू काळजी करू नकोस. सोमिलक नांवाच्या कोष्टयाने



आपल्या दुर्दैवाला तोंड देऊन शेवटी त्यावर जय मिळविला. तु देखील यशस्वी होशील."

"सोमिलक कोष्टयाची गोष्ट ऐकू दे तरी!" लघुपतनक म्हणाला. मंथरक सांगू लागला.

### कोष्टयाची गोष्ट

सोमिलक एक हुशार कोष्टी होता. तो रंगारंगाचे कपडे व लुगडी वगैरे विणीत असे. त्याने विणलेले कापड राजेरजवाड्यां-कडे वापरण्यालायक असे. इतके उत्तम कापड विणण्यात पटाईत असूनही त्या बिचाऱ्याला पोटभर खायला आणि अंग-भरल्यायला मिळेल इतकी मिळकत होत नसे. सामान्य कोष्टी जोडेभरडे कापड विणीत. त्यांची मिळकतदेखील त्यांच्याहून अधिक होत असे आणि त्यांचा संसार सुखाने चाले. ते पाहून तो एकदा आपल्या बायकोला म्हणाला—"काय ग, जाडेभरडे कापड विणणारे विणकरेदेखील खूप पैसा मिळवून चैन करीत आहेत. मी विणण्यात सर्वांहून जास्त पटाईत आणि हुशार समजला जातो. इतकी मेहनत करतो तरी दोन वेळचे पोट भरण्याची मारामार. माझ्यावर हा असा अन्याय या गावात होतो आहे. म्हणून हे गाव सोडून दुसऱ्या गावी जाण्याचा विचार करतो आहे."

तेव्हां त्याची बायको म्हणाली—"हे पहा, मला वाटतं की, तुमचा हा खोटा भ्रम आहे. येथे मिळत नाही ते इतर ठिकाणी मिळेल अशी मनाची समजूत चुकीची आहे. येथेच राहून जे मिळेल तेवढेच भाग्यात आहे असे, समाधान करून घेऊन रहावे."

"होय ग! तू म्हणतेस ते बरोबर आहे. तरी भाग्य कधी आपल्या कामाच्या आड येऊ शकत नाही. जशी एका हाताने टाळी वाजत नाही, तशी प्रयत्नाशिवाय यश मिळत नाही. भाग्यात अन्न असले तरी हाताने उचलून घास तोंडात घालावा लागतो. कर्म करणारावर लक्ष्मीची कृपा असते, प्रत्येक गोष्ट भाग्यावर सोडणारे भितरेच म्हटले पाहिजेत. म्हणून दैवावर अवलंबून न राहता आपल्या शक्तीप्रमाणे प्रयत्न करीत राहाले पाहिजे. यथाशक्ती प्रयत्न करूनही यश लाभले नाहीतर कोणी दोष देणार नाही—'यत्ने कृते यदि न सिद्धति, को अत्र दोष:?' अशी म्हणच आहे. जेथे यत्नाचा अभाव नाही तेथे सिद्धी असते. आपली सर्व कार्ये केल्यानेच यशस्वी होतात, कल्पनेने नाही. झोपलेल्या सिंहाच्या जबड्यात जशी जनावरे स्वत: होऊन पोचत नाहीत तशीच प्रयत्नाविना कोणतीही इच्छा पुरी होत नाही. म्हणून मी गांव सोडून जावे म्हणतो."

त्यानंतर तो कोष्टी वर्द्धमानपुर नावाच्या गावी निघाला. तेथे पोचल्यावर त्याने तीन वर्षे खूप मेहनत करून काम केले. तीनशे सुवर्णमुद्रा जमवून तो एके दिवशी आपल्या गावी परत निघाला. वाटेत एका जंगलातून जावे लागले. संध्याकाळी कोळोख पडू लागल्यावर तो एका वडाच्या झाडावर चढून एका फांदीवर झोपला. झोपल्यावर त्याला एक स्वप्न पडले. स्वप्नात दोन भयंकर व्यक्ती कावून परस्परांशी वाद-विवाद करीत होते. एकजण दुसऱ्याला म्हणत होता—"काय रे पुरुषार्था! मी सोमिलकला पोटापुरेसे मिळावे, जास्त मिळू नये या प्रयत्नात होतो. परंतु तू त्याला तीनशे सुवर्णमुद्रा का जमवू दिल्यास!"

दुसरा पहिल्याला म्हणाला—"भाग्यरेषे! माणसाला त्याच्या प्रयत्नाप्रमाणे यशस्वी करणे तो आपले कर्तव्य मानतो. हे यश त्याच्या भाग्यात नसेल तर ते तू घे!"

ते ऐकतांच सोमिलकची झोप मोडली. त्याने आपल्या कंबरेची पिशवी चाचपून पाहिली. ती रिकामी होती. आपल्या मेहनतीचे फळ असे अचानक नाहीसे कसे काय झाले? माझी सर्व मेहनत फुकट गेली. माझ्या हातात एक कवडीसुद्धा उरली नाही. अशा स्थितीत बायकोला किंवा मित्रांना जाऊन भेटणे शक्य नाही. असा विचार करून तो वर्द्धमानपुरला परतला आणि खूप काबाडकष्ट करून एका वर्षाच्या आत त्याने पांचशे सुवर्णमुद्रा संपादन केल्या.



# १७९. जगातली सर्वात मोठी दुर्बीण

उत्तर कॉकसस् प्रदेशात नवीन तयार केलेल्या 'रिफ्लेक्टिंग टेलिस्कोप' नामक दुर्बिणीच्या काचेचा व्यास सहा मीटर म्हणजे २३६ इंचांचा आहे. (पोलोमार दुर्बिणीच्या काचेचा व्यास २०० इंचांचा आहे.) या दुर्बिणीचे एकूण वजन ८५० टन आहे. या दुर्बिणीने एक हजार कोटी प्रकाश वर्षांच्या अंतरावर पाहतां येते. या दुर्बिणीने याच वर्षी काम चालू झाले आहे.





# माया सरोवर

[ ११ ]

[ जयशीलला या गोष्टीची खात्री झाली की कनकाक्ष महाराजांच्या मुलामुलीला पळवून नेणारा मनुष्य मकरकेतू हाच आहे. त्याने, मकरकेतूचे औषधपाणी करवून त्याला राजाकडे नेणे बरोबर होईल, हे ठरविले. परंतु त्याला वाटेत काही पारध्यांनी अडविले. त्याच वेळी दहा घोडेस्वारांनी येऊन सर्वांना चहूबाजूंनी घेरले. पुढे–]

जयशीलला, ते घोडेस्वार कनकाक्ष महाराजांनी पाठविलेले शिपाईच असले पाहिजेत हे. ओळखायला वेळ लागला नाही त्याने आपली तलवार म्यानेत ठेवून म्हटले–"ती पहा, त्या विचित्र हत्तीवर मकराकृतीत बसलेली व्यक्तीच कनकाक्ष महाराजांचा एक बंदी आहे. त्या भयंकर व्यक्तीवर नजर ठेवा, ती व्यक्ती पळून जाईल कदाचित्!"

घोडेस्वारांच्या नायकाने मकरकेतूला व त्याच्या नायकाला लक्षपूर्वक पाहिले व थक्क होऊन म्हणाला–"हा कोण बरे असावा? कोणी राक्षस आहे की भूत?"

"नाही हो नाईक! त्यांपैकी एकही नाही. कोण आहे, हे नक्की सांगणे देखील शक्य नाही." जयशील म्हणाला.

मध्यंतरी सिद्धसाधकाने पारध्यांच्या मांत्रिकाला जयशीलच्या हातातून सोडवून



दूर नेले आणि धनुष्यबाण घेऊन नेम धरून उभे असलेल्या पारध्यांकडे वळून म्हणाला— "अरे वेड्यांनो! हा कालीमातेचा भक्त-बिक्त काही नाही. लबाड ढोंगी आहे. मी महाकालाचा भक्त आहे. मी याला पाहिल्याबरोबर ओळखले. नेम याच्या काळजावर धरा. मी एक, दोन, तीन म्हटल्याबरोबर बाण सोडा."

सिद्धसाधक म्हणाला ते ऐकून पारध्यांना काय करावे सुचेना. ते घाबरून गेले होते. कारण तेथे राजाचे दहा सशस्त्र घोडेस्वार, काळी कफनी घालून लांब दाढीवाला मांत्रिकासारखा दिसणारा सिद्धसाधक, तल-

भयंकर हत्तीवर बसलेला एक विचित्र मकराकृती माणूस हे सर्व हजर होते.

पारध्यांपैकी एकाने विचार केला की तेथून पळून जाणेही तितके सोपे नाही. कारण त्यांच्या चारी बाजूला उभे असलेले लोक सशस्त्र घोडेस्वार आहेत. तो आपल्या साथीदारांकडे वळून म्हणाला—"सांगा रे, काय करायचे? या महाकाल भक्ताच्या सांगण्याप्रमाणे आपल्या मांत्रिकावर बाण सोडायचा? नाही तर आपले सर्वांचे मरण निश्चित समज!"

"आपल्या सर्वांचा जीव वांचविण्यासाठी या एकट्याला मरावेच लागेल. काय रे मांत्रिक लबाडा, सोडू का बाण तुझ्यावर?" एका पारध्याने विचारले.

ते ऐकून पारधी मांत्रिकाला समोर मृत्यु उभा असलेला दिसला. तो थरथर कापत जयशीलकडे वळून म्हणाला—"मालक! माझ्या या भोळ्यांच्या हातून मला वांचवा. बाणांचा मारा तलवारीच्या वारापेक्षा जास्त कठीण आहे!"

"मूर्खा! मरणाराला बाण काय आणि तलवार काय दोन्हीसारखेच! मुकाट्याने जागच्या जागी उभा राहतोस की नाही?" सिद्धसाधकाने धमकावून विचारले.

पारधी तीर सोडणार इतक्यात जय-

सिद्धसाधकाला म्हणाला—"साधका! अरे तू हे काय आरंभले आहेस? तू यांना मृत्युदंड द्यायला राजा आहेस का?"

जयशीलचा संतापलेला चेहरा पाहून सिद्धसाधक नरमला आणि म्हणाला—"अरे जयशीला! मी जे म्हणालो ते तुला खरे वाटले का? या सोंगाड्या मांत्रिकाला कायमचा धडा द्यायला मी एक नाटक रचले होते. महाराजांचे घोडेस्वार वेळेवर आले नसते तर या पारध्यांनी आपल्याला किंवा आपण त्यांना ठार केले नसते का?"

ते सर्व नाटक घोडेस्वारांचा नायक इतका वेळ काही बोलल्याशिवाय पहात होता. तो म्हणाला—"जयशील तुम्हीच नाही का? आमचे मंत्री शेजारच्या गावी पडाव टाकून उतरले आहेत. राजधानीत तुम्ही राजकुमार व राजकन्येचे अपहरण करणाऱ्याला पकडल्याची बातमी पोचली होती. म्हणून आम्ही आपल्या शोधार्थच इकडे आलो आहो."

"नाईक! आपण ठीक वेळेवर आलांत. सिद्धसाधक व मी दोघांनी युवराज व युवराणी अपहरण करणाऱ्याला बंदी केले आहे. विचित्र वाटते आहे ना?" सिद्धसाधक म्हणाला.

"विचित्र काय म्हणतां? भयंकर आहे



तलवार व बाण दागिन्यासारखे संभाळून ठेवले आहेत. मला हे पाहून आश्चर्य वाटते आहे." घोडेस्वारांचा सरदार म्हणाला.

"मी व चरकाचारी दोघे मिळून आपल्या गावी याला घेऊन जाऊन याचा इलाज करणार आहों. महाराजाचे पंतअमात्य आमच्या गावात उतरले आहेत हे ऐकून आम्हांला फार आनंद होत आहे." हत्तीच्या आडून बाहेर येत नारायण म्हणाला.

जयशीलला तेथे फार वेळ थांबणेबरोबर नाहीसे वाटू लागले. लवकर गावात जाऊन मंत्री धर्ममित्रांच्या कानावर सर्व हकीगत



देखील आवश्यक आहे की, युवराज आणि राजकन्या दोघांचा शोध इतक्या लवकर लागेल असे वाटत नाही. प्रथम मकरकेतू जिवंत राहला पाहिजे. त्याच्याकडूनच युवराज व राजकन्या कोठे आहेत हे कळू शकेल. असा विचार करून मकरकेतूला जयशील म्हणाला–"आता तुझ्या जिवाला धोका उरला नाही. कनकाक्ष महाराजांनी स्वतः तुझ्या रक्षणार्थ स्वतःच्या मंत्र्याला पाठविले आहे. आवश्यकता भासली तर राजधानीहून राजवैद्यांना बोलावून घेता येईल."

मकरकेतू जोराने कण्हत म्हणाला–"माझ्या बगलेत शिरलेली तलवार आणि

झाले आहे. तो बाण मारणारा पारधी जलग्रहाच्या सोंडेतच मेला असावा. त्याला दूर फेकून द्यायला सांगू का?"

जयशीलने भीमूच्या तोंडाकडे न्याहाळून पाहिले. त्याला वाटू लागले की, भीतीने त्याचा जीव गेला असावा. त्याच वेळी चरकाचारीने पुढे जाऊन भीमूची नाडी तपासून पाहिली व म्हणाला–"मालक! हा जिवंत आहे हो! याची नाडी मंदमंद चालू आहे."

"परंतु त्याला शुद्धीवर कसे आणावयाचे? याला इतर पारध्यांच्या हातात द्यावे म्हणजे झाले. याला उचलून गावात नेण्याची गरजच काय? उगीच जबाबदारी घ्यायला नको." जयशील म्हणाला.

"जयशीलचे बोलणे पुरे व्हायच्या आतच सिद्धसाधक भीमूच्या कानाजवळ तोंड नेऊन जोराने ओरडला–"भीमू! अरे ए भीमू! ऊठ, झोपायची गरज नाही आता, तू ज्या रानटी कोंबड्याची शिकार केली होतीस तो मंत्रीसाहेबांनी मकरकेतूच्या हातातून काढून घेऊन तुला द्यायला सांगि-तलां आहे. तो घेऊन तुमचा तो पारधी मांत्रिक पळून चेऊन जातो आहे बघ."

त्याचा परिणाम झाला. भीमू दचकल्या-सारखा जागा झाला आणि हत्तीच्या सोंडेतून

राच्या हातातला भाला घेऊन चारी बाजूला पहात मोठ्याने ओरडू लागला–"भुतांना वश करून घेणारा तो मांत्रिक कोठे गेला? कोठे आहे माझा कोंबडा?"

सिद्धसाधकाने भीमूच्या खांद्यावर हात फिरवीत त्याला सावध केले व म्हणाला–"अरे भीमू! तुला दिसत नाही का वेड्या! पहा, समोर कोण उभा आहे? जरा लक्षपूर्वक पहा पाहू! त्यांच्या समोर उभा तुम्हां लोकांचा मांत्रिकच तर आहे."

साधकाच्या तोंडचे ते शब्द ऐकून भीमूने आपल्या पारधी जातीच्या लोकांकडे पाहिले. त्यांच्यासमोर भयकंपित स्थितीत उभा भुतांचा मांत्रिक त्याला दिसला. त्याच वेळी सिद्धसाधकाने त्याला आठवण करून दिली ती कोंबड्याची गोष्ट त्याला आठवली.

"मकरकेतूने कोंबडा दिला तो कोठे आहे? कोठे आहे तो? काय रे मांत्रिका! कोठे ठेवला आहेस तो लपवून?" असा ओरडत भीमू भाला घेऊन मांत्रिकाच्या अंगावर धावला.

पारध्यांचा मांत्रिक मोठ्याने ओरडून म्हणाला–"भीमूच्या अंगात कोंबड्याचे भूत शिरले आहे. मांजराचा मंत्र टाकला की ते कोंबड्याचे भूत उतरेल. पहिल्याने त्याच्या हातातल्या भाल्यापासून आपला जीव कसा वांचवायचा याचा विचार करा. पळा, पळा!" असे म्हणत तो पळू लागला. त्याच्या पाठोपाठ दुसरे पारधी पळू





लागले. भीमूला स्वतःचे भानच नव्हते. तो भाला घेऊन त्या सर्वांचा पाठलाग करीत निघाला.

"जयशीला! आपण वाचलो. या पारध्यांची पीडा एकदाची टळली." असे म्हणत सिद्धसाधक जोराने हसला.

जयशील पळणाऱ्या त्या पारध्याकडे व त्यांचा पाठलाग करणाऱ्या भीमूकडे पहात म्हणाला—"साधका! या सर्व भानगडीला मूळ कारण तूच आहेस. जंगलात पशु-पक्ष्यांची शिकार करणाऱ्या रामूला तूच भीमू नाव देऊन त्याला चढविलेस आणि त्याला तो खरोखरच भीमू असल्यासारखे वाटू लागले.

[illegible] तू म्हणतास त्यात [illegible] अवश्य आहे, परंतु तूच विचार कर, त्या दुष्ट मांत्रिकाचा खरा प्रतिस्पर्धी हाच तर आहे. आतां यापुढे हे लोक आपल्या कामात विघ्न आणणार नाहीत." सिद्धसाधक म्हणाला.

"तरमग आपण निघायचं का?" घोडेस्वारांच्या सरदाराने विचारले.

"हो, निघू या आपण." जयशील म्हणाला. नंतर पुन्हां थोडा थांबून चरकाचारीला व नारायणाला जवळ बोलावून म्हणाला—"तुम्ही दोघे पुढे पुढे चालत रहा, आम्हांला वाट दाखवायला. तुमच्याच गावात आमचे मंत्री येऊन उतरले आहेत. त्यांना भेटायचं आहे."

"मंत्रीसाहेब गावाबाहेर डोंगरी तलावाच्या काठी तंबू टाकून त्यात उतरले आहेत आणि आपण दोघे भेटलात तर आपण दोघांना सरळ त्यांच्याकडे घेऊन यायला त्यांनी सांगितले आहे." अश्वदलाचा नायक म्हणाला.

जयशीलने चरकाचारी व नारायणाला थांबवून विचारले—"ऐकलंत ना तुम्ही नायक काय म्हणाले ते?"

"हो मालक, आम्ही चांगले ऐकले. या मकरकेतूचा इलाज आम्ही त्यांच्या समक्षच करून त्यांच्याकडून चांगलं बक्षिस आणि शाबासकी मिळवू." चरकाचारी म्हणाला.

"हो[illegible] [illegible]र बोललात. मकरकेतूचा इलाज, शस्त्रचिकित्सा वगैरे वगैरे करून त्यात यशस्वी झालो तर आपल्याला कनकाक्ष महाराजांच्या दरबारात वैद्याचार्य म्हणून मानाची जागा मिळेल, होय की नाही? काय वाटते तुम्हांला?" नारायण आश्चर्यचकित झाल्याचा भाव आणून म्हणाला.

"आचार्यपद मिळेल की नाही, हे नाही मला माहीत, परंतु शस्त्रचिकित्सा करून तुम्ही मकरकेतूला वांचवू शकलां नाही, तर मंत्रीसाहेब स्वतःच तलावाच्या काठावर तुमची दोघांची मुंडकी उडवितील. हेदेखील लक्षांत असू द्या." जयशीलने त्यांना सावध केले.

"हें काम मंत्रीसाहेबांनी माझ्या जबाबदारीवर सोडले, तर मी महाकालाचे आवाहन करून या दोघांचा बळी त्याच्या चरणी वाहीन! तसे केल्याने आपलेच कल्याण होईल असे नव्हे तर साऱ्या जगाचे कल्याण होईल!" सिद्धसाधक जणुकाही त्याला ती संधी मिळणार, असे दर्शवित म्हणाला.

अर्ध्या तासाभरात सर्व जण डोंगरी तलावाच्या काठी तयार करविलेल्या मंत्रीसाहेबांच्या तंबूशेजारी येऊन पोचले. मंत्री धर्ममित्राने एकदां सर्वांवर आपली नजर फिरविली. नंतर आदराने जयशीलकडे वळून म्हणाले—"तू महाराजांच्या मुलाला व मुलीला पळवून नेणाऱ्याला बंदी केलेस. मी तुझे अभिनंदन करतो. या दुष्टाने



युवराजांना आणि राजकन्येला कोठे लपवून ठेवले आहे?"

जयशीलने सर्व वृत्त मंत्रीसाहेबांना थोडक्यात सांगितले व म्हणाला–"मंत्रीसाहेब, मकरकेतूची शस्त्रचिकित्सा करून पहिल्याने त्याच्या बगलेतली तलवार व खांद्यातला बाण काढविला पाहिजे आणि त्याच्या जखमा भरल्यावर त्याला विचारावे की त्याने दोघांना कोठे लपवून ठेवले आहे?"

"ठीक, मला मान्य, तसेच करू या. त्या वेळी त्याने खरे सांगितले नाही तर त्याला हत्तीच्या पायांखाली तुडवून त्याला नरकलोकात पाठविता येईल. तरमग ठरलं." मंत्रीसाहेबांनी असे म्हणत करड्या नजरेने एकदां मकरकेतूकडे पाहिले.

ते सर्व बोलणे मकरकेतू लक्ष देऊन ऐकत होता. तो म्हणाला–"अहो जयशीलराव! या जलग्रहाने बरेच दिवस झाले पाण्याचा स्पर्श केला नाही. या मोठ्या तलावात त्याला एकदां पाणी पाजवून आणावे, म्हणतो."

नाही. परंतु मी आणि सिद्धसाधक तुझ्याबरोबर जलग्रहाच्या पाठीवर राहणार. नाही तर तू आमच्या हातावर तुरी देऊन पसार होणार नाहीस कशा वरून?" असे म्हणत जयशील जलग्रहावर चढून उभा राहिला. सिद्धसाधकही चढला.

मकरकेतूने जलग्रहाला तलावात शिरायला खूण करतांच हत्ती तलावात खोल पाण्यात गेला. तेव्हां मकरकेतू जयशीलला म्हणाला–"आतां माझं मरण टळणे शक्य नाही, हे मला दिसतेच आहे, माझ्या जखमा भरल्या तरी आणि नाही भरल्या तरी!" असे म्हणत तो एक क्षणभर थांबला आणि एकदम उच्चस्वराने जयघोष केल्यासारखा ओरडला–"हे मायासरोवरेश्वर!" आणि नंतर जलग्रहाला संबोधन करीत म्हणाला–"हे जलग्रहा! पाण्यात बुडी मार आणि चल पुढे!"

दुसऱ्या क्षणाला जलग्रह जयशील व सिद्धसाधकासह पाण्यात बुडाला. (क्रमशः)





## संन्याश्याचा पक्षपात

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू कोणासाठी एवढा पक्षपात करून इतके कष्ट करीत आहेस कळत नाही. परंतु सर्वसंगपरित्याग करून नाक धरून तपश्चर्या करीत बसणाऱ्या ऋषी मुनींच्या मनातही पक्षपात असतो. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला ज्ञानशेखराची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी धनवर्मा आणि वीरवर्मा नावाचे दोन राजे परस्परांना लागून असलेल्या देशांचे अधिपती होते. दोन्ही राज्यांच्या सरहद्दीवर असलेल्या जंगलात ज्ञानशेखर नावाचा संन्यासी एक कुटीर बांधून त्यात

## वेताळाच्या गोष्टी











तपश्चर्या करीत असे. दोन्ही राज्यातले नागरिक त्यांच्या समोर उभ्या राहलेल्या समस्या किंवा प्रश्न त्या संन्याश्यांला सांगून त्याच्या सल्लयाप्रमाणे वागत आणि आलेल्या संकटातून सुटका मिळवीत.

एका वर्षी पुरेसा पाऊस पडला नाही आणि दुष्काळ पडण्याची चिन्हे दिसू लागली. दुष्काळाला तोंड द्यायला काय करावे या-विषयी सल्ला विचारायला धनवर्मा व धीरवर्मा एकाच दिवशी त्या संन्याश्याकडे आले.

ज्ञानशेखरने ते दोघे म्हणाले ते ऐकून घेतले व म्हणाला—"बाबांनो! मी तुम्हां दोघांना एकेक हस्तीदंती पेटी देतो. तुमच्या [illegible] तेव्हां ती पेटी उघडून पहा. तुम्हांला काही तरी समाधानकारक तोड नक्कीच मिळेल. परंतु या पेट्यांच्या मदतीचा उपयोग कसा करून घ्यायचा हे मात्र तुम्ही आपापल्या बुद्धीने ठरवावयाचे आहे. प्रत्येक लहान सहान प्रश्नाचे उत्तर मिळावे म्हणून पेटीचा उपयोग करतां कामा नये. तिने दिलेल्या मदतीचा दुरुपयोगही करतां कामा नये. याविरुद्ध काही घडल्याचे दिसल्यास मी या पेट्या परत घेईन. मी काही काळ समाधीस्थ राहीन. मी पुन्हां डोळे उघडीपर्यंत कोणी माझे ध्यान भंग करू नका."

असे सांगून त्याने दोन हस्तीदंती पेट्या काढल्या, दोघां अधिपतींना दिल्या आणि स्वत: समाधिस्थ झाला. दोघे अधिपती त्या पेट्या घेऊन आपापल्या राजधानीला निघून गेले.

धनवर्माने मंत्र्यांचा व व्यापाऱ्यांचा दुष्काळाचा प्रश्न कसा सोडवावा याविषयी सल्ला विचारला आणि बराच वेळ उहापोह होत राहिला. परंतु समाधानकारक असा एकही निर्णय होऊ शकला नाही. म्हणून त्याने पेटी उघडून पाहिली तेव्हां त्याला फार मोठे धन पेटीत आढळले. त्याने ते धन वापरून इतर देशांतून धान्य विकत [illegible] दुष्परिणामापासून प्रजेला वांचविले. दुष्काळ आला केव्हां आणि संपला केव्हां प्रजेला कळलेच नाही.

परंतु धीरवर्माने तसे केले नाही. दुष्का-ळाला तोंड द्यायला त्याने इतर काही मार्ग निघतो का, पाहिले. त्यापासून काही फायदा झाला नाही, तर हस्तीदंती पेटी उघडायची असे त्याने ठरविले. त्याने देशातले धान्य देशाबाहेर जाऊ नये यासाठी सावधगिरी बाळगली. व्यापा-ऱ्यांजवळ जेवढे धान्याचे साठे होते ते स्वाधीन करून घेतले. त्याने ते धान्य राज्यभर वाटले. प्रजेला पोटभर खायला मिळाले नसले तरी धान्य पुरवठ्याच्या अभावी कोणी मेला नाही.

धीरवर्मापेक्षा आपण प्रजेचे हित जास्त केले याबद्दल धनवर्मा गर्व करू लागला आणि म्हणाला—"आपल्या देशाला सर्व देशांपेक्षा सुखी व समृद्ध करण्यासाठी यत्न करावा असा माझा विचार आहे, दुसऱ्या कोणत्याही राजाला तेवढे यश मिळतां कामा नये. त्यासाठी तुमचा सल्ला मी विचारतो आहे." धनवर्माने मंत्र्यांना व सल्लागारांना विचारले. ज्ञानशेखरने दिलेली हस्तीदंती पेटी उघडून पहावी, असा त्यांनी सल्ला दिला.



धनवर्माने हस्तदंती पेटी उघडून पाहतां तीत फक्त एक चिट्ठी सापडली. चिट्ठीत "प्रतीक्षा कर." एवढेच लिहिले होते.

त्यानंतर आणखी काही दिवसांनी परदेशातून कोणी एक थोर वैज्ञानिक धनवर्माच्या भेटीस आला आणि म्हणाला—"महाराज, माझ्याजवळ एक यंत्र आहे. त्याच्या सहाय्याने भूगर्भात दडलेल्या धातूंचा शोध लागू शकतो. त्याच्या सहाय्याने आपणांस अनेक तऱ्हेच्या धातूंच्या वस्तू सापडतील. अशा तऱ्हेने अपार संपत्तीचा लाभ आपल्याला होईल. परंतु आपल्याला जी काही संपत्ती लाभेल तिच्यातला अर्धा वांटा मला द्यावा लागेल."



त्या अटीस धनवर्माने मान्यता दिली आणि त्या वैज्ञानिकाच्या सहाय्याने धनवर्माला खरोखरच सोने, चांदी, तांबे, लोखंड वगैरे धातूचा अपार सांठा सापडला. त्याने कबूल केल्याप्रमाणे त्या वैज्ञानिकाला अर्धा वांटा दिला. त्या धातूंचा उपयोग केल्याने देशाची आर्थिक परिस्थिति कल्पनेबाहेर सुधारली.

ते पाहून धीरवर्माला त्याच्या मंत्र्यांनी सल्ला दिला की त्याने आपल्या हस्तिदंती पेटीच्या सहाय्याने देशाची आर्थिक स्थिती सुधारण्यासाठी प्रयत्न करून पहावा. परंतु धीरवर्माला तो सल्ला रुचला नाही. काही दिवसांनी तो वैज्ञानिक धीरवर्माला [illegible] सांगितले तेच सांगितले.

परंतु धीरवर्मा त्या वैज्ञानिकाला म्हणाला—"तुमचे ते यंत्र तुम्ही विकायला तयार असाल तर ते विकत घ्यायला मी तयार आहे. तुमच्या सहाय्याने भूगर्भात मिळालेल्या संपत्तीचा अर्धा वांटा मी कोणत्याही परिस्थितीत द्यायला तयार नाही."

"हे यंत्र माझ्याशिवाय इतर कोणालाही तयार करतां येत नाही. म्हणून मला ते कोणाला विकायचे नाही. अट मान्य न करून तुम्ही इतर तऱ्हेने प्रयत्न करून पाहिलेत तर पन्नास वर्षे लागतील तुम्हांला संपत्तीचा शोध लावायला. तुम्ही धनवर्माच्या पन्नास वर्षे मागे रहाल." या शब्दात यंत्र विकण्यास कबूली न देऊन वैज्ञानिकाने धीरवर्माला सावध केले आणि तो निघून गेला.

काही दिवसांनी ज्ञानशेखर समाधि संपल्यावर दोन्ही राज्यातली परिस्थिती कशी आहे हे पाहण्यासाठी निघाला. धीरवर्माने दुष्काळात त्याने प्रजेला अन्नपुरवठा व्हावा यासाठी केलेल्या प्रयत्नांचे आणि हस्तिदंती पेटीचा उपयोग एकदांही न केल्याचे सांगितले.

धनवर्माने त्या पेटीचा उपयोग करून प्रजेच्या सुखासाठी त्याने कायकाय कामे [illegible] व देशाची सुस्थिति प्रत्यक्ष दाखविली. परंतु ज्ञानशेखरने धीरवर्माला दिलेली हस्तदंती पेटी त्याच्याजवळच सोडून दिली आणि धनवर्माने देशात घडवून आणलेली प्रगती व भरभराट प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहूनही हस्तदंती पेटी त्याच्याकडून मागून परत घेऊन गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! ज्ञानशेखरने असे कां बरे केले असावे? धीरवर्माच्या बाजूने त्याने पक्षपात केला म्हणायचा का? की धनवर्माला त्या पेटीचा आणखी जास्त उपयोग करून घेण्यासारखे काही उरले नाही म्हणून? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य उत्तरादाखल म्हणाला—ज्ञानशेखरने धनवर्माकडून पेटी परत घेतली त्याचे मुख्य कारण धनवर्माने दोन्ही अटी मोडल्या होत्या. दोन्ही वेळां त्याने कोणतीही मोठी समस्या उद्भवली नसूनही पेटी उघडून पाहिली. दुष्काळात स्वतःच्या प्रयत्नाने करण्यासारख्या कामांचा त्याने विचारच केला नाही. त्याने पेटी उघडून प्राप्त झालेले धन खर्च करून खाद्यसामग्री विकत घेतली. प्रजेला काही नवे शिकण्यास त्याने संधीच दिली नाही. दुसऱ्यांदा त्याने आपल्या देशातील अर्धा भूगर्भभंडार वैज्ञानिकाला फुकट देऊन टाकला आणि पुढल्या पिढ्यांना दारिद्र्य भोगायला परिस्थिती निर्माण केली. यात प्रजेचे हित होईल असे समजून धनवर्माने प्रजेचे वास्तविक नुकसानच केले. धीरवर्मा स्वप्रयत्नाने प्रश्न सोडविण्याच्या खटपटीत होता व तो पेटीवर मुळीच अवलंबून राहला नाही. म्हणून तो पेटीचा दुरुपयोग करील हा संशय राहला नाही. म्हणून धीरवर्माकडे पेटी राहू दिली आणि धनवर्माकडली पेटी परत घेऊन गेला."

अशातऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# नोकराचे चातुर्य

एका गावी एका श्रीमंताच्या मुलीचे लग्न व्हायचं होतं. तारीखजवळ येऊन ठेपली होती. त्याने जिल्ह्याच्या गावी जव्हेऱ्याकडे पांच हजार रुपये देऊन दागिने करायला सांगून ठेवले होते. ते दागिने आणायचे होते. जिल्ह्याच्या गावी जाण्याच्या वाटेवर जंगलात चोरांचा सुळसुळाट वाढला होता. दागिने कसे आणायचे हा प्रश्न होता.

त्या श्रीमंताच्या घरी चंदू एक विश्वासपात्र नोकर होता. तो आणायला तयार झाला. मालकाने त्याच्यावर दागिने आणायची जबाबदारी टाकली.

चंदू जंगलाच्या वाटेने जात असतांना त्याला चार चोरांनी घेरले. चंदूने, त्याच्या जवळ काहीच नसल्याचे सांगितले. जिल्ह्याच्या ठिकाणाहून परत येतांना मात्र सुमारे दहा हजार रुपयांचे दागिने त्याच्या जवळ राहतील असे सांगितले. चोरांनी त्याला सोडले.

तो दुसऱ्याच दिवशी परतला तेव्हां त्या चार चोरांनी पुन्हां त्याला अडविले आणि विचारले—"कोठे आहे रे दागिन्याचे गाठोडे?"

चंदू म्हणाला—"जव्हेऱ्याने दिले नाहीत हो दागिने. म्हणाला—'वाटेत चोरांची टोळी आहे. तेव्हां बरोबर चार चौघांना आणल्याशिवाय दागिने देणार नाही.' तुम्हीसुद्धा बरोबर आलात तरी चालेल."

चोर आनंदाने बरोबर जायला तयार झाले आणि जव्हेऱ्याच्या पहारेकऱ्यांच्या हाती पकडले गेले. नंतर त्या जंगलात चोरांची भिती राहिली नाही.







# सेनापतीचे भाग्य

"महाराजांचा जयजयकार असो! आपले सेनापती विक्रमजित हे विजयी होऊन, पन्नाच्या राजाचा पराभव करून व त्याला कैद करून राजधानीला येत आहेत." दूतांनी महाराजांचा जयजयकार करीत ही बातमी सांगितली.

जयंत महाराजांनी खूष होऊन आज्ञा केली—"विजय तोरणे बांधा, पताका लावा आणि विजयोत्सव करा."

"परंतु एक गोष्ट सांगायची राहली आहे, महाराज! ती कशी सांगू?" दूत म्हणाला.

"भिण्याचे कारण नाही, सांग!" राजा म्हणाला.

"या युद्धात सेनापतीच्या डाव्या हाताचे मधले बोट गेले, महाराज!" दूत म्हणाला.

जयंत महाराज कपाळावर हात ठेवून दु:खावेगाने सिंहासनावर धाड्दिशी पडले. किती दुर्दैवाची बातमी? शूर सेनापती विजय मिळवून आला असला तरी आता त्याला त्या पदावर राहतां येणार नाही! कारण, कोणतेही व्यंग असलेल्या व्यक्तीस सेनापतीच्या पदावर नेमू नये असा नियम होता. राजा जयंतला वाटू लागले की, हा नियम आपल्याला दु:खीकष्टी करण्यासाठीच केलेला दिसतो आहे. विक्रमजितने देशाचे संरक्षण आजवर फार उत्तम तऱ्हेने केले होते. म्हणून राजाला कसलीच चिंता नव्हती. परंतु विक्रमजित सेनापती पदावर राहला नाही तर देशाचे रक्षण कसे होणार? म्हणून जयंत विजयोत्सवातही भाग घेऊ शकला नाही. उलट त्याला आनंदाऐवजी दु:खच झाले.

राजा, सेनापती व प्रधान अमात्य तिघे बालपणापासून जीवश्चकंठश्च मित्र होते. वडील निवर्तल्यावर जसा जयंत राजा झाला



तसाच विक्रमजित त्याचे वडील वारल्यावर देशाचा सेनापती झाला होता.

जयंत या काळजीने शेवटी मानसिक व्याधीने आजारी पडला. राज्यकारभाराची सर्व कामें प्रधानावर टाकून तो अंतःपुरात राहू लागला. विक्रम सेनापती पदावर नसेल तर राज्याचे काय होईल, अशी काळजी करीत राजाने कायमचे अंथरूण धरले.

विक्रमजित राजाला भेटला व त्याची समजूत घालू लागला—"महाराज! आपण काळजी कां करतां? मी आयुष्यभर आपला गुलाम आहे!"

"विक्रम, परंतु उपयोग काय? तुझ्यावर सेनापती पदाचा भार ठेवतां येणार नाही.

बांधलेले आहेत. तेव्हां मी राजा असलो तरी काय फायदा होणार आहे?" जयंतने आपल्या मनातले दुःख ओकून टाकले.

त्यानंतर राजा बेशुद्ध होऊन पडला. वैद्यांनी औषधपाणी व उपचार केल्यावर तो शुद्धीवर आला.

ते पाहून प्रधानाने इतर मंत्र्यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला आणि म्हणाला—"विक्रमजितालाच सेनापति पदावर राहतां आलं तरच महाराजांची तब्येत सुधारेल."

"ते कसे काय होणार? हा नियम फार पूर्वीपासून नाही का आपल्या देशात चालत आला आहे? विक्रमच्या पंजोबांची टांच गेल्याने त्यांना सेनापती पद सोडावे लागले. त्याच्या आजोबांचा डोळा गेला म्हणून त्यांनी ते पद सोडले. परंतु विक्रमच्या खापर पंजोबांचा कान गेला होता तरी परमेश्वराच्या कृपेने ते त्या पदावर राहले होतेच!" कायदे मंत्र्याने निवेदन केले.

"ते कसे काय?" सर्वांनी एक स्वरात विचारले.

कायदे मंत्र्याला ते माहीत नव्हते, तरी त्याने सल्ला दिला तो सर्वांना पटला.

"परमेश्वर कृपा या वेळेसही कां असणार नाही?" राजपुरोहिताने विचारले.

व्यवस्था करून त्याची मर्जी कशी आहे याचा निर्णय घेऊन महाराजांची प्रकृती पुन्हां पहिल्यासारखी व्हावी या गोष्टीची जबाबदारी आपल्यावरच राहील गुरुजी!" प्रधान म्हणाला.

दरबारी जादुगार भास्करवर्मा एका कोपऱ्यात गुपचुप बसून सर्व ऐकत होता. राजपुरोहिताने त्याच्याकडे हेतुपूर्वक पाहिले तेव्हां त्याने खुणेने होकार दिला. तेव्हां जादुगार काही युक्ती काढणार ह्या गोष्टीची राजपुरोहिताला खात्री वाटली.

"ठीक आहे. मी देवाच्या आराधनेची तयारी करतो आणि त्याचा अनुग्रह आहे का पाहून सांगतो. मी आपल्याकडून प्रयत्नाची शिकस्त करीन. पाहू या काय होते ते." म्हणत राजपुरोहित तेथून निघून गेले.

भास्करवर्माने देवळात राजपुरोहिताला भेटून त्याने योजलेला उपाय थोडक्यात सांगितला.

दुसऱ्या दिवशी दरबारात राजपुरोहिताने प्रवेश करतांच निवेदन केले—"मी समाधी लावून बसलो असतां मला एक अद्‌भुत दृश्य दिसले. विक्रमचे तुटलेले बोट एका कावळ्याने आणून आज सकाळी देवळात टाकले आहे. मला जे दृश्य दिसले



त्यात ते बोट काही वेळ हलत असलेले दिसले. त्याच्या हलण्यावरून देवाचा अनुग्रह आपल्यावर आहे हे सिद्ध होते. तेव्हां विक्रमजित आपल्या एका जुन्या रुढीप्रमाणे सेनापती पदावर राहायला मुळीच तयार नाही."

"हा चमत्कार केव्हां होईल हो?" प्रधानाने विचारले.

"महाराज आज सायंकाळी देवळात आले तर नक्कीच हा चमत्कार त्यांना पहायला मिळेल." राजपुरोहित म्हणाले.

त्या दिवशी संध्याकाळी राजा, प्रधान मंत्री प्रमुख नागरिक राजवाड्यातील देवळात हजर झाले. सर्व आपापल्या जागेवर

बसल्यावर राजपुरोहित देवळाच्या गाभा[illegible] रात गेले. काडचाच्या पेटीसारखी कप्पा असलेली व आकृतीने तेवढीच एक पत्र्याची पेटी घेऊन बाहेर आले. त्या पेटीच्या खालच्या बाजूला कापूस घालून ठेवला होता. त्याच्यावर कापलेले बोट ठेवलेले होते. ते निळसर रंगाचे होते. दोन्ही टोके पांढरी होती. ती पेटी पुरोहिताच्या डाव्या हातात होती. पुरोहिताने ती पेटी सर्वांना दाखविली व त्यानंतर समाधिस्थ होऊन बसले. थोडया वेळाने डोळे उघडून बोलू लागले–"परमेश्वरा! आमच्यावर अनुग्रह कर. तू भक्तवत्सल आहेस. तुझं मत या बाबतीत काय आहे हे सांगण्याचा अनुग्रह करून आम्हां सर्वांना आनंद होईल असे कर."

त्यानंतर थोडयाच वेळाने पेटीतले बोट चारपांचदां हलले व वर खाली झाले. सर्वजण ते पाहून चकित झाले. त्यानंतर राजपुरोहित एकटा देवळाच्या तलावाकडे धावत गेला आणि ते बोट पाण्यात टाकून [illegible] दिले नाही.

भास्करवर्मा देवळाच्या मागे पुरोहिताची वाट पहात बसलेला होता. त्याने चटदिशी पुरोहिताच्या हातातली पेटी काढून घेतली. राजपुरोहिताच्या हाताचे मधले बोट त्या पेटीच्या खाली केलेल्या भोकातून बाहेर आलेले होते. त्याला निळा रंग लावून त्याच्या दोन्ही टोकांना पांढरा रंग लावला होता. सर्वांनी हालते बोट पाहिले ते पुरोहिताचेच होते.

त्या प्रदर्शनाचा परिणाम असा झाला की सर्वांच्या मनाची खात्री झाली कीं देवाचा अनुग्रह आहे. त्यानंतर विक्रमची नेमणूक पुन्हां सेनापती पदावर करण्यात आली. महाराजांना त्या गोष्टीचा परमावधीचा आनंद झाला. राज्यभर विजयोत्सव झाला. पन्नाचा राजा जयंतचा एक सामंत राजा झाला. दोघांचा समेट झाला आणि पन्नाच्या राजाला सुटका मिळाली. त्यानंतर जयंतने अनेक वर्षे सुखपूर्वक राज्य केले.





# संन्यास्याचा संन्यास

धर्मपुरी येथे हरिहर नावाच्या एका सुखवस्तू गृहस्थाला दोन मुलगे होते. मोठा रामू वीस वर्षांचा आणि धाकटा श्यामू अठरा वर्षांचा होता. रामू विद्याभ्यासात मागे पडला. व्यवहारज्ञानही त्याला बेताचेच होते. त्याला काही कामधंदा येत नव्हता. श्यामू विद्याभ्यास संपवून घरी परतला. सर्व त्याची वाखाणणी करू लागले आणि रामूच्या अज्ञानाची थट्टा उडवू लागले. त्यामुळे रामूला आयुष्याचा कंटाळा येऊ लागला. त्याच सुमारास श्रद्धानंद नावाचा एक संन्यासी त्यांच्या घरी भिक्षा मागायला आला.

श्रद्धानंद गावाबाहेर एका गुहेत रहात असे. रामू दररोज श्रद्धानंदाला भिक्षा घालीत असे. एकदां श्रद्धानंदाला भिक्षा घातल्यावर रामूने विचारले–"स्वामी! आज आपण विशेष खूष दिसता?"

श्रद्धानंद म्हणाला–"बेटा! आम्हां संन्यास्यांना सुखदु:ख असे काहीच नसते. आम्ही जगाशी नाते तोडले आहे. म्हणून आम्हांला कसलीच काळजी नसते."

ते ऐकून रामूला वाटले, आपणही संन्यास घेतल्यास आपला आदर वाढेल. त्याने श्रद्धानंदांना विचारले–"स्वामी! मीसुद्धां संन्यास घ्यावा म्हणतो आहे. तेव्हां काय काय करावे सांगू शकाल काय?"

श्रद्धानंदांनी शांत चित्ताने त्याला विचारले–"बेटा, तू वीस वर्षांचा दिसतो आहेस. संन्यास घेण्याचा विचार तुझ्या मनात कसा काय आला? ते काही असो, संन्यास घ्यायचा तुझ्या मनाने पक्का निश्चय केला असेल तर तू गावाबाहेरच्या माझ्या गुहेत संध्याकाळी ये. मी तुला दीक्षा देईन."

त्या दिवशी संध्याकाळी रामू श्रद्धानंदाच्या गुहेत गेला. श्रद्धानंद त्याला म्हणाले–"तुला



संन्यास शब्दाचा अर्थ सांगतो. संन्यास म्हणजे सर्वसंग परित्याग घर, नातेगोते, सुख आणि संपत्ती सर्वांचा त्याग. 'मी' आणि 'माझे' ही भावनाच सोडून द्यावी लागते. जगाशी असलेले नाते कायमचे तोडावे लागते."

रामू संन्याश्याच्या पायांवर मस्तक ठेवून म्हणाला–"महात्मन्! मी एक सामान्य माणूस आहे. हे सर्व एकाएकी सोडणे मला कसे शक्य होईल आयुष्याचा मला वीट आला आहे, एवढे खरे. मी आपल्या-जवळ राहून आपली सेवा करीन व एकेक वस्तूचा त्याग करीन."

श्रद्धानंद विचार करून म्हणाले–"ठीक, पायरी पायरीने संन्यास ग्रहण करण्याचा [illegible] यला तयार आहेस ?"

"महात्मन्! मला घराचा मोह मुळीच नाही. म्हणून मी सर्वात आधी आपल्या घराचा संन्यास घ्यावा म्हणत आहे." रामू म्हणाला.

"तरमग तू आजपासून 'गृह संन्यासी' आहेस. तू माझ्याजवळ रहात जा." श्रद्धानंद म्हणाले.

रामू रात्री परत न आलेला पाहून घरची मंडळी काळजी करूं लागली. दुसऱ्या दिवशी श्रद्धानंद भिक्षा मागायला आले तेव्हां हरिहररावांनी त्यांना रामूला कोठे पाहिलात का, विचारले. श्रद्धानंदांनी तो त्यांच्या गुहेत रहायला आल्याचे सांगितले. सर्व गोष्टी ऐकून घेतल्यावर हरिहरराव म्हणाले– "त्याला संन्यास घ्यावासा कां वाटतो आहे कळत नाही!"

"ते मला माहीत नाही. त्याला आयुष्याचा वीट आला आहे. हे वैराग्य किती दिवस टिकेल हे नाही मला माहीत. तुम्ही जाऊन भेटून विचारा पाहिजे तर. आला परत तर घेऊन या. पण तो परत येईलसे मला नाही वाटत. परंतु तुम्ही जर मधूनमधून येऊन भेटत राहलात तर त्याचे मन कदाचित पालटेलही." असे सांगून श्रद्धानंद निघून गेले.

[illegible] मुलाला भेटायला गेले. आईवडिलांनी डोळ्यात पाणी आणून मुलाला परत चलायला सांगून पाहिले, परंतु त्याचे मन पालटले नाही.

रामू जमिनीवरच झोपत असल्याचे कळल्यावर हरिहररावांना राहवले नाही. त्यांनी एक गादी व पांघरूण नोकराकरवी गुहेत पाठवून दिले. श्रद्धानंद खातात ते अन्न रामूला कसे रुचेल असा विचार करून रामूची आई त्याच्यासाठी निरनिराळी पक्वान्नें तयार करून दररोज पाठवू लागली.

रामूचा बिछाना घालून द्यायला एक गडी दररोज येत असे. एके दिवशी तो पुटपुटू लागला–"आमच्या छोटया मालकांना काय झालं आहे कळेना. संन्यासी झाले आहेत आणि मला डोंगर चढून दररोज यावं लागतं आहे, अंथरुणा पांघरुणाची व्यवस्था करून द्यायला."

ते ऐकून रामूच्या मनात अंथरुणापांघरुणाची इच्छा राहिली नाही. त्याने आपला बिछाना गुंडाळून घेऊन जायला गड्याला सांगितले आणि श्रद्धानंदांना म्हणाला– "आजपासून मी आपल्यासारखाच जमिनीवर झोपणार आहे."

"तरमग तू आजपासून 'शय्यासंन्यासी' झालास." श्रद्धानंद म्हणाले.

आणखी काही दिवस लोटले. रामूला आढळून आले की, त्याच्यासाठी जेवण घेऊन येणारा गडीदेखील कुरकुर करू लागला आहे. तेव्हां त्याने श्रद्धानंदांना सांगितले की,





मला आजपासून स्वादिष्ट भोजन करण्याची इच्छा नाही. आपण जे खातां तेच मी खाईन." त्यानंतर त्याने जेवण आणण्याऱ्या नोकराला जेवण आणण्याची गरज नसल्याचे सांगितले.

श्रद्धानंदांनी रामूचे मन घट्ट होत चाललेले ओळखले आणि म्हणाले–"बेटा, तुझे मन हळूहळू परिपक्व होत चालले आहे, आतां तू 'स्वादसंन्यासी' झाला आहेस."

रामूला फार बरे वाटले. मुलाची विरक्ती वाढत चाललेली पाहून हरिहररावांनी मुलाची समजूत घालून त्याला घरी परतवून नेण्याचा प्रयत्न करून पाहिला. परंतु

शेवटी हरिहररावांनी मुलाला धमकी दिली की, तू पुन्हां एकदां विचार कर. बजावून ठेवतो तुला. तू घरी परत यायला तयार नसशील तर तुला घरातल्या इस्टेटीतली एक इंचभर जागा व एक पैसादेखील मिळणार नाही. तुला आयुष्यभर भीक मागत संन्यासी म्हणून रहावे लागेल."

रामूच्या आईने अशा मुलाला व्यर्थ जन्म दिल्याबद्दल नशिबाला नावे ठेवली.

परंतु रामू शांतपणे म्हणाला–"आई! तू उगाच कशाला मनाला एवढे लावून घेतेस? मला आजपासून कोणी आई नाही किंवा बाप नाही. पुन्हां कधी मला भेटायला यायची गरजच नाही."

नाइलाजाने रामूचे आईवडील हताश होऊन घरी परतले.

त्यानंतर रामूने श्रद्धानंदांना भेटून सर्व वृत्त सांगितले.

श्रद्धानंद म्हणाले–"बेटा! तू या क्षणापासून 'बांधवसंन्यासी' झालास, लवकरच पूर्ण संन्यासी होशील."

आणखी काही दिवस लोटले. अप्सरेसारखी एक सुंदर सोळासतरा वर्षांची मुलगी रामूला भेटायला आली. तिला पाहतांच रामू देहभान विसरला.

"तू [illegible]?" तिने विचारले.

रामूने लक्षपूर्वक तिला न्याहाळून पाहल्यावर विचारले–"अरे हो, तू नलिनी नव्हेस का?" ती त्याची मामेबहीण होती. पांच वर्षांपूर्वी त्याने तिला पाहिले होते. त्याच्या मामाचे कुटुंब पांच वर्षांपूर्वी दुसऱ्या एका गावी जाऊन राहू लागले होते.

"रामू! कालच आम्ही आलो. तू इकडे असल्याचे कळलं. मला राहवलं नाही म्हणून भेटायला आले." नलिनी म्हणाली.

"मी संन्यास घेतला आहे. मला घरदार आईबाप कोणी नाही." रामू म्हणाला.

"म्हणजे, तू एकटाच?" नलिनीने विचारले.

"मला कोणत्याही वस्तूची गरज नाही. येथल्या जीवनावर मला समाधान वाटते." रामू म्हणाला.

"तरमग माझं भविष्य संपलंच. मी तुला मनाने वरलं आहे." नलिनी म्हणाली.

"नलिनी तुझे माझ्यावर प्रेम आहे म्हणतेस? माझ्यात असे विशेष आहे तरी काय? माझ्यात काही नाही, म्हणून तर मी संन्यास घेतला आहे." रामू म्हणाला.

"रामू! असे कां म्हणतोस? तुला पाहिलं की पुन्हांपुन्हां भेटावेसे वाटते. तुझ्याशी बराच वेळ बोलत रहावेसे वाटते. तुझ्याशिवाय हे जग मला ओकंओकं वाटतं रामू! मग मी काय करू?" नलिनीने मन मोकळे करून विचारले.



नलिनी म्हणाली ते ऐकून रामूला आनंद झाला. तरी म्हणाला–"मी आतां सर्वस्वाचा त्याग केला आहे. तुला माझ्यापासून काय सुख मिळणार? तू माझा विचार सोडून दे. भेटावेसे वाटले तर उद्यां येऊन भेट."

त्या दिवशी रात्री रामूला झोप लागेना. तळमळत पडून होता जमिनीवर. त्याला वाटू लागले उद्यां नलिनी येईल का? आली तर किती बरे होईल? आणि नलिनी खरोखरच आली. तिला भेटल्यावर रामूला फार हलके वाटले.

"रामू, तुझ्याशिवाय मला घर खायला धावते. मी येथेच राहते तुझ्याबरोबर. मी सुद्धां संन्यास घ्यायचे ठरविले आहे." नलिनी म्हणाली.

त्यानंतर रामू श्रद्धानंद बसले होते तेथे गेला व मृदुस्वरात म्हणाला–"महात्मन्!"

"बेटा, काय पाहिजे तुला? या खेपेस आणखी कशाचा संन्यास घ्यायचा विचार आहे तुझा?" श्रद्धानंदांनी विचारले.

... घ्यावा म्हणतो." रामू म्हणाला.

श्रद्धानंद, रामू म्हणाला ते ऐकून चकित झाले. त्यानंतर रामूच्या तोंडी सर्व वृत्तांत ऐकून म्हणाले–"ठीक आहे, बेटा! जा, सुखाने रहा. आजपर्यंत तुझ्यावर खरे प्रेम कोणीच दाखविले नाही. म्हणून आयुष्याचा वीट आला होता तुला. तुला प्रेम करणारी एक तरुणी भेटली. तिच्या संगतीत तुला मानवत्व प्राप्त झाले, तुम्ही दोघे सुखी व्हा. तुमचे दोघांचे जीवन सुखी होवो."

रामूने श्रद्धानंदांच्या पायांवर मस्तक ठेवून प्रणाम केला आणि त्यांचे आशीर्वाद घेऊन नलिनीच्या बरोबर आपल्या घरी परत आला. रामूमध्ये झालेला बदल पाहून सर्वांना आनंद झाला आणि सर्वांनी त्याला आपल्या जीवनांत मिळवून घेतले. रामूच्या मनाचे समाधान झाले. त्यानंतर विधिवत् लग्न सोहोळा झाला. दोघांचा संसार सुखाचा झाला.





# व्यापाराचे गुपित

एका गावी सोमूशेट नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याने गांवकऱ्यांशी आपले चांगले संबंध ठेवले होते. म्हणून त्याला चांगले नावही मिळाले होते.

सोमूशेटला दोन मुलगे होते. त्याला वाटे की, त्याच्या मुलांनीही त्याच्या सारखेच चांगले नाव मिळवावे. त्याचा मोठा मुलगा लक्ष्मीपती बापाच्या शब्दाला मान देई आणि त्याच्या सूचनेप्रमाणे वागे. परंतु धाकटा काशीपती थोडा महत्वाकांक्षी होता, प्रत्येक गोष्टीत बापाच्या पावलावर पाऊल टाकून चालणे त्याला आवडत नसे. तो लक्षाधीश होण्याची स्वप्ने पहात असे.

सोमूशेटने ते ओळखले. त्याने त्याला सल्ला दिला–"बाबा रे! जो व्यापारी दुसऱ्याचे हित आपले हित मानतो तो सहजी लक्षाधीश होत नाही. परंतु बेइमानी करून व्यापार केला तर असली स्वप्ने साकार होऊ शकतात. माझ्या मते इमाने इतबारे व्यापार करून आयुष्य घालवावे हे बरे!"

परंतु काशीपतीला बापाचे म्हणणे जुन्या पद्धतीचे वाटले. तो म्हणाला–"बाबा, आजपर्यंत ज्या पद्धतीने आपण व्यापार करतो आहो, तो माझ्या मते व्यापारच नाही. आपण सुखाने आयुष्य घालवू शकत नाही. मी या गावात राहून यापुढे व्यापार करायला मुळीच तयार नाही."

काशीपती बापाबरोबर एकदां राजधानीस गेला होता. त्या शहराचे चित्र त्याच्या नजरेसमोर नाचत होते. ते शहर आतां पार बदलून गेले होते. मोठमोठ्या इमारती आणि रस्त्यावर नेहमी गर्दी, डोळ्यात खुपणारी दुकानांची दिवाबत्ती आणि सजावट, मोटारगाड्यांवर खचाखच



भरलेला माल आणि दुकानांतून नोटांची बंडले वगैरे पाहिल्यावर त्याचे डोळे फिरले. आपण बापासारखा भितरेपणाने व्यापार केला तर आयुष्यात कधीच डोकेवर काढता येणार नाही, असे त्याला वाटू लागले.

काशीपती घरी आल्यावर बापाला म्हणाला–"मी राजधानीत जाऊन व्यापार करायचे ठरविले आहे. म्हणून मला भांडवलाची गरज आहे. माझा वांटा मला द्या. मी जाणार आहे."

सोमूशेटला, मुलाला कसे समजावून सांगावे, कळेना. त्याने गावच्या कुळकर्ण्याचा सल्ला घेतला. कुळकर्णी विचार

शहरात जाऊन व्यापार करायचा आहे. त्याचा भ्रम निरास झाला पाहिजे. त्यासाठी तुला थोडे पैसे गमवावे लागले तरी चालेल. त्याला तू शहरात जाऊ दिले नाहीस तर त्याचा भ्रम वाढेल."

"मग आपल्या इस्टेटीचे वाटे केलेच पाहिजेत का कुळकर्णीसाहेब?" सोमूशेटने निराश होऊन विचारले.

"ते करायची गरज नाही, सोमूशेट!" असे सांगून कुळकर्ण्याने त्याला एक उपाय सुचवून निरोप दिला.

घरी परतल्यावर सोमूशेट मुलांना बोलावून म्हणाला–"मुलांनो! मी आपल्या इस्टेटीची वांटणी करण्याचे ठरविले आहे. काशीपतीला शहरात जाऊन व्यापार करायचा आहे. खुशाल जावे त्याने. परंतु आपल्या घराची खरी स्थिती जी आहे ती तुम्हां दोघांना कदाचित माहिती नसेल. आपल्या डोक्यावर कर्जाचे मोठे ओझे आहे, हे मी तुम्हांला कधी सांगितले नव्हते. परंतु आतां ते मी किती दिवस लपवू? आपण इस्टेटीच्या वांटण्या करण्याचे ठरवितांच सर्व सावकार कर्ज वसुलीसाठी दारासमोर येऊन उभे राहतील. कर्ज फेडल्यावर जे उरेल त्याची वांटणी करून घेऊ."

असे सांगून सोमूशेट दोघां मुलांना-

कुळकर्ण्याने दोघां मुलांना बापाबरोबर बसायला सांगून एक जुनी खतावणी आणून त्यांच्यासमोर ठेवली.

ती पाहून काशीपतीची वाचाच बंद झाली. तो बापावर उलटला व म्हणाला–"बाबा! तुम्ही उगीच एवढे कर्जाचे ओझे वाढवून कशाला हो ठेवलेत? आणि आजपर्यंत ते तुम्ही कां नाही फेडलेत?"

कुळकर्णी शांतपणे म्हणाला–"अरे मुला! तुझे बाबा इमान सोडणारा माणूस नाही. त्यांच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. मला तुम्हां सर्वांना धक्के मारून घरांबाहेर लावतां आले असते."

बापाच्या या खुळसटपणाच्या व्यापारामुळे आपल्या सर्व महत्वाकांक्षांवर पाणी फिरणार असे काशीपतीला वाटू लागले. तो म्हणाला–"हे पहा, कुळकर्णीकाका! मी शहरात जाऊन म्हणूनच मोठा व्यापार करण्याचे ठरविले होते. परंतु मला या गोष्टीची कल्पनाही नव्हती की बाबांनी इतके कर्ज वाढवून ठेवले असेल. मग तुम्हीच काही तरी मार्ग काढा. माणसासारखं या जगात जगायला काही तरी उपाय केलाच पाहिजे मला. या आयुष्याचा मला वीट आला आहे."

"असा घाबरून जाऊ नकोस रे! तुझ्यासारखा कर्तबगार मुलगा असल्यावर बापाचे कर्जही फिटेल आणि घरातलं दारिद्र्य कायमचे जाईल. म्हणून मी तुला भांडवल पुरवितो!" असे सांगून कुळकर्ण्याने काशी-





पतीला दोन हजार रुपये दिले व म्हणाला– "समज, व्यापारात कधी खोट आली आणि हे पैसे बुडाले तरी काळजी करू नकोस. माझ्याकडे ये. मी तुला आणखी पैसे देईन. कां कोणास ठाऊक तुझ्या कर्तबगारीवर माझा विश्वास वाढला आहे."

काशीपतीला स्वतःच्या कानांवर विश्वास होईना. तो कुळकर्ण्यांना म्हणाला–"काका! तुमचे कर्ज फेडणे तितकेसे जड जाणार नाही मला. एका वर्षाच्या आत या दोन हजारांचे चार हजार करतो मी."

काशीपती निघून गेल्यावर कुळकर्णी ते. त्याचं डोकं ताळ्यावर तरी येईल, नाही तर चार पैसे मिळवून तरी येईल."

सोमूशेट म्हणाला–"दोन्ही पैकी काही ही होवो, शेवटी सर्वांचे बरे व्हावे म्हणजे झाले."

काशीपती दोन हजार रुपये घेऊन शहरात गेला. बाजारपेठेत एका मुख्य स्थानी त्याने एक दुकान भाड्याने घेतले. इतर व्यापाऱ्यांशी सल्ला करून त्याने व्यापारासाठी चिंच आणि हळद खरेदी करून त्या दोन्ही पदार्थांच्या व्यापारात चांगले पैसे मिळविले. त्याने इतर व्यापाऱ्यांच्या मानाने कमी दरात माल विकला होता. त्याचा सर्व माल खपला व इतर व्यापाऱ्यांचा त्या मानाने कमी विकला गेला. व्यापाऱ्यांना मनात त्या गोष्टीचा थोडा राग आला. परंतु त्यांनी त्याच्या व्यापारातल्या कौशल्याची खोटी वाखाणणी केली. म्हणाले–"पुढे तुम्ही मोठे शेट होणार आमच्या बाजारपेठेत!" वास्तविक त्यांनी त्याला बुडीत कसे काढायचे याचा विचार सुरू केला होता.

परंतु काशीपतीला त्यांचा कावेबाजपणा कळला नाही आणि ते म्हणाले ते सर्व खरे वाटले. तो म्हणाला–"अहो, तुम्ही सर्वांनी सल्ला दिलात व प्रोत्साहन दिलेत [illegible] खरेदी करावयाचा, असे तुम्हांला वाटते?" काशीपतीने विचारले.

"तुमच्या कडची हळद आणि चिंच लहान लहान व्यापाऱ्यांनी खूप खरेदी करून ठेवली आहे. तेव्हां तुम्ही या खेपेस कांदे खरेदी करून सांठवा. पुढे किंमती वाढतील." व्यापाऱ्यांनी सल्ला दिला.

काशीपतीने त्यांचे आभार मानले आणि दुसऱ्या दिवशी दूरदूरच्या मंड्यात जाऊन पुष्कळ कांदा खरेदी करून सांठवला.

खरोखरी त्या काळात कांद्याला एवढी मागणी नव्हती. त्याशिवाय कांद्याची आवक बाजारात मोठ्या प्रमाणात होत होती. म्हणून इतर व्यापारी स्वस्त दराने कांदा विकत होते. कांद्याचा भाव उतरलेला पाहून काशीपती घाबरला. कारण त्याने ज्या किमतीने कांदा खरेदी करून सांठवला होता त्यापेक्षा कमी दराने बाजारात माल विकला जात होता. त्याने व्यापाऱ्यांना विचारले–"इतका स्वस्त कसा हो तुम्ही कांदा विकतां आहां?"

"कारण आम्हांला स्वस्त दराने कांदा मिळाला होता. तुम्ही घाई करून जास्त दराने कांदा खरेदी करून सांठविलात. तरी भिऊ नका. पुढे किंमती वाढतील. तो पर्यंत दम धरा. व्यापारात कधी नुकसान होणार नाही तुमचे. आम्हांलाच तुमच्याकडे विकत घ्यायला यावे लागेल." व्यापारी म्हणाले.



काशीपतीला ते सर्व खरे वाटले. त्याने [illegible] ज्या खोल्यांतून कांद्यांची पोती भरून ठेवली होती त्या खोल्यांना कुलपे लावली. परंतु दोन तीन महिने दर चढले नाहीत. त्याने व्यापाऱ्यांना कारण विचारले. ते म्हणाले– "मित्रा! व्यापारात घाईगर्दीने काम चालत नाही, हिंमत हारतां कामा नये." सर्व मनात हसत होते. आणखी काही दिवसांनी काशीपतीने सांठवून ठेवलेल्या कांद्याच्या खोल्यातून वाण येऊ लागली. लोक ओरडू लागले. काही लोकांनी कुलपे तोडून कांदे रस्त्यावर फेकण्याच्या धमक्या द्यायला सुरवात केली.

काशीपतीनं खोल्या उघडून पाहिल्या तर एकही कांदा खाण्यालायक उरला नव्हता.

व्यापारी नावे ठेवू लागले–"अहो, कांदा उघड्यावर ठेवला नाहीतर कुजतो, एवढेसुद्धां तुम्हांला कळू नये, म्हणजे आश्चर्यच आहे बुवा! मग तुम्ही व्यापार काय करणार?"

तेव्हां काशीपतीचे डोळे उघडले. व्यापाऱ्यांनी त्याला फसविले व गोत्यात [illegible] लबाडी, फसवेगिरी आहे. पेठेत इमानदार माणूस मिळणेच कठीण.

शेवटी काशीपतीने दुकानातले आणि खोल्यांमधले सर्व कांदे बाहेर फेकविले आणि रिकाम्या हाताने घरी परतला.

कुळकर्ण्याने त्याला विचारले–"काय रे बुवा, आणखी पैसे हवे आहेत का?"

"नको काका! तुमचं कर्ज फेडू शकलो तर मिळवली. कान धरला!" काशीपतीने घडलेले वृत्त सांगितले.

"अस्सं! बरेच लवकर डोळे उघडले म्हणावयाचे. तुझे फिरलेले डोके ठिकाणावर आणण्यासाठी मीच तुझ्या बापाला सांगून तुला कर्ज देण्याचे नाटक केले. सोमूशेटचेच पैसे मी तुला दिले होते. तुझ्या वडिलांवर काही कर्ज वगैरे नाही." कुळकर्णी म्हणाला.

ते ऐकल्यावर डोक्यावरचे एक ओझे उतरल्यासारखे वाटले काशीपतीला. त्यानंतर तो बापाच्या शब्दाबाहेर कधी वागला नाही.



# किफायतशीर हिस्सेदार

एका मोठ्या गावाच्या चौकात एक फळाचे दुकान होते. दुकानदाराने आंबे ठेवले होते विकायला. एके दिवशी एका गरीब तरुण मुलाने दुकानदाराकडे काही काम देता का दुकानावर म्हणून विचारले. दुकानदाराने त्याला नोकराची गरज नसल्याचे सांगितले.

तेव्हां तो म्हणाला–"तरमग असं करता का? तुमच्या दुकानातले बारीक बारीक आंबे द्या मला विकायला. मी बाजूला विकायला बसेन. उरलेले आंबे व पैसे परत आणून देईन. मला तुम्ही त्यातले मनाला वाटतील तेवढे द्या." व्यापाऱ्याने काही फळे विकायला काढून दिली. तो माणूस जवळच फळे विकायला बसला.

त्या दिवशी दुकानात नित्यापेक्षा जास्त विक्री झाली. लहान फळे नेणाऱ्या माणसाने संध्याकाळी सर्व फळे परत केली व म्हणाला–"माझ्या मेहनतीबद्दल मर्जीला वाटेल ते द्या."

दुकानदार चकित होऊन म्हणाला–"गृहस्था, तू तर एकदेखील फळ विकले नाहीस!"

"तुमचं म्हणणे बरोबर आहे. परंतु तुमच्या दुकानातली फळे विकली गेली माझ्याच मुळे. मी लहान फळांचा भाव तुमच्या मोठ्या फळांपेक्षा जास्त सांगितला. म्हणून तुमच्या दुकानातली फळे विकली गेली." तो माणूस म्हणाला.

दुकानदार निरुत्तर झाला. त्याने त्याला थोडे पैसे देऊन निरोप दिला.





# प्रायश्चित्त

एका गावीं विठोबाचें देऊळ होतें. जवळपासच्या पंचक्रोशींतले लोक देवपुजेसाठी त्या देवळात येत.

एके दिवशी रात्री पुजारी आरती वगैरे आटोपल्यावर गर्भागाराचं दार बंद करून हातांत कंदील घेऊन बाहेर आला तेव्हां एक गरीब माणूस हात जोडून विनवण्या करू लागला–"गुरुजी! एकदां गर्भागाराचं दार उघडतां का? देवाचं दर्शन घेऊन निघून जाईन."

पुजाऱ्याने त्या माणसाला वरपासून खालपर्यंत एकदां पाहिले आणि म्हणाला– "देवाची आरती झाली आणि शय्या वगैरे सजवून देवाला शय्या गृहात पोचवून आलो आहे! आतां उद्यांच दार उघडेल."

"म्हणजे रात्रभर मला ताटकळत बसावे लागेल म्हणता?" तो म्हातारा पुटपुटत म्हणाला.

"आज रात्रभर तू या चौथऱ्यावर पडून रहा." असे सांगून पुजारी निघून गेला. म्हातारा चाचपडत अंधारात चौथऱ्यावर जाऊन बसला. त्याला त्याचे पूर्व आयुष्य आठवले.

त्या म्हाताऱ्याचे नाव पांडुरंगराव होते. लग्न करून त्याने संसार थाटला. परंतु पुरेसे पैसे त्याला मिळत नव्हते. त्याचा एक म्हातारा नातेवाईक होता. तो मेल्यावर त्याची सर्व इस्टेट आपल्यालांच मिळेल हे पांडुरंगरावाला माहीत होते. परंतु जिवंत असेपर्यंत त्या म्हाताऱ्या नातेवाइकाने पांडुरंगरावांना जवळ फिरकू दिले नाही. पांडुरंग व त्याची बायको रखुमाबाई वाट पहात होते की, म्हातारा केव्हां मरतो आणि केव्हां त्याची संपत्ती मिळते.

शेवटी म्हातारा एकदांचा मेला. ती बातमी कळतांच नवराबायको त्याच्या [illegible]ता-ऱ्याचा दहनसंकार आदि यथासांग केला.

त्यानंतर दोघां नवराबायकोंनी सर्व घर हुडकून चाळून पाहिले, परंतु एक फुटकी कवडीदेखील घरात कोठे मिळाली नाही. देवघरात फार फार जुन्या काळातली एक कांस्याची विठोबाची मूर्त सोडून दुसरी कोणतीही मूल्यवान वस्तू सापडली नाही. पांडुरंगरावांना कळेना की, म्हाताऱ्याने आपली सर्वसंपत्ती कोठे दडवून ठेवली आहे.

'ही तांब्याची मूर्त घेऊन तिच्यावर कपाळ आपटायचं का?' असा विचार करून पांडुरंगराव ती दूर फेकून द्यायला निघाला. परंतु पांडुरंगरावाच्या बायकोने त्यांचा हात धरून त्यांना थांबविले व म्हणाली–"आपण जरा विचाराने काम घेतले तर पुष्कळ काही मिळू शकेल." असे सांगून तिने पांडुरंगरावांना एक युक्ती सुचविली.

पांडुरंगरावांनी बायकोच्या सुपीक डोक्याची खूप वाखाणणी केली. एका जुन्या कापडात ती गुंडाळून ते ती मूर्त आपल्या घरी घेऊन आले.

दुसऱ्या दिवशी वणव्यासारखी गावभर बातमी पसरली की पांडुरंगरावांच्या परसातल्या बागेत खणताना विठ्ठलाची मूर्त सापडली आहे. पांडुरंगरावांच्या बायकोच्या अंगात देव आला आहे. पांडुरंगरावांच्या घरांत देवदर्शनासाठी लोकांची गर्दी लोटली.














अंधविश्वासाने लोकांनी दक्षिणा व भेटी आणून देवासमोर ठेवल्या.

पांडुरंगरावांची बायको डोळे मिटून केस पिंजारून अंगात आल्यासारखी घुमत बसलेली होती. लोक प्रश्न विचारीत व ती देवानेच दिलेले उत्तर म्हणून उत्तर देई. भक्त तर देव पावला म्हणून खूष होते. शेवटी तिला अशक्तपणा आला व ती बेशुद्ध होऊन पडली. लोकांना वाटले देवाने तिला आतां मुक्त केले आहे आणि आपा-पल्या घरी निघून गेले. नंतर दोघां नवरा-बायकोंनी दक्षिणा व भेटी उचलून ठेवल्या. पांडुरंगराव म्हणाला–"याला म्हणतात युक्ती!"

नंतर त्यांनी आपल्या घरात त्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा केली. दर शनिवारी रखमा-बाईच्या अंगात देव येई. हळूहळू जवळ-पासच्या गावोगाव बातमी पसरली. लोक दर्शनाला येऊ लागले. मोठी मिळकत होऊ लागली.

आतां पांडुरंगरावांच्या मनात आणखी एक गोष्ट आली. लहानलहान भेटी आणि दक्षिणा मिळाल्यातरी काय उपयोग? एक हंडा ठेवून देवाच्या देवळासाठी भक्तांनी भेटी द्याव्या असे जाहीर केले. रखमाबाईने पांडुरंगरावांच्या या युक्तीची स्तुती केली.

दुसऱ्या दिवशी पांडुरंगराव एक मोठा थोरला तांब्याचा हंडा घेऊन आला. हंड्याला एक कापड हळदीत भिजवून बांधण्यात आले. रखमाई देवाच्या वाणीने भक्तांनी देवळासाठी पैसे द्यावेत असे सांगू लागली. "तुमच्यापैकी माझा भक्त असेल, फक्त त्यानेच या हंड्यात पैसे टाकावेत. परंतु प्रामाणिकपणाने मिळविलेली रक्कमच यात टाकावी, नाही तर ती खापराच्या तुकड्यात बदलून जाईल.

हंड्यात खूप पैसे जमा झाले. सहा महिन्यांनी देऊळ बांधायला पुरतील एवढे पैसे जमा झाले. "एवढे पैसे आयुष्यभर आपल्याला पुरतील. गाव सोडून पळून जाऊ या." नवरा बायकोने ठरविले.

[illegible] भरून तो हंडा पळवून नेणे शक्य नव्हते. कारण तेथे दररोज लोकांची ये-जा चालू होती. खूप विचार करून रखमाबाईने अगदी तेवढाच आणि तसाच दुसरा एक हंडा आणविला त्याच्यावर हळदीत रंगवलेले कापड गुंडाळले. तो हंडा मूर्तीच्या शेजारी आणून ठेवला. खरा हंडा उचलून जुन्या फाटक्या कपडयात गुंडाळून दुसरीकडे ठेवण्याचा विचार केला.

तिने सर्व बेत कसा पार पाडायचा हे नवऱ्याला सांगितले. म्हणाली–"मध्यरात्री आपण या घरातून पाय काढायचा. लोकांना वाटेल की हंड्यात बेइमानीने मिळवलेली रक्कम पडल्याने सर्व पैसे खापरात बदलले आहेत. म्हणून आपण दोघे दु:खी व निराश होऊन गाव सोडून गेली आहो.

संध्याकाळी परसातून खापरे गोळा करून पांडुरंगरावाने नव्या हंड्यात भरली. जुना हंडा दाराआड नेऊन ठेवला आणि नवा हंडा मूर्तीजवळ नेऊन ठेवला. मध्यंतरी रखमाबाई झोपली.

नंतर पांडुरंगरावाला शंका वाटली. भक्तांची सर्व कमाई बेमाइनीची असणे शक्य नाही. म्हणून त्याने जुन्या हंड्यातली काही नाणी काढून नव्या हंतचातल्या खापरांवर ठेवली आणि तोही झोपला.

मध्यरात्रीच्या सुमारास रखमाबाईची झोप मोडली. तिने नवऱ्याला जागे केले. उजाडण्यापूर्वी पळून जायचे होते. नाहीतर













शेतावर जाणारे लोक त्यांना पळून जाताना पाहतील.

पांडुरंगराव घाईघाईने उठला दाराच्या आड फाटक्या कापडात गुंडाळून ठेवलेला हंडा डोक्यावर उचलून घेऊन दोघं नवरा-बायको निघाली. उजाडण्यापूर्वी दोघं गावापासून पुष्कळच दूर निघून गेली होती. दुपारी एका निर्जन स्थानी दोघांनी थोडे खाऊन-पिऊन घेतले. थोडी विश्रांती घेतल्यानंतर त्यांनी दुसऱ्या गावी पोचल्यावर खर्चासाठी थोडे पैसे हवेत म्हणून हंडा उघडून पाहिला.

दोघे एकदम किंकाळी फोडून ओरडले. कारण हंड्यात सर्व खापरेच होती व थोडी वर तोंडाजवळ नाणी होती.

त्याचं असं झालं. रखमाबाईने झोप मोडल्यावर अर्धवट झोपेत हात घालून मूर्तीजवळच्या हंड्यात पाहिले की हंडे बदलून ठेवले आहेत की नाही. तेव्हां तिच्या हाताला नाणी लागली. तिने हंड्यांची अदलाबदल केली. खरा हंडा मूर्तीजवळ आणि नवा दाराआड ठेवला.

त्या दिवसापासून तिने जे अंथरूण धरले ते मेल्यावरच सुटलं.

पांडुरंगराव मेला नाही. परंतु त्याचे जीवित कुत्र्याहून वाईट गेले. त्याला केलेल्या पापाबद्दल पश्चात्ताप होऊ लागला. त्याला वाटू लागलं की खऱ्या हंड्यातले धन वापरून गावकऱ्यांनी देऊळ बांधलं असलं तर देवाचं दर्शन करून देवासमोर नाक घासून देवाजवळ क्षमा मागायची. असा विचार करून तो अंगात शक्ती उरली नव्हती तरी कसाबसा आपल्या गावी आला. त्याच्या घराच्या जागी एक सुंदर देवालय बांधलेले त्याला दिसले. त्याला परमानंद झाला. परंतु देवाचे दर्शन त्याच्या नशिबात नव्हते.

पांडुरंगराव, उजाडल्यावर दर्शन होईल व देवाची क्षमा वागून पापमुक्त करायला मागणे घालता येईल, या विचाराने चौथऱ्यावर झोपला तो पुन्हां उठला नाही. तो वैकुंठलोकी गेला असावा का?





# चोर आणि साव

एका गावी गोविंदराव नावाच्या एका जमीनदाराला शेखर नावाचा एक मुलगा होता. मुलाचे लग्नाचे वय झाले होते. तो रात्री घराबाहेर घराच्या मागच्या बाजूला एका पिंपळाच्या पारावर झोपत असे. पक्ष्यांची किलबिलाट सुरू झाली की तो प्रसन्न चित्ताने उठे.

एके दिवशी शेखर जागा झाला आणि झाडावर त्याला काय दिसलं कोणास ठाऊक, मोठ्याने ओरडला आणि बेशुद्ध होऊन पडला. मुलाचा आवाज ओळखून गोविंदराव धावले आणि बेशुद्धावस्थेत पडलेल्या मुलाला उचलून घेऊन आले.

थोड्या वेळाने शेखर शुद्धीवर आला, परंतु भ्रमिष्टासारखा कोठेतरी पहात तोंडाला आले ते बडबडू लागला. शेखरच्या अनपेक्षित आजाराविषयी गोविंदराव आणखी एका कारणाने घाबरले. त्याच दिवशी त्याच्याशी ज्या मुलीचे लग्न ठरलं होतं त्या मुलीचे आईवडील साखरपुडा करायला येणार होते. गोविंदरावांनी वधू पित्याकडे एका आठवड्यानंतर यायला निरोप पाठविला आणि शेजारचे वैद्य माधवशास्त्री यांना औषधोपचार करायला बोलावून आणले.

वैद्यबुवांनी नाडी तपासून शेखरला कसलाच आजार नसल्याचे सांगून भूतपिशाच्च बाधा झाली असावी, पिंपळावरच्या मुंजाला त्याने पाहला असावा आणि त्याला उतरवायला मठातल्या साधूकडे न्यायला सुचविले.

नंतर दोघे मुलाला घेऊन मठात गेले. त्या वेळी एकजण साधूला प्रदक्षिणा घालीत होता. त्याच्या मानेवर भूत बसले आहे असे लोक सांगत होते. साधूने तीन वेळ हातातली कुबडी त्या माणसाच्या डोक्याला लावली आणि काय गंमत पहा, लगेच







भूत उतरले. ते दृश्य पाहून गोविंदरावांचा साधूवर विश्वास बसला.

साधूने सर्व ऐकून घेतले व म्हणाला– "तुमच्या मुलाच्या मानेवर मुंजा किंवा भूतप्रेत काहीच बसलेले नाही. त्याचा कोणीतरी शत्रू आहे. त्याने त्याच्यावर मंत्र टाकलेला दिसतो आहे. हे काम कोणत्यातरी मांत्रिकाचेच असले पाहिजे. किती मांत्रिक आहेत गावात?"

गोविंदराव म्हणाले–"आमच्या गावात दोघेच मांत्रिक आहेत–एक शंभू आणि दुसरा खंडू."

"तुम्ही त्यांच्याकडून मुलाचा इलाज करवा. जो मांत्रिक इलाज करायला तयार [illegible] साधू म्हणाला.

गोविंदराव व माधवशास्त्र्यांनी नोकराच्या हाती निरोप पाठवून दोघां मांत्रिकांना बोलावून घेतले. शंभू ने शेखरला तपासून त्याचा इलाज करणे त्याला शक्य नसल्याचे सांगून टाकले. तो निघून गेल्यावर खंडू म्हणाला–"मी करतो याचा इलाज. आज रात्री मुलाच्या सर्वांगाला एक मंत्रवलेले उटण लावून हे काम कोणाचं आहे ते मी सांगतो. शंभू पैशासाठी आशा लावून बसतो. मला वाटते त्यानेच हे काम केले असावे. म्हणून त्याने गुपचुप येथून पाय काढला. मी त्याचं बिंग बाहेर काढतो."

दोघां मांत्रिकांचे परस्परांशी वैर होते धंद्यात हेवेदावे असतातच त्यानंतर गोविंदरावांनी खंडूला घरी पाठवून दिले आणि साधूकडे जाऊन खंडू इलाज करायला तयार असल्याचे सांगितले आणि त्याचा शंभूवत संशय असल्याचेही सांगितले.

साधूने विचारले–"तुम्हांला शंभूवर विश्वास आहे का? दिव्य दृष्टीने मला तरी ते काम खंडूचे असावेसे वाटते आहे. आज रात्री उटण लावण्याचे मिश काढून तो तुमच्या मुलाचा काटा दूर करणार आहे. माझा सल्ला आहे, तुम्ही आपल्या मुलाला वांचवा."

[illegible] बून सांगितले की त्यासाठी त्यांनी काय काय केले पाहिजे.

त्या दिवशी रात्री गोविंदराव व माधवशास्त्री दोघां जणांना बरोबर घेऊन खंडूच्या घरी गेले आणि जवळ अडोशाला एका जागी लपून बसले.

मध्यरात्र संपल्यावर खंडूने आपल्या घरातल्या मधल्या खोलीत रांगोळी घातली आणि मधोमध एक मेलेला साप गुंडाळी करून ठेवला. त्याच्यावर एक मेलेल्या माणसाच्या डोक्याची कवची ठेवली. कवचीवर एक लिंबू ठेवले. नंतर धूप लावला. हे सर्व झाल्यावर तो समोर बसणार इतक्यात गोविंदराव व माधवशास्त्री दोघां साथीदारांसह घरात शिरले. खंडूला खांबाला बांधून खूप बडविले आणि त्याला फरफटत ओढून साधूसमोर उभे केले. खंडू या अनपेक्षित हल्ल्याने अर्धमेला झाला.

सर्वांनी खंडूला आपली चूक मान्य करायला सांगितले. परंतु खंडू रडत म्हणाला– "देवाची शपथ, मी मंत्र टाकला नाही. हे कोणाचे काम असावे हेदेखील मला माहीत नाही. मी उटण फासून त्याच्याच शोध लावणार होतो. परंतु माझ्या प्रयत्नावर पाणी फिरले आणि या लोकांनी मला धरून इकडे आणले.

गोविंदरावांचे नोकर खंडूला आणखी बडवणार होते, त्याचवेळी शेखरला बरोबर घेऊन शंभू आला आणि दरडावून म्हणाला–



"त्या बिचाऱ्याला कां मारतां? पहिल्या साधूचे सोंग करून मंत्र टाकणाऱ्या या साधूला बडवा. हा शेजारगांवचा मांत्रिक आहे आणि साधूचे सोंग करून आला आहे. याने आम्हां दोघांना बदनाम करण्यासाठी हे जाळे टाकले होते. मला कित्येक दिवसांपासून याच्या ढोंगीपणाचा संशय होता."

ते ऐकून तो साधू तेथून पाय काढू लागला. परंतु शंभू आणि शेखरने त्याला धरून खूप झोडपले.

तो ओरडू लागला–"होय, मी लोभाला बळी पडून हे काम केलं होतं. परंतु माझ्याकडून हे काम करविणारा दुष्ट येथेच हजर आहे." असे सांगून त्याने माधवशास्त्र्यांकडे बोटाने खूण केली.

माधवशास्त्र्याचा चेहरा कावराबावरा झाला. त्याच्या तोंड वाटे एक शब्दही उमटेना.

गोविंदरावांनी शास्त्र्याला दरडावून विचारले–"शास्त्रीबुवा! तुम्ही केलेत हे काम?"

शास्त्र्यांच्या चिक्कूपणाची माहिती आपल्या सर्वांना आहेच. यांच्या मनात आपल्या एकुलत्या एका मुलीला माझ्या गळ्यात बांधायचे होते. लग्न करायचे म्हणजे खर्च करावा लागणारच. परंतु एक दमडी गाठीची खर्च केल्याशिवाय मला हे आपला जांवई करून घेण्याच्या खटपटीत होते. मी वेडा ठरलो तर कोण येईल मुलगी द्यायला? आपल्या मुलीशी लग्न करून टाकल्यावर मला पुन्हां माणसांत आणता येईल या विचाराने त्यांनी रचलेले हे सर्व नाटक होते. रात्री पिंपळावर काहीतरी भयंकर आकृती दिसली मला आणि मतिभ्रम झाला. परंतु आतां शंभूच्या कृपेने मी पुन्हां चांगला शुद्धीवर आलो आहे."

माधवशास्त्र्याची मान खाली झाली. त्यांचे डोके ताळ्यावर आले व त्यांनी खूप खर्च करून शेखरशीच आपल्या मुलीचे लग्न करून दिले.





# महाबली हनुमान

महोदर म्हणाला ते ऐकून कुंभकर्ण राक्षसांबरोबर रावणाच्या महालात गेला. त्यापूर्वीच काही राक्षसांनी पुढे जाऊन रावणासमोर निवेदन केले–"कुंभकर्ण झोपेतून जागे झाले आहेत. त्यांनी सरळ रणांगणावर जावे म्हणतां की त्यांना प्रथम आपल्याला भेटायला घेऊन येऊ म्हणतां?"

"त्याला भेटायचं आहे मला. म्हणून प्रेमादराने त्याला इकडे घेऊन या." रावणाने आज्ञा केली. राक्षसांच्या तोंडी रावणाचा संदेश मिळतांच कुंभकर्ण रावणाला भेटायला त्याच्या महालात गेला.

लंकानगरीच्या कोटाबाहेर वानरांना तो पर्वताकार देहधारी कुंभकर्ण दिसला आणि ते घाबरून पळू लागले. रामानेदेखील कुंभकर्णाला पाहून वानरसैन्य पळू लागलेले पाहिले. तेव्हां त्याने बिभीषणाला विचारले–"एका मोठ्या ढगासारखी दिसणारी ती व्यक्ती कोण बरे आहे?"

बिभीषण रामचंद्राला म्हणाला–"तो विश्रवसूचा मुलगा कुंभकर्ण आहे. त्याने युद्धभूमीवर प्रत्यक्ष यमाला व इंद्राला पळवून लावले होते. त्याच्या एवढे पर्वताकार शरीर इतर कोणाही राक्षसाला मिळालेले नाही. इतर राक्षसांनी वरदान मिळवून आपली शक्ति व बळपराक्रम वाढविला. परंतु हा जन्मापासूनच बलवान व पराक्रमी आहे. जन्मल्याबरोबर याने भूक लागताच सहस्रावधी प्राण्यांचे भक्षण



केले. ते पाहून प्रजा घाबरली आणि इंद्राच्या आश्रयाला धावली.

इंद्राने संतापून कुंभकर्णावर वज्रायुध टाकले. तेव्हां कुंभकर्णाने हुंकार केला. तेव्हां तो आवाज ऐकून प्रजा जास्तच घाबरून गेली. त्यानंतर कुंभकर्णाने इंद्राच्या ऐरावताचा सुळाच उपटला आणि त्याचा प्रहार इंद्राच्या छातीवर केला. इंद्र प्रजे-बरोबर ब्रह्मदेवाकडे जाऊन शरण मागू लागला. ब्रह्मदेवाने सर्व राक्षसांना बोला-विले. त्यात कुंभकर्णाला पाहून ब्रह्मदेवही घाबरून गेला. ब्रह्मदेव कुंभकर्णाला म्हणाला– "काय रे मूर्खा! त्रिलोकाचा नाश करण्या-साठी का रे विश्रवसूने तुला जन्म दिला?

तुला जगाचे भानच राहणार नाही." ब्रह्म-देवाच्या शापाने कुंभकर्ण तत्काळ जमिनीवर पडला. ते पाहून रावणाने हात जोडून ब्रह्मदेवाजवळ निवेदन केले–"हे पितामह देवा तो आपला प्रपौत्रच आहे. त्याला आपण असा शाप देणे बरोबर नाही. परंतु तो खोटादेखील होणे शक्य नाही. कुंभकर्ण झोपला आहे, त्यात काही बिघडले नाही. परंतु त्याच्या झोपण्याजागण्याच्या वेळा आपण ठरवून द्याव्या." तेव्हां ब्रह्मदेवाने असा नियम घालून दिला की, कुंभकर्ण सहा महिने झोपेल व फक्त एकच दिवस जागा राहील. जागा झाल्याबरोबर त्याला समोर जो कोणी आणि जे काही दिसेल त्याचे भक्षण करील.

"रामचंद्रा! आपला पराक्रम पाहून रावणाने कुंभकर्णाला जागा केला आहे. तो दिसायला भयंकर आहे आणि पराक्रमी पण आहे. तो वानरांना खायला येणार आहे. त्याला पाहतांच पळणारे हे वानर त्याच्याशी युद्ध कसे काय करणार? त्यांना समजावून सांगायला हवे की, कुंभकर्ण हे एक चालते फिरते यंत्र आहे, म्हणजे त्यांच्या मनांतली भीती कमी होईल."

बिभीषण म्हणाला ते ऐकून रामाने नीलवानराला आज्ञा केली की लंकेच्या



सर्व द्वारांवर एकदम हल्ला करावा. तेव्हां गवाक्ष, शरभ, हनुमान, अंगद आदि वानर पर्वतशिखरे उपटून घेऊन युद्धाला निघाले.

तिकडे कुंभकर्ण अर्धवट झोपेतच रावणाच्या घरी गेला. रावण चिंतामग्न स्थितीत बसलेला होता. कुंभकर्णाला पाहून रावणाला परमानंद झाला. तो उठून कुंभकर्णाला कडकडून भेटला. दोघे आपापल्या जागी बसल्यावर कुंभकर्णाने रावणाला विचारले—"दादा! अशी कसली घाई होती रे, तू मला जागा करायला सांगितलेस? ज्या व्यक्तीमुळे तुला एवढी भीती वाटते आहे, त्याचे मरणजवळ येऊन ठेवले आहे."

उत्तरादाखल रावण म्हणाला—"रामचंद्राने लंकेवर स्वारी केल्यामुळे आपल्या राक्षसवंशावर हे संकट आले आहे. सुग्रीव व वानरसैन्य बरोबर घेऊन रामचंद्र समुद्र पार करून लंकेत आला आहे. त्याने राक्षसांचा संहार सुरू केला आहे. लंकेला वानरांचा गराडा पडला आहे. या युद्धांत आतांपर्यंत वानरवीरांपैकी एकदेखील मेला नाही. उलट त्यांच्या हाती अनेक राक्षसवीर प्राणास मुकले आहेत."

रावणाकडून सर्व गोष्टी ऐकून घेतल्यावर कुंभकर्ण हंसत म्हणाला—"मागे एकदां आपण यासाठी राजसभा बोलाविली होती. त्या वेळी जे जे होईल असे वाटले तेच होत आहे. सीतेचे अपहरण करून तू जे पापकर्म केले आहेस त्याचे हे फळ इतक्या लवकर दृष्टीस पडेल, असे मात्र वाटले नव्हते. या बाबतीत आपला धाकटा भाऊ बिभीषण याने जो सल्ला दिला होता तोच योग्य व अनुकरणीय होता."

रावण खवळून म्हणाला—"कुंभकर्णा! लक्षात ठेव, तू माझ्याहून लहान आहेस. लहान तोंडी मोठा घास शोभत नाही. ही उपदेश करण्याची वेळ नाही. पराक्रम दाखविण्याचीवेळ आहे."

"राक्षसराजा! मी आपला धाकटा भाऊ आहे, आत्मीय बंधु आहे! म्हणून आपल्या हिताची गोष्ट सांगणे माझे कर्तव्य होते, ते मी केले. आपल्याला ते गैर वाटत असेल तर मी पुन्हां ती गोष्ट काढणार नाही. मी आपल्या शक्तीचा पुरा वापर करून शत्रूचा संहार करीन. रामालक्ष्मणांचा वध करून वानरांना पळवून लावीन. आपल्या जवळच्या नातेवाइकांचा वध झाल्याने दुःखी झालेल्या राक्षसांना खूष करीन. मी जिवंत असेपर्यंत रामचंद्र राक्षस राजाच्या केसालाही धक्का पोचवू शकणार नाही." कुंभकर्णाने वचन दिले.

कुंभकर्ण म्हणाला ते ऐकून महोदर त्याची कान-उघाडणी करण्याचा स्वरात म्हणाला—"रावण ज्या वेळी सीतेचे अपहरण करायला निघाला होता तेव्हां आपण सर्वांनी त्याची पाठ थोपटली होती. आतां तू स्वतःच्या पराक्रमाच्या फुशारक्या मारून एकट्याने युद्धाला जाण्याची भाषा बोलतो आहेस! आमच्या लंकेत अनेक राक्षसवीरांचा एकट्या रामाने वध केला आहे. त्याचा तू एकट्याने वध करणार म्हणतो आहेस का? रामचंद्राच्या हाती हार खाऊन परतलेले राक्षसवीर त्याचे नाव ऐकून भयकंपित होत आहेत!"

त्यानंतर महोदर रावणाला म्हणाला—"आपण आमच्या पैकी काही जणांना



करू शकलो तर उत्तमच. नाही तर आम्ही परत येऊन मी रामचंद्राला गिळून टाकले अशी अफवा पसरवायची. आपण आनंदोत्सवाचे प्रदर्शन करावे. पति मेल्याबद्दल आपण सीतेच्या मनाचे सांत्वन करावे. गोड बोलून तिचे मन वळवावे. युद्ध केल्याशिवायच हा प्रश्न सुटेल."

महोदर म्हणाला ते ऐकून कुंभकर्णाचा क्रोधाग्नी भडकला. तो गरजला—"या खोट्या अफवा पसरविण्याच्या भानगडीत पडू नका. तुमच्या सारख्या मूर्खांचा सल्ला ऐकूनच रावणावर हा प्रसंग आला आहे. तुम्हांला युद्ध शब्द ऐकूनच कापरे भरते.











तुम्हांला काय कळते रे? तुमच्या सारख्या मूर्खांमुळेच लंकेची ही दुर्गति झाली आहे. खजिना रिकामा झाला. सैन्य नष्ट झाले. स्वतःच्या राजाला शत्रूवर यायला हवी अशा आपत्तीत तुम्ही ढकललं आहे. तुम्ही ज्या चुका केल्या, त्या सुधारण्यासाठी मी रणांगणावर जाणार आहे."

कुंभकर्ण म्हणाला ते ऐकून रावण मोठ्याने हसला व म्हणाला–"हा महोदर म्हणशील तर रामाचे नाव ऐकूनच घाबरतो. म्हणून याला युद्ध नको आहे. तुझ्यासारखा शूर भाऊ आणि पराक्रमी वीर आमच्या बाजूला आहे तरी कोण? तर मग जा, विजयी होऊन परत ये. तुला पाहूनच राम व लक्ष्मण दोघांचा थरकांप उडेल."

त्यानंतर कुंभकर्ण युद्धाला जायला तयारी करू लागला. त्याने एक मोठा भाला हातात घेतला. तो सोन्याने मढवलेला होता. त्याला तांबड्या फुलांचे हारतुरे बांधून सजवले होते. तो रावणाला म्हणाला–"मी एकटाच जातो युद्ध करायला. सैन्याची गरज नाही. माकडांना पकडून मी खाईन."

"तू आपल्या बरोबर सशस्त्र सैन्य घेऊन जा. वानर पराक्रमी आहेत व चपळ आहेत. पाय रोवून लढणारे आहेत. तुला किंवा कोणालाही एकटा पाहून बेफिकीर राहणाऱ्याला सहज ठार करतील." रावण त्याला समजावून सांगू लागला.

त्यानंतर रावणाने स्वतः कुंभकर्णाला सजविले. कुंभकर्णाने कवच धारण केले आणि रावणाला कडकडून भेटला. रावणाचा आशीर्वाद घेऊन तो रणांगणावर निघाला. त्याच्याबरोबर अनेक राक्षसवीर रथांत बसून ससैन्य शंख व इतर युद्ध वाद्ये वाजवीत निघाले.

वाटेत कुंभकर्ण राक्षसांना म्हणाला–"वानरांनी आपले वाईट काहीच केले नाही. याशिवाय वानर हे आपल्या वना-

लंकेवर स्वारी केली त्याच्या मुळाशी राम व लक्ष्मण आहेत. म्हणून मी या युद्धात फक्त राम आणि लक्ष्मण यांचाच समाचार घ्यायचे ठरविले आहे."

राक्षसांनी कुंभकर्णाचा जयजयकार केला. रणांगणावर कुंभकर्णाच्या रूपाने एक पर्वतच चालत येत असलेला पाहून वानरांची गाळण उडाली.

अंगद वानरांना भ्यालेले पाहून नल, नील, गवाक्ष व कुमद या वानरवीरांना म्हणाला–"तुम्ही आपला पराक्रम, तुमचे शौर्य, साहस व कुळप्रतिष्ठा विसरून सामान्य माकडांसारखे पळतां काय? फिरा मागे. तुम्हांला जिवाची एवढी भीती आहे का? समोर जी भयंकर आकृती दिसत आहे, तो योद्धा नसून आपल्याला भयभीत करण्यासाठी तयार केलेले एक यंत्र आहे. आपण ते तोडून फोडून टाकू या."

ते ऐकून वानरांना धीर आला. ते खडक व झाडे मुळापासून उपटून घेऊन आले आणि मत्त हत्तीसारखे कुंभकर्णावर तुटून पडले. परंतु त्यांच्या झाडांचा किंवा खडकांचा परिणाम कुंभकर्णावर मुळीच झाला नाही. तो निर्भयपणे वानरांचा वध करू लागला.

आतां मात्र वानर कुंभकर्णाच्या हाती



उडवा टाकू लागले. काही सेतूवरून पळण्याचा यत्न करू लागले. अंगदाने वानरांना पळतांना पाहून सावध केले. म्हणाला–"आपण इतके वानर आहो आणि एकट्या कुंभकर्णाला पाहून आपण भिण्याचे कारणच काय? परंतु वानरांनी अंगदाच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. प्राणभयाने पळू लागले. तरी अंगदाने त्यांची समजूत घालून त्यांना धीर दिला व परतविले. हनुमानही त्यांच्या मदतीला धावला.

त्यानंतर हनुमानाला पुढे करून ऋषभ, शरभ, मैंद, धूम्र, नील, कुमुद, सुषेण,

युद्धाला निघाले. हे सर्व वीर मरणाला तोंड द्यायचे ठरवूनच निघाले.

तिकडे कुंभकर्णाने वानरांचे भक्षण सुरू केले. द्विविदने एक पर्वतच उचलून कुंभकर्णावर हल्ला केला. परंतु त्याचा नेम चुकल्यामुळे तो कुंभकर्णाच्या राक्षससैन्यावर पडला. त्यामुळे अनेक रथ, घोडे आणि राक्षस चिरडले गेले. द्विविदने आणखी एक डोंगर उचलून फेकला. तो पडल्यामुळेही राक्षसांचे फार नुकसान झाले. जे राक्षस रथात बसून आले होते त्यांनी अनेक वानरांचा वध केला. वानरांनी वृक्ष घेऊन राक्षसांना झोडपून काढण्याचा सपाटा चालू ठेवला.

हनुमानाने आकाशात उड्डाण करून कुंभकर्णावर खडक व वृक्षांचा वर्षाव केला. परंतु कुंभकर्णाने आपल्या भाल्याने ते खडक अडवून फोडून टाकले. नंतर तो आपला भाला घेऊन वानरांवर चालून गेला. तेव्हां हनुमानाने एक पर्वत उचलून कुंभकर्णावर फेकला.

अंग खरचटले व लहान मोठ्या जखमा झाल्या. सर्व अंग रक्त बंबाळ झाले. कुंभकर्ण चिडला. त्याने चक्राकार भाला फिरवून तो हनुमानाच्या छातीला लागेल असा फेकला. हनुमानाने मोठी आरोळी ठोकली आणि रक्त ओकून बेशुद्ध होऊन पडला.

त्या अवधीत नील वानराने कुंभकर्णावर आणखी एक पर्वत फेकला. कुंभकर्णाने आपल्या मुठीचा वार करून त्याचा चक्काचूर केला. तेव्हां वृषभ, शरभ, नील, गवाक्ष आणि गंधमादन या पांचही वीरांनी एकदम कुंभकर्णावर हल्ला केला. त्याला चारीबाजूनी गराडा घालून त्याच्यावर खडक, झाडे इत्यादींचा वर्षाव केला आणि लाथाबुक्क्यांनी सुद्धां खूप बडविले. परंतु हा मारा त्याला त्रासाचा वाटण्याऐवजी सुखाचा वाटला, परंतु थोडाच वेळ. त्यानंतर मात्र तो खवळला. त्याने त्या पांचही वीरांचा समाचार घ्यायचे ठरविले. सर्व रक्त ओकत बेशुद्ध होऊन पडले.



# बाजीप्रभू



छत्रपती शिवाजी महाराज दिल्लीच्या मोंगल बादशाहाच्या आणि मोंगल साम्राज्याच्या इतर सुभ्यांच्या सुभेदारांच्या बगलेत सुरी कांट्यासारखे खुपत होते.



ही गोष्ट स. १६६० मधली आहे. शिवाजी पन्हाळा किल्ल्यावर होते. तो किल्ला सर करून शिवाजीला कैद करून आणण्यासाठी विजापूरच्या सुलतानाने सलाबतखानाला ससैन्य पाठविले होते. कित्येक दिवस किल्ल्याला वेढा होता.



एके दिवशी शिवाजीचे सरदार व शिपाई पांढरे झेंडे घेऊन किल्ल्याबाहेर येऊन सलाबतखानाला म्हणाले– "आपण कोणत्या अटीवर वेढा काढून घेणार?"



त्याच वेळी तिकडे शिवाजी एका म्हाताऱ्याचे सोंग करून आपल्या काही बहादूर अनुयायांसह किल्ल्याच्या मागच्या दाराने (चोरवाटेने) किल्ल्याबाहेर पळून गेले. थोड्या अंतरावर घोडे तयारच होते.

शिवाजीने आपल्या अनुयायांसह पलायन केले तेव्हा शत्रूच्या एका हेराने गुप्त वेशातल्या शिवाजीस ओळखले. बातमी कळताच सलाबतखानाने सैन्यानिशी शिवाजीचा पाठलाग केला.





घाईगर्दीत शिवाजी व त्यांच्या अनुयायांसाठी जे घोडे तयार ठेवले होते ते तितके चांगले नव्हते. म्हणून सलाबतखान व त्याचे काही शिपाई लवकरच जवळ येऊन ठेपले. तेथे एक भयंकर युद्ध झाले व शिवाजीने

ते पावनखिंडीत पोचले. शत्रूचे मोठे सैन्य पाठलाग करीत आले. शिवाजीचा बाजीप्रभू नांवाचा एक शूर विश्वासपात्र व स्वामिभक्त सरदार शिवाजीला म्हणाला—"सलाबतखान सर्व सैन्यानिशी येऊन हल्ला करणार. म्हणून प्रभूने पुढे निघून जावे."





बाजीप्रभूच्या अनुमानाप्रमाणे सलाबतखान मोठे सैन्य घेऊन आला. तोपर्यंत बाजीप्रभूने पावनखिंडीत मोक्याची जागा धरून ठेवली होती. बाजीप्रभूने शिवाजीला विशालगडावर जाण्यास सांगितले. शिवाजीला ते आवडले नाही. परंतु बाजीप्रभूने आग्रहच केला. "गडावर पोचताच तीन तोफा डागाव्या", अशी बाजीप्रभूने सूचना केली.

बाजीप्रभू व त्याच्या अनुयायांनी शत्रूला खिंडीत अडविले आणि जो पुढे आला त्याला कापून काढले. शत्रूचा एकही सैनिक खिंडीतून पार जाऊ शकला नाही. बाजीप्रभूने फार पराक्रम गाजविला.





परंतु शत्रुसैन्य अफाट होते. मूठभर मावळे किती वेळ त्यांना अडविणार. तरी बाजीप्रभूने असे रणकंदन चालू ठेवले की शत्रूला एक पाऊल ही पुढे टाकतां आले नाही.



बाजीप्रभूचा तो पराक्रम मराठ्यांच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिला गेला. शत्रूचा मर्मी वार लागून रणांगणावर बाजीप्रभू पडला. त्याच वेळी तोफांचा आवाज ऐकू आला.



शत्रू हताश होऊन परतला. बाजीप्रभूचे सर्वांग रक्ताने माखले होते. परंतु त्याने जखमांची किंवहुना आपल्या प्राणाची ही पर्वा केली नाही. प्रभूला वांचविण्याचे कर्तव्य पार पाडल्याचा त्याला अपार आनंद झाला व त्याने डोळे मिटले. एक शूर योद्धा म्हणून त्याचे नाव अजरामर

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एक कवडीचुंबक चिक्कू होता. तो स्वतः खात नसे किंवा इतर कोणाला चुकूनही एक पैसा उचलून देत नसे. त्याच्या मुलाला बापाच्या चिक्कूपणामुळे फार त्रास होत असे. केसाचे डोक्यावर रान वाढे आणि केस कापावे म्हणून तो बापाकडे जाई, परंतु बाप त्याला खिशातून एक आणादेखील काढून देईल तर शपथ. त्याची मित्रमंडळी त्याला 'बोकड' म्हणून नेहमी चिडवीत.

एकदां परसातल्या माडावरून एक नारळ गळून पडला. मुलाची नजर त्या नारळावर गेली. तो नारळ घेऊन तो न्हाव्याकडे गेला आणि म्हणाला—"बाबा रे! मी एवढा नारळ देतो, माझे केस कापून टाक!"

कवडीचुंबकाची न्हाव्याला चांगली माहिती होती, म्हणून त्याने तो नारळ घेऊन मुलाचे केस कापून त्याला पाठविले. त्याला पाहिल्याबरोबर बापाने विचारले—"तू केस कापवून घेतलेस, पैसे कोठून आणलेस रे?"

"नारळ पडलेला मिळाला, तो देऊन कापवून घेतले." मुलगा म्हणाला.

"बाप रे, बाप! विकला असता तर कमीत कमी एका आण्याचे पैसे नसते का मिळाले, मूर्खा! देवा रे देवा माझं घर लुटलं गेले रे! असं व्हायचं असेल तर मी तरी कशाला पैपै जोडून ठेवायची?" असे म्हणत त्या कवडीचुंबकाने वीस वर्षांपासून पेटीत जपून संभाळून ठेवलेले मऊमऊ ब्लॅंकिट काढले व मुलाला धमकावीत म्हणाला—"आजपासून रात्री मी हे पांघरूण घेऊन निजतो, तू पहात रहा!"

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०० ०२६ या पत्त्यावर पाठवा.

२० जानेवारी १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओड परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल मार्च १९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.




यस्यार्था स्तत्य मित्राणि,
यस्यार्था स्तस्य बांधवा:,
यस्यार्था स्स पुमान लोके
यस्यार्था स्स च पंडित: ॥ १ ॥

[ ज्याच्याजवळ धनदौलत आहे त्यालाच मित्र मिळतात, बंधुबांधव मिळतात, तोच जगात मर्द म्हणविला जातो आणि तोच पंडितही होतो. ]

यस्यार्था स्स च विक्रान्तो
यस्यार्था स्स च बुद्धिमान्,
यस्यार्था स्स महाभागो,
यस्यार्था स्स महागुण: ॥ २ ॥

[ ज्याच्याजवळ धनदौलत आहे तोच पराक्रमी म्हणवितो, बुद्धिमान म्हणवितो, भाग्यवान आणि गुणवान ठरतो. ]

यस्यार्था धर्म कामार्था:
तस्य सर्व प्रदक्षिणम्
अधने नार्थ कामेन
नार्थ शक्यो विचिन्वता ॥ ३ ॥

[ ज्याच्याजवळ धनदौलत असते त्याची धर्मकार्ये सिद्ध होतात. त्याला सर्व गोष्टी अनुकूल असतात. निर्धनाचे मनोरथ कधीच पूर्ण होत नाहीत. ]




[ ४२ ]

सोमिलक आपल्या गावाला निघाला. सूर्यास्त झाल्यावर त्याला समोर ते वडाचे झाड दिसले. आपल्या दुर्दैवाविषयी विचार करीत तो झाडाच्या फांदीवर आडवा झाला आणि लगेच त्याला स्वप्न पडले. स्वप्नात त्याला त्या दोन व्यक्ती दिसल्या. त्यांपैकी एक जण म्हणाला–"काय रे पुरुषार्था! सोमिलकाला पांच हजार सुवर्ण-मुद्रा तू कशा काय दिल्यास?"

त्याचे उत्तर देत दुसरा म्हणाला–"अरे प्रारब्धा! त्याने मेहनत केली. मेहनतीचे फळ देणे माझे कर्तव्य आहे. पाहिजे तर तू काढून घेऊन जा."

ते ऐकतांच सोमिलकने आपली पिशवी पाहिली आणि पिशवी रिकामी झाल्याचे पाहून विचार करू लागला,–'हवे कशाला कवडीमोलाचे हे जीवित? याच झाडाच्या फांदीला दोरी बांधून फांस लावून घेतो.' लगेच तो झाडावरून उतरला. गवतदर्भ जे मिळाले ते उपटून त्याने त्याच्या दोरीचा फास गळयात अडकविला. फांदीला दोरी बांधून आतां उडी मारणार इतक्यात आकाशात एक दिव्य पुरुष त्याला दिसला. तो म्हणाला–"सोमिलका! हे घोर कर्म करू नकोस! तुझे सर्व धन घेऊन जायला सांगणारा पुरुषार्थ तो मीच! तू प्रारब्धाला तोंड दिलेस व स्वतःच्या करतबगरीवर अवलंबून राहिलास या गोष्टीचा मला आनंदच होत आहे. पाहिजे तो वर मागून घे."

सोमिलक म्हणाला–"अपार ऐश्वर्य दे."

पुरुषार्थ म्हणाला–"तुझ्या नशिबांत अन्नवस्त्राशिवाय काही नसतांना, अपार ऐश्वर्य तुला कसे काय मिळेल रे?"



"ते काही असो, मला ऐश्वर्यच हवे आहे." सोमिलक म्हणाला.

"तरमग तू वर्धमान नगरी पुन्हा जा. तेथे धनगुप्त आणि भुक्तधन नावाच्या दोघां व्यापाऱ्यांचे जीवित पाहून ये आणि तुला कसे जीवित हवे आहे, सांग." असे सांगून तो दिव्य पुरुष अंतर्धान पावला.

सोमिलक वर्धमानपूरला पुन्हा गेला. बरीच चवकशी केल्यावर त्याला धनगुप्ताचे घर सांपडले. पुष्कळांनी त्याचे नावच ऐकले नव्हते. कारण तो दानधर्म करीत नसे, करमणुकीसाठी ही खर्च करीत नसे.

सोमिलक त्याच्या घराच्या ओसरीत जाऊन बसला. ती जेवणाची वेळ होती. धनगुप्त घरी नव्हता. त्याची बायको व मुले त्याला मारहाण करून बाहेर काढण्याच्या विचारात होती. परंतु सोमिलक म्हणाला—"तुमच्या घरी संध्याकाळच्या वेळेला आलेला मी एक पाहुणा आहे.मला जेवायला वाढणे तुमचे वेदोक्त कर्तव्य आहे."

काहीवेळ बोलाचाली झाल्यावर सोमिलकला अगदी साधारण जेवण मिळाले.

सोमिलक दमून गेला असल्याकारणाने आडवा होताच त्याचा डोळा लागला. स्वप्नात ते दोघे दिव्यपुरुष आपसात हळूहळू बोलत होते ते सोमिलकने ऐकले

"कायरे पुरुषार्था, तू धनगुप्ताकडून हा खर्च कां करविलास रे? हे नाही बरोबर." एक जण म्हणाला.

"अरे प्रारब्धा! ती माझी चूक नव्हती. हा त्याने जो खर्च केला तो भरून काढण्याची जबाबदारी तुझीच आहे." दुसरा म्हणाला.

सोमिलकची झोप मोडली. थोड्यावेळाने धनगुप्त घरी परतलेला त्याला दिसला. कोणाला तरी जेवायला घातल्याचे ऐकून धनगुप्ताच्या पोटात 'भ्रस' झाले. त्याला भयंकर राग आला. त्यामुळे त्याला झोपसुद्धा लागली नाही. उजाडल्यावर त्याला जुलाब होऊ लागले.

ते सर्व ऐकून व पाहून सोमिलक भुक्तधनाचा शोध काढीत निघाला. त्याला विशेष त्रास झाला नाही. त्याचे घर लवकरच सांपडले. कारण गावातल्या सर्व लोकांना त्याचे घर माहीत होते.

भुक्त धनाने सोमिलकला दारात उभा पाहतांच नम्रपणे पुढे जाऊन त्याला घरात बोलावून आणले. त्याला आंघोळीला पाणी काढून दिले आणि नेसायला नवीन धोतर जोडी दिली. झाल्यावर पंचपक्वान्नांचे जेवण पलंगावर झोपण्याची व्यवस्था करून दिली. सोमिलक गाढ झोपेत असतां त्याला स्वप्नात ते दोघे दिव्य पुरुष दिसले. दोघे बोलत होते.

"अरे पुरुषार्था! सोमिलकच्या आतिथ्यासाठी भुक्तधनाकडून भलताच जास्त खर्च करविलास की रे! त्याच्याकडे उद्याच्या जेवणापुरेसेदेखील पैसे उरले नाहीत. शिवाय याने आज जो खर्च केला तो एका सावकाराकडून त्याने घेतलेल्या पैशातून केला. उद्याची व्यवस्था आतां तू काय करणार आहेस?" एकाने विचारले.

दुसरा म्हणाला—"अरे प्रारब्धा! उद्यां उजाडताच राजाचा एक दूत भुक्तधनाला कित्येक इनामे आणि पुष्कळ धन आणून देणार आहे,—त्याला कित्येक दिवसाच्या खर्चाला पुरतील एवढे."

ते सर्व सोमिलकने स्वप्नात ऐकले आणि खरोखरच सकाळी उजाडल्यावर उठून पाहतो तो राजदूत भुक्तधनाच्या दारासमोर येऊन उभा असलेला दिसला. सोमिलक विचार करू लागला—"हा निर्धन भुक्तधनच बरा! एवढे मोठे कोठार भरून असूनही धनगुप्त नीच आणि दरिद्रीच! स्वत: खाऊन पिऊन इतरांना दानधर्म करण्यातच पैशाचं चीज आहे."

तो पुरुषार्थाला हात जोडून नम्रपणे म्हणाला—"देवा! भुक्तधनाला मिळाले तसे धन मला दे. धनगुप्ताचे ऐश्वर्य मला नको."

पुरुषार्थाने त्याला पैशाची कधी जाणीव भासणार नाही एवढे ऐश्वर्य दिले. सोमिलक आपल्या घरी परतला आणि खूप दानधर्म करून सकुटुंब सुखाने राहू लागला.



## १८०. प्राचीन प्राण्यांची अवशेष

कित्येक कोटी वर्षांपूर्वी आपल्या या पृथ्वीवर राक्षसाएवढ्या मोठ्या पाली, हत्ती, गेंडे वगैरे होते. कालक्रमाने ह्या प्राण्यांच्या जातीच नष्टप्राय झाल्या आणि त्यांच्या अस्थी दगडाच्या रूपे अवशिष्ट राहिल्या आहेत. मंगोलियांत काही प्रदेशात खूप खोल जमिनीत 'फॉसिल' (दगडी रूप) झालेली प्राण्यांची हाडे उपलब्ध झाली आहेत. मुख्य करून पुराच्या वेळी नद्या किनारा कापीत जातात. पाणी ओसरल्यावर खणल्याशिवायच ही हाडे मिळतात. या चित्रांत दिसत असलेले 'फॉसिल' अवशिष्ट राक्षसाकृती गेंड्याचे आहे.





# माया सरोवर

[ १२ ]

[ घोडेस्वारांच्या नायकाच्या तोंडी जयशीलला मंत्री धर्ममित्र टोंगरी तलावाच्या काठी पडाव टाकून त्याची वाट पहात असल्याचे कळले. तो मकरकेतूला घेऊन निघाला. मकरकेतूने जलग्रहाला पाणी प्यायला नेत असल्याचे सांगून जयशील व सिद्धसाधक जलग्रहावर त्यांच्यासह डोंगरी तलावात शिरण्यास जलग्रहाला सांगितले. जलग्रहाने पाण्यात शिरून बुडी मारली. पुढे—]

जलग्रह अचानक पाण्यात शिरला आणि बुडी मारून तळाला पोचला. त्याने इतक्या वेगाने पाण्यात बुडी मारली की जयशील व सिद्धसाधकाला पोहून वर निघायला सवडच मिळाली नाही. आता आपल्याला जलसमाधी मिळणार असे दोघांना वाटले. सिद्धसाधकाने मृत्यूला प्रत्यक्ष समोर पाहून आपल्या इष्ट-दैवताचे स्मरण केले आणि त्याचा धावा करीत ओरडला—"जय महाकाल! त्राहि माम्!"

त्याचे ते ओरडणे जयशीलला चांगले ऐकू आले. त्याला समोर जलग्रहावर बसलेला मकरकेतुसुद्धां चांगला दिसत होता. याचा अर्थ असा की खोल पाण्यातही त्याला चांगले दिसत होते आणि ऐकू येत



होते. 'हे कसं काय बुवा?' तो आश्चर्यचकित होऊन विचार करू लागला.

जयशीलने वेड लागल्यासारखा चटदिशी पुढे जाऊन मकरकेतूचा खांदा धरून हलवीत विचारले—"लबाडा! तू हे काय आरंभिले आहेस? आम्हांला तुझे डोके केव्हांच उडविता आले असते. परंतु आम्ही तसे केले नाही. कृतघ्न गृहस्था! त्याबद्दल आतां तू आम्हांला बुडवून मारण्याच्या विचारात आहेस का?"

ते ऐकून मकरकेतू खदखदां हंसू लागला. थोडा वेळ थांबून बगलेत कळ आली म्हणून कण्हत म्हणाला—"जयशीला! तुझे डोके तर फिरलं नाही ना? या वेळी एक माडभर खोल पाण्यात आपण आहो. सामान्य माणसं अशी बोलू शकतील का? नाकातोंडात पाणी शिरून मरणार नाहीत का? विचार करून बोल!"

"होय रे जयशील! आश्चर्याचीच गोष्ट आहे की नाही? ही सर्व त्या महाकालाची कृपा आहे!" असे म्हणत सिद्धसाधकाने चारीबाजूला एकदां नजर फिरवून पाहिले. त्या डोंगरी तलावात अनेक प्राणी त्यांच्या जवळून जात येत होते. त्यांत मोठमोठे मासे, मगरी, मोठमोठे पाणसाप इत्यादी प्राणी होते. जलग्रह बेफिकीरपणे तोंड आणि सोंड वर करून पुढे पोहोत जात होता. समोरून एका खडकाळ गुहेतून पाण्याचा प्रवाह जोराने वहात येत होता.

मकरकेतूने आपल्या वाहनाला एकदां जोराने हाकारले—"जलग्रहा!" नंतर जयशील व सिद्धसाधकाकडे वळून त्याने विचारले—"काय रे! तुम्ही दोघे एकदम बोलायचे थांबलात का? कसला विचार चालू आहे? आतां समजले ना खोल पाण्यात तुम्ही अजून जिवंत कां आहात ते. कळले की नाही?"

जयशील तलवार उपसून म्हणाला—"होय, छान कळले. तुला आणि जलग्रहाला चिकटून धरून असल्यामुळे आमच्या सारख्या माणसांचा पाण्यातदेखील श्वासोच्छ्वास चालू राहतो."

"बरोबर कळले तुम्हांला, जयशीला, तर मग तू म्यानेतून तलवार कशाला काढलीस?" मकरकेतूने विचारले.

"तुझे डोके उडवायला! ऐक, तू लगेच आपल्या जलग्रहाला पाण्याबाहेर जायला सांगतोस की नाही?" जयशीलने मकरकेतूला धमकावून विचारले.

सिद्धसाधक आपल्या हातातले त्रिशूळ उचलून ओरडला—"महाकाल की जय! आजपर्यंत महाकालाच्या कोणत्याही भक्ताने त्याच्या चरणावर पाण्यात नरबली वाहिला नसेल. हे भाग्य मला मिळू दे!" असे म्हणत त्याने आपले त्रिशूल मकरकेतूच्या गळ्यावर ठेवले. मकरकेतूला हंसू आले. परंतु त्रिशूळाचे टोक बोचू लागल्यावर त्याने त्रिशूल हाताने बाजूला सारले व म्हणाला—"या थोर वीराचे आणि महाकालाच्या भक्ताचे सुद्धा डोके ठिकाणावर असेलसे वाटत नाही. मी कोणत्याही परिस्थितीत जलग्रहाला पाण्याबाहेर काढून तुमचा बंदी व्हायला तयार नाही. तुमचा हुकूम न मानल्याबद्दल माझे डोके उडाले तरी मला हरकत नाही. परंतु त्यानंतर लगेच तुम्हां दोघांना पाण्यात जिवंत राहण्याची जी शक्ती प्राप्त आहे ती मात्र घालवून बसाल. आपण यावेळी चाळीस पन्नास फूट खोल पाण्यात आहो. तुम्ही दोघे इतक्या खोल पाण्यातून जिवंत वर निघणे शक्य नाही. एकमात्र होईल, तुमची प्रेते नक्कीच पाण्यावर तरंगू लागतील."





जयशील व सिद्धसाधकाला मकरकेतूचे म्हणणे निरर्थक वाटले नाही. त्यांना आतां उलटी भीती वाटू लागली. आपणच आता मकरकेतूचे बंदी झालो आहो. परंतु आतां त्यांच्या हातात काहीच नव्हते. जलग्रह डोंगरी गुहेतून वेगाने वहात येणाऱ्या प्रवाहाच्या दिशेने जात होता.

जयशीलने धीर करून विचारले–"मकरकेतू! आम्हाला कोठें घेऊन जायचा विचार आहे तुझा?"

मकरकेतू उत्तर देणार इतक्यात एक मगर एका माशाचा पाठलाग करीत त्यांच्या बाजूला येत असलेली दिसली. जयशील तलवारीने तिला ठार करण्याच्या बेतात होता. त्याच वेळी मकरकेतूने मगरीची शेपटी धरून तिला जोराने हलविले आणि दूर फेकून दिल्यावर म्हणाला–"जयशीला! तुम्ही दोघे माझे कैदी आहां असे मानू नका. मीदेखील आतां तुमचा कैदी राहलो नाही. त्या गुहेत आतां जलग्रह शिरणार आहे. तो डोंगरी सरोवरात पोचल्यावर तुम्ही आपल्या वाटेने जा आणि मी आपल्या वाटेने जाईन."

मकरकेतू बोलतच होता आणि जलग्रह प्रवाहाविरुद्ध गुहेत शिरला. आतां कोणालाच काही दिसत नव्हते. दाट काळोख होता. जयशील जलग्रहावरून सरकून खाली पडून जाण्याच्या भीतीने मकरकेतूच्या कंबरेला विळखा देऊन बसला होता आणि सिद्धसाधकाने जयशीलला धरून ठेवले होते.

काही क्षणांनंतर जलग्रह पुन्हां डोंगरी सरोवरात पोचला. मकरकेतूच्या आज्ञे-प्रमाणे तो पाण्याच्या पातळीवर आला आणि सोंड उचलून एकदां जोराने हुंकारला.

जयशील व सिद्धसाधकाने एकदां वाच-ल्याचा सुस्कारा सोडला. आणि पाण्याबाहेर उघड्या आकाशाकडे एकदां आनंदाने पाहिले. चारीबाजूला डोंगर होते आणि मध्ये ते सरोवर होते. पाण्याचा प्रवाह दुसऱ्या बाजूने वहात कोठेतरी जात होता.

ते पाहून जयशीलच्या मनात एक शंका आली. मकरकेतू मधूनमधून 'सरोवरेश्वर' म्हणून ओरडत असे. तेच सरोवर तर हे नसेल. त्याचा 'सरोवरेश्वर' येथेच कोठेतरी रहात असावा.

जयशीलने तसे विचारलेही. तेव्हां मकर-केतू नकारार्थी मान हलवून म्हणाला–"जयशील! तुला वाटते तसे नाही. आमचे मालक 'सरोवरेश्वर' राहतात त्याचे नाव मायासरोवर आहे. ते हे नव्हे. त्याला पाहून कोणी मानवशरीरधारी व्यक्ति जिवंत परतली नाही.

"तरमग तुझा विचार आम्हांला तिकडे नेण्याचा आहे का?" जयशीलने विचारले.

मकरकेतूच्या तोंडी होकारार्थी उत्तर मिळतांच त्याच्या पाठीवर त्रिशूल भोस-कण्यासाठी उचलून धरून सिद्धसाधक त्याला मारायला तयार झाला.

मकरकेतूने प्रसंग ओळखला. परंतु तिळमात्रही न कचरतां म्हणाला–"तुम्ही दोघे स्वभावाने अधीर दिसतां आहां. एक तर जंगलात मला विनाकारण कैदी करून ठेवलेत आणि त्याचा परिणाम तुम्ही आज या करुण अवस्थेत स्वतःचा जीव धोक्यात घालून बसलां आहां. माझ्या बगलेत पहिल्यानेच तलवार तुटून शिरून बसली होती. तरी तुम्ही त्या सर्व पारध्या-



करवी माझ्या खांद्याला एक बाण मारवून मला हतबल करण्याचा प्रयत्न केलात. तुम्हांला पोहतां येते ना? येत नसेल तर डोंगरांतली झाडे वाहून चालली आहेत. त्यांच्यापैकी एखादे झाड धरून रहा. वहात जाऊन लागाल किनाऱ्याला." असे सांगून मकरकेतू काही वेळ गप्प राहिला आणि एकदम मोठ्याने ओरडला–"जलग्रहा!"

जयशीलने धोक्याची सूचना देण्यासाठी सिद्धसाधकाला खुणावले. हत्ती पाण्यात बुडू लागल्याचे पाहून दोघांनी पाण्यात उड्या टाकल्या आणि पोहोत जाऊन वहात चालल्याला एका झाडाची फांदी धरली. झाड पाण्यात बुडे व पुन्हां वर येई. त्या



अवस्थेतच दोघांनी त्याच्या फांदीवर चढण्याची खटपट सुरू ठेवली. त्याच वेळी झाडाच्या बुंधावर उपडा बसलेला वाघ दिसला. तो पुढल्या पायांनी बुंधाला घट्ट आवळून धरून बसला होता.

दोघांनी वाघाला पाहिले त्याच वेळी वाघाने त्यांना पाहिले. वाघ चटदिशी आपल्या मागच्या पायांवर उभा राहिला आणि डरकाळी फोडून जवळच सिद्धसाधक दिसला, त्याच्यावर उडी मारण्यासाठीच जणुकाही शेपटी हलवू लागला. सिद्धसाधकाने त्रिशूल स्वरक्षणासाठी उचलून धरले. जयशीलने त्याला सावध केले– "साधका! थांब! घाई करू नकोस. हा वाघसुद्धा पाण्यात पडलेला आणि स्वतःचा जीव वांचविण्याच्या प्रयत्नात असलेला दिसतो आहे. तू त्रिशूल फेकलेस तर तो तुला जिवंत सोडणार नाही. तुम्हां दोघांच्या मारामारीत झाड पाण्यात बुडाले तर आपण सर्वंच स्वतःच जलसमाधी घेऊ."

"तुझे म्हणणे बरोबर आहे रे, परंतु हा वाघ पिसाळलेला दिसतो आहे!" असे म्हणत सिद्धसाधकाने त्रिशूलाचा नेम धरला आणि वाघाकडे करड्या नजरेने पहात म्हणाला– "जयशीला! मी जरा मान हलविली तर वाघ माझ्यावर उडी मारील. तुला धबधब्या-सारखा आवाज ऐकू आला का? याच नदीचा धबधबा तर नसेल पुढे कोठे?"

जयशीलचे सर्वांग हादरले. तो दिग्भ्र-मित झाल्यासारखा चहूकडे पहात म्हणाला– "होय रे साधका! आपण धबधब्याच्या दिशेनेच वहात जात आहो. दोन तीनशे पावलावरच धबधबा कोठेतरी असावा."

सिद्धसाधकाला कांपरेच भरले. "अरे मग आपण हे झाड सोडून दिले तर?" त्याने विचारले.

"हाच एक आधार आहे. स्वतःचा जीव वांचवायला. सोडू नकोस." जयशीलने ओरडून सांगितले.

त्याचवेळी पुन्हां वाघ डरकाळी फोडून सिद्धसाधकावर उडी मारण्याच्या बेतात दिसला. परंतु पाण्याचा वेग वाढला. झाड भयंकर आवाज करीत धबधब्यात सांपडून खाली पडू लागले. सुमारे दोनशे फुटावरून ते खाली प्रवाहाबरोबर आदळले.

झाड खाली धबधब्यात पडू लागल्यावर जयशील आणि सिद्धसाधकाने डोळे मिटून व देवावर सर्व भरंवसा ठेवून झाडाला घट्ट कवटाळून धरले. धबधब्याचे पाणी जेथे पडत होते तेथे मोठमोठे खडक होते. एका मोठ्या खडकावर आदळून झाडाचे दोन तुकडे झाले. एका तुकड्यावर जयशील होता व दुसऱ्यावर सिद्धसाधक व वाघ होते. थोड्या वेळाने मन स्थिरावल्यावर जयशीलाने डोळे उघडून पाहिले. तो किनाऱ्यावर पोचला होता. कंबरेपर्यंत तो पाण्यात होता. त्याचे अर्धे अंग पाण्यावर होते. दूर धबधब्याचा आवाज ऐकू येत होता.

जयशील विचार करू लागला, मी जिवंत आहे, माझे हातपाय शाबूत आहेत का? त्याचे उजवे कोपर मुरगळल्यासारखे झाले होते. त्याने दोन्ही पाय हलवून पाहिले. पाय थोडेच दुखले.

"मी केवढा नशीबवान आहे. इतक्या उंचीवरून खाली आदळूनही वांचलो आणि माझे हातपाय चांगले शाबूत आहेत." असा विचार करीत तो उभा राहिला. हाता-पायांना थोडे थोडे खरचटले होते आणि एक दोन जागी लहानमोठ्या जखमाही झाल्या होत्या. म्यानेतली तलवार बरोबर









आहे की नाही हे एकदां पाहून घेतले त्याने. त्याच वेळी त्याला सिद्धसाधकाची आठवण झाली. तो जोराने प्रवाहात चालत तरंगत पुढे जाऊ लागला.

प्रवाहात जागोजागी लहान मोठे दगड व खडक होते. जयशील ज्या झाडासकट धबधब्यात पडला होता ते झाड दोन मोठ्या खडकांच्या सांधीत अडकले होते. त्याच्या खालच्या बाजूला झाडाचा दुसरा भाग किनाऱ्याला लागला होता. परंतु जयशीलला सिद्धसाधक कोठे दिसला नाही.

'नशिबाने घात केलेला दिसतो त्याच्या! धबधब्यावरून झाडावरून खाली पडतांना हात सुटून खडकावर तर आदळला नसेल? त्याचे प्रेत प्रवाहाबरोबर वाहून तर गेले नसेल?' अशा अनेक शंकाकुशंका त्याच्या मनात येऊ लागल्या.

आतां त्याला इतके दिवस अनेक तऱ्हेच्या संकटांत त्याच्या बरोबर स्वत:चा जीव धोक्यात घालणाऱ्या सिद्धसाधकाची काळजी वाटू लागली. त्याचे प्रेत माशामगरींच्या घशांत जाण्यापूर्वी बाहेर काढून त्याचा दहनसंस्कार करण्याची जबाबदारी त्याच्या-वरच तर आहे.

दुसऱ्या क्षणाला तो ताठ उभा राहला. नदीकाठावर उगवलेल्या गवतातून आणि काटयाकुटयांतून वाट काढीत तो काही अंतर चालून गेला असेल नसेल, त्याला वाघाची डरकाळी ऐकू आली. त्याच वेळी दोघांबरोबर धबधब्यात पडलेल्या वाघाची त्याला आठवण झाली.

'सिद्धसाधकाला त्याने तर खाल्ले नसेल?' तो विचार मनात येताच त्याचा हात तलवारीच्या मुठीवर गेला. तो वाघाची डरकाळी ज्या दिशेने ऐकू आली होती त्या दिशेने चालू लागला.

एका जागी किनाऱ्यावर सिद्धसाधक बेशुद्ध होऊन पडला होता. खडकावर पडल्यामुळे वाघाचे मागचे दोन्ही पाय तुटलेले होते. तरी तो गुरगुरत पुढच्या पायांच्या आधारे फरफटत साधक पडला होता त्या बाजूला जात होता. (क्रमश:)





# मायारूप सुधीर

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुला आपल्या कार्यात यश न मिळण्याचे कारण तुला मानवातीत सिद्धीप्राप्त नाहीत असे वाटत असेल कदाचित, परंतु तो तुझा एक भ्रम आहे. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला मैत्रेयाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

उज्जयिनी नगरीवर सुधीर नांवाचा एक राजा राज्य करीत असतां त्याच्या दरबारात वीरदास नावाचा एक प्रख्यात शिल्पकार होता. त्याच्या धाकटया भावाचे नाव मैत्रेय होते. मैत्रेयाला हिमालय पर्वतात अनेक वर्षे प्रवास करीत फिरत असतां मोठमोठ्या



योग्यांची सेवा करण्याचे भाग्य लाभले. त्याने एका योग्याकडून एक सिद्धी प्राप्त करून घेतली. ती अपूर्व सिद्धी म्हणजे जिवंत माणसासारखा दगडाचा पुतळा हिंडू फिरू आणि हंसू बोलू लागे.

आपल्या त्या अद्‌भुत सिद्धीचे प्रदर्शन राजासमोर करण्याची अनिवार इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली. त्याने आपल्या मोठ्या भावाकरवी दगडाच्या दोन स्त्रीमूर्ती करविल्या आणि दरबारात सर्वांसमक्ष त्या मूर्ती चालूबोलू लागल्याचे दाखविले. राजाबरोबर सर्व दरबारी चकित होऊन त्या अद्‌भुत सिद्धीची वाखाणणी करू लागले. राजाने मैत्रेयाला आपल्या दरबारात एक आदराचे स्थान दिले. मैत्रेय एक दरबारीच नव्हे तर राजाचा एक विश्वासंपात्र मित्र झाला.

राजा सुधीर आणि मैत्रेय यांची मैत्री वाढत गेली. एकदां राजाच्या मनांत स्वत:चा चालता बोलता पुतळा पाहण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. त्याने मैत्रेयाला तसे करता येईल का विचारले तेव्हां मैत्रेय तो प्रयोग करण्यास कबूल झाला.

मैत्रेयाने मोठ्या भावाकडून सुधीरचा एक पुतळा तयार करविला. त्या पुतळ्यात प्राण प्रतिष्ठा करून मध्यरात्रीच्या सुमारास मैत्रेय आपल्या घरून त्याला बरोबर घेऊन राजवाड्यात जायला निघाला.

सर्व देशांच्या राजधान्यात परदेशांच्या हेरांचे जाळे असते तसे उज्जयिनीला ही शत्रूचे हेर होते. त्यांनी या मायारूप सुधीरला पाहिले आणि त्याला खरा राजा समजून त्यांनी त्याचा खून केला आणि पळून गेले. उजाडतांच महाराजांचा कोणीतरी खून केल्याची बातमी राजधानीभर पसरली.

परंतु ज्याचा खून झाला तो मायारूप सुधीर होता, खरा सुधीर राजवाड्यातच सुखरूप आहे असे जाहीर करण्यात आले. परंतु राज्यात काही दुष्ट राजद्रोही होते. त्यांनी अशी अफवा उठविली की राजवाड्यात आहे तोच मायारूप सुधीर असून तो मैत्रेयाच्या हातचे एक खेळणे आहे. खऱ्या राजाचाच खून झाला आहे. राजा आणि मैत्रेय यांच्यामध्ये जी गाढ मैत्री होती तीवरूनही सर्वांस अफवा खरी वाटली.

सामान्य लोकांचा या गोष्टीवर विश्वास बसला तर त्यात आश्चर्य करण्यासारखे काहीच नव्हते. अंत:पुरात राणीपासून दासदासीपर्यंत सर्वांना राजा सुधीर हा मायारूप सुधीर आहे असे वाटू लागले.

सुधीरला आपली ही दशा झालेली पाहून मनापासून फार वाईट वाटले. याच्यातून कसा मार्ग काढायचा त्याला सुचेना. म्हणून त्याने मैत्रेयालाच आपल्या मनाची व्यथा सांगून काही तरी मार्ग काढायला सांगितले. मैत्रेयदेखील कोणता तरी मार्ग काढण्याच्या विचारातच होता. शेवटी त्याला एक उपाय सुचला.

मैत्रेयाने आपल्या थोरल्या भावाकरवी स्वत:चा एक पुतळा करवून त्यात प्राण-प्रतिष्ठा करायचे ठरविले. त्या कारण मायारूप मैत्रेयाला राजाकरवी राजद्रोहाबद्दल शिरच्छेदाची शिक्षा करविली तर सुधीरच खरा राजा असल्याचे सर्वांना पटेल. त्याप्रमाणे त्याने आपले प्रतिरूप असलेली मूर्त घडवून प्राणप्रतिष्ठा केली.



राजा ते पाहून चकित झाला. त्याला सुद्धा खरा मैत्रेय कोण व मायारूप मैत्रेय कोण कळणे कठीण झाले.

मैत्रेय म्हणाला–"महाराज, मी खरा मैत्रेय आहे आणि हे माझे नकली रूप आहे. आपण याला दरबारात नेऊन सर्वां-समक्ष याच्यावर राजद्रोहाचा आरोप लावून शिरच्छेदाची शिक्षा द्यावी."

"मग तुझं कसं रे? तू काय करणार, कोठे जाणार?" सुधीरने विचारले.

"मी कोणाच्या नजरेस पडल्याशिवाय वेष पालटून हिमालयात निघून जातो. मला तिकडची माहिती आहे. आपल्या-वर प्रजेचा पुन्हां विश्वास बसेल व राज्या-

वरचे संकट टळेल." मैत्रेय म्हणाला. त्या दिवशी रात्री मैत्रेय राजाचा निरोप घेऊन कोणालाही कळू न देतां राज्याबाहेर निघून गेला आणि हिमालय पर्वतप्रदेशात पोचला.

दुसऱ्यादिवशी राजाने सुधीरच्या नकली रूपाला दरबारात बोलवून आणून त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवला आणि शिरच्छेदाची शिक्षा सांगून त्याचा शिरच्छेद करविला. तेव्हां प्रजेला सुधीर हाच खरा राजा असल्याची खात्री पटली. शिक्षा दिली गेली तेव्हां दरबारी व सामान्य प्रजा ते दृश्य पहायला हजर होते.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! मैत्रेयाने केले ते काम फार सूज्ञपणाचे होते यात काही संशय नाही. परंतु त्याला मिळालेली अपूर्व सिद्धी त्याला उपयोगी पडलीच नाही, उलट त्याला सर्व आयुष्य जीवनमृतावस्थेत काढण्याला कारण झाली. असे कां व्हावे? या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला–"मानवातीत अशा सिद्धी या लौकिक जीवनात कशा उपयोगी होतील हे सांगता येणार नाही. त्यांच्यापासून होणाऱ्या परिणामाला आळा घालण्याची शक्ती मानवाला नसते. पुतळ्यात प्राण ओतण्याची मात्र मैत्रेयात शक्ती होती. परंतु लौकिक जीवनात त्यामुळे उत्पन्न होणारे प्रश्न सोडविण्याची शक्ती त्याच्या अंगात नव्हती. म्हणून त्याला नाव गाव सोडून राहण्या व्यतिरिक्त मार्गच उरला नाही. त्याला सिद्धीचे कसकसे दुष्परिणाम होतील हे माहीत नव्हते. माहीत होताच तो हिमालयात निघून गेला हे साहजिक आणि योग्यच झाले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# माझी लाडकी

इंद्रसेन नगराच्या गादीवर चंद्रसेन राजा राज्य करीत असतां शिवशर्मा नावाचा एक दरबारी कवि होता.

त्या राज्यात दर वर्षी वसंत, नवरात्र वगैरे उत्सव मोठ्या थाटाने होत असत. देशोदेशीचे विद्वान, कवी, गायक आणि कलाविद इंद्रसेन नगराला येत असत. ते आपल्या कलेचे प्रदर्शन करून राजाकडून मोठमोठी पारितोषिके आणि सन्मान मिळवून स्वदेशी जात. एकदां सत्कार समारंभ वगैरे संपले. शिवशर्माचा सुद्धा फार मोठा सत्कार झाला.

उत्सव संपल्यावर आलेल्या सर्व ब्रह्मवृंदाला जेवणे दिली गेली. त्यांचा सत्कार झाला. शिवशर्मा त्या वेळी ते सर्व पहायला गेला होता. लोकांची इतकी गर्दी होती की. राजाच्या नोकरांनाही आवरणे कठीण झाले. त्या गर्दीत शिवशर्मा एका जागी चिखल होता, त्या चिखलात पाय घसरून पडला. सर्व अंग चिखलाने भरले.

राजवाड्याच्या वरच्या मजल्यातून राजाने ते पाहिले आणि हाक मारून विचारले– "काय हो हे?" त्याला उत्तर देत शिवशर्माने हा श्लोक म्हटला–

"क्षु तृ आशाः कुटुंबिन्यो मयि जीवति नान्यगाः,
ता सा मत्या प्रियतमा, तस्या शृंगार चेष्टितम् ।"

[भूक, तहान आणि आशा माझ्या तीन बायका आहेत. त्यांच्यापैकी तिसरी ही माझी सर्वात लाडकी आहे. तिची ही शृंगारचेष्टा आहे.]





# अंड्यांचा व्यापार

गीतापूरची अंडी फार प्रसिद्ध होती. त्या गावचे शेतकरी शेतकामाबरोबर कोंबडी पाळीत आणि जोडधंदा म्हणून हा गावठी धंदा करीत त्या धंद्यात त्यांना चांगली मिळकत होत असे. अंडी चांगल्या आकाराची आणि रुचकर असल्यामुळे चांगली किंमत येई.

परंतु एका वर्षी कसला तरी रोग पसरला आणि कोंबड्या पटापट मरू लागल्या. आणि अशी वेळ येऊन ठेपली की गावात एकही कोंबडी नमुन्यालादेखील उरली नाही. दीनानाथ नांवाच्या शेतकऱ्याकडे पांचशे कोंबड्या होत्या. त्यांपैकी एकदेखील वांचली नाही.

ही काहीतरी भूतपिशाच्चबाधा असावी, असा दीनानाथाला संशय येऊ लागला. त्या भुतांचा नाश व्हावा यासाठी होम केल्याशिवाय भागणार नाही. दुर्लक्ष केले तर ती भुते आपल्या मानेवर बसायला मागेपुढे पाहणार नाहीत, असे त्याला वाटले.

इतर शेतकऱ्यांना दीनानाथाचे म्हणणे बरोबर वाटले. शेजारच्या गावी एक मांत्रिक रहात होता. सर्वांनी मिळून चंदा केला आणि त्या मांत्रिकाला बोलवून भूत-बाधा नष्ट करण्याचा त्याच्या करवी प्रयोग करायचे ठरले.

एका शनिवारी रात्री तो मांत्रिक आपल्या शिष्यवर्गासह गीतापूरला आला आणि भुतांना पळवून लावण्यासाठी मंत्रतंत्र काय ते त्याने केले आणि खूप जेवून खाऊन व बरेचसे पैसे मिळवून आपल्या गावी निघून गेला.

आतां यापुढे भीती नाही असा विचार करून गांवकऱ्यांनी कोंबड्या विकत आणल्या आणि अंड्यांचा धंदा पुन्हां सुरू केला. परंतु एका आठवड्याच्या आत सर्व कोंबड्या मेल्या.

"पुरे झाला बाबा हा कोंबड्यांचा धंदा. आपण बरे आणि आपली शेती बरी. कोणता तरी शाप आहे आपल्या कपाळी." दीनानाथ म्हणाला.

अशा तऱ्हेने गीतापूरला औषधालादेखील अंडे मिळणे अशक्य झाले. शेतकरी वर्गाला तेव्हांपासून फावल्या वेळी माशा मारीत बसण्याव्यतिरिक्त काही काम उरले नाही.

गीतापूरच्या एका धनी शेतकऱ्याचा मुलगा शंकर सुट्टीचे दिवस होते म्हणून घरी आला होता. मागच्या खेपेस तो घरी आला होता तेव्हां दोन्ही वेळ अंड्याशिवाय त्याचे जेवण होत नसे. या खेपेस तीन दिवस झाले तरी जेवणाबरोबर अंड्याचा वासही मिळाला नाही.

त्याने आपल्या आईला विचारले तेव्हां ती म्हणाली—"पाप लागलं आहे आपल्या गावाला. भुतांनी सर्व कोंबड्या खाऊन टाकल्या." परंतु शंकरला ते खरे वाटेना. अंड्यांचा धंदा गावात खूप चाले आणि शेतकऱ्यांना चांगली मिळकत होत असे हे त्याला चांगले माहीत होते. गावात पुन्हां तो धंदा सुरू झाला पाहिजे आणि त्यासाठी काय वाटेल ते करावे लागले तरी करावयाचे त्याने मनाशी ठरविले. देशात अन्नधान्याचा तुटवडा होता. मांस-मासळीसुद्धा फारच कमी मिळे. म्हणून





कोंबड्या पाळण्याचा धंदा वाढविणे आवश्यक होते.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच शंकर दीनानाथच्या घरी गेला आणि कोंबड्या मेल्या त्या कोणत्या तरी स्पर्शजन्य रोगाने, म्हणजे साथीच्या आजाराने मेल्या आहेत, भूत-पिशाच्चबाधा वगैरे सर्व खोटे आहे, असे शंकरने दीनानाथाला अनेक प्रकारे समजावून सांगून पाहिले. परंतु त्या भोळ्याभाबड्या शेतकऱ्याला त्याचे म्हणणे खरे वाटेना.

शहरात असतांना त्याने थोडी जादू शिकून घेतली होती. त्या जादूचा प्रयोग करून शेतकऱ्यांचा अंधविश्वास दूर करण्याचे त्याने ठरविले.

तो गांवकऱ्यांना म्हणाला—"मी जास्त दिवस शहरात असतो न! तिथल्या देवळात पुष्कळ बैरागी आणि सिद्धपुरुष राहतात. आमच्या बाबांनी गावातली खबर-बात पत्रात लिहितांना गावात होत चाललेला हा प्रकारही मला कळविला होता. तेव्हां मी एका सिद्धपुरुषाकडे जाऊन त्याला कोंबड्या पटापट मरत असल्याचे सांगितले. त्यांचे नाव आहे गंभीरानंद महाराज. त्यांनी मला एक ताईत दिला आणि त्याचा प्रभाव कोंबड्यावर फार चांगला होईल असे सांगितले. तो प्रभाव तुम्ही प्रत्यक्ष डोळ्यांनीच पहा. तुम्हांला खरे वाटावे म्हणून मीच कोंबड्यांचा धंदा सुरू करून शापमुक्ति कशी मिळेल हे दाखवितो. ताईताचा प्रभाव पाहतां का? केव्हां म्हणाल तेव्हां दाखवायला मी तयार आहे."

"हो! उद्या दुपार उलटल्यावर ये. येथे माझ्या घरीच तो प्रयोग दाखव. मी सर्व शेतकऱ्यांना पहायला बोलावितो." दीनानाथ म्हणाला.

दुसऱ्या दिवशी तीन प्रहरी शंकर दीनानाथच्या घरी गेला. तेथे पुष्कळ गावकरी जमले होते. शंकरने आपल्या खिशातून एक तांब्याचा ताईत काढून चौरंगावर ठेवला. नंतर त्याने दुसऱ्या खिशातून हात-

ठेवला. मग उजव्या हाताने खिशातून कोंबडीचे अंडे काढून डाव्या हातात ठेवले आणि ते हातरुमालात झांकून ठेवले. नंतर ताईत काढला आणि उजव्या हाताने तो हातरुमालात घालून त्याने आत काहीतरी हालचाल केली. पुन्हां ताईत बाहेर काढला. काही वेळ थांबून हात रुमालाची टोके बाजूला सरकवली. त्याच्या डाव्या हातात दोन अंडी दिसल्यावर गावकरी आश्चर्यचकित होऊन डोळे फाडून पाहू लागले.

शंकरने दोन अंडी रुमालात गुंडाळून खिशात ठेवली आणि ताईत काढून डोळ्यांना लावून तांबड्या दोऱ्याने आपल्या दंडाला बांधून ठेवला.

त्या दिवशी प्रयोग करण्यापूर्वी एकदोन दिवस शंकर शहरात जाऊन पशु चिकित्सक आणि कुक्कुट तज्ञांना भेटला आणि त्यांचा सल्ला व मदत घेऊन कुक्कुट पालनावर पुस्तके, औषध व इंजेक्शने विकत घेतली. इंजेक्शने कशी द्यायची हे त्याने शिकून घेतले होते. दोन दिवसात या विषयावर त्याने अनेक गोष्टींची माहिती करून घेतली होती आणि दीनानाथच्या घरी प्रयोग करण्यापूर्वी अंडी दुप्पट करण्याची रीतदेखील समजून शिकून घेतली होती.

ती रीत अशी: एका मोठ्या अंड्याचे टरफल घेऊन त्याचे दोन उभे समसमान भाग कापून घ्यायचे. अर्ध्या टरफलात एक लहान अंडे सहज राहू शकते. अशी दोन



अंडी ठेवलेले मोठे अंडे शंकरने प्रयोगाच्या वेळी पूर्वी तैयार करून आणले होते. त्याने प्रेक्षकांना अंड्याचा वरचा भाग तेवढा दाखविला. हात घालून हाल-चाल करताना अंडी टरफलातून बाहेर काढली. थोड्या अंतरावरून पाहुणाऱ्यांना टरफलाचे दोन जोडलेले भाग एकाच अंड्यासारखे वाटत होते.

जादू यशस्वी झाल्यावर शंकरने पुढला कार्यक्रम हाती घेतला. त्याने काही कोंबड्या विकत आणून पाळल्या. सरकारकडून त्याला उत्तम प्रकारचा कोंबड्यांना घालायचा चारा मिळाला. स्पर्शजन्य रोग होऊ नयेत म्हणून त्याने कोंबड्यांना रोग-निरोधक इंजेक्शने दिली. कोंबड्या झपाट्याने वाढल्या आणि मोठी अंडी घालू लागल्या. एकदेखील कोंबडी मेली नाही. गावकरी येऊन त्याच्या कोंबड्या पाहून त्याची पद्धत व रीत पाहून जात. चार आठवड्यात शंकरचा धंदा उत्तम तऱ्हेने चालू लागला.

“हा सर्व या ताईताचा प्रताप आहे दिनूमामा! त्यानेच माझा धंदा वांचविला. कोंबड्यांना चांगला आहार दिला आणि कोंबड्यांची वाढ चांगली झाली. इंजेक्शनांनी त्यांना पुष्ट केले. तुम्ही मुळीच भिण्याचे कारण नाही यापुढे. पुन्हां कोंबड्या पाळण्याचा धंदा सुरू करून गीतापूरच्या अंड्यांना पुन्हां बाजारांत पाठवा. त्या सिद्धपुरुषाकडून मी आणखी ताईत घेऊन येतो. मी येथे आहे तोंपर्यंत माझा ताईत आहेच. मी दर रोज प्रत्येकाकडे जाऊन कोंबड्यांना काही त्रास होऊ नये याची काळजी वाहातो.”

शंकरने दिलेल्या प्रोत्साहनामुळे त्याच्या मार्गदर्शनाखाली शेतकऱ्यांनी पुन्हां कोंबड्या पाळण्याचा धंदा सुरू केला. त्यांना खूप फायदा होऊ लागला.

शंकरने स्वतः पशुचिकित्सा शास्त्राचा जास्त अभ्यास करून त्यात प्राविण्य संपादन केले. त्या मार्गदर्शनाखाली कोंबड्या पाळण्याचाच धंदा नव्हे, तर गोपालन वगैरे धंदेही उर्जितावस्थेत आले.





# निर्लज्ज सदा सुखी

चंद्रवर्मा नावाच्या राजाच्या सभामंडपावर धर्मू नावाचा एक शिपाई पाहारेकऱ्याचे काम करीत असे. चंद्रवर्मा एकदां त्या बाजूने जात असतां धर्मूला म्हणाला— “काय रे. तुला एकट्याला बरेच काम पडत आहे नाही का? तुला मदतीला आणखी एका शिपायाला पाठवून देतो.”

“प्रभू! त्याची गरज नाही!” असे धर्मू उत्तर देणार, तितक्यात राजा निघून गेला होता.

धर्मू त्याला मदतीची गरज नाही म्हणाला, त्याला एक कारण होते. राजाच्या दर्शनास येणाऱ्या लोकांकडून धर्मू खूप लांच घेत असे. त्यात त्याला चांगली प्राप्ती होई. मदतीला आणखी कोणी आला म्हणजे त्याच्या मिळकतीत एक वांटेकरी येणार किंवा तो आपल्या विरुद्ध राजाचे कान भरणार अशी शंका त्याला आली.

दुसऱ्या दिवशी त्याला नको असलेला ‘मदतनीस’ आला. राजाच्या दर्शनास येणाऱ्या लोकांना बाजूला बोलावून नेऊन आपले बक्षिस धर्मू वसूल करू लागला. ते पाहून त्याच्या मदतनिसाने त्याला धमकावले की, महाराजांना जाऊन कळवीन. धर्मूने आपल्या मिळकतीतील वांटा द्यायचे प्रलोभन दिले. परंतु तो मानेना. कारण धर्मू लांच घेत असल्याच्या संशयावरूनच तर राजाने त्याला धर्मूवर डोळे ठेवण्यासाठी नेमले होते.

आपला मदतनीस मदत करणार नाही, कळल्यावर धर्मूने पवित्रा बदलला. राजाच्या दर्शनाला येणाऱ्या लोकांना तो सांगे— “हे पहा, मालक! हा आहे ना, मी आपल्याकडून लांच घेतो अशी महाराजांकडे तक्रार करायची म्हणतो आहे. तुम्ही माझ्या बाजूने साक्ष दिली पाहिजे बरं का?”



धमुं मुरलेला माणूस होता. वीस वर्षे त्या जागी त्याने ते काम केले होते. ज्यांच्याकडून तो पैसे घेई त्यांची थोडी-फार कामे करवूनही देत असे. तो त्या जागेवर नसला तर त्यांची कामे करवून देणारा माणूस हातचा जाईल या हेतूने लांच देणाऱ्या लोकांनी साक्ष द्यायचे मान्य केले. त्यामुळे दुसऱ्या पाहरेकऱ्याचे तोंड बंद झाले. शिवाय धर्मूने विरुद्ध तक्रार करू नये म्हणून त्यानव्याने आपल्या पगारातली पंचनांश रक्कम धर्मूला देण्याचे कबूल केले.

दोन महिने असेच गेले. नवरा पुरा

नव्या पाहारेकऱ्याच्या बायकोने राजाच्या कानावर घातली. राजाने चवकशी केली. तेव्हां खरी गोष्ट राजाला कळली. तेव्हां राजाने धर्मूला कचेरीवर घंटा वाज-विण्याच्या कामावर नेमले.

कचेरीत काम करणाऱ्या कारकुनांना भेटून धर्मूने त्यांच्यावर कामाचा भार वाढत चालल्याबद्दल सहानुभूतीचे दोन शब्द बोलून त्यांना आपल्या बाजूला वळवून घेतले. म्हणाला–"तुमच्यावरचा कामाचे ओझे कमी करायला कामाची वेळ कमी करायचा उपाय मी करतो. त्याबद्दल सर्वांनी मला थोडीथोडी मदद केली पाहिजे." गरीब कारकून त्या गोष्टीस कबूल झाले. त्या दिवसापासून कचेरीची वेळ सुमारे एक तास कमी होऊ लागली.

कित्येक महिने हे चालू होते. धर्मूकडे कुबेराचे धन एकत्र होत होते. त्याने राजधानीच्या मध्यभागी एक मोठा बंगला बांधला.

एके दिवशी राणीला आश्चर्य वाटले. ती राजाला म्हणाली–"काय हो, दिवस लवकर कसा काय संपतो? संध्याकाळ मात्र कां रेंगाळत येते? हे सर्व विचित्रच वाटतं आहे! चंद्रवर्मालाा सुद्धां तसेच वाटत होते. परंतु त्याने कधी त्या गोष्टीकडे ध्यान

अंतःपुरातल्या घड्याळाजवळ पापणी न हालविता बसून राहिला.

कचेरीत काम सुरू होईपर्यंत घड्याळ अगदीबरोबर चालत होते. एका मिनिटाचा ही फरक नव्हता. परंतु वाळूच्या घड्याळा-तली सर्व वाळू पडायच्या आतच पुढल्या घंटा वाजत गेल्या. घंटा वाजविणारा धर्मूच होता. संध्याकाळी कचेरी बंद व्हायच्या वेळी शेवटची घंटा वाजली तोंपर्यंत एका तासाचा फरक पडला. तेव्हां राजाला दिवस लहान होण्याचे कारण समजले.

चंद्रवर्माने धर्मूला बोलवून सर्व चवकशी केली तेव्हां तो कारकुनांकडून व अधिकाऱ्यां-कडूनही खूप लांच घेत असल्याचे कळले. परंतु जुन्या नोकराला एकदम कामावरून कमी करायला राजाचे मन मानेना. कोणत्यातरी कडक अधिकाऱ्याच्या हाता-खाली नेमावे म्हणजे याची खोड जाईल, असे राजाला वाटले.

बराच विचार केल्यावर राजाला आठ-वले की, त्याचा सेनापती म्हणजे सामान्य माणूस नसून मनाचा कर्कोटक नागासारखा आहे. राजाने त्याच दिवसापासून धर्मूला सेनापतीच्या खास विश्वासतल्या नोकराच्या पदावर नेमले. या नवीन पदावर धर्मूने इमानदारापणाने वागण्याचे ठरविले आणि काम करू लागला.



एके दिवशी संध्याकाळी धर्मू फलझाडांना पाणी घालीत असतां बागेच्या बाजूला जी खोली होती त्यांत सेनापती व त्याची बायको दोघांची परस्परांशी कोणत्यातरी गोष्टीवरून बरीच बोलाचाली झाली. ते बोलणे प्रेमाचे नसून काहीतरी भांडण असावे असे धर्मूला कळायला वेळ लागला नाही. त्याची उत्सुकता वाढली व तो खिडकीला कान लावून उभा राहिला. तेव्हां त्याला कळले की सेनापती बाहेर सिंहासारखे किती गरजले तरी बायकोसमोर गोगलगाईसारखे उभे राहतात. बायकोने रागाने एकदम हातात आले ते उचलून नवऱ्याला बडवायला सुरवात केली.



ते दृश्य कोणी पाहिले तर नसेल, असा संशय येऊन सेनापतीने खिडकी-बाहेर वांकून पाहिले तर धर्मू उभा. सेनापतीला पाया खालची जमीन धसल्या-सारखे झाले. बायकोला काय बोलणार? तो बागेत येऊन धर्मूवर कावण्याच्या बेतात होता.

धर्मू त्यापूर्वीच म्हणाला–"पुरे करा हो मालक! किती प्रेम असले म्हणून बायकोच्या हातचा मार खातात का कोणी? ही गोष्ट राजधानीत पसरली तर मालकांची किती बेअब्रू होईल?"

सेनापतीला ती गोष्ट झोंबली. ती गोष्ट या कानाची त्या कानाला कळतां कामा नये, अशा विनवण्या कराव्या लागल्या धर्मूजवळ त्याला.

"त्यात काय मालक? परंतु महा-राजांनीच बोलावून विचारले की 'काय रे, कशी वाटली नवी नोकरी? नवी जागा?' तर खोटं कसं बोलायचं मालक?" धर्मू म्हणाला.

सेनापतीला धर्मूचे तोंड बंद करायला चारा घालावा लागला. हळूहळू धर्मूला सेनापतीच्या बायकोकडूनही चांगली मिळकत होऊ लागली. सिंहासारखा सेनापती आणि त्याची बायको धर्मूसमोर ताटाखालची मांजरे झाली. ही गोष्ट राजाधानीभर पसरली आणि एके दिवशी राजाच्या कानावरही पोचली.

राजाने धर्मूला बोलावून सर्व चवकशी केली तेव्हां सर्व कळले. त्याचा सेनापतीला जांच होणे बरोबर नाही असा विचार करून राजाने धर्मूला कमावरून काढून टाकले. तोंपर्यंत धर्मूने पुष्कळ मिळकत करून घेतली असल्याने त्याला नोकरी गेल्याचे मुळीच वाईट वाटले नाही.

उलट त्यानेच काही निरुद्योगी तरुणांना बोलावून थोडया पगारावर नेमले आणि त्यांना काम वाटून देऊन राजधानीभर फिरून कोठे काही विशेष घडेल ते पाहून एका वहीत टिपून ठेवायचे आणि त्या [illegible] धर्मूच्या घरी [illegible]. त्या वद्यातल्या मुख्यमुख्य गोष्टी धर्मू एका वहीत टिपून ठेवी. त्या टिप्पणाला धर्मू 'बखर' म्हणत असे.

धर्मूच्या बखरीची कीर्ती राजधानीभर पसरली. कोणाला माहीत नसलेली, परंतु हवी असलेली गोष्ट धर्मूच्या बखरीत सांपडू लागली.

त्या वर्षी दसऱ्याचा उत्सव मोठ्या थाटाने राजधानीत साजरा झाला. तो पाहण्यासाठी दूरदुरून लोक आले होते. राजेरजवाडेही आले होते. त्यांनी त्यावेळी भेटी व नजराणे चंद्रवर्माला दिले. एका राजाने एक सुंदर हिऱ्याची अंगठी दिली होती.

दहाव्या दिवशी संध्याकाळी दसऱ्याचा उत्सव संपला. सर्व लोक आपापल्या गावी परतले. उत्सवाच्या गर्दीत चंद्रवर्माच्या बोटातली हिऱ्याची अंगठी कोठेतरी गळून पडली. नोकरांचाकरांनी, शिपायांनी पुष्कळ शोधून पाहिली, परंतु शेवटी हात टेकून म्हणाले–"आतां मिळाली तर धर्मूच्या बखरीतच मिळेल!"

राजाने पाहूया तर गंमत, असा विचार करून धर्मूला बखर घेऊन बोलवून आणायला शिपायाला पाठविले.

तो आल्यावर राजाने त्याला बखर उघडून दहाव्या दिवशी, म्हणजे दसऱ्याच्या दिवशी घडलेल्या विचित्र गोष्टी बखरीतून वाचायला सांगितले.



धर्मूने बखरीची पाने उलटून एका जागी वाचले—"दक्षिणेकडच्या गल्लीत एका झाडाला राजाच्या अंबारीचा हत्ती बांधून ठेवलेला आहे. माहूत घाईघाईने आपल्या घरी पळत निघून गेला."

राजाने ती बातमी टिपून ठेवणाऱ्या तरुणाला बोलवून आणायला धर्मूला सांगितले. त्या तरुणाने राजाच्या सर्व माहूतांना एका रांगेत उभे केल्यावर खास अंबारीच्या माहूताला ओळखले.

राजाने त्या माहूताला विचारले—"कायरे, तू हत्तीला असा गल्लीत बांधून पळत घरी निघून जायचं कारण काय?"

माहूत म्हणाला—"त्या दिवशी महाराज, आपण हत्तीवरून उतरलात आणि पायीच उत्सवाच्या वेळी हिंडू लागलात माझी चूक नाही महाराज!"

तो तरुण राजाला म्हणाला—"महाराज! काल याची बायको पैठणी विकत घेऊन आणि मोत्यांचा हार करून द्यायला हट्ट [illegible] बसला होता. ते मी ऐकलं होतं आणि ती गोष्ट ही बखरीत नमूद केली आहे, महाराज!"

बखरीत ती गोष्ट नमूद झालेली दिसली.

"एवढे पैसे तुझ्याकडे आले कसे, सांगशील का? की फांशी देऊ?" राजाने करड्या स्वरांत विचारले.

माहूत थरथर कापत म्हणाला—"महाराज! त्या दिवशी आपण अंबारीतून उतरण्याच्या घाईत होतां. आपल्या बोटातली अंगठी गळून पडली. ती मी चटदिशी उचलली. ती विकून खर्चाला पैसे आणून द्यायला बायकोने हट्ट धरला, महाराज!"

राजाला अंगठी मिळाली. धर्मू आणि त्याच्याकडे काम करणाऱ्या पोरांचा कसा उपयोग करून घ्यायचा, याविषयी राजा विचार करू लागला. त्यांना गुप्तचरांचे आणि हेरगिरीचे काम द्यायचं त्याने ठरविले. त्यांना चांगला पगार दिला. तेव्हांपासून त्या राज्यात हेरांचे आणि गुप्तचरांचे एक निराळे खाते सुरू झाले.





# निरुपयोगी सल्ला

एका गावाच्या टोकाला स्मशानात भुतांचा अड्डा होता. त्यांच्यात एक म्हातारी भुतीण होती. तिला इतर भुते त्यांच्या समोर जेजे प्रश्न उभे रहात ते सांगत आणि ती ते प्रश्न कसे सोडवायचे सांगे.

एकदा म्हातारी भुतीण जंगलात हिंडून दमल्यावर एका जुनाट पडक्या विहिरीच्या कठड्यावर जाऊन बसली.

"कोण बसलं आहे ते कठड्यावर? माझी जागा आहे ही सारी!" तो आवाज ऐकून म्हाताऱ्या भुतिणीने मान वर करून पाहिले तेव्हां तिला एक तरणी भुतीण दिसली. तिला म्हातारीने विचारले—"तुझी आहे का ही जागा? असेल त्यात काय? कठडा खूप मोठा आहे. तू सुद्धां बस येऊन." ती म्हणाली.

ती तरुण भुतीण म्हाताऱ्या भुतिणीच्या शेजारी येऊन बसली.

"मी इकडच्या स्मशानात राहते. भुतांसमोर काही प्रश्न उभा राहिला की ती मला येऊन विचारतात." असे सांगून म्हातारीने तरुण भुतिणीला आपली ओळख सांगितली.

ते ऐकून ती तरुण भुतीण म्हणाली—"माझ्यासमोर एक समस्या उभी राहिली आहे." तिने म्हातारीला तिच्या समोरची समस्या सांगितली.

ती रहात असे त्या वडाच्या झाडाजवळ एक जुने घर होते. एका महिन्यापूर्वी त्या घरात एका संगीत शिक्षकाने गाण्याचे क्लास काढले. गावातले बरेच लोक गाणे शिकायला त्या शिक्षकाकडे येत. दिवसभर संगीत क्लास चालत आणि मुलेमुली येऊन संगीत शिकत. इतके दिवस निश्चितपणे त्या झाडावर राहणाऱ्या भुतिणीला त्या संगीताची कटकट होत असे. त्या संगीत



शिक्षकाला त्या घरातून कसे पळवून लावायचे ही समस्या भुतिणीसमोर होती.

ते सर्व ऐकून म्हातारी भुतीण म्हणाली– "ही काय मोठी समस्या झाली का ग? मी मोठमोठ्या समस्या सोडविल्या आहेत. मी सांगते तसे कर म्हणजे तुझी समस्या सहजी सुटेल." असे सांगून म्हातारीने तरुण भुतिणीला कोणतातरी सल्ला दिला.

त्या तरुण भुतिणीला तो सल्ला आवडला. ती त्या दिवशी रात्री तो संगीत शिक्षक रहात असे त्या घरात गेली आणि बोक्याचे रूप घेऊन आत उडी मारली. तो आवाज ऐकून संगीत शिक्षकाची झोप मोडली. लगेच ती बोक्याचे रूप टाकून भुतिणीचे रूप घेऊन उभी राहली. त्या शिक्षकाने निर्भयपणे तिला विचारले–"कोण ग तू? या अपरात्री तुझे येथे काय काम?"

भुतीण मोठ्याने हसत म्हणाली–"तुला माहीत नाही का, मी एक भुतीण आहे. मी वाटेल ते रूप घेऊन मी या घरात फिरत राहीन." असे म्हणत तिने वटवाघळाचे रूप घेतले आणि उडू लागली.

"ठीक, तर तुला पुण्य लागेल, तू दररोज बोक्याच्या रूपात येऊन माझ्या घरात वाटेल तितकी फीर, उंदरांचा मला जो त्रास होतो तो तरी कमी होईल. नंतर पालीचे रूप घेऊन किडे, डास वगैरे खात जा." संगीत शिक्षक म्हणाला.

ती तरुण भुतीण रागाने म्हणाली– "मला दुसरे काही काम नाही असे वाटलं का तुला?" असे म्हणत फणकाऱ्याने ती तेथून निघून गेली.

दुसऱ्या दिवशी ती विहिरीच्या कठड्यावर त्या म्हाताऱ्या भुतिणीला भेटून म्हणाली–"आजी! तुझी युक्ती फुकट गेली. तो मोठा वस्ताद दिसतो आहे."

"अग एक युक्ती यशस्वी झाली नाही तर दुसरी होईल. ऐक तरी." असे सांगून म्हातारीने तिला दुसरी एक युक्ती सांगितली.

ती तरुण भुतीण त्या दिवशी रात्री त्या संगीत शिक्षकाच्या घराच्या छपरावरची कवले काढून खाली जमिनीवर फेकू लागली.

तो आवाज ऐकून संगीत शिक्षकाची झोप मोडली. त्याने बाहेर येऊन विचारले– "कोण ते कवले काढते आहे?"

"मी, भुतीण! काही तरी करीत राहल्याशिवाय मला करमत नाही." असे म्हणत ती हवेत कोलांट्या मारू लागली.

"ही सरकस तू मागाहून पाहिजे तेवढी कर. पहिल्याने थोडे काम आहे ते कर. अलीकडे चार पैसे माझ्याकडे जमले आहेत. मी जुनी कवले काढून गच्चीच करावी म्हणतो आहे. उजाडायच्या आधी सर्व कवले काढून टाक बघू." असे सांगून संगीत शिक्षक बाहेर एका झाडाखाली झोपला आणि घोरू लागला.

"मोठा लबाड दिसतो आहे की हा! माझ्याकडून फुकटात काम करवून घेणार आहे वाटतं?" असा विचार करून वटवाघळाचे रूप घेऊन ती तरुण भुतीण ओरडत विहिरीच्या दिशेने उडून गेली.

"तू बरीच उत्साहाने आली आहेस. संगीत शिक्षकाला काढून लावलेस वाटते घरातून?" म्हाताऱ्या भुतिणीने तरुण भुतिणीला विचारले.

"कपाळ माझं! त्यानेच मला पळवून लावले. त्याच्याजवळ तुझे सल्ले आणि युक्त्या सर्व फुकट गेल्या." तरुण भुतीण म्हणाली. आपल्या दोन्ही युक्त्या फुकट निरुपयोगी



ठरलेल्या ऐकून म्हातारीला अपमान वाटला. तिने आणखी एक उपाय सुचविला.

त्याप्रमाणे तरुण भुतीण दुसऱ्या दिवशी गेली. तिने दार वाजवून संगीत शिक्षकाला जागे केले.

"पुन्हां कशाला घेऊन आली आहेस आपले काळे तोंड, माझी झोप मोडायला?" संगीत शिक्षक म्हणाला.

"तू मुकाट्याने हे घर सोडून चालता होणार आहेस की नाही? गावातला इकडचा हा सर्व भाग माझा आहे. मी कित्येक दिवसांपासून येथे राहते आहे. तू येऊन आपले गाणे सुरू करून माझी शांती हरण केली आहेस." ती म्हणाली.

"अस्सं! मी कित्येक दिवसांपासून भाड्याने घर मिळाले नाही म्हणून काळजीत होतो. संगीत शिक्षकाला भाड्याने कोण घर देणार? माझ्या नशिबाने मला हे घर सहजी मिळाले. पुष्कळ मोठी शिष्यमंडळी मिळाली आहे. म्हणून हे घर सोडून जाण्याचे माझ्या मनात मुळीच नाही. तूच तुला वाटेल तिकडे निघून जा. मी ना नाही म्हणणार!" संगीत शिक्षकाने तिला साफ उत्तर दिले आणि करवट बदलून पुन्हां झोपला.

तरुण भुतिणीचे एवढेसे तोंड झाले. ती विचार करू लागली रिकामटेकडे बसून सल्ला द्यायला काय गेले त्या थेरडीला? स्वतःचा प्रश्न स्वतःच सोडवायला हवा.

दुसऱ्या दिवशी दिवसभर विचार करून रात्री ती संगीत शिक्षकाला भेटून म्हणाली– "उद्यांपासून रात्री मला संगीत शिकवा. नाहीतर दिवसां मुलंमुली शिकायला येतात त्यांच्याबरोबर येऊन बसेन शिकायला." तिच्या बोलण्याच्या धाटणीवरून ती तसे करणार या गोष्टीची खात्री पटल्यावर संगीत शिक्षक घाबरला. आतांच कोठे चांगलं नाव मिळू लागलं आहे. मी भुतांना संगीत शिकवितो हे कळलं तर चिटपाखरू-देखील इकडे फिरकणार नाही. गावकरी मला धक्के मारून गावाबाहेर काढतील. म्हणून त्या दिवशी रात्रीच संगीत शिक्षकाने घर बदलले.





# उशिरां ज्ञानोदय

एका गावी शिबू आणि शितू नावाचे दोन शेतकरी होते. शिबूने दोन एकर जमिनीत ज्वारी पेरली. पीक छान येण्याची चिन्हे दिसत होती आणि कापणीची वेळ जवळ येऊन ठेपली होती. नेमकी त्या वेळीच शितूची गुरे शिबूच्या शेतात शिरली आणि उभ्या पिकाचा नाश झाला. शिबूने शितूकडे एक हजार रुपये नुकसान भरपाई मागितली. शितूने ती अमान्य केली.

शिबूने गावातल्या पंचांकडे धाव घेतली आणि न्याय करायला सांगितला. त्यांनी चवकशी करून शिबूवर आरोप लावला की, त्याने शेताला कुंपण बांधून शेताच्या रक्षणाची व्यवस्था केली नव्हती. शितूवर त्यांनी आरोप ठेवला की, त्याने निष्काळजी-पणाने गुरे सोडली. म्हणून शेताचा नास झाला. त्याने गुराखी किंवा गडी गुरांबरो-बर ठेवायला हवा होता. दोघांचीही चूक होती. म्हणून एक हजार नुकसान भरपाई दोघांवर वाटून शितूला पाचशे रुपये नुकसान भरपाईचे म्हणून शिबूने द्यावे असा निवाडा दिला.

गावचा पाटील लांचखोर होता. म्हणून शितूला त्याची मदत घ्यावेसे वाटले. तो त्याच्याकडे पंचांच्या निवाड्याविरुद्ध न्याय मागायला गेला. त्याने त्याला अडीचशे रुपये त्याबद्दल द्यायचे कबूल केलें. पाटलाला आणखी काय पाहिजे? त्याने पंचांविरुद्ध निवाडा दिला की, चूक शिबूचीच होती की त्याने कुंपण घालून शेताच्या रक्षणाची पुरेशी सोय केली नव्हती. मुक्या गुरांना कोठे तोंड लावायचे आणि कोठे लावायचे नाही, कळते का. म्हणुन शितूने नुकसान-भरपाई देण्याची मुळीच गरज नाही.

शिबूला पाटलाचा निवाडा कसा मान्य होणार? तो मामलेदाराच्या कचेरीत

पाटलाच्या निकालाविरुद्ध न्याय मागायला गेला. त्याने मामलेदाराला अडीचशे रुपये चारून आपल्याकडे वळवून घेतले आणि आपल्या बाजूने निवाडा करवून घेतला.

मामलेदाराने निवाडा दिला तो असा– "गावांत किती शेते आहेत. प्रत्येक शेताला कोणी कुंपण घालीत नाही. म्हणून शिवूचे नुकसान शितूने एक हजार रुपये देऊन भरून काढावे."

शितू तो निवाडा ऐकून का स्वस्थ बसणार? तो गेला जिल्हा अधिकाऱ्याकडे. तोदेखील लांचखाऊच. तो म्हणाला– "मामलेदाराने तुझ्याविरुद्ध निवाडा देऊन एक हजार रुपये तू शिवूला द्यावेत असा निकाल दिला होता ना? तरमग तू त्यातले अर्धे रुपये तरी मला दे. तुझ्या बाजूने निकाल होईल."

पांचशे रुपये लांच दिली तरी आपल्याला अडीचशे रुपयाचा फायदाच होईल असा विचार करून शितूने पांचशे रुपये त्याला दिले. मामलेदाराचा निवाडा बरोबर नाही. पाटलाने दिलेला निकालच बरोबर होता असा जिल्हाअधिकाऱ्याने निकाल दिला.

शिवूला आतां मात्र राग आला. तो प्रांताकडे धावला. पांचशे रुपये लांच देऊन त्याने त्याच्याकडून शितूच्या विरुद्ध आणि आपल्या बाजूने निकाल करून घेतला. आतां प्रांताच्या वर अपील म्हणजे सर्वोच्च न्यायाधिकाऱ्याकडेच. तो मात्र लांचखाऊ नव्हता. खरा न्यायनिवाडा करणारा होता. त्याने सुरवातीपासून सर्व गोष्टींची चवकशी केली आणि पंचांनी जो न्याय दिला होता, तोच बरोबर होता, असा न्याय दिला. शितूने शिवूला पांचशे रुपये मुकाट्याने दिले आणि कान धरला.

शिवू आणि शितू घरी परत येत असतां परस्परांजवळ बोलू लागले, पंचांनी दिलेला निवाडा मान्य करून आपण गप्प बसलो असतो तर आपले आजपर्यंत झाले तितके नुकसान झाले नसते. दो ी प्रत्येकी साडेसातशे रुपये घालवून बसले होते. मेहनत फुकट गेली ती वेगळीच.



# भूतदया

एक राजा आपला वाढदिवस मोठ्या थाटामाटाने साजरा करीत होता. त्याचे सामंतराजे अनेक नजराणे घेऊन आले. एक शिकारी एक हरणाचे पाडस घेऊन आला. ते त्याने नजराणा म्हणून दिले. राजाने खूष होऊन ओंजळभरून सोन्याची नाणी त्याला दिली.

ते पाहून मंत्री म्हणाला–"त्या शिकाऱ्याला दिलेले बक्षिस थोडे जास्तच झालं नाही का?"

राजा म्हणाला–"तसं जास्त काय दिलं? स्वतंत्रपणे विहार करणाऱ्या निरुपद्रवी प्राण्याला पुन्हा स्वतंत्रता देण्याची संधी मला दररोज मिळेल का?"

"महाराज, आपण एका गोष्टीचा विचार करावा. पकडल्या गेलेल्या निरुपद्रवी प्राण्यांना आपण सोडून देत आहात हे कळले तर तसे प्राणी धरून आणून देणारे अनेक लोक येतील. त्यांपैकी काही प्राण्यांना या प्रयत्नात कष्ट देखील सोसावे लागतील. आपण भूतदया दाखवायचीच असेल तर कोणीही निरुपद्रवी प्राण्यांस धरू नये असा कायदा करा. परंतु निरुपद्रवी प्राण्यांना धरून आणल्यानंतर त्यांना सोडून दिल्याने भूतदया होते असे मात्र मानणे बरोबर होणार नाही." मंत्री म्हणाला.

राजाला ती गोष्ट पटली व त्याने तसा कायदा केला.












# संन्यास्याचा संन्यास

वरंगल राज्याचे पतन झाल्यानंतर काकतीय साम्राज्याचा अस्त झाला. काकतीय चक्रवर्ती प्रतापरुद्र याते हरिहरराय आणि बुक्कराय नावाचे दोघे भाऊ खजीनदार होते. त्यांनी तुंगभद्रेच्या किनाऱ्यावरील प्रदेशात प्रस्थान करून तेथे विजयनगर राज्याची स्थापना केली. हरिहरराय वारल्यावर बुक्करायच राज्याचे अधिपती झाले. बुक्कराय एक कर्तबगार शासक हो.ते त्यांनी प्रजेत कोठे भेदभाव दिसला तो किंवा धार्मिक वैर दिसले ते दूर करण्याचा खूप प्रयत्न केला. प्रजा सुखी होती आणि शांतता नांदत होती. मुसलमानांचा अत्याचार असह्य झाल्यावर वरंगल व इतर प्रदेशातील हिंदूप्रजा विजय नगराच्या राज्याश्रयाला येऊन सुखाने राहू लागली. परंतु बुक्करायाने नेहमी एक धोरण अवलंबिले होते, धार्मिक वैषम्य त्यांना पसंत नव्हते. सर्व धर्मांच्या अनुयायांना ते समदृष्टीने वागवीत.

वरंगल सोडून हिंदू लोक जात त्यांना सुताचा एक धागासुद्धां बाहेर नेण्याची मनाई होती. जवळ असे ते सरकारात जमा करून जावे लागे. पैसा अडकां न्यायचा झालातर सरकारी अधिकाऱ्यांच्या डोळ्यात धूळ फेकूनच जावे लागे. मुसलमानांना मोकळेपणे बाहेर जायला किंवा यायला परवानगी होती.

वरंगल येथे मुत्याल नावाचा एक हिंदू सावकार होता. लहानथोर अधिकाऱ्यांची तोंडे भरणे त्याला अशक्य झाले. त्याने विजयनगर राज्यात प्रयाण करण्याचे मनाशी ठरविले. मोकळेपणे जायचे म्हणजे अंगावरच्या वस्त्रांशिवाय बरोबर काही नेणे शक्य नव्हते. म्हणून त्याने एका फकीराबरोबर मैत्री वाढविली.

त्या फकीराजवळ एक उंट होता. तो मक्कामदिना वगैरे तीर्थक्षेत्रांची यात्रा त्या उंटावरच करून आला होता. त्याचे स्वत.चे असे निराळे नाव नव्हते. तो फकीर नावानेच ओळखला जाई. त्याला कोणी 'फकीरा' म्हणून हाक मारले की तो अभिमानाने आपल्या दाढीवर बोटांनी विचरल्यासारखा हात फिरवीत बोले. तो फकीर मुत्याल सावकाराला मदत करायला कबूल झाला. मुत्यालकडे हिरे, माणिक्ये आणि सोने पुष्कळ होते. तो सर्व ऐवज फकीराने विजयनगरला पोचता केला तर मुत्याल सावकाराने त्याला एक लाख रुपये इनाम देण्याचे कबूल केले.

फकिराने पुढे निघावे आणि त्यानंतर पंधरा दिवसांनी मुत्यालने निघावे. फकिराने विजयनगरला पोचल्यावर मुत्याल येईपर्यंत वाट पहावी, असे ठरले.

ठरल्याप्रमाणे फकीर निघाल्यावर पंधरा दिवसांनी मुत्याल निघाला आणि विजयनगरला सुखरूप येऊन पोचला. त्याने त्या फकीराचा पुष्कळ शोध केला. जो भेटेल त्याला आणि घरोघरी जाऊन चवकशी केली. परंतु फकीरचा पत्ता लागला नाही.

वस्तुस्थिती अशी होती की, इतके वैभव पाहल्याबरोबर फकीराचे डोळेच फिरले.



आपली दाढी काढून टाकली आणि हिंदू व्यापाऱ्याचा वेष घेऊन, मुत्यालने त्याच्याकडे दिलेले हिरे वगैरे सर्व विकून टाकले.

तो विजयनगरच्या रस्त्यावर हिडत असतां एकदां त्याला मुत्याल भेटला. मुत्यालने त्याला ओळखले नाही. म्हणाला–
"काय हो, पंधरा दिवसापूर्वी येथे वरंगलहून एक फकीर एका उंटावर बसून विजयनगरला आला. तो तुम्हांला कोठे दिसला का ?"

"पाहिल्यासारखा वाटतो हो! त्याला एक मोठी लांब दाढी होती नाही का ?" फकिराने मुत्यालला विचारले.

"होय होय, त्याचा पत्ता आहे का

"कालच तो या जागी मला भेटला होता हो! त्याच्याकडे थोडे सोने, हिरे आणि माणिक्येसुद्धां होती. विकत घेतां का, मला विचारीत होता. मी नाही विकत घेतले. काही सुद्धा, इतक्यात कोणी बगदादचा व्यापारी भेटला. दोघे बगदादला निघून गेले." असे म्हणत फकीर संवयी प्रमाणे दाढी बोटांनी विचरल्यासारखा हात हलवू लागला.

मुत्यालने तत्काळ त्याला ओळखले व म्हणाला–"तूच की रे तो फकीर आहेस, माझा सर्व ऐवज गडप करणारा !"

"मी? चुकतां आहां तुम्ही!" फकीर म्हणाला.

दोघांमध्ये बरीच बोलाचाली झाली. शेवटी मुत्याल बुक्करायांकडे गेला आपले गाऱ्हाणे घेऊन. त्याने घडलेले सर्व वृत्त सांगून न्यायनिवाडा करायला विनंती केली. बुक्करायांनी फकिराला न्यायालयात बोलाविले. त्यांनी फकिराला मुकाट्याने ऐवज मुत्याललला परत देऊन टाकायला सांगितले.

"अहो मी फकीर नाहीच" फकीर म्हणाला.

"मग मुत्याल तुला फकीर कां म्हणतो आहे?" बुक्करायांनी फकीराला विचारले.

फकीर म्हणाला–"महाराज! मी एक व्यापारी आहे, माझ्याजवळ खूप पैसे आहेत असे समजल्याने त्याने हा खोटा आरोप माझ्यावर लावला आहे."

बुक्कराय एक क्षणभरच थांबले असतील विचार करायला. फकिरावाला म्हणाले–"ह्या मुत्यालने लावलेला आरोप खरा ठरू शकत नाही. तेव्हां तुला जायला हरकत नाही."

फकीर आनंदाने फुलून जाऊन बाहेर निघून जात असतां बुक्कराय पाठीमागून मोठ्याने म्हणाले–"त्या फकीराला जरा थांबायला सांगा."

लगेच फकीराने मागे वळून पाहिले. अशा तऱ्हेने फकीराला बुक्करायांनी पकडले. मुत्याललला त्याचे सर्व वैभव तर मिळालेच, त्याचबरोबर फकिराला शिक्षासुद्धा झाली.



# सर्व उलटेच

एका गावी विठोबा आणि रखमाबाई नावाचे नवरा बायको रहात. रखमाबाई जे म्हणेल त्याच्या विरुद्ध विठोबा बोले. एकदां दिवाळीचा सण आला तेव्हां रखमाबाई नवऱ्याला विचारू लागली–"दिवाळीला माहेरी जावे म्हणते." विठोबा म्हणाला–"शक्य नाही. घरात पडून रहा स्वस्थपणे."

त्या दिवशी रात्री रखमाबाईचा भाऊ रघू तिला व मेहुण्याला भेटायला आला. तिने भावाला, नवरा म्हणाला ते सांगितले. रघू रात्री जेवण झाल्यावर छान झोपला. दुसऱ्या दिवशी उजाडतांच निघतांना विठोबाला म्हणाला–"मी ताईला म्हटले, सण आहे, चल, चार दिवस माहेरी! तुम्ही सुद्धा जा म्हणालात म्हणे. परंतु ती हट्ट करते आहे, यायला तयार नाही. ही अशी तऱ्हेवाइकासारखी कां झाली कळत नाही. परंतु तिला नका बरं का काही विचारू तुझा भाऊ!"

लगेच विठोबा घरात जाऊन म्हणाला–"तो तुला माहेरी घेऊन जातो म्हणाला, पण तू नाही म्हणालीस, म्हणे. कां नाही जात? जा बघू."

"कशाला? नको हो. मी इकडेच राहते, तुम्ही रेशमी साडी आणून दिलीत तर सणाच्या दिवशी सकाळी जाऊन संध्याकाळी परत येईन." रखमाबाई म्हणाली.

विठोबा संतापून–"ते काही चालायचे नाही. आतांच नीघ. मुकाट्याने दिवाळी माहेरी काढून सावकाश ये!" असे म्हणत गाडी घेऊन यायला निघाला.





# खरं की खोटं?

पुरी विद्यापीठात विद्याभ्यास संपवून सुधीर आणि सुरेंद्र नावाचे दोघे राजकुमार आपापल्या राजधानीला निघाले. दोघांत गाढ मैत्री होती. दोघे शेजारच्या देशातच रहात असत.

वाटेत एक जंगल होते. ऐन मध्यभागी पोचल्यावर ते पावसात सापडले. सुदैवाने पावसापासून बचाव व्हायला त्यांना जवळच एक पडके जुने देऊळ दिसले. आत पाऊल टाकतांच त्यांना त्यांच्या आधी देवळात येऊन पोचलेला एक बैरागी दिसला.

त्यांनी विचारले तेव्हां तो बैरागी उत्तर देत म्हणाला—"मी एक ज्योतिषी आहे. देशभर भ्रमण करून कालच मी येथे आलो. मला माणसातला मंदपणा आवडत नाही. मी देशदेशांतराचा प्रवास करून ज्योतिष्यशास्त्रात फार मोठे पांडित्य संपादन केले आहे."

सुरेंद्राला ज्योतिष्याची फार आवड होती. त्याने आपले भविष्य सांगायला त्या बैराग्याला सांगितले.

"भविष्य काळात काय होणार हे कळले तरी मनुष्याला करण्यासारखे असे काहीच नसते. कारण जे व्हायचे असते ते होतेच. मी आपल्या ज्ञानाचा उपयोग माणसासाठी करीत नाही." तो ज्योतिषी म्हणाला.

"काही येत नसणारासुद्धा अशा गप्पा मारू शकतो की!" सुरेंद्र वार करण्याच्या हेतूने म्हणाला.

बैरागी काही वेळ डोळे मिटून मग म्हणाला—"तुम्ही येण्यापूर्वी या जंगलापलीकडे असलेल्या विदर्भदेशाच्या भविष्याविषयी मी जोतिर्गणित करीत होतो. एका आठवड्याच्या आत त्या राज्यात फार मोठमोठे बदल होणार आहेत. आतां तेथे एका अयोग्य राजाचे राज्य आहे. त्या अयोग्य राजाचा खून होणार. परंतु त्याला ठार करणारा गादीवर बसणार नाही, दुसराच बसेल. माझे हे भविष्य कधी खोटे ठरणे शक्यच नाही."

सुरेंद्र त्यानंतर काहीच बोलला नाही. ज्योतिष्यावर सुधीरचा विश्वासच नव्हता. म्हणून त्याने तर तोंडच उघडले नाही.

इतक्यात पाऊस थांबला आणि दोघे मित्र बैराग्याचा निरोप घेऊन पुढच्या प्रवासाला निघाले. जंगल पार झाल्यावर एक हमरस्ता लागला. त्या वाटेने एका दिशेला विदर्भदेश होता. दुसऱ्या दिशेने गेले तर त्यांचा स्वदेश होता.

सुरेंद्र थांबला व मित्राला म्हणाला—"विदर्भाविषयी ऐकलं ते खरे आहे का पाहून यावेसे वाटते आहे. या विदर्भदेशाचा राजा अयोग्य आहे. त्याच्यामुळे प्रजेला फार त्रास होत आहे. त्याला ठार करून विदर्भदेशाच्या प्रजेचे हित करावे असे वाटते आहे."

सुधीर चकित होऊन म्हणाला—"त्या बैराग्याच्या बोलण्यावर विश्वास करून तू विनाकारण स्वतःचा जीव धोक्यात घालून घेणार आहेस का? कोणत्यातरी परक्या देशाचे हित करायला तुला कोणी सांगितले? असा वेड्यासारखा वागू नकोस.



समज, बैराग्याचे भविष्य खरं ठरलं, विदर्भदेशाच्या राजाचा खून झाला तरी त्याचा फायदा तुला मिळणार नाही. आणखी कोणीतरी राजा होईल."

"मला त्याचा फायदा होतो की नाही, याची मला गरज नाही. कोणाचं का बरं होईना. बैराग्याचे भविष्य खरे की खोटे हे मी पाहणार आहे. तू जा तर पुढे, मी तुझ्या पाठोपाठ येतोच." असे सांगून सुरेंद्र विदर्भदेशाच्या दिशेने निघाला.

सुधीरचे पाय हालत ना. आपला मित्र कोणत्यातरी भयंकर संकटात सापडणार आहे, त्याचे रक्षण करण्यासाठी त्याच्या



असे त्याला वाटले. म्हणून तोही सुरेंद्रच्या मागे विदर्भदेशाच्या मार्गाने चालू लागला.

सुरेंद्र सरळ विदर्भदेशाच्या राजधानीत गेला. तो एका धर्मशाळेत उतरला. सुधीर त्याच्या पाठीमागून जाऊन ती धर्मशाळा पाहून विदर्भदेशाचा मंत्री कालकेशी याच्या घरी गेला आणि स्वतःचा परिचय करून देऊन त्याचा मित्र सुरेंद्र याच्या विषयी-देखील त्याच्याशी सर्व बोलला. नंतर तो कालकेशीला म्हणाला–"एक आठवडाभर माझ्या मित्राला कैदेत ठेवून नंतर त्याला सोडा. तो आपल्या वाटेने परतेल. नंतर तो कोणाचाही खून करण्याचा प्रयत्न करणार नाही, या गोष्टीची मी हमी देतो."

"आमच्या राजाच्या खुनाचा विचार ज्या व्यक्तीच्या मनात आहे, त्याचा शिरच्छेद मी तत्काल करावा म्हणतो आहे. परंतु तुझ्याकडे पाहून मी तो विचार मनातून काढून टाकतो आहे. तुझ्या सांगण्याप्रमाणे मी त्याला एक आठवडाभर कैदेत ठेवून नंतर सोडतो." कालकेशी म्हणाला.

सुरेंद्रच्या जिवाला काही धोका नाही असे वचन मंत्र्याकडून मिळाल्यावर सुधीरने त्याचा मित्र कोठे उतरला आहे वगैरे गोष्टी सांगितल्या. नंतर मित्राची सुटका होईपर्यंत तेथेच रहायचे ठरवून सुधीर आणखी एका धर्मशाळेत जाऊन उतरला.

परंतु दुसऱ्या दिवशी उजाडतांच एक वाईट बातमी सुधीरच्या कानावर आली. सुरेंद्रने गेल्या रात्रीतच विदर्भदेशाच्या राजाचा खून केला असून कैद झाला आहे.

ते ऐकून सुधीर हताश झाला. तो कालकेशीला भेटून म्हणाला–"हा खून होऊ नये म्हणून मी आपल्याला माझ्या मित्राला कैद करून ठेवा, असे प्रथमच नव्हते का सांगून ठेवले? तुम्ही लगेच जाऊन त्याला कैदेत कां नाही टाकलेत? तुमच्या निष्काळजीपणामुळेच नाही का ही घोर घटना घडली? तुम्हांला ते शक्य नसल्याचे तुम्ही सांगितले असते तर मी दुसरा काहीतरी उपाय केला असता!"

कालकेशी म्हणाला–"तू म्हटल्यासारखं मी करायला गेलो होतो, परंतु तुझ्या मित्राला ते कळलं की काय, त्यापूर्वीच तो निसटला. तो इतक्या लवकर हे काम करील असे नव्हते वाटले मला. त्याला फाशीची शिक्षा आतां सुटत नाही."

सुधीरला फार वाईट वाटले, काय करावे सुचेना. मंत्र्याजवळ बोलण्यासारखे सुद्धा त्याला काही दिसले नाही. आपल्या मित्राला वांचवायचा काही मार्ग निघतो का, म्हणून तो बराच वेळ विचार करीत बसला. मित्राच्या मृत्यूला आपणच तर एका तऱ्हेने कारण झालो आहो, असेही त्याचे एक मन सांगे.

आणखी काही दिवस लोटले. राजधानी दुसऱ्याच दिवशी मंत्री कालकेशीचा राज्याभिषेक होणार असल्याची व त्याच मुहूर्तावर सुरेंद्राला फाशीची शिक्षा होणार ही वार्तापसरली.

सुधीर राज्यसभेत गेला. दरबारात गर्दी होती. कालकेशी सिंहासनाजवळच्या एका आसनावर बसला होता. सिंहासन रिकामेच होते. सुरेंद्राला बेड्या घालून आणण्यात आले. पहिल्याने त्याचा शिरच्छेद आणि त्यानंतर कालकेशीचा राज्याभिषेक व्हायचे ठरले होते,

सुधीर कालकेशीजवळ जाऊन म्हणाला–"प्रभू, राजद्रोह्याच्या शिरच्छेदाचे काम करण्याची संधी मला द्यावी. ते काम



करून मी आपल्या जबाबदारीतून मुक्त व्हावे म्हणत आहे."

कालकेशीने त्या गोष्टीस होकार दिला.

सुधीरने आपली तलवार उपसून सुरेंद्रच्या बाजूने एक पाऊल टाकले आणि कोणतीतरी शंका आल्यासारखे दाखवून परत कालकेशीकडे वळला आणि विद्युत्वेगाने त्याने कालकेशीचा शिरच्छेद केला.

त्यावेळी सभेत हाःहाकार उडून जायला पाहिजे होता, परंतु मुंगीच्या चालण्याचा आवाजसुद्धां ऐकू येईल इतकी स्तब्धता होती. राजाचे शिपाई जमिनीकडे पहात उभे राहाले. इतक्यात सभेत आनंदाने जयजयकार होऊ लागला. कारण कालकेशी मेल्याचा प्रजेला आनंद झाला होता.

सुरेंद्रच विदर्भदेशाचा राजा व्हावा असे राज्यसभेत एकमताने ठरले. लगेच थोड्या वेळाने सुरेंद्रचा राज्याभिषेक झाला.

नंतर आपला मित्र सुधीर याला कडकडून भेटून सुरेंद्रने विचारले—"तू मंत्र्याचा खून केलास तो मला वांचविण्यासाठीच नी की बैरागी म्हणाला ते खोटे ठरविण्यासाठी?"

"दोन्ही गोष्टी नाहीत. कालकेशीचे वागणे, मला सुरवातीपासून संशयास्पद दिसले. त्या दुष्टाने आपल्या राजाच्या रक्षणासाठी काही न करतां तू त्या दिवशी खून केल्यावर हिकमतीने तुझ्या जिवावर स्वतःच गादी बळकावण्याचा घाट घातला. बैराग्याचे भविष्य त्याच वेळी खोटे ठरले. तू चराजाला मारलेस आणि तूच राजा झालास."

सुरेंद्र हसत म्हणाला—"नाही मित्रा! बैराग्याचे भविष्य अक्षर अक्षर खरे ठरले. राजाला मी नव्हते ठार केले, कालकेशीनेच ठार केले. तो आरोप त्याने माझ्यावर लावला आणि स्वतः राजा होण्याचा प्रयत्न केला होता."

ते ऐकून सुधीर आश्चर्यचकित झाला. त्याने कालकेशीचा वध केला नसता तर तोच राजा झाला असता आणि बैराग्याचे भविष्य खोटे ठरले असते. ते खरे व्हायला सुधीर व सुरेंद्रच कारण झाले.






सहस्त्रावधी वानर कुंभकर्णावर एकदम तुटून पडले. सर्वांनी त्या पर्वताकार हावरदे मुष्टिप्रहार केला. नखांनी ओरबाडले, दातांनी चावले आणि लाथा ढोपरांनी मारून पाहिले. परंतु कुंभकर्णाला त्याचे काहीच वाटले नाही. उलट तो वानरांना धरून आपटून मारून खाऊ लागला.

परंतु हिंमत हारल्याशिवाय अंगदाने आणि सुग्रीवाने खडक आणि पर्वतशिखरे कुंभकर्णावर फेकायला सुरवात केली. तरी ते कुंभकर्णाला एक पाऊलही मागे सरकवू शकले नाहीत. कुंभकर्णाने आपले त्रिशूल सुग्रीवावर फेकले. परंतु हनुमानाने मध्येच ते धरून मोडून टाकले. ते पाहून वानरांना आनंद झाला आणि ते सिंहनाद करू लागले. परंतु कुंभकर्णाने एक पर्वतशिखर उपटून सुग्रीवावर टाकले. सुग्रीवाला बेशुद्ध झालेला पाहून कुंभकर्ण त्याला खांद्यावर उचलून घेऊन लंकेकडे निघाला. हेतू हा की सुग्रीवाला उचलून नेल्यावर वानरसैन्य हताश होऊन परत जाईल व त्यांच्याबरोबर रामलक्ष्मणही निघून जातील.

परंतु मारुती, सुग्रीवाला कुंभकर्ण उचलून घेऊन जात असताना पाहूनही कचरला नाही. त्याला सुग्रीव आपली सुटका करून घेऊन परतेल या गोष्टीची खात्री होती. म्हणून तो वानरांना धीर देण्यासाठी थांबला.

सुग्रीव शुद्धीवर आल्यावर स्वतःला कुंभकर्णाच्या खांद्यावर पाहून भ्याला नाही. त्याला लंकानगरीचे रस्ते व गल्ल्या दिसत



होत्या. त्याने एकाएकी कुंभकर्णाच्या नाका-कानाचा करकरून चावा घेऊन स्वत:ची सुटका करून घेतली. कुंभकर्ण त्याला जमिनीवर फेकून लाथा मारणार इतक्यात सुग्रीव आकाशात उड्डाण करून पसार झाला.

सुग्रीवाला निसटून पळालेला पाहल्यावर कुंभकर्ण पुन्हां युद्धभूमीवर आला आणि वानरांना निर्दयपणाने धरून गाजरामुळ्यां-सारखा खाऊ लागला. तेव्हां लक्ष्मणाने त्याच्यावर शरवृष्टी सुरू केली. परंतु कुंभकर्णाने त्याच्याकडे दुर्लक्ष केले आणि रामावर धावला.

राम त्याला म्हणाला—"कुंभकर्णा! तू इंद्राला जिंकले आहेस हे खरे असले तरी एवढं मात्र लक्षात ठेव की मी इंद्र नसून रामचंद्र आहे. आज माझ्या हाती तुझा वध निश्चत आहे!"

"रामा! तुला काय वाटले, मी विराध, वाली किंवा मारीच आहे? मी कुंभकर्ण आहे. तुझा पराक्रम काय तो आज मी पाहणार आहे. आज तुला मी कच्चा खाण्याचा निश्चय करून आलो आहे." कुंभकर्ण म्हणाला.

रामचंद्राने ज्या बाणांचा प्रयोग करून तालवृक्ष पाडले होते आणि वालीचा वध केला होता तेच बाण काढून कुंभकर्णावर त्यांच्या प्रयोग केला. परंतु कुंभकर्णाच्या अंगाला स्पर्श करून ते बाण खाली पडले. तेव्हां रामाने वायव्यास्त्राचा प्रयोग केला. तो कुंभकर्णाच्या उजव्या हाताला लागला आणि गदेसह तो हात तुटून गळून पडला.

परंतु कुंभकर्ण पाऊल मागे न घेता सिंहगर्जना करीत एक मोठा वृक्ष डाव्या हाताने उपटून रामावर धावला. तेव्हां रामाने इंद्रास्त्राचा प्रयोग करून तो हातही तोडून टाकला. तरी कुंभकर्ण मागे सरकला नाही. रामचंद्रावर चालून आला. तेव्हां रामाने त्याचे दोन्ही पाय एकेक बाण सोडून कापून काढले आणि शेवटी त्याचा शिरच्छेद केला.

कुंभकर्ण मेल्याची वार्ता ऐकून राक्षस टाहो फोडून रडू लागले. रामचंद्राच्या नावानेच त्यांना कापरे भरले. वानरांनी रामचंद्राच्या शौर्याची प्रशंसा केली.

कुंभकर्णवधाची बातमी ऐकून रावण बेशुद्ध होऊन पडला. त्या गोष्टीवर कोणाचा विश्वासच बसेना. कुंभकर्णाची मुले देवांतक, नरांतक, त्रिशिर आणि अतिकाय लहान मुलासारखे मोठमोठ्याने रडू लागले. त्याचप्रमाणे कुंभकर्णाचे भाऊ महोदर व महापार्श्वदेखील रडू लागले. सर्व लंकेवर शोककळा पसरली.

शुद्धीवर आल्यावर रावणाला जयाची आशा सुटली. लंकेवर वानरांचा अधिकार होणार असे त्याला वाटू लागले. त्याला राज्याची आशा उरली नाही. सीतासुद्धा आतां आपल्याला मिळत नाही हे त्याला स्पष्ट दिसू लागले. परंतु भ्रातृऋण फेडण्याचे त्याने ठरविले. कुंभकर्णाच्या वधाचा सूड उगविण्याचा त्याने मनाशी निश्चय केला. आपण विभीषणाचा सल्ला न मानून चूक केली. त्याच्या सारखा कटुसत्य सांगणारा भ्राता आपल्याला कोठून मिळणार? असा तो पश्चात्तापही करू लागला.

रावणाला दु:खी पाहून त्रिशिर म्हणाला—"काका! आपण त्रिलोक जिंकला होता आणि आतां या सामान्य रामाला भिण्याचे



कारणच काय? आपण आपले शौर्य व पराक्रम विसरला आहां का? मला पाठवा रणांगणावर, मी रामाचा वध करून येतो."

ते ऐकून देवांतक, नरांतक आणि अति-काय रणांगणावर जायला तयार झाले. ते पाहून रावणाचा पुन्हां उत्साह वाढला. त्याने आपल्या पुतण्यांना आशीर्वाद देऊन युद्धाला पाठविले.

पुन्हा वानरराक्षसांचे भयंकर युद्ध झाले. नरांतक एक शूर राक्षस होता. त्याचे शौर्य पाहून वानर घाबरले. ते पाहून सुग्रीवाने अंगदाला त्याच्या समा-चाराला पाठविले. अंगदाने सुग्रीवाच्या



आज्ञेला मान देऊन नरांतकाशी घोर युद्ध केले आणि शेवटी त्याचा वध केला.

ते दृश्य पाहून त्रिशिर, महोदर आणि अतिकाय अंगदावर धावले. अंगद एकटा तिघां राक्षसांशी युद्ध करीत होता. तेव्हां हनुमान त्याच्या मदतीला धावला. त्याने एक मुष्टिप्रहार करून देवांतकाचा वध केला. नील वानराने अंगदाच्या मदतीला येऊन महोदराला ठार केले.

महापार्श्व राक्षसाशी ऋषण वानराने भयंकर युद्ध करून त्याला वाटेला लावले. महापार्श्वला मेलेला पाहून राक्षसांचा धीर सुटला आणि ते शस्त्रास्त्रे टाकून रणांगणावरून पळून गेले.

रणांगणावर शूर राक्षसांचा वध झाल्याचे कळल्यावर अतिकाय समोर आला. त्याचा देह म्हणजे एक लहानसा पर्वतच होता. त्याला पाहून रामचंद्राने विभीषणाला विचारले–"हा शूर राक्षस कोण आहे?"

विभीषणाने या शब्दात अतिकाय राक्षसाचा परिचय दिला–"हा धान्यमालीच्या पोटी जन्मलेला रावणाचा मुलगा आहे. याचे नाव अतिकाय आहे. तो पराक्रमात रावणाच्या बरोबरीने आहे. त्याने ब्रह्मदेवाच्या कृपेने दिव्यास्त्रे मिळविली आहेत. त्याचबरोबर ब्रह्मदेवाकडून त्याला एक वरदानही मिळाले आहे. त्या वरदानाने देव किंवा दानव कोणाच्याही हाती त्याला मरण नाही. त्याला ब्रह्मदेवाकडून कवच आणि एक रथ ही मिळाला आहे. त्यांच्या मदतीने त्याने अनेक वेळा देवादानवांचा पराभव करून राक्षसांचे रक्षण केले आहे. त्याचा वध वेळीच केला गेला नाही तर आपले फार मोठे नुकसान होण्याची शक्यता आहे."

मध्यंतरी वानरसैन्याबरोबर अतिकायचे युद्ध सुरू झाले होते. कुमुद, द्विविद, मंद, नील आणि शरभ हे वानरवीर अतिकायशी आपली सर्व शक्ति एकवटून युद्ध करू लागले. परंतु सर्वांचे प्रयत्न व्यर्थ ठरले. उलट त्यांनाच अतिकायच्या हाती मार खाऊन माघार घ्यावी लागली.

त्यानंतर अतिकाय सरळ रामचंद्रासमोर येऊन स्वतःच्या पराक्रमाच्या वल्गना करीत म्हणाला–"मी पळपुट्यांशी युद्ध करणार नाही. या कोणाला समोरासमोर युद्ध करायची हिंमत असेल तर."

ते ऐकून लक्ष्मणाला राग आला. त्याने आपल्या धनुष्याची प्रत्यंच्या अतिकायला सावध करण्यासाठी एकदां टंकारली. ते पाहून अतिकाय म्हणाला–"लक्ष्मणा! तू आहेस अजून लहान. तुझ्याशी युद्ध करून मी आपला पराक्रम काय दाखविणार? माझ्याशी युद्ध करायला तुला पाठविलेच कोणी? व्यर्थ आपले प्राण गमावून बसशील! बाजूला हो माझ्या समोरून!"

"तू आपल्या फुशारक्या सोड आणि आपला पराक्रम काय तो प्रथम दाखव. शूर पराक्रमी वीर गप्पा मारीत नाहीत. शौर्य दाखवितात. आत्मस्तुतीचा येथे काही उपयोग नाही."

त्यानंतर दोघांचे परस्परांशी धनुर्युद्ध प्रारंभ झाले. पहिल्याने, या पोराशी काय युद्ध करायचे या भावनेने अतिकाय युद्ध करीत होता. परंतु लक्ष्मणाचे काही बाण लागल्यावर अतिकायचे डोळे उघडले. त्यानंतर मात्र त्याने खरे युद्ध सुरू केले. दोघांनी परस्परांवर दिव्यास्त्रे सोडली. अतिकायाच्या बाणांनी लक्ष्मणाला बरेच



लागले. परंतु लक्ष्मणाचे बाण अतिकायचे कवच भंग करू शकले नाहीत. म्हणून लक्ष्मणाने ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. ते अडविण्यासाठी अतिकायने केलेले प्रयत्न वृथा ठरले. शेवटी ब्रह्मास्त्राने अतिकायचा शिरच्छेदच झाला.

अतिकायचा वध झाल्यावर राक्षस शोक करू लागले. आपल्या अति पराक्रमी मुलाच्या वधाची बातमी ऐकून रावणाला आश्चर्यच वाटले. राम व लक्ष्मणांच्या हाती राक्षसांचे एकेक करून वीर रणांगणावर पडत होते. रामलक्ष्मणांच्या व वानरवीरांच्या शौर्याचा अंदाज न लावू शकल्याची चूक रावणाच्या लक्षात आली.



बापाला चिंतामग्न होऊन बसलेला पाहून मेघनाद म्हणाला–" मी जिवंत असेपर्यंत तुम्हांला दु:खी होण्याचे कारणच काय? माझ्यासमोर आजपर्यंत कोणाचाच टिकाव लागला नाही. मी रामालक्ष्मणांचा वध करतो. तुम्ही अगदी निश्चिंत रहा. हा मी निघालो युद्धाला.

मेघनादाने बापाचा निरोप घेतला आणि उत्तम जातीची खेचरे आपल्या रथाला जुंपायला सांगून तो त्या रथात बसून निघाला. मेघनाद युद्धाला निघत असलेला पाहून अनेक राक्षसवीर त्याच्या पाठोपाठ निघाले. त्यांना नवीन उत्साह चढला. मेघनादाने युद्धभूमीवर पाय ठेवल्यावर दिव्य रथ मिळावा म्हणून होम करण्याचे ठरविले आणि राक्षसांना चारीबाजूला पाहरा देण्यासाठी उभे केले. त्यानंतर त्याने शास्त्रोक्त मंत्रोच्चार करून अग्नीत आहुती देण्यास सुरवात केली. अग्नी प्रज्वलित झाला. धुराशिवाय मोठमोठ्या ज्वाला वर उठू लागल्या.

त्यानंतर मेघनादने ब्रह्मास्त्राचा जप केला आणि त्या अस्त्राबरोबर आपले धनुष्य, रथ, आणि इतर आयुधे मंत्रवून पवित्र केली. होम संपल्यावर मेघनाद रथात बसला आणि रथ, आयुधे आणि सारथी सर्वांसह आकाशात उडाला आणि अंतर्धान पावला.

राक्षस सैन्य पायदळ, अश्वसैन्य आणि रथ युद्धभूमीवर दाखल झाले. राक्षसांनी अनेक प्रकारच्या आयुधांनी वानरांवर प्रहार केला. मेघनादाने त्यांना प्रोत्साहन देऊन ठेवले होते. मेघनाद अदृश्यरूपे वानरांवर अस्त्रे सोडीत होता. एकेका अस्त्राने त्याने पाच पाच सहासहा वानरांचा वध केला. त्याने प्रमुख वानरवीरांनादेखील घाबरवून सोडले. गंधमादन, नल, मंद, गज, सुग्रीव, ऋषभ, अंगद आणि द्विविद त्याच्या बाणांनी जखमी झाले. परंतु प्रयत्न करूनही ते मेघनादला पाहू न शकल्यामुळे त्याच्या केसालाही धक्का पोहचव शकले नाहीत.

मेघनादाचे बाण रामालक्ष्मणांनाही लागले. तेव्हां रामचंद्र लक्ष्मणाला म्हणाला– "मेघनाद मायावी रूपाने युद्ध करीत आहे. म्हणून त्याचा वध करणे शक्य नाही. तेव्हां आपण त्याचा बाण लागल्याने बेशुद्ध झाल्याचे सोंग केले तर तो आनंदाने लंकेला परत जाईल. यावेळी तरी हाच उपाय करणे बरोबर होईल."

त्याप्रमाणे राम आणि लक्ष्मण बाण लागतांच बेशुद्ध होऊन जमिनीवर पडले. अनुमान केल्याप्रमाणे मेघनाद जयघोष करीत लंकेला निघून गेला.

मेघनादने रामालक्ष्मणांवर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला होता. हनुमान बिभीषणाला म्हणाला–" ब्रह्मास्त्राचा प्रयोग झाल्याने कित्येक वानर हताहत झाले आहेत. परंतु वास्तविक कोण मेला आहे व कोण फक्त त्याच्या महिमेने बांधले गेले आहेत पाहून यावे."

त्याप्रमाणे हनुमान आणि बिभीषण हातात एकेक मशाल घेऊन रणांगणावर हिंडून शोध काढू लागले. त्यांना एका जागी जांबवंत दिसला. तो जिवंत होता. बिभीषणाने त्या वृद्धवीराचा सल्ला विचारला–" तुम्ही स्वत: जिवंत असल्याचे पाहून आम्हांला आनंद होत आहे. परंतु या परिस्थितीत काय करावे, असा तुमचा



सल्ला आहे?" त्या वेळी जांबुवंताला दिसत नव्हते. दृष्टी अधू झाली होती. त्याने विचारले–" महाबली हनुमान जिवंत आहे ना?"

विभीषणाने चकित होऊन जांबवंताला विचारले–" तुम्ही रामचंद्र आणि लक्ष्मणाची चवकशी करण्याऐवजी हनुमंताविषयी कसे काय विचारता आहां?"

जांबुवंत म्हणाला–" बाळा विभीषणा! एकटा हनुमान जिवंत असून सर्व वानर-सैन्य जरी नष्ट झाले तरी आपले काही नुकसान होणार नाही. परंतु तो जर मेला आणि सर्व वानरसैन्य वांचले तरी ते मेल्यासारखेंच."

बृद्ध जांबवंताच्या तोंडचे ते शब्द ऐकून हनुमान पुढे आला आणि जांबुवंताचे पाय धरून नमस्कार करून समोर उभा राहिला.

तेव्हां जांबुवंत त्याला म्हणाला—"बाळा हनुमाना! सर्व वानरांचे रक्षण करण्याची जबाबदारी आतां तुझ्यावर आहे. हे काम तुझ्याशिवाय इतर कोणाकडून होण्यासारखे नाही."

त्यानंतर राम आणि लक्ष्मण यांना शुद्धीवर आणण्यासाठी काय केले पाहिजे त्याचा उपाय जांबुवंताने सांगितला. म्हणाला :

"हनुमाना! तुला समुद्र पार करून हिमालयापर्यंत जावे लागेल. तेथे तुला कांचन आणि कैलास शिखरे दिसतील त्या दोन्ही शिखरांच्या मध्यभागी एक वनस्पतीचा पर्वत आहे. त्याच्या शिखरावर दिव्य औषधीवनस्पती आहेत. त्या दिव्य वनस्पती नित्य चकाकत असतात. त्यांची नांवे अनुक्रमे—विशल्यकरणी, मृतसंजीवनी, सौर्णकरणी आणि संधानकरणी अशी आहेत. तू तावडतोब जाऊन त्या वनस्पती घेऊन ये. त्यांच्या सहाय्याने उपचार करता येईल."

जांबुवंताकडून ते कळल्यावर हनुमान तत्काळ वायुवेगाने आकाशमार्गे निघाला. तो समुद्र, नदीनद व पर्वत ओलांडून हिमालय पर्वताच्या दिशेने जाऊ लागला.

हिमालय पर्वतावर पोचल्यावर त्याला हिमालयाची गगनचुंबी शिखरे व ऋषीचे आश्रम दिसू लागले. त्याने ब्रह्मकोश, कैलासपर्वत, इंद्राची तपोभूमि, रुद्रबाणाचे मोक्षस्थान, हयग्रीवक्षेत्र, ब्रह्मकपाल इत्यादि प्रदेश पाहिले. त्याच बरोबर त्याला, ब्रह्मदेवाने इंद्राला जेथे वज्र दिले होते ते स्थानही पहायला मिळाले. कुबेरनगरी, ब्रह्मासन, शिवधनुक्षेत्र व पाताळविवरही त्याला दिसले आणि शेवटी त्याला ऋषभ पर्वत आणि कैलास पर्वताच्या मध्य भागी तो औषधीवनस्पतींचा पर्वतही दिसला. त्यावरच्या वनस्पतीची एक अपूर्वज्योती त्याला दिसली.



# त्यागमूर्ती पन्नादाई



राजपुतान्यातील प्रसिद्ध सुमेवाड संस्थानचा १६व्या शतकाच्या सुरवातीला राणा सांगा हा अधिपती होता. तो फार मोठा शूर व उदार होता.



दुर्दैवाने त्याचे मुलगे पित्यासारखे योग्य निघाले नाहीत. रत्नसिंह नावाचा एक मुलगा आणखी एका राजकुमाराशी युद्ध करीत असतां मरण पावला. पित्याच्या मरणानंतर विक्रमजित गादीवर आला. त्याने भोगविलासात सर्व वेळ घालवून खजिना रिकामा केला.



मेवाड राज्यात राज्यसत्ता अशी राहिलीच नाही. दिल्लीच्या मोंगल बादशाहाची वाकडी नजर त्या राज्यावर होती. त्या परिस्थितीत दरबारातील काही प्रमुख सरदारांनी बनवीर नावाच्या एका राजकर्त्यांच्या मदतीने विक्रमजिताला गादीवरून काढून टाकण्याचा प्रयत्न केला. हा



बनवीरने विक्रमजितावर तो असावध असतां हल्ला केला. आत्मरक्षण न करू शकल्यामुळे विक्रमजित मरण पावला. त्याचे स्नेही मित्र पळून गेले

राजवाड्यात राजाच्या खुनाची बातमी पसरली. सर्वत्र रडारड आणि शोक कळा पसरली.





विक्रमजिताचा एकुलता एक लहान मुलगा उदयसिंह पन्ना नावाच्या एका दाईजवळ त्यावेळी होता. तिला उदयसिंहाच्या वयाचाच मुलगा होता. अंतःपुरातच ती दोघांचे लालनपालन करीत असे.

नोकरांकरवी राजाचा खून झाल्याची शोकवार्ता पन्नादाईला कळली. त्याला त्या प्रसंगी काय करावे, कळेना. दुष्ट बनवीर युवराजाला धरण्यासाठी येत असल्याचे सुद्धा कळले.





तत्काळ युवराजाचे रक्षण करणे आवश्यक होते. पन्नादाईने एका विश्वासपात्र नोकराला त्याने काय करावयाचे ते सांगून त्याच्याकडून वचन घेतले. राजवाड्याच्या सैपाक-घरातून चोरवाटेने मुलाला टोपल्यात घालून नोकर किल्लाबाहेर निघून गेला.

दुष्ट बनवीर युवराजाचा शोध काढीत येणार आणि तो मिळेपर्यंत त्याची रक्तपिपासा शमणार नाही, हे पन्ना दाईला चांगले माहीत होते. तेव्हां तिने स्वतःच्या मुलाला युवराजाच्या अंथरुणावर झोपविले.
















तेवढ्यात क्रूर बनवीर हातात तलवार घेऊन ओरडत धावत आला–"कोठे आहे युवराज? बोल लवकर!" त्याने पन्नादाईला विचारले.



पन्नादाईने युवराजाचे रक्षण करण्याची प्रतिज्ञाच केली होती. खरे सांगितले तर बनवीर त्याचा पाठलाग करणार. तिने चटदिशी अंथरुणावर झोपलेल्या आपल्या मुलाकडे बोट दाखविले. बनवीरने निर्दयपणाने आपली तलवार त्याच्या काळजांत खुपसली.



नोकर नदीकाठी वाट पहात बसलेला होता. पन्नादाई त्याला जाऊन भेटली. दोघे कोमलमेरच्या राजवाड्यात पळून गेले. युवराज उदयसिंग लहानाचा मोठा झाला. त्याने बनवीरच्या हातून स्वतःचे राज्य मिळविले. पन्नादाईचा हा त्याग इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहिला गेला आहे.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

दहा व्यापारी पुष्कळ पैसे मिळवून जंगलातल्या वाटेने येत असतां तिघां अट्टल चोरांनी शस्त्रास्त्रे घेऊन त्या व्यापाऱ्यांना अडविले. त्यांनी त्यांच्या जवळचे सर्व पैसे हिसकावून, एका लंगोटीशिवाय बाकी अंगावरची मूल्यवान वस्त्रेसुद्धा काढून घेतली आणि त्यांना म्हणाले–"आतां तुम्ही नृत्य करून आमची थोडी करमणूक करा!" असे सांगून आपली शस्त्रे बाजूला ठेवून ते जमिनीवर बसले.

निःशस्त्र व्यापाऱ्यांना चोरांच्या आज्ञेप्रमाणे करावे लागले. परंतु ते दहाजण होते आणि चोर फक्त तिघे जण. शिवाय त्यांनी आपली श[illegible] जमिनीवर ठेवलेली होती. ते लक्षांत ठेवून एक साहसी व्यापारी असे गाणे म्हणत नाचू लागला:

तीन त्रिके नऊ पहा।
उरले आतां आणि दहा।

चोरांना वाटले की व्यापाऱ्याचे काहीतरी गाणे असावे. परंतु इतर व्यापाऱ्यांनी त्याचा अर्थ ओळखून तिघांतिघांचे गट केले आणि संधी साधून एकेका चोराला धरले. गाणे म्हणणाऱ्याने चोरांचे हातपाय कपड्याने बांधले आणि त्यांना फर[illegible]त नेऊन राजाच्या समोर उभे केले.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०० ०२६ या पत्त्यावर पाठवा.

२० फेब्रुवारी १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल एप्रिल १९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

डिसेंबर महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "सुखाचे अजिर्ण"












# अमरवाणी

अनभिज्ञाय शास्त्रार्थान्
पुरुषाः पशुबुद्धयः
प्रागलभ्या द्वक्तु मिच्छन्ति
मंत्रे ष्वम्यंतरीकृताः ॥ १ ॥

[ शास्त्रार्थ कळत नाही असे पशुतुल्य बुद्धिवाले शास्त्रार्थ सभेत शिरून विद्वत्तेच्या गप्पा मारतात. ]

अशास्त्र विदुषां तेषां
न कार्यं महितं वचः
अर्थशास्त्रा नभिज्ञानां
विपुलां स्त्रिय मिच्छताम् ॥ २ ॥

[ अशा शास्त्ररहित मूर्खांच्या बोलण्याने काम बिघडते. स्वहिताची अभिलाषा असणाऱ्यांनी त्यांच्या बोलण्याकडे लक्ष देऊ नये. ]

अहितंच हिताकारं
दार्ष्ट्या ज्जल्पन्ति ये नराः
अपेक्ष्य मंत्रबाह्यास्ते
कर्तव्याः कृत्यदूषणाः ॥ ३ ॥

[ जे लोक लांब गप्पा मारून अहिताच्या गोष्टी हिताच्या असल्याचे सांगतात, त्यांना प्रथमच ओळखून मंत्रणा करते वेळी वगळावे. ]



# मित्रलाभ

[ ४३ ]

कावळा, कांसव आणि उंदीर, हे तिघे मित्र सरोवराच्या काठी आनंदाने राहू लागले.

एके दिवशी तिघे बोलत बसले असतां तेथे चित्रांग नावाचे एक हरण शिकारी पाठलाग करीत येत असल्यासारखे पळत येऊन सरोवरात पडले. त्याच्या पाठीमागून शिकारी येत असावेत या भीतीने कांसवाने पाण्यात बुडी मारली. उंदीर बिळात शिरला आणि कावळा एका झाडावर जाऊन बसला.

परंतु बराच वेळ झाला तरी कोणी पाठलाग करीत येत असल्याचे कावळ्याला दिसले नाही. हरण पाणी पिऊ लागलेले पाहून कावळा आपले मित्र कांसव आणि उंदीर दोघांना हाक मारून म्हणाला– "हरणाचा पाठलाग कोणी करीत नाही आहे. ते खूप तहान लागली होती म्हणून धावत पळत आले. आपण उगीच इतके भ्यालो."

तेव्हां मंथरक (कांसव) म्हणाले–" मित्रा ! तू चुकतो आहेस. शिकाऱ्यांनी त्याचा पाठलाग केला असल्याचे त्याचे तोंड पाहूनच कळते आहे. इतक्या जोराने ते पळत आले आणि मागे वळून पुन्हापुन्हा पहात होते. त्याची छाती पहा, किती धडधडते आहे? प्राणभयाने पळणाऱ्यांतच ही लक्षणे आढळतात. फक्त तहानेने आले असते तर इतक्या जोराने पळत येण्याची गरजच नव्हती." असे म्हणत कांसव चित्रांगकडे वळून म्हणाले–" मित्रा! मी म्हटले ते खरे आहे ना?"

चित्रांग म्हणाले–" मंथरका, माझ्या भीतीचे कारण तू बरोबर ओळखलेस.












अनेक शिकारी माझा पाठलाग करीत होते. त्यांचे बाण माझ्या अंगाला न लागतां केसाच्या अंतरावरून गेले. त्या दुष्टांनी माझ्या बरोबरच्या कळपांतल्या सर्व हरणांचे प्राण हरण केले. मी तुमच्या आश्रयाला आलो आहे. मला येथे सुरक्षित जागी राहू द्या. मित्र समजून तुम्ही त्या दुष्टांच्या हातून माझे रक्षण करण्याची कृपा करा."

"अरे हरणा, तू खुशाल इकडे रहा. आम्हांला जे काही आमचे म्हणून आहे त्यांत तुझाही वांटा आहे असे समज. शत्रूपासून स्वत:चे रक्षण करावयाचे म्हणजे साथी पाहिजेत व भुजबलही पाहिजे. शिकारी येण्यापूर्वीच आपण दाट झाडीत कोठे तरी लपूया." कांसव म्हणाले.

झाडावरून कावळा पहात होता. तो म्हणाला—"शिकारी आपापल्या राहुट्यांकडे परत जात आहेत. तूर्त काही भिती नाही. आपण या उन्हाच्या आगीतून निघून त्या मोठ्या झाडाच्या सावलीत जाऊन थोडी विश्रांती घेऊ या. तेथे गप्पा मारीत बसूया."

कावळा, कांसव आणि उंदीर यांच्या जवळ मैत्री कशी वाढवायची हे शिकण्याची इच्छा हरणाने व्यक्त केली.

"आम्ही अगदी सामान्य जीव आहो रे. आमची मैत्री तुझ्या काय कामाची? ज्यांना स्वरक्षणाची भीती असते त्यांनी बलवान मोठ्यां जवळ मैत्रीची अपेक्षा ठेवावी, हे बरे नाही का?" मंथरकाने विचारले.



मित्र किती लहान असले तरी ते थोरां-मोठ्यांपेक्षां जास्त साहाय्य करू शकतात. हत्तीला सोडवायला उंदरांनी नव्हती का मदत केली?" हरिण म्हणाले.

"ती गोष्ट तरी सांग." असे मंथरक म्हणाला. तेव्हां चित्रांगने गोष्ट सांगितली.

### हत्तीला सोडविणारे उंदीर

एका जंगलात एक जुना पडका वाडा होता. त्याच्या समोर एक मोठे तळे होते. त्या पडक्या वाड्यात लक्षावधी उंदीर बिळे करून आनंदाने रहात होते. एकदां दुष्काळ पडला असतां हत्तींचा राजा गजराज आपल्या कळपा बरोबर पाण्याचा शोध काढीत त्या वाड्या-समोरच्या तळ्याजवळ आला. हत्तींच्या पाया खाली त्या वाड्यातले बरेचसे उंदीर चिरडून मरून गेले. उंदरांनी एक सभा केली व त्यांच्यावर आलेल्या संकटाविषयी विचार करू लागले. त्यांनी गजराजाकडे एक शिष्ट मंडळ पाठवून आपले गाऱ्हाणे पोचते केले. म्हणाले—"आम्हां गरीब प्राण्यांवर थोडी भूतदया दाखवा. आम्ही अगदी क्षुद्रजीव आहो हे खरे असले तरी आपल्याला आमची कधीतरी गरज भासेलच!"

गजराज उंदराचे म्हणणे ऐकून थोडा हंसला, तरी त्याने उंदरांचे म्हणणे मान्य केले. हत्ती वाड्याच्या मधून न जाता वाड्याबाहेरून तलावाकडे जाऊ लागले.

त्या देशाच्या राजाला हत्तींच्या या कळपाची बातमी कळली. त्याने पाण्यात हत्तींना पकडण्यासाठी आवश्यक असलेली सर्व तयारी करविली. पाण्यात पसरलेले जाळे न दिसल्यामुळे पुष्कळसे हत्ती त्यात सांपडले. गजराजाला उंदरांनी दिलेले वचन आठवले. त्याने जाळ्यात न सांपडलेल्या एका हत्तीला उंदरांकडे पाठविले. उंदरांनी येऊन हत्तींना त्या दीन अवस्थेत पाहिले आणि आपल्या अणकुचीदार दातांनी जाळे तोडून टाकले आणि हत्तींना सोडविले. गजराज अनुयायांना म्हणाला—"प्रेमाने वागावे! किती अशक्त मित्र असले तरी त्यांची मदत अशी कामी येते. त्याचे उदाहरण या उंदरांनी दाखवून दिले आहे."



## १८१. अत्यंत प्राचीन काळातला वृक्ष

अरिझोना देशात कोटयवधी वर्षांपूर्वी अरण्येच होती. त्यांत मोठमोठे वृक्ष होते. काळाच्या प्रवाहात त्यांचा दगडाच्या रूपात बदल झाला–त्यांना 'फॉसिल' रूप प्राप्त झाले. अहिल्येला गौतमाने शिला होऊन जा, असा शाप दिला होता. परंतु काळ जीव प्राण धारण करणाऱ्या प्रत्येकाला शिलारूप देऊ शकतो. तसा शिला 'फॉसिल' झालेला वृक्ष या चित्रात पहावा.





# माया सरोवर

[ १३ ]

[ डोंगरी सरोवरात बुडी मारून गेल्यावर मकरकेतूने जलग्रहाला पर्वतावरच्या एका मोठया तलावात यायला सांगितले. तेथे जयशील व सिद्धसाधकाला सोडून पुन्हां जलग्रहाबरोबर पाण्यात बुडी मारून निघून गेला. जयशील तो धबधब्यात पडल्यावर बेशुद्धावस्थेत सिद्धसाधकाकडे येत असलेल्या वाघाला पाहून तिकडे गेला. पुढे– ]

सिद्धसाधकावर वाघ उडी मारणार की काय वाटून जयशील वेगाने त्या बाजूला गेला. वाघाला पुढल्या पायांनी पुढे सरकत साधकाकडे जात अगदी जवळ पोचलेला पाहून त्याचे ध्यान दुसरीकडे वळविण्यासाठी जयशीलने "हो! हो!" असे मोठ्याने ओरडत जवळच एक दगड होता तो उचलून त्याला मारला.

त्यावेळी जयशील वाघापासून पंधरावीस पावलांवर होता. माणसाचा आवाज ऐकून आणि अंगाला एक दगड लागलेला पाहून वाघाने त्या आवाजाच्या दिशेला वळून पाहिले. तेवढा अवधी मिळाला जयशीलला पुढे जायला. त्याने पाठीमागून चटदिशी पुढे होऊन वाघाचे मागचे पाय धरून मागे ओढले. वाघाला पुढच्या पायांवर उभे राहतां येईना



म्हणून त्याने मोठयाने एक डरकाळी फोडली.

त्या आवाजाने बेशुद्धावस्थेत पडलेल्या सिद्धसाधकाला जाग आली. शुद्धीवर येताच समोर वाघ दिसला. तेव्हां संवयीप्रमाणे तो आपला त्रिशूल उचलण्यासाठी हाताने पाहू लागला की तो कोठे आहे आणि जोराने ओरडला–"जय महाकाल!" परंतु त्रिशूल हाताला लागला नाही. तेव्हां तो भीतीने उभा राहून मागे सरकला आणि पाण्यात पडला.

तिकडे जयशीलने वाघाचे मागचे पाय धरले होते ते मोडलेले असल्यामुळे वाघाला उभे राहता येत नव्हते ते त्याने ओळखले [illegible] ओढीत त्याने "साधका!" म्हणून मोठयाने हाक मारली व विचारले–"अरे, तुला वाघच दिसतो आहे, मी त्याच्या मागे उभा राहून त्याचे पाय मागे ओढतो आहे, ते दिसले नाही का?"

तो प्रश्न ऐकतांच साधक चटदिशी-पाण्यात उभा राहून म्हणाला–"अरे जयशीला! म्हणजे तू येथेच आहेस वाटते? धबधब्यात पडण्यापूर्वी शुद्ध होती; त्यानंतर काय झालं ते नाही कळलं. वाघ ओरडला म्हणून शुद्ध आली."

"काय वाटेल ते असू दे, आपण दोघे वांचलो खरे." असें म्हणत जयशील मान फिरवून जमिनीवर फरपटत पुढे सरकत चाललेल्या वाघाकडे पहात म्हणाला–"बिचारा धबधब्यात खाली पडला तो कोणत्यातरी खडकावर आदळला आणि त्याचे मागचे पाय मोडून गेले आहेत. आतां याला स्वतःचा आहार मिळविण्यासाठी शिकार करणे अशक्य आहे. उपासमार होऊन हालहाल होऊन मरण्यापेक्षा एकदम तो आत्तांच मेला तर नशीबवान म्हटला जाईल." असे म्हणत तलवार घेऊन जयशील पुढे गेला.

मध्यंतरी सिद्धसाधक त्याचे त्रिशूल कोठे दिसते का शोधू लागला. ते नदीच्या [illegible] वर दिसले. आनंदाने ते उचलून घेऊन जयशीलला मदत करायला त्या बाजूला गेला. जयशील वाघाकडे पहात म्हणाला–"कायरे साधका! या वाघाने आपल्याला काही अपाय केला नाही. त्याला मारायला माझा हात हलत नाहीं."

सिद्धसाधक जयशीलच्या हातातली तलवार घेऊन म्हणाला–"जिवंत राहून नरकयातना सहन करणाऱ्या या वाघाचा आपण उद्धार करीत आहो. हे पुण्य कार्य आहे." असे सांगून त्याने एका वाराने वाघाचे डोके उडविले.

जयशील चारी बाजूला एकदा नजर फिरवून म्हणाला–"साधका! आता आपण कोठे जायचं रे? कनकाक्ष महाराजांच्या मुलांना पळवून नेणाऱ्या त्या दुष्टाला आपण सोडून दिले. त्याला असे हातचे जाऊ द्यायला नको होते."

"अरे जयशीला! त्याला आपण जाऊ दिले की त्याने आपल्याला, हे सांगणे शक्य आहे का? त्या जलप्रवाहाबरोबर पाण्यात आपण किती काळ राहू शकलो असतो? तरी या पुढचा विचार करायला हवा खरा! मागचा विचार आतां करण्यात अर्थ नाही. आपण आहोत कोठे? या प्रदेशात मनुष्यवस्ती आहे की नाही हा प्रश्न आहे!" सिद्धसाधक म्हणाला.



सिद्धसाधकाच्या प्रश्नाचे जणुकाही उत्तरच म्हणून की काय, त्याचे बोलणे पुरे व्हायच्या आत नदीच्या खालच्या बाजूच्या किनाऱ्याला असलेल्या झाडीतून कोणाची तरी किंकाळी आणि त्याच्या बरोबरच एका रानमेंढयांचे ओरडणे ऐकू आले.

"रानमेंढयाने माणसाला की, माणसाने रानमेंढयाला ठार केले की, दोघे आणखी कोणाच्या वशात पडल्यामुळे ओरडत आहेत, कळत नाही." सिद्धसाधक म्हणाला.

"साधका, मला वाटते त्या दोघांना कोणत्यातरी रानटी जनावराने धरले असावे! ये तर पळ." असे म्हणत जयशील



त्या दिशेने नदीच्या उताराकडे किनाऱ्या किनाऱ्याने पळू लागला.

जयशील व सिद्धसाधक काही अंतर उताराच्या दिशेने गेले व त्यांना अंगावर कांटा उभा करणारे आणि चकित करणारे दृश्य दिसले. किनाऱ्यावरच्या एका मोठ्या झाडाच्या फांदीला एक रानमेंढा आणि एक खुजा माणूस लोंबकळत होते. त्या झाडाची पाने बारीक बारीक होती.

"हे काहीतरी विचित्रच दिसतं आहे रे साधका! फांदीवर कोणी प्राणीतर दिसत नाही आणि मेंढ्याला आणि त्या खुजाला मग वर कोण ओढते आहे?" जयशील म्हणाला.

[illegible] असावे! मी त्रिशुलाने त्याचे काळीज बाहेर काढतो." असे ऐटीत म्हणत सिद्धसाधक झाडाच्या फांदीच्या खाली गेला आणि त्रिशूल उगारणार इतक्यात आणखी एक फांदी खाली वांकली आणि त्याचा खांदा पकडला गेला.

कोणीतरी आपल्याला धरून ओढण्याच्या बेतात आहे, असा संशय येताच सिद्धसाधक चटदिशी मागे सरकला आणि म्हणाला—"अरे जयशीला! सावध रे! हे एखादे राक्षसी झाड असावे से वाटते आहे!"

"राक्षसी झाड की भूतवृक्ष मला नाही माहीत, परंतु एवढे मात्र नक्कीच की त्याच्या आवाक्यात जवळपास जो प्राणी दिसेल त्याला खाणारा, नक्कीच हा एक वृक्ष दिसतो आहे." असे म्हणत एक मोठी उडी मारून जयशील पुढे गेला व विचार करायला न थांबतां त्याने आपल्या तलवारीने तो खुजा आणि मेंढा लोंबत होते ती फांदी एक वार करून तोडली. त्या बरोबर दोघे खाली पाण्यात पडले.

जयशील आणि सिद्धसाधकाने धावत जाऊन पाण्यात पडलेल्या खुजाला वांचविले. रानमेंढा पाण्यातून पोहोत वर काठावर आला होता. एकदां त्याने अंग झाडून अंगावरचे सर्व पाणी पाडून टाकले आणि

[illegible] ओरडला.

"जयशीला, अरे तो सामान्य रानमेंढा दिसत नाही रे! त्याला पहा, घोड्याला आपण घालतो तसे खोगीर आणि लगाम सर्व आहे." सिद्धसाधक म्हणाला.

तोपर्यंत मृत्युभयातून मुक्त झालेला आणि थंड पाण्यातून बाहेर आल्यावर थर थर कापत असलेला खुजा सिद्धसाधक व जयशीलकडे आश्चर्यचकित मुद्रेने पहात म्हणाला—"कोण हो तुम्ही? आपल्या सेनापतीला प्राणीभक्षक वृक्षाच्या हातातून सोडविल्याबद्दल आमची गडेकारांची राणी तुम्हांला नक्कीच काहीतरी मोठे इनाम देईल."

जयशीलने त्या खुजाकडे चकित होऊन पाहिले व म्हणाला—"म्हणजे या प्रदेशावर एका राणीचा अधिकार असून त्या राणीकडे सैनिक आहेत आणि सैन्याचा अधिकारी तुझ्यासारखा एक सेनापतीही आहे म्हणा-वयाचा! आश्चर्यच आहे!"

"पण जयशीला, प्राणीभक्षक झाड हे सर्वांत मोठे आश्चर्य आहे. आजपर्यंत अशी झाडे आहेत, असे फक्त ऐकत होतो, प्रत्यक्ष डोळ्यांनी आजच पाहिले," म्हणत सिद्ध-साधक झाडापलीकडे जाऊन मोठ्याने टाळ्या वाजवीत ओरडून म्हणाला—



"जयशीला! अरे या झाडाची भूक सुद्धा राक्षसी भूक कुंभकर्णाच्या भुकेसारखी आहे. इकडे येऊन तर पहा. रानटी जनावरांचे आणि माणसांचे अस्थिपंजर किती पडले आहेत!"

जयशीलने सिद्धसाधकाजवळ जाऊन खोलगट जागेत आणि झाडीत ढीगच्या ढीग पडलेले अस्थिपंजर पाहिले. ते पहात तो झाडाच्या फांदीखाली आला तेव्हां झाडाची एक फांदी त्याच्याकडे वाकू लागली आणि त्याला धरण्याच्या बेतात होती. जयशील चटदिशी उडी मारून दूर पळाला आणि आश्चर्यचकित मुद्रेने झाडाकडे पाहू लागला.



तो खुजा आपले ते वाहन, म्हणजे रानमेंढा, त्याचा लगाम धरून जयशील व सिद्धसाधक होते तिकडे आला व म्हणाला– “तुम्ही मला एका घोर संकटातून वांचविलेत आणि गडेकार जातीवर फार मोठे उपकार केले आहेत. चला, आमच्या राणी सरकारांच्या दर्शनाला जाऊ या!”

ते ऐकून सिद्धसाधक चिडल्यासारखा म्हणाला–“जा रे! प्राणीभक्षक वृक्ष खाईल हे माहीत असूनही तू स्वतःला त्या झाडापासून वांचवू शकला नाहीस, म्हणे सेनापती! तुमची राणी आम्हांला काय बक्षिस देणार? पायलीभर रानगवती दाणे, नाहीतर चार रताळी नाहीतर कणघरे देईल. तू आता आपल्या वाटेने जा, आम्ही आपल्या वाटेने जातो.”

सिद्धसाधकाने हिडीसफिडीस करून बोलल्यामुळे तो सेनापती हिरमुसल्यासारखा झाला आणि पुढे काय बोलायचे या विचारात असतां झाडीपलीकडून जनावरांच्या पळण्यासारखा आणि गाडीसारखा काहीतरी आवाज आला. जयशील व सिद्धसाधक त्या बाजूला पाहू लागले. दोन रानमेंढयाच्या रथात बसून हरणाच्या कातडयांचे कपडे घालून आणि मोर व बगळयांच्या पिसांचा किरीट धारण करून एक स्त्री त्यांच्या बाजूला आली. त्या रथाच्या आजूबाजूला आणि मागे रानमेंढयावर बसलेले स्वार हातात भाले घेऊन तेथे आले. ते सर्व खुजेच होते.

त्यांना पाहतांच खुजा सेनापती पुढे जाऊन म्हणाला–“महाराणी!” आणि रथातल्या खुजा स्त्रीला नमस्कार करून तिला जयशील व साधक दोघांकडे खूण करीत दाखवीत म्हणाला–“या दोघांनी जीवभक्षक वृक्षापासून मला वांचविले.”

महाराणीने त्या दोघां शेजारी रथ थांबविला व म्हणाली–“अहो महाकाय, रात्री मला स्वप्नात दर्शन देऊन आमच्या गडेकार जातीच्या सर्व शत्रूंना ठार करून आम्हांला शाश्वत रक्षण करण्याचे वचन देणारे तुम्हीच नाही का?”

दिसते आहे की रे कोणी तरी!”

“बरोबर म्हणालास, हुशार दिसते आहे. बिचारीला ह्या खुजा जातीच्या लोकांवर कोठून तरी संकट येणार आहेसे दिसते आहे. विचारपूस करून शक्य झाले तर मदत करू या.” जयशील म्हणाला.

ते ऐकून त्याला ते मान्य नसल्यासारखे तोंड करून साधक म्हणाला–“जयशीला, अरे आपण फार मोठ्या कामाची जबाबदारी शिरावर घेऊन निघालो आहो. ती गोष्ट पार विसरून या फुकटच्या भानगडीत गुतलो तर मागाहून पश्चात्ताप करावा लागेल.”

“साधका! कनकाक्ष महाराजांच्या मुलांसारखाच या गिड्डया खुजांचा जीव आहे. यांच्यावर कोणाकडून कोणत्या स्वरूपाचे संकट आहे, विचारून घेऊन त्यांना यथासाध्य मदत करणे आपले कर्तव्य आहे असे मला वाटते.” जयशील म्हणाला.

जयशील ते बोलत होता, तेवढयात जवळच्याच एका टेकाडाच्या शिखरावरून कापरे भरेल असे ओरडणे ऐकू आले. जयशील व त्याच्याबरोबर इतर सर्व त्या दिशेला वळून पाहू लागले. दहाबारा फूट उंचीची एक विकृत आकृती त्या टेकडीवर उभी होती. तिच्या दोन्ही हातात दोन मोठे दगड होते आणि फेकायला हातवर केलेले होते. तिच्या कंबरेला बांधलेली एक



बळकट लोखंडी सांखळी एका हाताने धरून दुसऱ्या हातात तलवार घेऊन एक माणूस उभा होता.

त्या विकृत आकृतीला पाहतांच खुजांची राणी आणि तिच्याबरोबर तिचे सर्व अनुयायी थरथर कापू लागले. इतक्यात शेजारी उभा असलेल्या माणसाने त्या विकृत आकृतीच्या पाठीला तलवार टोचली. विकृत आकृती दगड तसेच धरून ओरडत आजूबाजूला नाचू लागली.

जयशील सिद्धसाधकाला म्हणाला—"त्या भयंकर प्राण्याला असा नाचवणारा खुजा दिसत नाही; आपल्यासारखाच माणूस दिसतो आहे. हा कोण बरे प्राणी असावा?" असे विचारीत तो खुजा राणीकडे वळून म्हणाला—"तुम्ही शत्रू म्हणालात ते भयंकर प्राणी आणि त्याला नाचविणारा मनुष्यच ना?"

तो प्रश्न ऐकून राणी थोडी स्थिरचित्त झाल्यासारखी दिसली. ती रथातून उतरून सिद्धसाधक व जयशील जवळ येऊन उभी राहिली व म्हणाली—"अहो महाकाय! आम[illegible] राहणारे आमच्यासारखेच गिड्ड्याजातीचे आहेत. परंतु ते म्हणतात की त्यांचा वंश यक्षजातीपासून असून आमच्याहून उच्च आहे आणि म्हणून ते आमची जात निर्वंश करणार आहेत."

"इतक्या भयंकर प्राण्यांना वश करून घेणारे कधी न कधी तुम्हांला नमविणारच." सिद्धसाधक म्हणाला.

"अहो महाकाय! तो भयंकर प्राणी म्हणजे वनमाणूसच! त्याच्या करवी आमच्यावर दगड फेकणारा तुमच्या-सारखाच माणूस आहे. ते दोघे दहा बारा दिवसांपूर्वीच आमच्या शत्रूकडे आले." खुजांची राणी म्हणाली.

राणीचे बोलणे संपायच्या आत तो वनमाणूस मोठ्याने ओरडला आणि हातातले मोठे दगड डोंगारावरून खुजा जातीच्या लोकांवर त्याने फेकले.

(क्रमशः)





# राजदरबार

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू आपल्या प्रयत्नात यशस्वी झालास तर त्यापासून तुला जो फायदा होईल तो सोडून देऊ नकोस. कारण काही लोक मेहनतीचे फळ हाती येण्याच्या वेळी ते लाथाडून निघून जातात. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला विश्वनाथ नावाच्या शेतकऱ्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

चित्रकूट नावाच्या गावी विश्वनाथ नावाचा एक युवक शेतकरी कुटुंबात जन्माला येऊन मोठा झाला. पूर्वजन्मी केलेल्या पुण्याचे फळ म्हणून की काय,

---

## वेताळाच्या गोष्टी

त्याला संगीताचा नाद लागला व त्यात त्याने चांगले प्राविण्य संपादन केले. ते पाहून त्याच्या वडिलांनी त्याला मनाला येईल तेथे हिंडून व वाटेल तो खर्च करून संगीत शास्त्राचा खोल अभ्यास करायला परवानगीं दिली. अशातऱ्हेने विश्वनाथाने वीणावादनात प्राविण्य मिळविले आणि घरी येऊन बापाबरोबर शेतीची कामे पाहू लागला. संध्याकाळी घरी आल्यावर आपल्या घराच्या ओटयावर बसून तो वीणावादन करीत गात बसे.

विश्वनाथाचे लग्न झाले. त्याची बायको मीनाक्षी नवरा वीणा वाजवीत बसला की, ऐकायला येऊन बसे व त्याच्या वीणावादनाचे कौतुक करी. संध्याकाळी तो वीणा वाजवीत गाऊ लागला की त्याचे गाणे ऐकायला त्यांत संगीतशास्त्राचे ज्ञान असलेले प्रौढ लोकसुद्धा असत.

त्यांपैकी अनेक लोकांनी त्याला सुचविले की, तुला संगीतशास्त्रांत इतके प्राविण्य असतांना तू एखाद्या राजाच्या दरबारात संगीत विद्वान म्हणून नोकरी कां नाही करीत?

मीनाक्षीच्या मनातही ही तसेच विचार येत. परंतु विश्वनाथाच्या मनात राजाच्या पदरी नोकरी करण्याचा विचारच येत नसे. आपल्या ज्ञानाला उदरनिर्वाहाचे साधन करून घेणे विश्वनाथाला पसंत नव्हते. मीनाक्षीला ते माहीत होते. म्हणून तिने त्या गोष्टीबद्दल कधीच आग्रह केला नाही.



परंतु तिची इच्छा सहजी पूर्ण झाली. एकदां विश्वनाथ नित्याप्रमाणे संध्याकाळी आपल्या घराच्या ओटीवर वीणा वाजवीत बसला असतां कोणी अपरिचित दोघे जण विश्वनाथाचे वीणावादन व गायन मन लावून शेवटपर्यंत ऐकत बसले होते.

ते दोघे, मागाहून कळले, त्या देशाचे महाराज व मंत्रीच वेष पालटून गायन ऐकायला येऊन बसले होते. त्यांनी विश्वनाथाला आदरपूर्वक बोलावून त्याला चांगली नोकरी दिली. सुरवातीला ती नोकरी विश्वनाथाला कैदेसारखी वाटली. परंतु हळूहळू तो दरबारी लोकांत मिसळू लागला व राजापासून तर इतर लहानथोर दरबारी लोकांपर्यंत त्याची प्रशंसा करू लागल्यावर त्याला त्या जीवनातही आनंद वाटू लागला.

काही दिवसांनी चित्रकूट गावी रत्नपुराहून कुंजर नांवाचा एक संगीत विद्वान आपल्या शिष्यमंडळींसह आला. त्याच्या इच्छेवरून राजाने एकदां त्याच्याशी विश्वनाथाचा चढाओढ ठेवली. त्या चढाओढीत विश्वनाथ हारला. कारण विश्वनाथाला संगीतशास्त्राचे चांगले ज्ञान असूनही कुंजरासारख्या असामान्य विद्वानाशी चढाओढ करण्या इतके ज्ञान नव्हते. ही गोष्ट राजाच्या व दरबाऱ्यांचा नजरेस आली. स्वतः विश्वनाथालाही तसेच वाटले.

तेव्हांपासून राजाच्या मर्जीतून विश्वनाथ उतरला. इतर दरबारी व अधिकारीदेखील





विश्वनाथाचा कमी आदर करू लागले. त्यात विश्वनाथाचा एवढाच अपराध होता, की, त्याने इतर देशाच्या एका संगीत विद्वानासमोर महाराजांची अप्रतिष्ठा केली.

अर्थातच तेव्हांपासून विश्वनाथाला तेथे राहणे सुखाचे वाटेनासे झाले. ते पाहून मीनाक्षी त्याला एकदां म्हणाली—"तुम्ही एवढे मनाला लावून कां घेता? जय आणि पराभव हे दैवाधीन असतात."

"माझा पराभव झाला याचे मला दुःख वाटत नाही. कारण माझा पराभव झाला तो माझ्याहून थोर विद्वानाच्या हातूनच झाला. परंतु माझ्यामुळे महाराजांची व त्यांच्या दरबाराची अप्रतिष्ठा झाली याबद्दल मला [illegible] वाटत आहे." विश्वनाथ म्हणाला.

त्याने दरबारात जायचे सोडून दिले आणि संगीत साधना करू लागला. सहा महिने तो साधना करीत होता. परंतु त्या अवधीत त्याच्याकडे चवकशी करायलादेखील कोणी आला नाही. आपली साधना पूर्ण झाल्यावर विश्वनाथ रत्नपुरीला गेला. त्याने कुंजरला चढाओढ करायला आव्हान केले आणि त्या चढाओढीत कुंजरचा पराभव केला. कुंजरने अत्यंत आदरपूर्वक त्याला गाढ आलिंगन करून आपला पराभव स्वीकारला आणि विश्वनाथाच्या साधनेची प्रशंसा केली.

विश्वनाथ कुंजरचा पराभव करून परतल्याचे कळल्याबरोबर राजा आपल्या मंत्र्यासह विश्वनाथाला भेटायला आला आणि त्याच्या संगीत साधनेची प्रशंसा करून त्याचा योग्य आदर न केल्याबद्दल त्याने त्याच्याजवळ क्षमा मागितली आणि नित्य दरबारात यायला विनंतीसुद्धा केली.

परंतु विश्वनाथानाने त्यांना दरबारची नोकरी करणे त्याला पसंत नसल्याचे व तो आपल्या गावी परत जात असल्याचे सांगितले. तो आपल्या गावी परतला व पुन्हां दिवसां शेतीची कामे करून सायंकाळी संगीत साधना करू लागला.

[illegible]—
"राजा, आता या विश्वनाथाला काय म्हणावे? तो चढाओढीत हारला तेव्हां त्याने आनंदाने ती हार कशी काय स्वीकारली? हारण्यात काही हरकत न मानणाऱ्याला पुन्हां सहा महिने साधना करण्याची व कुंजरला पराजित करण्याची गरज काय होती? जिंकून आल्यावर राजा खूष झाला असतां पुन्हां दरबारात संगीत विद्वानाची पदवी भूषविण्यास विश्वनाथाने नकार कां दिला आणि पुन्हां शेतीभातीची कामे कां करू लागला? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य उत्तर देत म्हणाला—"विश्वनाथ हा संगीतात फक्त प्रवीण नव्हता, तर त्याला संगीताची आवडसुद्धा होती. त्याने संगीतसाधना केली ती फक्त एक छंद म्हणून. उदरनिर्वाहासाठी तो शेतीची कामे करी. परंतु राजाची मेहर नजर झाल्यावर संगीत हे उदरनिर्वाहाचे साधन झाले. त्यामुळे त्याला चढाओढीत पराजित करणारा पुढे येतांच त्याला स्वतःचा अपमान झाल्याचे एवढे वाईट वाटले नसले तरी राजाचा अपमान आपल्यामुळे झाल्याचे वाईट वाटले. राक्षसी महत्वाकांक्षा मनात बाळगून संगीतसाधना केल्यास अजिंक्यपद मिळवितां येते हे दाखविण्यासाठी आणि संगीताचा छंद आणि जयपराजय यांचा परस्परसंबंध काहीच नसतो हे दर्शविण्यासाठीच त्याने कुंजरचा पराभव करून दाखविला. नंतर संगीत हे उदरनिर्वाहाचे साधन मानण्यात आनंद नाही की मानसिक शांती नाही हे कळल्यावर तो घरी परतून पुन्हां शेतीभाती करू लागला."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# दरबारी सामने

फार पूर्वी कधी कांभोज देशाच्या गादीवर कुमारवर्मा नावाचा राजा राज्य करीत असे. तो सर्व विद्यांत असामान्य निपुण असल्याचे आणि प्रजारंजनाच्या कामात ही असल्याचे अद्वितीय मानीत असे.

एकदां त्याची बायको कर्पूरवल्ली त्याला चिडविण्यासाठी थट्टेत म्हणाली–"वारस म्हणून राजा होण्यात काय भूषण आहे? स्वतःच्या शौर्यसाहसाने राज्य मिळविण्यातच खरा पराक्रम आहे!" राणीने ही गोष्ट फक्त थट्टेतच म्हटली होती तरी कुमार-वर्माच्या मनाला ती फार लागली. त्याने आपला थोरपणा राणीला पटवून देण्यासाठी त्याने चढाओढी करण्याची व्यवस्था केली.

त्या सामन्यात भाग घेण्यासाठी दूरदुरून तरुण शूर पराक्रमी युवक राजधानीत आले. निरनिराळ्या तऱ्हेचे सामने झाले आणि त्यात प्राविण्य दाखविणाऱ्यांना बक्षिसे व पारितोषिके वांटण्यासाठी जय्यत तयारी करण्यात आली.

कुमारवर्मा खड्गयुद्धात प्रविण्य दाख-विणाऱ्या रामराजा नांवाच्या तरुणाला दाखवून म्हणाला–"आपल्या देशात खड्ग-युद्धात सर्वश्रेष्ठ हाच ठरला नाही का?"

सर्व प्रजा म्हणाली–"होय महाराज!"

"तरमग ते खरे की खोटे हे मी पाहणार आहे!" असे म्हणत स्वतः कुमारवर्मा त्याच्याशी खड्गयुद्ध करण्यास सिद्ध झाला. सर्व आश्चर्यचकित झाले. कुमारवर्मा व रामराजा दोघांचे बराच वेळ द्वंद्वयुद्ध झाले. शेवटी रामराजाने कुमार-वर्माच्या हातातली तलवार पाडली. कुमार-वर्माचा चेहरा खाडकन् उतरला.

इतक्यात निर्णायक पुढे येऊन जाहीर केले– "रामराजाने नियमविरुद्ध खड्गयुद्ध केले आहे." नंतर रामराजाला दूर बोलावून

रामराजा कुमारवर्माच्या जवळ येऊन म्हणाला–"प्रभू! आपल्या समोर उभे राहणे मला शक्य झाले नाही म्हणून मी खड्गयुद्धाच्या नियमाविरुद्ध युद्ध केले. आपणांबरोबर पुन्हां द्वंद्व खेळावे म्हणतो."

हारल्याचा राग कुमारवर्माला होता, म्हणून तो त्या गोष्टीस कबूल झाला. या खेपेस कुमारवर्माने द्वंद्वयुद्ध सुरू झाल्यावर रामराजाच्या हातची तलवार उडविली. इनाम राजाला मिळाले.

साहित्यचर्चेत सर्वांचा पराभव करून अजिक्यपद पटकावणाऱ्या विद्यानाथाला राजाने आव्हान केले. दोघे चर्चा करीत असतां निर्णायकांनी विद्यानाथाने चर्चेत व्याकरणाच्या चुका केल्याचे सांगून राजाला इनाम मिळाल्याचे जाहीर केले.

या एका चढाओढीतच नव्हे, तर प्रत्येक क्षेत्रात राजानेच सर्व इनामें पटकाविली. अशातऱ्हेने त्या वर्षातलीच नव्हे तर लागो-पाठ पांच वर्षे जे सामने झाले त्यांत सर्व क्षेत्रात राजानेच सर्व इनामे पटकावली. त्याने ती गोष्ट फुशारक्या मारून आपल्या बायकोला सांगितली तेव्हां ती फक्त हसली व काहीच बोलली नाही.

मध्यंतरी कुमारवर्माला एक वाईट बातमी कळली. त्याचा भैरव नावाचा



मंत्री राजाच्या विरुद्ध एक कट करीत होता. त्याचा कट जवळजवळ पुरा होत आला होता. कोणत्याही क्षणाला तो कुमार-वर्माला बाजूला सारून गादीवर बसायला सिद्ध होता.

ती गोष्ट कळल्यावर कुमारवर्मा आपल्या बायकोला बरोबर घेऊन वेष पालटून गुप्तमार्गाने राजधानीबाहेर पळून गेला. आतां राजा सामान्य माणूस झाला असल्या कारणाने मंत्र्याने निश्चितपणे स्वतःचा राज्याभिषेक करून घेतला.

कुमारवर्मा व कर्पूरवल्ली एका दूर कोपऱ्यातल्या खेडेगावात नावे बदलून गरीबीत राहू लागले. स्वतःच्या पोटापाण्या-



साठी त्यांना काबाडकष्ट सोसावे लागले. प्रजेबरोबर रहावे लागल्याने प्रजेचे सुखदु:ख. गरजा वगैरे सर्व राजाला चांगले कळू लागले. कारण आजपर्यंत त्याला वाटले होते तशी प्रजा सुखी नसून कष्ट सोशीत असल्याचे त्याला प्रत्यक्ष पहायला मिळाले. आजपर्यंत प्रजेवर अत्याचार व अन्यायचे होते राहले हे त्याला चांगले कळले.

या वर्षीसुद्धा दरवर्षाप्रमाणे सामने होणार हे ऐकून त्याला पुन्हां उत्साह चढला. परंतु त्यावर्षी तरुणांत उत्साह नसलेला पाहून त्याला फार आश्चर्य वाटले. त्याने पुष्कळांना त्याचे कारण विचारले तेव्हां ते म्हणाले–"कशाला हो हे सर्व सामने? कोणत्याही क्षेत्रात चढाओढ झाली तरी बक्षिस राजालाच तर मिळणार!"

आपल्या प्रतिभेचे प्रजा कौतुक करीत आहे, असे कुमारवर्माला वाटले. आज भैरव गादीवर आहे, त्याच्यात मंत्रणा देण्यात आणि कट करण्यात प्राविण्य असले तरी कोणत्याही चढाओढीत भाग घेऊन चढाओढ जिंकण्याचे सामर्थ्य कोठून असणार? असा विचार करून कुमारवर्मा सर्व इनामे मिळविण्याच्या विचाराने राजधानीकडे जायला निघाला.

निरनिराळ्या क्षेत्रांत तरुणांचे कौशल्य कमीं पडल्याचे पाहून कुमारवर्माला फार आश्चर्य वाटले. सर्व देश मरगळल्या-सारखा झाला होता. कुमारवर्माने अनेक क्षेत्रात चढाओढी जिंकल्या.

सर्व क्षेत्रांत चढाओढ जिंकणाऱ्यांना भैरवने राजा म्हणून आव्हान केले. कुमार-वर्माशी त्याचे खड्गद्वंद्व झाले. कुमारवर्माने काही क्षणात भैरवला नि:शस्त्र केले. लगेच निर्णायक धावले व त्यांनी कुमार-वर्माने खड्गयुद्धाचे नियम भंग केल्याचे सांगितले आणि कुमारवर्माला बाजूला बोलावून घेऊन जाऊन म्हणाले–"मूर्खा! तू द्वंद्वयुद्ध करतो आहेस ते कोणाशी, लक्षात आहे का? ते एका व्यक्तीशी नसून एक गादी भूषविणाऱ्या राजाशी आहे. तू भैरव

जे सिंहासन भूषवित आहे त्या सिंहासना-समोर हार मानावयाची आहे. तेव्हां महाराजांची क्षमा माग आणि पुन्हां द्वंद्वयुद्ध करून आपली हार स्वीकार कर. नाहीतर तुझ्या जिवाला धोका आहे, समज."

निरुपाय होऊन कुमारवर्माने त्यांनी सांगितल्याप्रमाणे करून दुसऱ्या खेपेस भैरवला द्वंद्वयुद्धात जिंकू दिले.

तो घरी परत आल्यावर गावकऱ्यांनी त्याला विचारले–"काय झालं रे? सर्व क्षेत्रात भैरवच जिंकला की नाही? याच साठी तू राजधानीपर्यंत गेला होतास का? तुला इनाम मिळवायचं असेल तर तू राजा झाले पाहिजेस."

भैरवच्या राजवटीत प्रजेवर अत्याचार नित्य वाढतच चालले होते. ते पाहून कुमारवर्माने देशभर भ्रमण केले आणि उत्साही आणि शूर व साहसी तरुणांना त्याने आपल्याकडे वळवून तरुणांचे एक गुप्त सैन्य उभे केले. त्या सैन्यात कोणाला सेनापती नेमावे यासाठी सामने झाले. धनुर्विद्या, खड्गयुद्ध भालाफेक इत्यादी युद्धकलेच्या अनेक क्षेत्रात चढाओढी झाल्या. त्यात कुमारवर्माच जिंकला आणि सेनापती निवडला गेला.

पुन्हां गादी मिळविण्यासाठी कुमारवर्माने जय्यत तयारी केली.

दुसऱ्या वर्षी जे सामने झाले त्या वेळी कुमारवर्मा आपले सैन्य बरोबर घेऊन गेला



व त्याने युद्धविद्येशी संबंध असलेल्या सर्व क्षेत्रात भाग घेऊन अजिक्यपद मिळविले.

भैरवने त्याला खड्गयुद्ध करण्यास आव्हान केले. कुमारवर्माने अगदी सहजी भैरवच्या हातातली तलवार उडविली आणि आपली तलवार भैरवच्या छातीवर ठेवून तेथे जमलेल्या लोकांस म्हणाला– "या दुष्टाने मला ठार करण्यासाठी कट केला होता, परंतु काही स्वामिभक्त अनुयायांनी सावध केल्यामुळे मी याच्या हातावर तुरी देऊन निसटलो. मी तुमचा पूर्वीचा राजा कुमारवर्मा आहे. हा भैरव प्रजेचे स्वत च्या मुलासारखे पालन करीत राहला असता तर मी या भानगडीत पडलो नसतो. परंतु प्रजेच्या हितासाठीच मला आज पुढे यावे लागले. मला तुम्ही आपला राजा म्हणून स्वीकार करायला तयार आहां का? की सिंहासन परत मिळविण्यासाठी मी युद्ध करू?" असे विचारीत त्याने आपला नकली वेष काढून फेकून दिला.

दर [illegible] आणि जयजयकार केला. रक्तपात झाल्याशिवायच कुमारवर्माला त्याचे सिंहासन परत मिळाले.

कर्पूरवल्ली राणी आपल्या नवऱ्याला म्हणाली–"तुम्हीच कुमारवर्मा आहां हे सैन्याला कळले असते तर तुम्ही केव्हांच पुन्हां गादी मिळवू शकला असतां."

"या खेपेस मी राज्य मिळविले ते वारस म्हणून मिळविले नसून स्वशक्तीने मिळविले आहे. आतां मला माझ्या स्वतःच्या बळावर विश्वास झाला असल्या कारणाने स्वतः चालविलेल्या चढाओढीत मला भाग घेण्याची गरज राहिली नाही." कुमारवर्मा म्हणाला.

नंतर त्याने प्रजेबरोबर राहून मिळविलेल्या अनुभवाच्या आधारे प्रजेच्या सुखसोयींसाठी कामे करायला सुरवात केली. त्याने सामन्यात स्वतः भाग न घेतां तरुणांना प्रोत्साहन दिल्यामुळे कर्तबगार तरुणमंडळी पुढे आली.





# गुरूची विद्या गुरूस फळली

यादवपूर नावाच्या गावी गोपू नावाचा एक उडाणटप्पू तरुण युवक रहात असे. त्या गावात दुर्गामातेचे एक देऊळ होते. देवळातल्या पुजाऱ्याचे नाव होते शंभूभट. त्याची नजर एकदा गोपूवर पडली. कारण शंभूभटाला गोपूसारख्या उडाणटप्पू आकाशवृत्तीवर राहणाऱ्या माणसाची फार गरज होती.

ते गाव थोडे मागासलेले होते तेव्हां गावकरी प्रत्येक लहानथोर आधीव्याधींसाठी देवीला नवस, करीत. म्हणून शंभूभटाला प्राप्ती भरपूर होत असे.

परंतु त्या गावात काही दिवसांपूर्वी बऱ्याच सुधारणा झाल्या. शिवाय पिके चांगली निघाली आणि सरकारतर्फे औषधपाण्याची उत्तम व्यवस्था झाल्या कारणाने रोगराई कमी होत गेली. त्यामुळे देवीच्या अनुग्रहाची तेवढी गरज भासत नाहीशी झाली. त्याच बरोबर शंभूभटाची प्राप्तीदेखील कमी होत गेली.

तेव्हां लोकांच्या मनात देवाची भीती पुन्हां वाढविण्यासाठी शंभूभटाला गोपूसारख्या आकाशवृत्तीवर राहणाऱ्या तरुणाची गरज फार वाटू लागली. म्हणून शंभूभटाने गोपूला बोलावून देवीच्या भक्तांनी आणलेले नैवेद्य वगैरे खूप खायला घालून आणि मधून मधून त्याच्या हातावर चार पैसे ठेवून त्याला आपला पिट्टू करून घेतले.

एकदां शंभूभट गोपूला म्हणाला–"हे बघ रे गोप्या, मी सांगतो तसं तू कर, म्हणजे तुला जे वाईट नाव आहे ते पुसून निघेल आणि लोक तुझा आदर करू लागतील. मी योजलेली युक्ती यशस्वी झाली तर तुला नियमित पगार सुद्धा देईन."

शंभुभटाने ठरविलेली युक्ती म्हणजे एक नाटक होते. गोपूने ते सोंग करून



पुजाऱ्याची युक्ति यशस्वी करून दाखविण्याचे वचन दिले.

संध्याकाळी घरी झाल्यावर गोपू एकाएकी फेफरे आल्यासारखा बेशुद्ध होऊन पडला. आईबाप मुलाला पित्त झाले की काय म्हणून धावले. गोपू एकदम उठून बापावर कावल्यासारखा धावून दात ओठ विचकावून ओरडत म्हणाला–"तुला खाऊन कच्चा गिळून टाकीन!"

वाटेने जाणारेयेणारे लोक तेथे जमा झाले आणि म्हणू लागले–"या मुलाच्या अंगात आल्यासारखे दिसते आहे!"

पुजारी हातात झाडाच्या दोन डहाळ्या घेऊन येऊन कोणालातरी हाक मारून विचा… … तुझी माझे आई?"

गोपूने शंभूभटाची शेंडी पकडून एक धक्का देत विचारले–"मूर्खा! तू मला ओळखले नाहीस का?"

पुजारी जमिनीवर आदळला. लगेच उठून साष्टांग नमस्कार करून म्हणाला–"माते! तूच का? क्षमाकर! चुकलो, कान धरतो!" म्हणत तोंडात मारून घेऊ लागला.

"साऱ्या गावावर नांगर फिरवीन. मी उपाशी आहे." गोपू म्हणाला.

"तुला उपाशी ठेवणार नाही, माते! क्षमा कर आम्हां सर्वांना!" पुजारी म्हणाला.

नंतर काही वेळाने गोपू शुद्धीवर आल्यासारखा दिसला. तोंडावर पाणी शिंपडल्यावर झोपेतून जागा झाल्यासारखा सर्वांच्याकडे पाहू लागला.

हे नाटक व्यर्थ गेले नाही. गावकरी देवीला घाबरून तिला खूष करण्यासाठी निरनिराळे आहार पदार्थ, शिधा, फळफळावळ दक्षिणा वगैरे आणून देवीसमोर ठेवू लागले. शंभूभटाचे हे नाटक यशस्वी झाले. देवीच अंगात आल्यामुळे गोपूचा गावात आदर वाढला. तो दररोज संध्याकाळपर्यंत देवळातच राहू लागला आणि पुजारी देई ते आणून घरी देऊ लागला. म्हणून घरातदेखील त्याचा मान वाढला.

… अशा भीति वाटल्यामुळे सर्व गांवकऱ्यांचा देवीवरचा विश्वास वाढत गेला. प्रत्येक गावकरी दररोज देवीच्या दर्शनाला येऊन देवीसमोर तांदूळ, फळे, किंवा आणा दोनआणे ठेवू लागला. हा बदल गोपूला आवडला नाही.

तो पुजाऱ्याला भेटून म्हणाला–"यापुढे मी देवी अंगात येण्याचे सोंग कधीं करणार नाही. पुजाऱ्याने त्याला जास्त पैसे देण्याचा लोभ दाखविला. परंतु तो 'हो' 'ना' करू लागला.

परंतु शंभूभटाने दुसराच डाव टाकला. म्हणाला–"तरमग मी अंगात आल्याचे सोंग करतो. तू कडुलिंबाच्या डहाळ्या घेऊन यायचे सोंग कर."

गोपू थोडा नरमला. कारण पैसे फुकटात मिळणार ना! परंतु त्याने मनात एक गोष्ट ठरविली. हे नाटक चालू असतां आपल्या घरच्या लोकांवरच आधीव्याधींची पीडा आली तर आपल्या नाटकाचे गुपित घरच्या लोकांना सांगून टाकून मोकळे व्हायचे.

पुजाऱ्याला आणखी एक नवीन गोष्ट सुचली. गोपूने पहाटे दिसू लागायच्या आत देवळात येऊन देवीच्या आड लपायचे आणि कोणाला न दिसणारी दोरी ओढून, भक्त लोक येतील तेव्हां दार उघडल्यासारखे



दाखवायचे. दार आपल्या आप उघडते आहे हे कळल्यावर लोक दुर्गामातेला आणखी जास्त नैवेद्य, दक्षिणा वगैरे आणून देतील असे त्याला वाटले.

पुजाऱ्याने ती युक्ती गोपूला सांगितली. ती युक्तीदेखील यशस्वीपणे पार पडली. गावकऱ्यांच्या मनात देवीवरचा अंधविश्वास जास्तच वाढला. त्यांनी कामधंदा सोडून दिला आणि देवीचे भजन करू लागले. शेताची कामे टाकून ते देवळातच जास्त वेळ राहू लागले.

अशातऱ्हेने गावावर आलेले हे नवीन संकट गोपूच्या लक्षात आले. या सर्वाला कारण पुजाऱ्याचा स्वार्थ आहे, हे त्याला

चांगले कळले. त्याला पुजाऱ्याचा भयंकर राग आला. त्याला स्वतःचाही राग आला.

दुसऱ्या दिवशी दार आपोआप उघडण्याचे बंद झाले. गावकरी देवीचा कोप पुन्हा कां झाला बुवा, म्हणून काळजी करू लागले. पुजारी मनातल्या मनात गोपूला शिव्या देऊ लागला.

गोपू पहाटे उठून कडुलिंबाच्या मोठ-मोठ्या डहाळ्या घेऊन आला. पुन्हां देवीचा काही कारणाने कोप झाला आहे असे दाखवून पुजाऱ्याने पुन्हां अंगात आल्या-सारखे बडबडायला सुरवात केली. ओरडू लागला–"सर्वनाश करीन, सर्व पिके जाळून भस्म करीन. मला पोटभर नैवेद्य मिळाला पाहिजे!"

गोपूने कडुलिंबाच्या डहाळ्यांनी पुजाऱ्याला झोडपायला सुरवात केली. कडुलिंबाच्या डहाळ्यांमध्ये काही कांटे असलेल्या खाजरीच्या डहाळ्या सुद्धा होत्या. पुजाऱ्याच्या अंगाला भयंकर खाज सुटली. तो आणखी मोठ्याने ओरडू लागला.

गो[illegible] म्हणाला–"उतरतेस की नाही? गांव सोडून जातेस की नाही? रात्रं दिवस तुझं पोट भरायला गावकऱ्यांना आणखी काही काम नाही का? त्यांनी उपाशी रहावं का?"

पुजाऱ्याला नको जीव झाले. अंगात येण्याचे सोंग अंगाशी येते की काय वाटले. मोठ्याने ओरडला–"जातो...जातो..." आणि खरोखरच बेशुद्ध होऊन पडला.

गोपू भक्तांना म्हणाला–"देवी गाव सोडून निघून गेली. आतांपर्यंत गावाची शिवार पार करून गेली असेल. आपण आपापली कामे करीत राहू तोंपर्यंत ती आपल्या वाटेला जाणार नाही."

देऊळ ओसाड पडले आणि गाव सुधारले. त्याला फार दिवस लागले नाहीत.

पुजाऱ्याने शेतात काम करायला सुरवात केली. आकाशवृत्तीवर जगणारा गोपू देवीला पळवून लावणारा शूरवीर म्हणून प्रसिद्ध झाला.



# दातृत्व

अश्वमेध यज्ञ करून धर्मराजाने खूप दानधर्म केला. त्याला वाटू लागले की, आपल्यासारखा दाता जगात पूर्वी कधी झालाच नसेल. इतका त्याला आपल्या दातृत्वाचा गर्व चढला.

ते लक्षात आल्यावर श्रीकृष्ण एकदा धर्मराजाला घेऊन पाताळ लोकात तेथल्या बलिराजाच्या दरबारात गेला. बलीने श्रीकृष्णाचे सर्व प्रकारे आतिथ्य केले. परंतु धर्मराजाची विचारपूससुद्धा केली नाही. म्हणून कृष्णाने धर्मराजाची ओळख करून दिली. म्हणाला–"हे धर्मराज आहेत. कोणत्याही युगात कोणीही कधी दान केले नसेल एवढा दानधर्म यांनी केला आहे."

बलिराजाने कानावर हात ठेवले व म्हणाला–"किती वाईट गोष्ट ऐकली! दानधर्म करून मोठेपण मिळविण्या इतके नीच काम काय असू शकेल? माझ्या राज्यात मी दानधर्म करतो असे स्वतः म्हणत कोणी येईल का? सर्व माझ्यासारखेच आहेत!"

हे वाक्य ऐकून धर्मराजाची मान खाली झाली.













# सतीपूरचे गावकरी

सतीपूर गावचे गावकरी शेतीच्या कामात फार हुशार म्हणून प्रसिद्ध होते, परंतु त्यांचे जीवित सुखाचे नव्हते. कामे नसत त्या काळात काय किंवा लावणीच्या दिवसांत काय, त्यांना धनीमानी शेतकऱ्यांकडून कर्जे काढावी लागत. म्हणून त्यांच्या श्रमाचे फळ हाती यायच्या वेळी त्यांना कर्ज फेडण्यासाठी ते सर्व खर्ची घालावे लागे. त्यांच्या या दारिद्र्याचा शेवट त्यांना कधीच पहायला मिळाला नाही.

जुगलप्रसाद नांवाचा एक मोठा श्रीमंत जमिनदार होता. त्याला स्वत:चा असा कोणीच नव्हता. मूलबाळ नव्हते की दुसरा कोणी नातेवाईकही नव्हता. तरी त्याला पैशाचा फार लोभ होता. चार पैसे खर्च करायचे म्हणजे आपला जीव जातो की काय असे त्याला वाटायचे.

त्या गावात आणखी दोघे श्रीमंत गृहस्थ होते. परंतु ते जुगलप्रसादासारखे श्रीमंत नव्हते. ते गरीब शेतकऱ्यांना कर्जाने पैसे व धान्य वगैरे देत व आणि कर्ज वसूल करतांना अव्वाच्या सव्वा व्याज आकारून पैसे वसूल करीत.

गावकरी अशिक्षित निरक्षर होते. त्यांना त्यांचे काम तेवढे येत होते. गावातल्या सोनाराचा मुलगा गोपाळ सतीपूर पासून तीस मैलावर असलेल्या एका शहरात विद्याभ्यास करीत असे. त्याच्या चुलत्याचे तेथे सराफीचे दुकान होते. शहरातच जास्त रहावे लागल्याकारणाने त्याला जगाचा अनुभव बराच होता. आपल्या गावातले लोक कर्जे काढून किती कष्ट सहन करीत आहेत, हे त्याला दिसत होते. त्याला त्याबद्दल फार वाईट वाटे. गावकऱ्यांचे कष्ट, नवीन आर्थिक योजना, ... वगैरे थोडी ... वरून गेल्या होत्या. त्याला त्यांच्याविषयी थोडी थोडी माहितीसुद्धा झाली होती.

शहरात गोपाळचा गंगाधर नावाचा एक मित्र होता. त्याचा मोठा भाऊ इंद्र हा एक समाजसेवक होता. गोपाळकडून त्याच्या गावातल्या गावकऱ्यांच्या आर्थिक दुरवस्थेविषयी ऐकून तो म्हणाला—"एक सहकारी-संस्था स्थापन केली तर तुमच्या गावातली स्थिति सुधारेल. परंतु सुरवातीला थोडे भांडवल लागेल."

"भांडवल देऊ शकणारे सावकार गरीब प्रजेला जळूसारखे पिळून काढीत आहेत हो. सहकारी संस्था काढली तर त्यांचा धंदा बंद नाही का पडणार?" गोपाळ म्हणाला.

"तसं असेल तर तुझ्या गांवकऱ्यांना या आर्थिक संकटातून मुक्ति मिळणे अशक्यच!" इंद्र म्हणाला.

"जुगलप्रसादमामांना आपण वळवू शकलो तर काम होईल. ते सावकारी करीत नाहीत. परंतु आहेत मोठे चिक्कू कवडीचुंबक." गोपाळ म्हणाला.

इतका वेळ त्यांचे संभाषण ऐकत मुकाट्याने बसलेल्या गंगाधरने विचारले—"तुझे ते जुगलप्रसादमामा म्हणालास त्यांचा जुन्या गोष्टींवर विश्वास, म्हणजे अंधविश्वास आहे का?"



"खेडेगावात राहणाऱ्यांचे अंधविश्वासावरच तर चालते!" गोपाळ म्हणाला.

"तरमग मला माहिती आहे ती जादू करून त्यांच्या मनात विश्वास उत्पन्न होईल असे करितां येईल. त्यांना भेटलं पाहिजे केव्हां तरी." गंगाधर म्हणाला.

एके दिवशी गोपाळ, गंगाधर आणि इंद्र सायकलवर बसून सतीपूरला निघाले आणि काळोख पडू लागण्याचा सुमारास त्या गावी पोचले. रात्री गोपाळच्या घरीच मुक्कामाला ते राहिले.

दुसऱ्या दिवशी इंद्र एका ज्योतिष्याचा वेष करून गावकऱ्यांचे हात पाहून त्यांना त्यांचे भविष्य सांगू लागला. त्याला सम-



रेषा बघण्याची थोडी माहिती होती. म्हणून त्याने सांगितलेल्या गोष्टी ऐकून गावकरी चकित झाले. ही गोष्ट जुगलप्रसादपर्यंत पोचविण्याची कामगिरी गोपाळने बजाविली. जुगलप्रसाद इंद्रकडे धावतच आला आणि आपला हात पुढे करून बसला.

इंद्र त्याला म्हणाला–"तुमचा हात मी सर्वांसमोर नाही पाहणार. तुमच्या घरी येऊन पाहीन."

गोपाळने त्यापूर्वी एकदा गावात येऊन त्यासाठी आवश्यक ती तयारी करून ठेवली होती. त्या दिवशी संध्याकाळी इंद्रबरोबर गोपाळ व गंगाधर जुगलप्रसादच्या घरी गेले. इंद्र जुगलप्रसादचा हात पाहून म्हणाला–

"खरं प्रारब्ध म्हणतात तर यालाच. काय पण विचित्र आहे पहा, लक्ष्मीचा अनुग्रह, जवळ काही असणारांवरच होतो. काबाड-कष्ट करणाऱ्या गरिबांकडे ती ढुंकूनसुद्धा पहात नाही. आजच तुम्हांला शुभलाभ स्पष्ट दिसतो आहे."

नंतर जुगलप्रसादचा हात जास्त लक्ष देऊन पहात इंद्र म्हणाला–"तुमच्या आवा-रात आग्नेय दिशेच्या कोपऱ्यात एखादे आंब्याचे झाड आहे का? त्याच्याजवळ एक चांग्याचे झाड असले पाहिजे. त्याच्या खाली चांदीचे रुपये पुरून ठेवलेले नक्की सापडतील. खणून घेऊन या."

ते ऐकून जुगलप्रसाद उत्सुकतेने कंदील फावडे घेऊन त्याजागी एकटाच गेला.

तो परत यायच्या आत गंगाधर एक कांचेचा ग्लास घेऊन खोलीत एका कोप-ऱ्यात चौरंगावर तो ठेवून एक 'ट्रिक' करायला तयार होऊन बसला.

अर्ध्या तासाभराने जुगलप्रसाद एक मडके घेऊन परत आला. त्याने ते इंद्रच्या समोर आणून ठेवले. इंद्रने त्या मडक्याच्या तोंडावरचे सीलबंद झांकण फार काळजी-पूर्वक काढून मडके जमिनीवर उपडे केले. टंकसाळीतून जणूंकाही आताच काढलेले नवेकोरे व्हिक्टोरिया राणी छापाचे रुपये पन्नासवर होते. जुगलप्रसादचा चेहरा

"तुमचं भविष्य खरोखरच अद्भुत आहे खरं!"

ते रुपये गोपाळने आपल्या चुलत्याच्या दुकानातून मागून रसायनाने स्वच्छ धुवून चकचकीत करून घेऊन आला होता. ते त्याने मडक्यात ठेवून झांकण सीलबंद करून लावून ठेवले होते. पंधरा दिवसांपूर्वी तो आपल्या गावी मुद्दाम त्या कामासाठी आला होता त्यावेळी ते मडके त्याने ओळखीच्या जागी पुरून ठेवले होते.

इंद्रने पुन्हा जुगलप्रसादचा उजवा हात पाहून म्हटले–"आणखी एक गोष्ट तुम्हांला सांगायला हवी. तुम्ही तिजोरीत ठेवलेले सर्व धन तुम्हांला कळू दिल्याशिवाय पळून जायच्या तयारीत आहे. ते धन असे कैदेत पडून रहायला तयार नाही. तुम्ही ताबड-तोब काळजी घेतली नाही, तर ते तुमच्या हातावर तुरी देऊन केव्हां कोठे निघून जाईल, कळणारसुद्धा नाही.

जुगलप्रसादने त्या गोष्टीवर त्याचा विश्वास बसत नसल्यासारखे इंद्रकडे पाहिले.

"माझ्या बोलण्यावर तुमचा विश्वास बसत नाहीसे दिसते आहे. एक काम करा. तुम्ही आपल्या तिजोरीतला एक रुपया काढून आणून त्या माणसाला द्या." असे म्हणत त्याने गंगाधरकडे बोट दाखविले.

जुगलप्रसादने घरात जाऊन तिजोरीतला एक रुपया काढून आणला आणि गंगाधरला



दिला. गंगाधरने तो चौरंगावरच्या ग्लासात टाकला.

"तुमच्या तिजोरीतल्या पैशाचा पराक्रम पहा थोडा." इंद्र म्हणाला.

"दुसऱ्या क्षणाला रुपया हालू लागला आणि ग्लासाबाहेर पडण्याची खटपट करू लागला. तो ग्लासात थोडा वर चढल्यासारखा झाला आणि पुन्हा खाली पडला. नंतर तो ग्लासात उड्या मारू लागला.

जुगलप्रसाद आश्चर्यचकित होऊन डोळे फाडून रुपयाकडे पहात राहिला. नंतर त्याने काही वेळ विचारले–"मग माझे पैसे पळून जाऊ नयेत यासाठी काय करावे म्हणतां?"

"गरीब शेतकऱ्यांना चांगल्या मुहूर्तावर मदत करा," इंद्र म्हणाला.

"मी इतर लोकांप्रमाणे व्याज घेऊन कर्ज देणार नाही. मग आणखी कोणती मदत करू म्हणतां?" त्याने विचारले.

"एक काम करतां येईल तुम्हांला. हा गोपाळ तुमच्या गावातलाच आहे ना? शिकला सवरलेला आहे, विश्वास करण्या योग्य आहे. शेतकऱ्यांना त्याची मदत घेतां येईल त्याला विचारा, तो सांगेल. तुमच्या पैशांचा उपयोग चार जणांच्या साहाय्यार्थ होऊ शकला तर ते तुमच्या हातातून निसटून जाणार नाहीत." इंद्र म्हणाला.

गोपाळच्या सल्ल्याने सतीपूरला एक सहकारी संस्था स्थापन करण्यासाठी आवश्यक धन जुगलप्रसादने दिले. कमी व्याजाने गरीब शेतकऱ्यांना, त्यांना आवश्यक असलेले धन सहकारी बँकेतून मिळू लागले. गावाची उन्नती झाली. गावकरी सुखी झाले आणि सावकारी करणाऱ्यांचा धंदा बंद झाला.

परंतु गंगाधरने काचेच्या ग्लासात टाकलेला रुपया कसा नाचविला? त्याच्याजवळ अगदी बारीक व अत्यंत बळकट काळा धागा होता. त्याच्या एका टोकाला मेण चिकटवून लावून तो ग्लासात टाकला होता. धाग्याचे दुसरे टोक गोपाळच्या हातात होते. काळोखात जवळून पाहूनसुद्धां तो धागा दिसत नव्हता. गोपाळच तो रुपया हलवत होता.



# शत्रुऋण फेडले

एका गावी रामू आणि श्यामू शेजारीशेजारी रहात असत. त्या दोघांचे परस्परांशी हाडवैर बरेच दिवसांपासून होते. वैर हे विस्तवासारखे आतल्या आत धुमसत असते. कोणाचे कर्ज आणि शत्रुत्व दोन्हीचा शेवट होईपर्यंत माणसाला स्वस्थ चित्तता नसते. म्हणून हे दोघे परस्परांचा काटा कसा काढावयाचा याच विचारात नेहमी असत.

एकदां रामूच्या दोन बकऱ्या दोऱ्या तोडून शेजारी असलेल्या श्यामूच्या परसात शिरल्या आणि भाजीची व फुलझाडांची रोपे त्यांनी खाऊन टाकली. श्यामू इतका संतापला की त्याने दोन्ही बकऱ्यांना कापून त्यांचे कातडे काढले व ते रामूच्या परसात टाकून दिले.

त्यानंतर काही वेळाने रामू एक पहार घेऊन श्यामूच्या घरी गेला. ते पाहून श्यामू एक पांडके घेऊन मारामारीच्या तयारीने आला.

परंतु रामू शांतपणे म्हणाला–"क्षमा कर बाबा, श्यामू! माझ्या निष्काळजीपणामुळे बकऱ्या तुझ्या परसात शिरल्या आणि त्यांनी सर्व नास केला. मी पुन्हां जमीन खणून काढून रोपे लावून देतो."

श्यामू ते ऐकून लज्जित झाला. म्हणाला–"रामू! चूक माझी झाली बाबा! राग न आवरल्यामुळे मी मुक्या जनावरांचा जीव घेतला. क्षमा कर मला."

परस्परांचे वैर त्या क्षणाला संपले.





# कलाप्रेम

भीमू थोरल्या पाटलांच्या घरी गडी होता. पाटलांच्या परसात एक झोपडं होतं, त्यांत तो रहात असे. त्याचा आवाज गोड होता. तो गात गुणगुणत घरातली सर्व कामे करीत असे.

पाटलीणबाई एक दिवशी त्याला जेवायला वाढीत असतां म्हणाल्या–"काय रे भीमू, किती दिवस असा एकटा राहणार? एखादी चांगलीशी मुलगी पाहून लग्न कां नाही करून घेत?

भीमूच्या मनात पुष्कळदां लग्न करण्याचा विचार आला. परंतु लग्नासाठी विचारपूस करायला, मुलगी पहायला वगैरे त्याला वेळच मिळत नव्हता. म्हणून तो मालकिणीला म्हणाला–"मालकांना सांगून एक आठवडा-भराची सुट्टी देववा. लग्न करून येतो"

पाटलांनी त्याला सुट्टी दिली. भीमू चार गावे फिरला आणि एका चांगल्या मुलीला पाहून तिच्याशी लग्न करून तिला घेऊन आला. तिचे नाव होते चंद्रकला. सर्व तिला कला म्हणूनच हाक मारीत.

कलेने तसा मोठा विद्याभ्यास केला नसला तरी तिला जन्मत: खेडुतांच्या भाषेत जात्यावरच्या, कांडायच्या वेळच्या व अशाच ओव्या वगैरे करता येत होत्या. उन्हाळा सुरू झाला, पावसाळा आला, आभाळ भरून आले, विजा चमकू लागल्या, कोणाच्या घरी लग्न कार्य झालं किंवा सणवार आले की ती खेडुतांच्या भाषेत गाणी लिही, ती गाणी गायला चांगली व त्यांच्यातला भावदेखील चांगला असे.

पाटलीणबाईला कला फार आवडे. शिवाय ती गाणी ओव्या लिहून म्हणे त्या तर त्यांना फारच आवडत. कलासुद्धा नवीन ओवी किंवा गाणे प्रथम मालकिणीला म्हणून ऐकवी. पाटलीण, कला चांगली [illegible] सांग. म्हणून शेजारपाजारच्या बायकांना कला फार आवडू लागली.

ते पाहून भीमूच्या एका मित्राच्या मनात मत्सराग्नी भडकला. कदाचित् त्याच्या बायकोची कोणीच वाखाणणी करीत नव्हते.

तो एकदा भीमूला भेटून म्हणाला–"कायरे, तुझी बायको म्हणे छान ओव्या व गाणी लिहिते? तुला पेंन्सिलसुद्धा धरता येत नाही आणि तू आपल्या बायकोला असे वाऱ्यावर सोडलेस तर पुढे पुढे ती तुला विचारायचे सुद्धा सोडून देईल. संसार कामे करणारी बाई कविता लिहिते का? चारजणांसमोर ती वाचून दाखविते का? बाईमाणसाला हे शोभते का?" त्याने भीमूला जणुंकाही सावध केले.

आपल्या मित्राने आपल्या हिताची सूचना केली आणि त्यात बऱ्याच गोष्टी खऱ्या आहेत असे भीमूला वाटले. तो घरी परतला नेमकी त्यावेळी कला कोणते तरी गाणे लिहीत होती.

"सकाळ संध्याकाळ वेड्यासारख्या त्या ओव्या आणि गाणी नाही लिहिलीस, तर आणि मी कधी बाहेर कोठे गेलो असलो तर तुला पाटलांच्या घरच्या म्हशीचे दूध नाही का काढता येणार? गोवऱ्या



थापायला काय झालं? आपण नुसता दान वेळचा पुक्खा झोडून बसलं तर चालेल का? हातपाय हलविल्याशिवाय पोट नाही भरत!" भीमू बायकोला म्हणाला.

कला लगेच उठून गेली, दूध काढून द्यायला पाटलांच्या घरी. दुसऱ्या दिवशी तिनेच गोवऱ्या थापल्या.

त्या दिवसापासून कलेने कविता लिहायचे सोडून दिले आणि दिवसभर कोणत्यातरी कामात स्वत:ला गुंतवून ठेवू लागली. आपल्या नशिबात कविता करणे लिहिलेले नाही, असे वाटून तिचे मन फार दु:खी झाले. परंतु तिने ती गोष्ट कोणाला बोलून दाखविली नाही.

एकदां भीमू पाटलांच्या मळ्यात झाडांना पाणी लावीत खूप मोठ्या सुरात गात होता. जवळच पाटील दोघां मजुरांकडून नारळ उतरवीत होते. ते भीमूला म्हणाले– "तुझं तोंड क्षणभर देखील बंद रहात नाही कारे? कशाला ही वेड्यासारखी गाणी दिवसभर म्हणत राहतोस?"

भीमू एकदम गप्प झाला. त्याचं मन खट्टू झालं. मुकाट्याने तो काम करू लागला आणि तेव्हांपासून काम करतांना त्याने कधी तोंड उघडलेच नाही. पूर्वी किती काम पडले तरी त्याला कामात उत्साह व आनंद वाटे. आता त्याला काम म्हणजे एक ओझे वाटू लागले.

त्यानंतर एकदोनदां काम करतांना तो नकळत गुणगुणला असेल, परंतु पाटलांची त्याला बोलणी खावी लागतील. म्हणून त्याने गायचे सोडूनच दिले, परंतु काम करण्याची शक्तीदेखील कमी झाली.

एकदां पाटलांनी त्याला विचारले– काय रे भीमू, तू हल्ली पहिल्यासारखं झपाझप [illegible] विचार आहे की काय!

"मालकांनी गाऊ नको म्हणून नव्हतं का सांगितलं? गाणं म्हटल्याशिवाय हात चालत नाही बघा! मला निरोप द्यावा मालक! गात काम करायला मिळेल अशा जागी जाऊन नोकरी करावी म्हणतो." भीमू म्हणाला.

पाटील हंसू लागले. म्हणाले–"काय रे, मग तुझी बायको तुझ्यासारखी माणूसच आहे ना? ती काम करीत नाही म्हणाली का? तिला गाणी लिहिणे बंद करायला का सांगितलेस रे? तिची कविता लिहिण्याची हौस तू अशी दाबून टाकलीस तर तिच्या मनाला नाही का लागणार तुझ्या सारखे? तिच्या मनाला तू बोललास ते पाटलीण-बाईंनी ओळखलं. त्यांनीच तुझी कान-उघाडणी करायला सांगितले मला. जा काम कर आणि खूप गा. बायकोला काम करू दे आणि कविता करते ते खुशाल करू दे."





# म्हातारीची मदत

एका जंगलात एक म्हातारी झोपडी बांधून रहात असे. त्या वाटेने जाणारे येणारे लोक त्या जागी रात्र पडू लागली तर म्हातारीच्या झोपडीत रात्र काढीत आणि उजाडल्यावर आपल्या वाटेने निघून जात. रात्री जंगलाच्या वाटेने पुढे कोणी जात नसे. कारण त्या जंगलात चोरांचे भय होते.

परंतु गंमत अशी की चोरसुद्धा त्यांनी चोरून आणलेला माल कधीकधी आणून म्हातारीकडे आणून ठेवीत. तिलादेखील त्यातला थोडा वाटा मिळत असे.

एके दिवशी संध्याकाळी एक चोर म्हातारीच्या घरी आला व तिला एक मोत्यांचा हार दाखवून म्हणाला–"आजी! हा तुम्ही आपल्याजवळ ठेवा आणि मागा-यला येईन तेव्हां मला द्या. हा एका जमिनदाराचा आहे. जमिनदाराचा मुलगा रात्री घोड्यावरुन या बाजूला येईल आणि तुमच्या घरी राहील. तो आपला घोडा तुमच्या घरासमोरच्या झाडाला बांधून ठेवील. मी खूप रात्र लोटल्यावर येईन आणि तुमच्या जवळून हा हार घेऊन त्यातले अर्धे मोती तुम्हांला देईन आणि उरलेल्या मोत्यासह हार घेऊन त्या घोड्या-वर बसून निघून जाईन. जमिनदाराचा मुलगा पहाटे उठून त्याचा घोडा कोणी नेला या विचारात पडेल. त्याचा तुमच्या-वर संशय येण्याचे कारणच नाही."

म्हातारीने ती गोष्ट कबूल आणि चोराच्या समोरच तो हार, शिक्यावर एका वर एक अशी तीन मडकी होती, त्यांपैकी सर्वात वरच्या मडक्यात ठेवून दिला.

चोर निघून गेला.

चोर म्हणाला तसा जमिनदाराचा मुलगा काळोख पडल्यावर आला आणि

रात्री म्हातारीला राहण्याची इच्छा त्याने व्यक्त केली. म्हातारीने होकार दिला. जमिनदाराच्या मुलाने आपला घोडा झाडाच्या बुंधाला बांधून ठेवला.

तो छान झोपला असावा असे वाटतांच म्हातारी चोराची वाट पहात घोडा दिसेल अशा जागी खिडकीजवळ बसून राहली.

चोर आलाच नाही. उजाडायला थोडाच वेळ उरला होता. आतां चोर येणार नाही असे वाटून म्हातारीने आता मोत्यांचा हार सगळा आपलाच. असा विचार करून शिक्यावरच्या मडक्यात हार काढण्यासाठी हात घातला.

पण त्यात हार नव्हता. तिच्या छातीत 'धस्स' झाले.

तिला तिच्या पाठीमागून कोणीतरी मोठ्याने हसण्याचा आवाज ऐकू आला. तिने दचकून मागे वळून पाहिले. तिला जमिनदाराचा मुलगा दिसला. मोत्यांचा हार त्याच्या हातात होता.

"[illegible] हार [illegible] घराण्यात पिढ्यान्‌पिढ्या आहे हो. असे एकसारखे मोती आता कोठे मिळत नाहीत. फार मूल्यवान आहेत हे. मी आपले जमिनदारीचे गाव सोडून शहरात रहायला जातो आहे. मी या बाजूला येऊन पोचेपर्यंत सूर्यास्त होऊ लागला होता. काळोख पडल्यावर जंगलात कोठे अडकून राहीन की काय आणि मग आपले जीवित आणि हा हार यांच्या शाश्वतीची काळजी मला वाटू लागली. म्हणून रात्र तुमच्या घरात काढून पहाटे उठून निघून पुढे जायचे ठरविले. परंतु रात्रभर या हाराची आणि घोड्याची फिकीर मला वाटत राहली असती. ते काम तुमच्या करवी करून घ्यायचे मी ठरविले. चोराचे सोंग करून प्रथम आलो आणि तुम्हांला थोडे फसविले. तुम्ही मला एवढी मदत केलीत त्याबद्दल हे इनाम घ्या." असे म्हणत जमिनदाराच्या मुलाने म्हातारीच्या हातावर चार पैसे ठेवले आणि घोड्यावर बसून निघून गेला.



# किफायत

सोमू धनगराकडे मेंढरांचे अनेक कळप होते. तो स्वभावाने गरीब आणि फार भोळा सुद्धा होता.

जवळच्या गावी शितू नावाचा एक माणूस आजारी पडून खूप थकला होता. बेताची प्रकृती बरी झाल्यावर मांस वगैरे पौष्टिक आहार घ्यायचे ठरवून तो सोमू धनगराकडे आला, म्हणाला–"बाबारे, मी आजारी पडून किती थकलो आहे पहा. सोमूला त्याची कीव आली व त्याने त्याला दहा रुपये दिले.

शितू रुपये घेऊन निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर परतून म्हणाला–"सोमण्णा! तू हे दहा रुपये ठेवून घे आणि मला एक कोकरूच दे." सोमूने ते दहा रुपये ठेवून घेतले आणि एक लहानसे मेंढरू शितूला दिले.

शितू तू मेंढरू घेऊन थोडे अंतर गेल्यावर परतला आणि म्हणाला–"सोमण्णा! ते दहा रुपये आणि हे मेंढरू दोन्ही तूच ठेवून घे आणि मला थोडे मोठेच मेंढरू दे." भोळ्या सोमूने तसे एक मेंढरू दिले.

अशा तऱ्हेने दोनतीनदां करून शितूने सोमण्णाकडून दोनतीन मोठमोठी मेंढरे उपटली.

बिचाऱ्या सोमण्णाला मात्र वाटत होते की त्याला या व्यापारात खूप किफायतच झाली.





# देवाची भीती अन् राजभक्ति

इराण देशातील एका गावी इब्राहिम आणि इस्माईल नावाचे दोघे लाकूड-तोडे रहात असत. ते दररोज जंगलात जात, लाकडे फोडीत आणि जवळच्या एका शहरात जाऊन ती विकीत. त्यांना लाकडांची जी किंमत मिळे त्यावर ते आपला संसार फार मोठ्या कष्टाने चालवीत. दोघे मनात विचार करीत, देवाची कृपा होवो किंवा राजाची, ही गरीबी जाऊन चांगले दिवस कधी बघायला मिळतील का?

इब्राहिमच्या मनात देवाची भीती होती आणि राजभक्तिपण होती. म्हणून देवावर भरंवसा ठेवून व राजाची कधी करुणा होईल असे मानून तो राही. इस्माईल एवढा देवभक्त नव्हता आणि राजभक्तपण नव्हता. देव काय किंवा राजा काय आपली गरीबी कधी दूर करणार नाहीत. म्हणून श्रीमंत व्हायला त्यांच्या मर्जीची गरज काय असे त्याला वाटे.

एके दिवशी दोघे दोन जागी लाकडे फोडीत होते. इस्माईलच्या डोक्यात अकस्मात् एक गोष्ट आली. तो इब्राहिमजवळ येऊन म्हणाला—"हे पहा, इब्राहिम! श्रीमंत लोक जंगलात आपला धनात साठा पुरून नाहीतर झाडाच्या ढोलीत पुरून ठेवतात. आपल्याला एखादा साठा मिळाला तर किती बरे होईल रे!"

"मिळाला तरी काय फायदा रे? तो आपल्याला कसा मिळणार? असे गुप्त धन सर्व प्रजेचे असते म्हणून ते बादशहाकडे पोचवायचे असते."

"आग लाव तुझ्या या नियमांना आणि कायद्यांना!" असे म्हणत इस्माईल तावातावाने तेथून निघून गेला आणि पुन्हां लाकडे फोडू लागला.

दुसऱ्या दिवशी दोघे पुन्हा लाकडे फोडायला निघाले. इब्राहीमला एक जाडजूड ओणके दिसले. ते त्याने कुऱ्हाडीने फोडून काढले तर त्याला आश्चर्य व भय वाटेल असे त्या ढोलीत एक सोन्याचे भांडे दिसले. त्याला सोन्याचेच झांकण होते. झांकण काढून पाहिले तर भांडे भरून सोन्याचे दीनार होते.

तो लगेच धांवत इस्माईल लाकडे फोडीत होता तिथे धावत गेला. इब्राहिमने चकित होऊन त्याच्याकडे पाहू लागला. इब्राहिमने घडलेली गोष्ट सांगितल्यावर त्याने विचारले—"मग काय करायचा विचार आहे तुझा?"

"घेऊन जाऊन बादशाहाकडे देईन म्हणतो. त्यांनी खूष होऊन काही दिले तर ते आनंदाने घेईन." इब्राहिम म्हणाला.

"तू फुटक्या नशिबाचाच!" इस्माईल म्हणाला.

"चांगले दिवस बघायला मिळणार असतील तर माझा शोध काढीत येतील रे!" इब्राहिम म्हणाला.

पैशासाठी तडफडणारा इस्माईल, ते धन बघायलासुद्धा आला नाही, या गोष्टीचे इब्राहिमला आश्चर्य वाटले. त्याने ते भांडे काळजीपूर्वक उचलून लाकडांच्या आत दिसणार नाही असे झाकून ठेवले. मोळी



टाकली आणि सोन्याचे भांडे राजधानीला घेऊन गेला. त्याने ते बादशहाच्या पायांजवळ ठेवले व त्याला ते कोठे व कसे मिळाले हे निवेदन केले.

राजाने दरबार बोलावून त्याच्या राज्यभक्तीची खूप वाखाणणी केली आणि त्या भांड्यातली नाणी बक्षिस म्हणून इब्राहिमला न देता खजिन्यातून शंभर दीनार मागवून इनाम दिले आणि त्याला निरोप दिला.

इब्राहिमने त्याला लहानशा भांडवलावर व्यापार सुरू केला.

ही गोष्ट घडली त्यानंतर दोन दिवसांनी इस्माईल नकली सोने खरे आहे असे सांगून

शिपायांच्या हाती पकडला गेला. इब्राहिम होता त्या गावात ती बातमी पसरली. इब्राहिमने इस्माईलच्या घरी जाऊन चवकशी केली तर ती बातमी खरी असल्याचे कळल्यावर त्याने राजधानीकडे धाव घेतली.

इस्माईलला बादशहा चवकशी करीपर्यंत अटकेत ठेवण्यात आले होते. इब्राहिम सरळ बादशाहाकडे त्यांच्या दर्शनाला गेला आणि इस्माईल बद्दल स्वतः जामीन रहाण्याचे कबूल करून त्याला सोडून देण्याची त्याने विनंती केली.

बादशहाने दरबारात त्याची ती प्रार्थना ऐकून सभेला संबोधन करून म्हणाला– "दैवभीती आणि राजभक्ति ही दोन्ही परंपरेने चालून आली आहेत असे मानून वागणारे सुखी होतात. त्याविरुद्ध वागणाऱ्यांना दुःखीच व्हावे लागते. त्याचे उदाहरण म्हणून मी एक लहानशी गोष्ट सांगतो. दोघे लाकूडफोडे होते. एक जण देवभीती आणि राजभक्ति मानणारा होता. एकदा [illegible] गेला असता त्याने त्या दोघांचे संभाषण ऐकले. त्याने दोन नकली सोन्याच्या भांड्यात नकली नाणी ठेवून दोघे काम करीत त्या जागी ढोलीत लपवून ठेवली. ती दोघांना सांपडली. पहिल्याने आपले सोन्याचे भांडे कायद्याप्रमाणे बादशहाकडे आणून दिले आणि शंभर दीनार इनाम म्हणून मिळविले. दुसरा सर्व स्वतःच बळकावण्याच्या विचाराने ते बाजारात विकायला निघाला आणि राजाच्या शिपायांच्या हाती कैद झाला. पहिला लाकूडफोड्या हा इब्राहिम व दुसरा इस्माईल." असे सांगून बादशहाने त्या दोघांकडे बोट दाखविले.

इब्राहिमच्या इच्छेवरून आणि त्याच्या जामिनावर बादशहाने इस्माईलला सुटका दिली. इस्माईलचे डोळे उघडले. त्याने थोबाडीत मारून घेतली. इब्राहिमने आपल्या व्यापारात अर्धा वांटा देण्याचे कबूल केले. दोघे काही दिवसांनी श्रीमंत झाले.





# खोड मोडायची रीत

त्या देशात पीक खूप चांगले येऊनही आहार धान्यांच्या किमती वाढतच होत्या. प्रजेत हाःहाकार उडून गेला.

दिवसेदिवस देशाची आर्थिक स्थिती खालावतच चालली होती. ते पाहून त्या देशाचा राजा प्रचंडसेन याने खजिन्यातले धन प्रजेत वाटायला सुरवात केली, खजिना अर्धा रिकामा झाला. परंतु आर्थिक परिस्थिती सुधारण्याऐवजी जास्त जास्त बिघडतच चालली. पैसा प्रजेच्या हातात भरपूर झाला. किमती वाढत गेल्या.

हा एक विचित्र दुष्काळ होता. प्रजेला या संकटातून कसे वांचवावे या गोष्टीचा विचार करण्यासाठी राजाने आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेतला. परंतु कोणी मंत्री किंवा दरबारी त्या संकटांतून देशाला बाहेर कसे काढावे, याविषयी युक्ती सुचवू शकला नाही. राजपुरोहिताने सुचविले की शतचंडी यज्ञ करून देवीला प्रसन्न केल्यास या संकटांतून मुक्ती मिळू शकेल. प्रचंडसेन राजाने त्यासाठी मंजूरी देऊन यज्ञाची तयारी करायला सांगितले आणि त्यासाठी लागणारे सर्व पदार्थ व धनसहाय्य करण्याची व्यवस्था करून दिली.

होम निर्विघ्नपणे पार पडला. काहीजणांनी कोंबडे, बकरे, मेंढे बळी दिले. परंतु अन्नधान्यांचे भाव थोडेदेखील उतरले नाहीत.

शेवटी राजाने एक शेवटचा प्रयत्न म्हणून मुख्यमुख्य व्यापाऱ्यांना बोलावून किमती खाली आणायला सांगितले.

व्यापारी राजाला म्हणाले–"महाराज! आपल्या राज्यात प्रजेला आवश्यक तेवढे धान्य नसल्याने किमती आकाशाला पोचल्या आहेत. तेव्हां आम्हीतरी नुकसान

सहन करून कमी भावाने धान्य कसे विकायचे हे आपणच सांगावे."

व्यापारी म्हणाले ते प्रचंडसेनाला पटले नाही. कारण देशात पिके नष्ट झाल्याची किंवा चांगली न आल्याची गोष्ट अधिकाऱ्यांकडून राजाला कळली नव्हती. मग अन्नधान्याची कमतरता कां असावी? व्यापाऱ्यांनी सांठेबाजी आणि चोरबाजार सुरू केला असावा असा संशय राजाला आला. म्हणून राजाने अन्नधान्याच्या किमती ठरवून त्या किमतीवरच धान्य विकावे असा निर्बंध आणला. ठरलेल्या किमतीपेक्षा जास्त भावाने विकल्यास शिक्षा होईल असेही जाहीर केले.

व्यापाऱ्यांनी दुकानेच बंद केली. मागच्या दाराने सर्व व्यापार चालू राहिला. चोरबाजारी वाढली.

अशा परिस्थितीत देश असतां प्रधानाचा मुलगा रविवर्मा देशाटन करून स्वदेशी परत आला. देशातली बिघडलेली स्थिती पाहून त्याला फार आश्चर्य वाटलं आणि ती दूर [illegible] त्याने विचार करून राजाला एक सल्ला दिला. राजाला त्याची युक्ती पटली व त्या प्रमाणे त्याने उपाययोजना करण्याचे ठरविले.

त्याने परदेशातून धान्य मागवीत असल्याचे जाहीर केले आणि प्रजेच्या मनात अन्नधान्याची कमतरता भासणार नाही असा विश्वास उत्पन्न केला.

दुसऱ्या दिवशी पोती भरलेल्या गाड्या राज्याच्या कोठाराकडे जात असलेल्या दिसल्या. व्यापाऱ्यांना कांपरे भरले. भाव उतरले तर त्यांचे नुकसान होईल. म्हणून त्यांनी दाबून ठेवलेला माल भराभर बाहेर काढला. भाव उतरले आणि प्रजेला स्वस्त दराने भरपूर धान्य मिळू लागले.

दुष्काळ एका आठवड्याच्या आत नाहीसा झाला. स्वस्त दराने पाहिजे तेवढे अन्न धान्य मिळू लागले. रविवर्माने मागविलेली फोलपटांची पोती राज्याच्या गोदीत सुरक्षित राहली. त्यांना सोडून पाहण्याची गरजच उरली नाही.






हनुमानाने औषधी वनस्पतीचा शोध सुरू केला, परंतु त्याला त्या वनस्पती ओळखणे शक्य झाले नाही. सर्व झाडे व वनस्पती एकासारखे वाटले. म्हणून त्याला राग आला. परंतु थोडा विचार करून त्याने ते पर्वत शिखरच उपटले आणि ते उचलून घेऊन निघाला.

एका मोठ्या पर्वताला उचलून हनुमानाला येत असलेला पाहून वानर आनंदाने त्याचा जयजयकार करू लागले. तो आवाज ऐकून हनुमानही एकदां गरजला. तो खाली उतरला आणि सर्व वडीलधाऱ्या वानरांना नमस्कार करून बिभीषणाला भेटला.

औषधी वनस्पती वरून वहात आलेला वारा लागताच राम व लक्ष्मण शुद्धीवर आले. इतर बेशुद्ध झालेले वानर सुद्धा शुद्धीवर आले. जे मरून पडले होते त्यांना औषधी वनस्पतींचा स्पर्श होतांच ते जिवंत झाले आणि उठून उभे राहले. त्यांच्या अंगाला जेथे जेथे दुखापत झाली होती त्या जखमा भरून आल्या.

राक्षसही वानरांसारखे जिवंत झाले असते. परंतु रावणाने मेलेल्या राक्षसांना पाहून इतर राक्षस भिऊन घाबरून जाऊ नयेत म्हणून त्यांना समुद्रात टाकून दिले होते. म्हणून त्यांच्या अंगाला औषधी किंवा त्यांच्यावरचा वारा लागणेच नव्हते.

औषधी वनस्पतींचे काम संपल्यावर ते पर्वतशिखर नेऊन हनुमानाने यथास्थानी नेऊन ठेवले आणि तो रामाजवळ परत आला.












हनुमान परतल्यावर सुग्रीव त्याला म्हणाला–"कुंभकर्ण मेला, रावणाची मुले मेली. म्हणून रावण आतां युद्ध करायला बहुतेक येणार नाही. तेव्हां रात्री मोठ्या बलवान वानरांनी दिवट्या मशाली वगैरे घेऊन लंकेत प्रवेश करावा."

सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणे सूर्यास्त झाल्यावर काळोख पडतांच वानरवीर दिवट्या व मशाली घेऊन लंकेत प्रवेश करायला निघाले. दारांवर पाहरा देत असलेले राक्षस पाहरेकरी वानरांना येत असलेले जास्तच पाहून भिऊन पळून गेले. वानरांनी त्यांना कोणी अडवणारा न पाहून दारांना, बुरुजांना रस्त्यावर आणि घरदारांना आग लावायला सुरवात …

घरांदारांबरोबर आतले अमूल्य सामान व वस्तू जळू लागल्या. पुष्कळ राक्षस त्या आगीत जळून गेले. एका बाजूने वानर जयजयकार आणि दुसऱ्या बाजूने राक्षस हाःहाकार करू लागले. त्या परिस्थितीतही काही राक्षस युद्धकरायला सिद्ध झाले. परंतु यावेळी लंकानगरीतच वानरांशी युद्ध करणे आवश्यक होते.

"तुम्ही रावणाच्या वाड्याजवळ जाऊन राक्षसांशी युद्ध करा." अशी आज्ञा सुग्रीवाने वानरांना केली. आज्ञेप्रमाणे वानर दिवट्या व मशाली घेऊन रावणाच्या वाड्याजवळ युद्धाला येऊन पोचले. वानरांना आपल्या दाराजवळ उभे असलेले पाहून राग आला. त्याने कुंभकर्णाच्या कुंभ आणि रावणाला निकुंभ या मुलांना या वानरांशी युद्ध करायला पाठविले. कुंभ व निकुंभ यांच्या बरोबर यूपाक्ष, शोणिताक्ष, प्रजंघ आणि कंपन ही गेले.

दोघांचे परस्परांशी युद्ध झाले. या युद्धांत अंगदाने कुंभला ठार केले. त्यानंतर त्याने शोणिताक्षाच्या हातातली तलवार काढून घेऊन त्याच तलवारीने त्याला ठार केले आणि इतर राक्षसांच्या अंगावर धावला. त्याच्या हाती प्रजंघ मारला गेला. यूपाक्ष मैंदच्या हाती मारला गेला.

… युद्ध करीत असतां …
होऊन पडला. ते कळल्यावर रामाने त्याच्या मदतीला जांबुवान वगैरे वानरांना पाठविले. परंतु ते कुंभच्या शरवृष्टीसमोर उभे राहणे अशक्य झाल्यामुळे त्याच्या जवळ जाऊ शकले नाहीत. ते पाहून सुग्रीव पुढे गेला. तो कुंभच्या बाणांची फिकीर न करतां त्याच्या जवळ गेला आणि त्याने त्याच्या हातातले धनुष्य हिसकावून घेऊन तोडून टाकले. नंतर त्याच्याशी मल्लयुद्ध करू लागला. त्या मल्लयुद्धात शेवटी कुंभ मरण पावला.

आपला मोठा भाऊ मेल्याचा राग आला म्हणून निकुंभने एक परिघ उचलले आणि ते हनुमंताच्या छातीवर टाकले. परंतु ते हनुमंताच्या छातीवर आदळून तुटून तुकडे तुकडे होऊन खाली पडले. तरी हनुमंताला ते बरेच जोराने लागले यात शंका नाही. परंतु हनुमंत स्वस्थ बसला नाही. दुप्पट रागाने त्याने निकुंभाच्या छातीत मूठ वळून एक ठोसा दिला.

ठोसा खाऊन निकुंभ रक्त ओकला आणि बेशुद्ध होऊन पडला. पुन्हां थोड्या वेळाने शुद्ध आल्यावर तो हनुमंताशी मल्लयुद्ध करू लागला. हनुमंताने त्याची मान धरून त्याला गरगर फिरवून जमिनीवर आपटून ठार केले.



कुंभ व निकुंभ मेल्याचे ऐकून रावणाला फार वाईट वाटले. त्याने खर राक्षसाचा मुलगा मकराक्ष याला युद्ध करायला पाठविले. मकराक्ष रामाशीच युद्ध करायला गेला आणि मारला गेला.

ते ऐकून रावणाने दांतओठ चावीत रागाने इंद्रजिताला युद्धाला जायला सांगितले. इंद्रजिताने यज्ञाची तयारी केली. तो यज्ञाच्या वेदिकेकडे गेला. त्याला येत असलेला पाहून तेथे ज्या राक्षसस्त्रिया होत्या व ऋत्विज होते ते डोक्याला बांधायला लाल फेटे घेऊन आले.

इंद्रजिताने जो होम केला तो सामान्य नव्हता. त्याने दर्भाच्या ऐवजी आपली









आयुधे व शस्त्रास्त्रे आणि ताम्हन व पळी पंचपात्रासाठी लोखंडी तसराळी व पळ्या वगैरे वापरल्या. ऋत्विजांनी त्याच्या डोक्याला तांबडा फेटा बांधला. त्याने काळ्या रंगाचा बकरा यज्ञासाठी कापला. विजयसूचक अग्नीतून धुराशिवाय ज्वाळा येऊ लागल्या. अशातऱ्हेने इंद्रजित अग्नीत आहुती देऊन देव, दानव आणि राक्षसांच्या नावे तर्पण करून अदृश्य मायारूप असलेल्या आपल्या रथात बसला. त्या रथाचे रूप सूर्यासारखे ज्योतिर्मय होते.

इंद्रजित अंतर्धान होऊन युद्धभूमीवर आला. त्याने वानर सैन्यात मध्यभागी रामलक्ष्मण होते त्यांच्यावर नेम धरून शरवृ[illegible] केला. रामलक्ष्मणांनी आपल्या बाणांनी सर्व आकाश झाकून टाकले तरी त्यांचा एकही बाण इंद्रजिताला लागला नाही. त्याचे बाण मात्र रामाच्या अंगाला लागत होते. रामलक्ष्मणांनी इंद्रजिताने सोडलेले बाण स्वतःच्या बाणांनी भंग केले. परंतु इंद्रजिताच्या बाणांनी वानरसैन्याचे फार मोठे नुकसान केले.

लक्ष्मणाला फार राग आला. तो रामाला म्हणाला–"दादा, आतां याला असे मोकाट सोडून भागणार नाही. मी ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून राक्षससैन्याचा नाश करतो."

परंतु रामाला ते नको होते. म्हणाला– "ब्रह्मास्त्राचा प्रयोग अनिवार्य असेल तरच करणे बरोबर होईल. एकासाठी सर्व राक्षससैन्याचा नाश करणे बरोबर नाही. आपण फक्त इंद्रजिताचा वध करण्याचा प्रयत्न करून पाहू या. दिव्यास्त्रांचा प्रयोग करून पाहू या."

मध्यंतरी इंद्रजिताच्या मनात निराळाच एक विचार आला. तो युद्धभूमीवरून लंकानगरीत परतला. मायारूप सीतेला रथात बसवून आणून रामलक्ष्मणांसमक्ष तिचा वध करायचा व त्यांचे धैर्य सुटते का पहायचे, असा त्याचा विचार होता. तो मायारूप सीतेला घेऊन आला.

[illegible] पुन्हा [illegible] येत असलेला पाहून हनुमान एक मोठा खडक उचलून घेऊन आला. त्याच्या पाठीमागून अनेक वानर लहान मोठे खडक, शिळा किंवा दगड घेऊन आले. परंतु इंद्रजिताच्या रथात हनुमानाला रडत असलेली आणि अशक्त झालेली सीता दिसली. ते पाहून हनुमंताच्या डोळ्यात खळ्ळकन पाणी आले. त्याने जागच्या जागी थबकून आपल्या वानर अनुयायांना विचारले–"इंद्रजित आपल्या रथात बसवून सीतामातेला कां बरे आणीत असावा?"

तो अत्यंत क्रोधाने इंद्रजितावर धावून गेला. वानरसैन्य आपल्यावर हल्ला करायला येत असलेले पाहून इंद्रजिताने आपल्या तलवारीने सीतेला एकदां दोनदां टोचले आणि तिचे केस धरले.

हनुमंताच्या डोळ्याचे पाणी थांबेना. तो इंद्रजिताला दरडावून विचारू लागला– "काय रे, हे? तू काय करायला निघाला आहेस? तुला लाज नाही वाटत? तू सीतेला ठार केलेस तर तूही लवकरच ठार होशील, मग तुझ्या अंगात कितीही शक्ति असो किंवा तुला कितीही मंत्रबळ प्राप्त असो. मी तुला जिवंत सोडणार नाही."

इंद्रजितावर चालून आलेल्या वानरसैन्यावर राक्षस चालून आले. इंद्रजित



हनुमानाला म्हणाला–"ह्या सीतेसाठीच नाही का तू, सुग्रीव आणि राम लंकेवर स्वारी करायला आलात? मी तिला तुझ्या डोळ्यादेखत ठार करतो. त्यानंतर रामाला, लक्ष्मणाला, तुला, सुग्रीवाला आणि राक्षसद्रोही बिभीषणाला ठार करतो. स्त्रीहत्या करू नये असे असले तरी शत्रूला दुखविण्यासाठी काय वाटेल ते केले तरी चालते."

असे म्हणत रडत असलेल्या मायारूप सीतेला इंद्रजिताने शिरच्छेद करून ठार केले. नंतर त्याने एक भयंकर सिंहनाद केला. तो आवाज ऐकून वानर पळून गेले.



हनुमानाने त्यांना थांबविले व म्हणाला– "काय झाले रे? शूर रणांगण सोडून पळतात का?" वानर परतले. त्यांना बरोबर घेऊन हनुमानाने राक्षस सैन्यावर खडकादगडांचा वर्षाव सुरू केला.

त्याने एक मोठा खडक इंद्रजिताच्या रथावर फेकला. इंद्रजिताचा सारथी हुशारीने हनुमंताचा नेम चुकवून रथ दुसऱ्या बाजूला घेऊन गेला. परंतु दगड राक्षसांवर पडला आणि अनेक राक्षस प्राणास मुकले. वानर राक्षसांना अति उत्साहाने ठार करू लागले. त्यांनी इंद्रजितावर दगडाखडकांचा वर्षाव सुरू केला. इंद्रजिताला राग आला. त्याने शरवृष्टी करून वानरांचा वध करायला सुरवात केली. म्हणून राक्षसांना उत्साह चढला.

परंतु हनुमानाने राक्षस सैन्याला पळवून लावले व आपल्या अनुयायी वानरांना म्हणाला–"आपल्याला या राक्षसांशी युद्ध करण्यात वेळ घालविता कामा नये. चला, सीतेला इंद्रजिताने ठार केल्याची बातमी रामचंद्राला जाऊन कळवू या. राम व सुग्रीव जसे सांगतील तसे त्यानंतर करू या."

हनुमानाला परत जातांना पाहून इंद्रजित यज्ञ करण्यासाठी निकुंभी चैत्याकडे गेला. त्याला अग्नीत मांस आणि रक्त दोन्हींची आहुती दिली.

मध्यंतरी राक्षसांबरोबर वानरांचे घोर युद्ध चालू असलेले पाहून राम जांबुवंताला म्हणाला–"हा हनुमानाचा पराक्रम दिसतो आहे." त्यानंतर रामाने जांबवानाला हनुमंताच्या मदतीला जायला सांगितले. त्याप्रमाणे जांबुवान हनुमानाच्या मदतीसाठी लंकेच्या दारापर्यंत गेला.

हनुमंताने आपल्या मदतीला येत असलेले भल्लूक सैन्य (अस्वलांचे सैन्य) पाहून त्यांना परतायला सांगितले. सर्व रामाकडे आले. हनुमानाने फार दुःखाने रामाला इंद्रजिताच्या हाती सीतेचा वध झाल्याची शोकवार्ता सांगितली. ती बातमी ऐकून

राम जागच्या जागी बेशुद्ध होऊन पडला. ते कळल्यावर वानरवीर धावून रामाकडे आले. त्यांनी रामाच्या तोंडावर सुगंधी थंडगार पाणी शिंपडले.

लक्ष्मणाने रामाला मांडीवर घेतले आणि रडत म्हणाला–"तू धर्ममार्ग अवलंबून पिताच्या आज्ञेचे पालन करण्यासाठी वनवास पत्करलास, राज्य सोडलेस, कैकेयीशी वैर धरले नाहीस. तरी तुला इतके कष्ट सहन करावे लागत आहेत. तुझा धर्म तुझे रक्षण करू शकला नाही. हा धर्मविचार निरुपयोगी आहे, असेच मानण्याची पाळी आली आहे. धर्म असत्य आहे. अधर्म अवलंबन करून रावण पहा किती सुखी आहे?" असे म्हणत लक्ष्मण रामाला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करू लागला.

तेव्हां बिभीषण तेथे आला. रामालक्ष्मणांना, इंद्रजिताच्या हातून सीतेचा वध झाल्याची बातमी ऐकून दु:ख झाल्याचे त्याला कळल्यावर तो म्हणाला–"रामचंद्रा! ह्या बातमीवर विश्वास करतां कामा नये. सीतेला [illegible] असतां ते नाकारून आता तोच रावण तिच्या वधाची आज्ञा अनुज्ञा कशी काय देईल? तो सीतामातेला कोणत्याही परिस्थितीत सोडणार नाही. इंद्रजित होम करीत आहे. त्यावेळी वानरांना विघ्न आणू नये म्हणून त्यांना दु:ख करीत बसवून ठेवण्यासाठी त्याने मायारूप सीतेचा वध केला असावा. तो निर्विघ्नपणे होम करून परत आला तर सर्व देव आपले बळ एकवटून युद्धाला आले तरी त्याला जिंकणे शक्य नाही. म्हणून त्याचा होम पुरा होण्यापूर्वीच आपण निकुंभी चैत्याकडे जाऊ या. तू मात्र अगदी निश्चितपणे येथेच रहा. आमच्याबरोबर लक्ष्मणाला पाठव. लक्ष्मण इंद्रजिताच्या यज्ञात फक्त विघ्नच आणणार नाही तर, त्याचबरोबर त्याच्याशी युद्ध करून त्याला ठार करून ही येईल. अशातऱ्हेने लक्ष्मणाला ब्रह्मदेवाने दिलेला वरही खरा ठरेल."

बिभीषणाचा तो सल्ला सर्वांस पटला.






पूर्व किनाऱ्यावर कुजंग नावाचे एक छोटेसे राज्य होते. त्याच्या राजधानीचे नाव होते प्रदीप. त्या राज्याचे अधिपती शूर व पराक्रमी होते. त्यांना वृषराज म्हणत. त्या राज्याच्या प्रजेला समुद्रावर अगर मोठमोठ्या नद्यांवर कोणी अडविणे शक्य नव्हते. राजा चंद्रध्वज याला वीर वृषभ हे नाव होते.

इंग्रजांनी एकामागून एक भारताचे सर्व प्रदेश बळकावले आणि या छोटे खानी राज्याला गिळंकृत करण्यासाठी त्यांनी खूप खटपट केली. चंद्रध्वज याच्या नायकत्वाखाली कुजंग नाविकांनी समुद्राकाठी नांगर टाकून राहिलेल्या इंग्रजांच्या युद्धनौकांना खूप त्रास द्यायला सुरवात केली.





इंग्रजांच्या सैन्याने कुजंग राज्याला वेढा दिला. चंद्रध्वजाच्या सैनिकांजवळ उत्तमोत्तम व नवीन शस्त्रास्त्रे नव्हती. तरी त्यांनी शूरांसारखे इंग्रजांच्या वेढ्याला तोंड दिले. शेवटी किल्ला इंग्रजांच्या स्वाधीन झाला.



परंतु चंद्रध्वज बंदी झाला नाही. मोजक्या अंगरक्षकांबरोबर तो समुद्र किनाऱ्याच्या दाट जंगलात पळून गेला.

इंग्रजांनी कुजंग नावापुरतेच जिंकले, कारण त्यांना त्या राज्यात राहणे फार कष्टसाध्य झाले. चंद्रध्वजाचे अनुयायी गनिमी काव्याने संधी मिळाली की त्यांच्या शिबिरावर स्वाऱ्या व जाळपोळ करीत.





चंद्रध्वजला कैद केल्याशिवाय आपल्याला शांती मिळणे शक्य नाही, ही गोष्ट इंग्रजांच्या चांगली लक्षात आली. एकदा चंद्रध्वज अरण्यात समाधी धरून बसला असतां त्याला एकटा पाहून हेरांच्या मदतीने इंग्रजांनी त्याला अटक केली.

कैद्याला कटक येथे नेऊन इंग्रजांनी महा नदीच्या काठी बारावती नावाच्या किल्ल्यात कैदेत ठेवले. परंतु त्याला जे कैद करून घेऊन आले होते ते त्याने सांगितलेल्या गमतीदार गोष्टी मन लावून ऐकू लागले.





एवढेच नव्हे तर त्याने गोऱ्या लोकांना भारतीयांचे अनेक व्यायामाचे प्रकार ही शिकविले. त्यात तो फार हुशार व निपुण होता. अशा परिस्थितीत कित्येक महिने लोटले.

एके दिवशी संध्याकाळी एक अत्यंत सुंदर नाव नदीत दिसली. तिच्यात वल्हवणारे ३६ जण होते. ती नाव पाहून गोरे लोक व त्यांच्या बायका आणि मुले सर्व आनंदाने नावेकडे पाहू लागले. तशी सुंदर नाव त्यांनी पूर्वी कधीही पाहिली नव्हती.





त्यांनी तांडेलाजवळ चवकशी केली तेव्हां ती नाव एका मयत राजाची असून ती आता विकायला काढली असल्याचे कळले. "काय किंमत आहे?" इंग्रजांनी विचारले. तेव्हां "किंमत कोणी राजाच सांगू शकेल. अशा चैनीच्या नावा तेच तयार करवितात." तांडेल म्हणाला.



पाहुया तर, असा विचार करून इंग्रजांनी चंद्रध्वजाला बाहेर आणवून ती नाव चांगली आहे का पहायला सांगितले चंद्रध्वज नावेत चढला.



लगेच ३६ वल्ही एकदम चालू झाली. पापण्या लवायच्या आत नाव वळण घेऊन दृष्टीआड झाली. सर्व धड-ल्यावरच गोऱ्यांचे डोळे उघडले. इंग्रजांच्या हातावर तुरी देऊन जायला चंद्रध्वजाला प्रजेने व त्याचा मंत्री पट्टाजोशी याने मदत केली.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

सिचियोम नामक जपानी गृहस्थ आपल्या बायकोला बोलावून म्हणाला–"हे पहा ग, आपल्या व्हरांड्यात एक मेख बाहेर आली आहे. तिच्यामुळे फार मोठा अपाय होण्याची शक्यता आहे. ठोकून बसविली पाहिजे. शेजारच्या घरून हतोडा मागून आण."

ती शेजारच्या घरी जाऊन रिकाम्या हाताने परतली व म्हणाली–"मी शेजारच्या घरी जाऊन हतोडा मागितला तर ते लोक विचारू लागले–'ती मेख कसली आहे? बांबूची, लाकडी, की लोखंडी?' मी सांगितले, लोखंडी आहे. तेव्हां ते म्हणाले–'तर मग आमचा हतोडा बिघडणार नाही का? आम्ही नाही देणार!"

ते ऐकून सिचियोम दातओठ चावीत रागाने म्हणाला–"खरोखर, या जगात कशी कशी चिक्कू माणसं आहेत! ठीक आहे! मग आपण तरी काय करणार? आपलाच घेऊन ये?"

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०० ०२६ या पत्त्यावर पाठवा.

२० मार्च १९७७च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल मे १९७७च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

डिसेंबर महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "कद्रु नीती"



# अमरवाणी

त्याज्यं न धैर्यम् विदुरेपि काले,
धैर्यात् कदाचित् गति माप्नुयात् सः,
यथा समुद्रेपि च पोतभंगे
सां यात्रिको वांछति तर्तुमेव ॥ १ ॥

[ किती मोठे गंडांतर आले तरी धैर्य सोडता कामा नये. कारण धैर्य असेल तर कदाचित् त्या संकटातूनही सुटका होण्याची शक्यता असते. समुद्रात जहाजे फुटली तर प्रवासी स्वतःला वांचविण्यासाठी धडपडतोच.]

व्यसने मित्रपरीक्षा,
शूरपरीक्षा रणांगने भवति,
विनये भृत्यपरीक्षा,
दानपरीक्षा च दुर्भिक्षे ॥ २ ॥

[ संकटसमयी मित्राची परीक्षा होते, रणांगणावर शूरवीर माणसाची परीक्षा होते. नम्रपणात नोकराची आणि दुष्काळात दानधर्माची.]

न सदश्वाः कशाघातम्,
न सिंहा घनगर्जितम्,
परैं रंगुलिनिर्दिष्टम्
न सहंते मनस्विनः ॥ ३ ॥

[ चांगल्या जातीच्या घोड्यांना इजा होत नाही. सिंहांना मेघगर्जना सहन होत नाही. स्वाभिमानी माणसाला दुसऱ्याने दाखविलेला दोष सहन होत नाही.]



# मित्रलाभ

[ ४४ ]

सरोवराच्या काठी चारही मित्र आनंदाने रहात एके दिवशी बोलत बसले असतां चित्रांग (हरण) हजर नव्हते. बाकी मित्र आपसात म्हणू लागले—"कां बरे आले नाही ते? कोणत्यातरी सिंहावाघाच्या तावडीत किंवा शिकाऱ्याच्या जाळ्यात तर सापडले नसेल? आणखी कोणत्यातरी जीवघेण्या संकटात तर सांपडले नसेल?"

शेवटी मंथरक (कांसव) कावळ्याला म्हणाले—"अरे लघुपतनका! त्याला शोधत फिरणे मला किंवा हिरण्यकाला (उंदीर) शक्य नाही. म्हणून तूच आकाशात उडत जाऊन पाहून तर ये की, चित्रांग जिवंत आहे की इहलोक सोडून गेले."

लघुपतनक त्याप्रमाणे उडत गेला. सरोवराच्या जवळच एका जागी जाळ्यात सापडलेला चित्रांग त्याला दिसला. त्याला फार वाईट वाटले. त्याने विचारले—"मित्रा! काय रे हे?"

मित्र भेटतांच हरणाचे दुःख जास्तच वाढले. ते कावळ्याला म्हणाले—"संपलं आता या जगाशी नाते. या अंतकाळी एका मित्राचे दर्शन घडलं, याहून जास्त आणखी काय पाहिजे? मी प्रसंगवशात् तुला कमी अधिक काही बोलला असेन तर मला क्षमा कर. मी क्षमा करायला सांगितल्याचे आपल्या दोघां मित्रा नाही सांग."

कावळा म्हणाला—"मित्रा! आमच्यासारखे मित्र असतां तू जगाशी नाते सुटण्याच्या गोष्टी बोलतो आहेस, हे बरोबर नाही, बुवा! मी आत्तां जाऊन हिरण्यकाला घेऊन येतो. तो तुझ्या जाळ्याच्या दोऱ्या तोडून तुला सोडवील."



काबळ्याने हरणाला धीर दिला आणि उडत कांसव आणि उंदीर होता तेथे आला. त्याने हरणावर आलेल्या प्रसंगाचे वर्णन केले आणि हिरण्यकाला आपल्या पाठीवर बसवून तत्क्षण परतला.

आपल्या मित्रांना पाहील्यावर हरणाला धीर आला व ते त्यांना म्हणाले–"शहाण्याने संकटांत मदतीला धावणारे तुमच्यासारखे मित्र जोडले पाहिजेत."

उंदीर हरणाला विचारू लागला–"मित्रा! इतका शहाणा तू असतां ह्या जाळयात कसा काय सांपडलास रे?"

"मी जाळयात सांपडलो, हे पहिल्यानेच नव्हे रे! असाच एकदां मागे मी जाळयात सांपडलो होतो. परंतु सुदैवाने सुटलो. म्हणून तर तुमच्यासारख्यांशी मैत्री होण्याचे भाग्य लाभले." हरण म्हणाले.

उंदराने ती गोष्ट सांगायला सांगितली. तेव्हां हरण म्हणाले–"ती गोष्ट मागाहून सांगेन. शिकारी कोणत्याही क्षणाला येईल. मला प्रथम या जाळयातून सोडव."

उंदीर हंसून म्हणाला–"मी जवळ हजर असतां तुला शिकाऱ्याची भिती असण्याचे कारण नाही. मला थोडेफार शास्त्रज्ञान आहे. म्हणून विचारले."

"दुर्दैव आलं की, माणसाची सर्व अक्कल गुंग होऊन जाते, काम करीत नाही. मोठमोठे जाडजूड ग्रंथ लिहिणारे सुद्धां त्यांच्या कपाळावर काय लिहिले आहे त्यातले एक अक्षरदेखील खोडू शकत नाहीत." असे म्हणत हरण आपला जुना अनुभव सांगू लागले.

"फार दिवसांपूर्वी, मी सहा महिन्याचे पाडस असेन, कळपाच्या पुढेपुढे धावत असे. मोठी हरणे वाटेत खाचखळगे किंवा इतर काही धोका असला तर उडी मारून स्वतःचा बचाव करीत.

"एके दिवशी मी कळपाबरोबर जात असतां आमच्या वाटेवर एका शिकाऱ्याने जाळे पसरून ठेवलेले दिसले. मोठी हरणे ते ओलांडून पलीकडे उडी मारून गेली. परंतु मला इतकी लांब उडी मारता येत नव्हती. म्हणून मी पळत जाऊन जाळयात सांपडलो.

"शिकाऱ्याला फार आनंद झाला. त्याने माझे पाय बांधले. मला जाळयात सापडलेला पाहून बाकीची हरणे स्वतःचा जीव वांचविण्यासाठी पळून गेली.

"परंतु सुदैवाने त्या शिकाऱ्याने माझा गळा कापला नाही. मी दिसायला सुंदर असल्याने मला ठार करण्याऐवजी कोणाला पाळायला दिले तर जास्त नफा होईल असा विचार करून तो मला घरी घेऊन गेला. मला स्वच्छ धुवून काढले आणि खूप सजवून नेऊन एका राजाच्या हाती विकले.

"राजाने माझे प्रेमाने पालन पोषण केले. राजघराण्यातल्या बायकांनी माझे इतके लाड पुरविले की मला नको झाले.

"इतक्यात पावसाळा आला. गडगडू लागले, विजा चमकू लागल्या व पाऊस पडू लागला. माझं मन जंगलाकडे आपल्या कळपाकडे धाव घेऊ लागले. "केव्हां भेटतो आपल्या आप्तबंधूना, केव्हां अरण्यात मोकळेपणी बागडतो, असे मन अधीर होऊन मी बडबडू लागलो.

"माझं बोलणं ऐकून सर्व थक्क झाले. मला भूतबाधा झाली असावी असा विचार करून राजाने एका मांत्रिकाला बोलाविले. ते मला काठीने बडवून माझं भूत उतरवू लागले. तितक्यात एका साधूने त्यांना थांबवून विचारले–"कां त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्याला असे मारता? त्याने कोणते असे पाप केले."

"मी बोललो ते त्यांनी साधूला सांगितले.

"हे दुर्दैवी हरण स्वतःच्या स्वातंत्र्यासाठी मोकळेपणे हिंडण्याफिरण्यालायक जंगलासाठी तडफडते आहे, त्यांत गैर काय? सोडून द्या त्याला." साधू म्हणाला.

"तेव्हां राजाने मला स्वच्छ धुवून काढले. बडविल्यामुळे माझ्या अंगाला झालेल्या जखमांना औषध लावले आणि मला सोडून दिले."



# १८२. पहिला ख्रिश्चन चक्रवर्ती

नीरोसारख्या रोमन चक्रवर्तीने ख्रिश्चनांची ससेहोलपट केली तर कॉन्स्टंटाइन नावाच्या चक्रवर्तीने रोमन साम्राज्याचा ख्रिश्चन धर्म हा स्वतःचा धर्म मानून त्याचा आदर केला. ह्याचा सर्वांग पुतळा प्रथम रोमन स्वरूपात होता. त्याचे डोके व भग्नांश या चित्रात दिसतील.





# माया सरोवर

[ १४ ]

[ धबधब्यांतून खाली पडल्यावर जयशील व सिद्धसाधक वाचले. त्यांनी एका खुजाला प्राणी खाणाऱ्या एका राक्षसीवृक्षाच्या हातातून वांचविले. त्याच वेळी तेथे खुजांची राणी आली ती आपल्या शत्रूंविषयी काही सांगत असतां डोंगरावरून एका भयंकर जनावराने एक मोठी शिळा त्यांच्या अंगावर फेंकली. पुढे—]

जयशील व सिद्धसाधक डोंगरावरच्या त्या भयंकर प्राण्याकडे आणि त्याच्या शेजारी उभा असलेल्या माणसाकडे आश्चर्य-चकित होऊन पाहू लागले. त्या माणसाला आपण पूर्वी कोठेतरी पाहिले आहेसे जय-शीलला वाटू लागले. तो आठवीत असतां त्या भयंकर जनावराने फेकलेला खडक जोराने येऊन ते उभे होते त्या जागेपासून सुमारे पंचवीस फुटावर आदळला. पडतांना त्या दगडाचा जो आवाज झाला, त्यामुळे सर्व भयचकित झाले.

खुजेतर आपापल्या वाहनांवर बसून दहावीस कदम मागे सरकून पळून जायच्या तयारीत होते. त्यांची राणीसुद्धा थोडी दूर उभी राहून जयशील व सिद्धसाधकाला म्हणाली—"अहो महाकाय, तो भयंकर वनमाणूस आणि त्याला नाचविणारा तो महाकाय गेले दहाबारा दिवस आम्हांला



फार त्रास देत आहेत. जंगलात शिकारीला आमच्यापैकी चार जण गेले असतां त्यांना या महाकायाने ठार केले. आमचे शत्रु त्याचा आसरा मिळाल्याने कोणत्याही क्षणाला आमच्यावर स्वारी करतील अशी शंका वाटते आहे आम्हांला."

जयशील आणि सिद्धसाधकाला गडेकार जातीच्या राणीचे बोलणे ऐकून तिची कींव आली. ती व तिच्या जातीचे खुजे आपल्या परीने शूरवीर होते, हे खरे असले तरी त्या वनमाणसासमोर आणि त्याला नाचवणाऱ्या माणसासमोर त्यांचा थरकाप उडाला होता.

सिद्धसाधकाने जयशीलला विचारले– "काय रे, त्या वनमाणसा शेजारी हातात [illegible] घेऊन उभा [illegible] तो आपल्या देशातला माणूस असेल का? पहातर जरा लक्ष लावून."

जयशीलला देखील तो माणूस ओळखीचा, त्याला वाटत होता अगदी तोच असावासा वाटू लागले होते. परंतु तो आपल्यासारखा इतकी जंगले, रानेवने, डोंगर, न द्या ओलांडून इकडे इतका दूर कशाला आला असेल...?

जयशील या विचारात पडला असतां त्या माणसाने आपल्या तलवारीची मूठ. त्या वनमाणसाच्या पाठीत टोचीत त्याला काही तरी हुकूम दिल्यासारखे दिसले. वेदना असह्य होऊन त्या वनमाणसाने एक दोन उड्या मारल्या आणि खाली वाकून एक मोठा खडक वर उचलण्याचा यत्न करू लागला. परंतु तो दगड इतका मोठा होता की तो उचलून उभे राहणे त्याला जमत नसावेसे वाटले.

"साधका! तो त्या वनमाणसाकरवी आपल्यावर पुन्हा तो खडक फेकविण्याच्या प्रयत्नात दिसतो आहे. दिवसाच्या वेळी एवढा मोठा खडक आला तरी त्याच्यापासून स्वतःला वांचविणे शत्रूला शक्य आहे हे त्या मूर्खाला कळत नसावेसे दिसते आहे." असे म्हणत जयशील गडेकार जातीच्या राणीकडे वळून म्हणाला–"तुमच्या जातीचे लोक शिकारीला जातांना धनुष्यबाण वापरतात का? तसे एक धनुष्य व काही बाण मागवा."

गडेकारजातीचे लोक सामान्यपणे भाल्यांनेच शिकारवगैरे करीत. तसा त्या जातीचा नियमच होता. तेव्हां त्यांच्याकडे तसे धनुष्यबाण कोठून असणार? पण त्यांच्या सेनापतीला एकदां जंगलात शिकारीला गेला असतां एका जागी अनपेक्षितपणे एक मोठे धनुष्य आणि पांचसहा बाण सांपडले होते. ते त्याने, कोणाला कळू न देता फार काळजीपूर्वक आपल्या घरात लपवून ठेवले होते. ती गोष्ट त्यांच्या राणीलासुद्धा माहीत नव्हती.

जयशीलने धनुष्यबाण घेऊन यायला सांगितल्यावर तो सेनापती आपल्या राणीकडे घाबऱ्याघाबऱ्या पाहून काही सांगण्याच्या विचारात दिसला, परंतु त्याच्या तोंडावाटे शब्दच फुटत नव्हता. ते ओळखून सिद्धसाधक त्याला म्हणाला–"काय रे ठेंगू शूरा! तू बोलायलासुद्धां इतका भितो आहेस तर युद्धात सैनिकांना आणि मेंढेस्वारांना कसे काय प्रोत्साहन देणार?"

त्या प्रश्नाचे जणुंकाही उत्तर देण्यासाठीच की काय तो खुजा सेनापती आपल्या राणीकडे थरथर कांपत पहात म्हणाला– "महाराणी! आपल्या जातीने धनुष्यबाणाला हात लावू नये असा नियम आहे. परंतु मी तो नियम मोडला आणि जंगलांत सापडलेले धनुष्यबाण मी आपल्या घरात लपवून ठेवले आहेत."



ते ऐकून खुजांच्या राणीला राग आला. ती संतावून काही म्हणणार इतक्यात जयशीलने हाताने तिला शांत राहण्यास खुणावले व म्हणाला–"तुमच्या सेनापतीने केलेले काम तुमच्या जातीच्या नियमाप्रमाणे किती मोठा अपराध म्हणून मानले जाईल, हे मला माहीत नाही. परंतु ते धनुष्यबाण तुम्ही लगेच मागविलेत तर मी एका क्षणात त्या वनमाणसाला वाटेला लावीन. त्यानंतर मी स्वतःच्या हाताने निराळे धनुष्यबाण तयार करून त्या माणसाला आणि तो वनमाणूस जिवंत राहिला तर त्याला सुद्धा कसे ठार करावयाचे त्याचा मार्ग काढतो." खुजांची राणीने काहीच न बोलता आपल्या



सेनापतीकडे होकारार्थी सहेतुक पाहिले. सेनापती चटदिशी आपल्या वाहनावर चढून झाडीच्या आड दिसेनासा झाला. तो आपल्या घराकडे गेला.

मध्यंतरी वनमाणसाने आणखी एक मोठा दगड उचलला. त्याच्या कंबरेला बांधलेली साखळी धरून उभा असलेला माणूस मोठ्याने ओरडून तलवारीच्या मुठीने त्या वनमाणसाला पाठीत मारून खुणावीत काहीतरी हुकूम देत होता. वनमाणूस चिडून जाऊन बाजूला सरकून त्याला हुकूम देणाऱ्यावरच दगड फेकण्याच्या विचारात दिसला. तेव्हां त्या माणसाने तलवारीचे टोक वनमाणसाच्या गळ्यावरच ठेवले आणि मोठ्याने ओरडला.

वनमाणसावर खिसकावून ओरडणाऱ्याचा आवाज डोंगराखाली उभे असलेल्या जयशीलला व इतरांना छान ऐकू आला. जयशील थोड्या हलक्या स्वरात म्हणाला– "अरे साधका! तो माणूस कोण आहे, हे मी आतां ओळखले. तो तुमच्या हिरण्यपूरचा माणूस नाही, आमच्या अमरावतीनगरीचा राहणारा आहे. मी जेथे जन्मलो वाढलो ते गांव सोडून देशोदेशी हिंडत तुमच्या हिरण्यपूरला येण्यास, रानांवनांत भटकत फिरण्यास कारण हाच! तो एके काळी आमच्या रुद्रसेन महाराजांच्या पदरी घोडेस्वारांचा नायक होता. त्याचे नाव कृपाणजित."

ते ऐकून सिद्धसाधक आश्चर्यचकित होऊन म्हणाला– "जयशीला! हे तर फारच विचित्र दिसते आहे! कोठे अमरावती नगरी आणि कोठे हे जंगल? तर मग आतां काय करायचा विचार आहे तुझा?"

जयशीलने एकदां ध्यानपूर्वक डोंगराच्या शिखराकडे पाहिले व म्हणाला– "साधका! बाण लागून, त्याला ठार करणारा कोण हे कळल्याशिवाय कृपाणजित मेलेला मला आवडणार नाही. तो त्या वनमाणसाकडून तेच काम करवीत आहे. त्याला बरोबर नेम धरून दगड मारतां देखील येत नाही. ते वनमाणूस त्याला सतावणाराच्या टाळक्यातच दगड फेकणारसे दिसते आहे."

[illegible] धनुष्यबाण आणायला गेलेला खुजांचा सेनापती धनुष्यबाण घेऊन आला. त्याने मेंढ्यावरून उतरून बरोबर आणलेले धनुष्यबाण जयशीलच्या पायाजवळ नम्रपणे आणून ठेवले. जयशीलने धनुष्यबाण हातात घेऊन ते कामाचे आहेत का लक्षपूर्वक पाहिले. चांगले मजबूत होते ते. बरोबरचे सहाबाणही चांगले होते.

सिद्धसाधक त्या धनुष्यबाणांकडे पाहून म्हणाला– "जयशीला तू आपला शत्रू कृपाणजित आणि त्याच्या त्रासाने खुजांच्या वस्तीवर दगड फेकणाऱ्या वनमाणसाला परलोकी पाठविणार आहेस का?"

तो प्रश्न ऐकून जयशील थोडे स्मित करून म्हणाला– "इतक्या दुरून त्या दोघांना नेम धरून ठार करणे इतके सोपे आहे का रे? हे बाण सामान्य बाण आहेत; ब्रह्मास्त्र किंवा नागास्त्र नव्हेत."

एवढ्यात डोंगराच्या शिखरावरून काहीतरी आरडाओरडा झाल्यासारखा ऐकू आला. वनमाणूस चिडून जाऊन त्याला त्रास देणाऱ्यावरच उलटलेला दिसला. हातातला दगड त्याच्या टाळक्यातच टाकायला तयार झाला होता. कृपाणजित तलवारीच्या टोकाने हळूच टोचीत होता आणि वनमाणूस इकडे तिकडे उड्या मारून स्वतःला बांचविण्याच्या प्रयत्नात होता. इतक्यात तिकडे चारपांच खुजे दोऱ्या घेऊन आले. त्यांनी दोऱ्या फेकून वनमाणसाचे पाय आणि हात चातुर्याने बांधले.





तरी वनमाणसाने दगड खाली टाकला आणि स्वतःचे हातपाय सोडविण्याची धडपड करीत असलेला दिसला.

ते पाहून खुजांचा सेनापती अत्यंत आनंदाने जयशीलला म्हणाला–“ अहो, या भयंकर प्राण्याला ठार करायला हीच संधी उत्तम आहे. नेम धरून बाण मारा त्याला.”

खुजांची राणीसुद्धां होकारार्थी मान हलवीत म्हणाली–“ बरोबर असलेल्या त्या महाकायाशिवाय त्या वनमाणसाची सुद्धां आम्हांला भिती वाटते आहे. त्याला लोळविलात म्हणजे आम्हांला ठार करण्याच्या बेतात असलेल्या आमच्या शत्रूला, त्या गडेकोंड दुष्टाला आणि त्याच्या [illegible] लोकाला पाठवू.”

परंतु जयशीलला इतक्या दुरून डोंगराच्या शिखरावर उभे असलेल्यांना बाण मारून ठार करणे शक्य होईलसे वाटत नव्हते. तरी शत्रूला भयभीत करून सोडण्याबरोबरच त्या कृपाणजिताला आपणाही या जागी आहो हे कळविण्याची तीव्र इच्छा त्याच्या मनात उपजली. हा युद्ध धर्म आहे, धोक्याने ठार करणे बरोबर नाही असेही त्याला वाटले. असा विचार करून तो थोडा पुढे गेला आणि एका उंच दगडावर उभा राहून त्याने तलवार उपसली आणि ती आकाशात जोराने हलवीत ओरडला–“नीच कृपाणजिता! हा पहा, मी जयशील इकडे आलो आहे, सावध रहा!”

परंतु तो आवाज डोंगरावरच्यांना चांगला ऐकू आला नसावासा दिसले. कारण कृपाणजितावरोबर शत्रूपक्षातले खुजे त्या वनमाणसाला काबूत आणण्याच्या प्रयत्नात गढून गेलेले होते. कृपाणजित वनमाणसाच्या कंबरेला बांधलेली साखळी जोराने ओढीत होता आणि खुजे त्या बिचाऱ्याच्या हातापायांना बांधलेल्या दोऱ्या धरून ओढीत होते. वनमाणूसही स्वतःला सोडविण्यासाठी मोठमोठ्याने ओरडत धडपड करीत होते.

तलवार उपसून जयशील जेथे उभा होता तेथे सिद्धसाधक आणि खुजांची राणी दोघं आली. सिद्धसाधक जयशीलला म्हणाला–“ अरे जयशीला! राणी आणि तिच्या सैनिकांना सुद्धा त्यांच्या शत्रूवर हल्ला करायला हीच संधी चांगली वाटते आहे रे! वनमाणसाला दोऱ्यांनी ओढणाऱ्या खुजा लोकात राणीचा शत्रू गडेकोंडसुद्धा आहे म्हणे! त्या खुजांच्या मध्ये डोक्याला घार-गिधाडांच्या पिसाचा किरीट घालून एक जण दिसतो आहे ना?” सिद्धसाधकाने विचारले.

जयशीलने ते ऐकून डोंगराच्या शिखरा-वर उभे असलेल्या प्रत्येकाला लक्षपूर्वक पाहिले. त्यांच्यात साधकाने सांगितले तशी एक व्यक्ति होती खरी. “तोच गडेकोंड वाटते? तो राणीचा शत्रू असो की कोणी दुसरा असो, आपला नक्कीच शत्रू नाही. आपला शत्रू कृपाणजितच आहे. आपण बाणाने कोणाला ठार करावयाचे झाले तर त्यालाच करायचे.”

असा विचार करून जयशीलने धनुष्य हातात घेतले आणि एकदां डोंगराच्या शिखराकडे मान वर करून पाहिले. पुष्कळ मेंढेस्वार त्याच्या जवळच उभे होते. आणखी अनेक भाले हातात घेऊन खुजे डोंगरावर चढायला सिद्ध होते.

जयशील खुजांच्या राणीकडे वळून म्हणाला–“ काय राणी! तुमचे अनुयायी युद्ध करायला सिद्ध झालेले दिसत आहेत! मी एका बाणाने त्या वनमाणसाला आणि तुम्ही म्हणता त्या महाकायाला मारू शकणार



नाही, हे मी सांगायला नको. माझा बाण तिकडे पडल्याबरोबर शत्रू तुमच्याशी दोन हात करायला सावध होऊन तयार राहणार. तेव्हां युद्ध करायला ही वेळ बरोबर आहे की नाही, याचा नीट विचार करा."

खुजांची राणी सेनापतीकडे त्याचे त्या-विषयी काय म्हणणे आहे, हे विचारण्याच्या हेतूने पाहू लागली. खुजांचा सेनापती ऐटीत आपला भाला वर उचलून आपल्या मेंढ्यावर बसत म्हणाला–"अहो, तुम्ही त्या दुष्टावर नेम धरून बाण सोडा. आजपर्यंत आमच्या शत्रूने भाल्यांच्या फेकी शिवाय दुसऱ्या कोण-त्याही शस्त्राचा उपयोग केलेला नाही. बाणही वस्तूच त्यांना माहीत नाही. तुमचा बाण लागताच त्यांची गाळण उडून जाईल. आम्ही बरोबर त्या वेळी हल्ला चढवू आणि त्यांना डोंगरापलीकडे पळवून लावू. शक्य झालं तर त्यांच्या वस्तीत शिरून त्यांच्या झोपड्यांना आणि गावांना आग लावून ती खाक करू."

"हे ठीक झाले सेनापती! परंतु तू आपल्या उत्साहात त्या वनमाणसाला आणि [illegible] माणसास विसरतो आहेस! तरी तुझे शौर्य आणि तुझ्या सैनिकांचे शौर्य एकदां पहावयाचे माझ्या मनात आहे." जयशील म्हणाला.

"जयशीला! हीच मोक्याची वेळ आहे. बाण सोड, वनमाणूस त्याला बांधलेली दोरी तोडून एका खुजाला धरून उभा आहे, पहा." असे मोठ्याने ओरडून म्हणाला.

जयशीलाने धनुष्यावर बाण ठेवून वन-माणसावर नेम धरला आणि बाण सोडला. बाण 'सुं...ई...' असा आवाज करीत जाऊन वनमाणसाच्या कंबरेला लागला. दुसऱ्या क्षणाला वनमाणूस जोराने ओरडला आणि त्याने हातात एका खुजाला उचलून धरले होते त्याला डोंगराच्या खालच्या बाजूला फेकले.

खुजा मरणाच्या भीतीने आकाशात तरंगत ओरडत येत असतां सेनापतीने आपल्या अनुयायांना सावध रहायला सांगितले. मेंढेस्वार आणि पायदळ जय-जयकार करीत भाले उचलून धावत उत्साहाने डोंगर चढू लागले. (क्रमशः)





# खरा हेतू

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तुझ्यासारख्या शहाण्या माणसाने परिस्थितीवश होऊन असे वागणे आश्चर्यंच वाटते आहे. असभ्य माणूस चांगली संधी मिळाली असूनही तिचा लाभ घेत नाही. त्याचे उदाहाण म्हणून तुला मी वीरू नावाच्या एका रानटी जातीच्या माणसाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी कामरूप देशाच्या गादीवर मलयसेन नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला मूलबाळ नव्हते. गादी बळका-वण्याच्या हेतूने राजाचा वध करण्याचे अनेक कट झाले. ही कारस्थाने कोणाची

वेताळाच्या गोष्टी



आहेत ह्याचा शोध लावणेदेखील मलय-सेनला शक्य होत नव्हते.

मध्यंतरी पूर्वेकडील जंगलात एका वाघाने फार धुमाकूळ मांडला असल्याचे राजाला कळले. म्हणून राजा त्या त्या वाघाची शिकार करण्यास निघाला. राजा आपल्या दोघां अंगरक्षकांसह जंगलात खूप हिंडला. राजाला त्या आड रानात एकटा पाहून त्याचे दोघे अंगरक्षकच तलवारी उपसून राजाला मारायला धावले. राजाने देखील आपली तलवार उपसली व युद्ध करू लागला. परंतु राजाचे उतारवय होते आणि दोघे अंगरक्षक तरुण होते. म्हणून दोघांशी एकदम युद्ध करणे राजाला साध्य झाले नाही.

[illegible] कोठून तरी एक रानटी जातीचा तरुण राजाच्या मदतीला धावला. त्याने आपल्या भाल्याचा वार करून एकाला ठार केले आणि दुसऱ्याला राजाने व त्याने मिळून ठार केले. अशा तऱ्हेने राजा त्या संकटातून वाचला.

वीरू नांवाचा तो तरुण एका रानटी जातीच्या नायकाचा मुलगा होता. नायक एका लुटारूंच्या टोळीचा पुढारी होता. वीरूने राजाला वांचविले ते राजभक्तीमुळे नसून एका वृद्ध व्यक्तीला दोघे मारायला धावलेले पाहून त्याला त्याची कीव आली. परंतु ती गोष्ट मलयसेन राजाला माहीत नव्हती. त्याने वीरूचे आभार मानले व त्याला आपल्याबरोबर राजधानीत बोलावून घेऊन गेला. राजधानी कशी आहे पाहून येण्याच्या कुतूहलाने वीरू राजाबरोबर जायला तयार झाला.

राजवाड्यात पोचल्यावर राजाने वीरूला, गुप्तपणे काही राजद्रोही आपला वध करण्याचा प्रयत्न करीत असल्याचे, पण कारस्थानी कोण आहेत हे कळत नसल्याचे सांगितले. त्यानंतर राजा वीरूबरोबर जेवायला बसला. दोन घासच तोंडात घातले असतील, राजा एकाएकी बेशुद्ध होऊन पडला. कोणीतरी त्याच्या अन्नात विष कालविले होते.

[illegible] धावत आला. राजवैद्याने केलेल्या औषधोपचाराचा काही उपयोग झाला नाही. तेव्हां मरण येण्यापूर्वी मलयसेन राजाने प्रधानाला वीरूच आपला वारस असल्याचे सांगून प्राण सोडला.

ह्या सर्व गोष्टी घडी दोन घडीत झाल्या. वीरूला काय करावे सुचेना. निघून जावेसे वाटले त्याला. परंतु विष प्रयोग करणारा कोण याचा शोध लावल्याशिवाय निघून जाणे त्याला आवडले नाही.

राजा मेल्यावर वीरूचा वध करण्याचे सुद्धा अनेक प्रयत्न झाले. परंतु सुदैवाने त्या संकटांतून तो वांचला.

त्याच सुमारास लुटेऱ्यांचा धुमाकूळ वाढला. हे लुटेरे आपलेच लोक आहेत हे वीरूला माहीत होते. म्हणून लुटालूट चालू असूनही त्याने तिकडे दुर्लक्ष केले.

अशा परिस्थितीत एके दिवशी सेनापतीने वीरूला येऊन सांगितले की, चोरांचा नायक कैद झाला आहे आणि महाराजांचा हुकूम असेल तर त्याला मृत्युदंड दिला जाईल.

वीरूला वाटले की तुरुंगात जाऊन टोळीचा नायक कोण आहे, हे पाहून यावे. त्याप्रमाणे तो सेनापतीबरोबर तुरुंगात गेला. कैद झालेला लुटेरा वीरूचा उजवा हातच होता. वीरूला पाहताच सुटकेची आशा



त्याच्या डोळ्यात झळकू लागली. तो बोलताबोलता थांबला. वीरू लगेच मागे फिरला आणि निघून गेला.

आपल्या एका अनुयायाला तुरुंगात पाहून वीरूचे मन घुसळून निघाले. रात्री त्याला झोपच लागली नाही. मध्य रात्रीच्या सुमारास तो तुरुंगात गेला आणि आपल्या साथीदाराला मुक्त केले आणि स्वतः त्याच्याबरोबर राज्य सोडून निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले– "राजा, वीरूने आपला राज्यावरचा अधिकार कां सोडून दिला? कोणी त्याचा वध करील म्हणून का? की राज्य करण्याची योग्यता त्याला स्वतःच्या अंगात नसल्या-

सारखे वाटले? कट कोण करतात याचा छडा मनात असूनही त्याने तो कां लावला नाही? एका साथी मित्राला तुरुंगात पाहून तो कां कचरला? तो राजा होता, तुरुंगातून कोणालाही माफ करण्याचा त्याला अधिकार होताच की नाही? त्याचा प्रयोगही कां केला नाही? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर, परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

"वीरूला कोणी वध करील याचे भय असावेसे दिसत नाही." विक्रमादित्य असे म्हणत पुढे म्हणाला—"तसे असते तर राजाच्या वधाबरोबर त्याच्या वधाचाही प्रयत्न झालेला होता, तर तेव्हांच पळून गेला नसता का? त्याच्या मनात बदल व्हायचे एकच एक कारण दिसते आहे. आपल्या मित्राला तुरुंगात टाकण्याचे मूळकारण तो स्वतःच ठरला असता, सेनापतीकडून मित्राला मुक्तता देवविणे त्याला [illegible] स्वतः राजपदावर राहू शकला असता की नाही, याची शंकाच होती. तो स्वतः चीरांपैकीच एक आहे, असा संशय यायला जागा होती. राजा होणे म्हणजे मरणाला तयार असणे, त्याला असल्या गोष्टांचा तिटकाराच वाटला. तसा तिटकारा वाटल्यावर कट कारस्थाने कोण करतो आहे, याचा शोध लावणे हा प्रश्नच त्याच्या मनात राहिला नाही, ही अगदी स्वाभाविक गोष्ट होती. म्हणून वीरू पुन्हा आपल्या आत्मीय बांधवांकडे निघून गेला. जेथे कोणी आप्तबंधू नाही, ज्या राज्याची त्याला आपुलकी वाटली नाही, त्याचा मोह तरी कसा राहणार? आपल्या रानटी जातीच्या जीवनातच तो समरस व्हायला निघून गेला.

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





नुकतेच उजाडले होते. मुरारी आंब्याच्या झाडाखाली तोंड धुवत बसला असतां त्रिलोचन नावाचा चाळीशीतला एक गावकरी घाबराघुबरा होऊन आला आणि धापा टाकीत मुरारीच्या समोर उभा राहिला.

"काय हो काका? इतक्या उजाडतांच आलात?" मुरारीने त्या गावकऱ्याला विचारले.

त्रिलोचन मटकन खाली बसला आणि दोन्ही हात कपाळावर आपटून म्हणाला—"मेलोच की रे!"

"चोरी झाली का? की कोणी घरफोडी केली? काय झालं तरी काय?" मुरारीने विचारले.

"डाकाच म्हण, परंतु डाका घालणारा आमच्या शेजारचा 'मोठा' माणूस होता, किशोरी ठाकूर." त्रिलोचन म्हणाला.

"काय, झाले तरी काय? ऐकू तर दे!" मुरारीने विचारले.

"गेल्या वर्षी मी किशोरी जवळून दोन शे रुपये कर्जाऊ घेतले होते. पावतीवर त्याने माझा आंगठा घेतला. आपल्याला वाचायला कोठे येते आहे? त्या दोनशे रुपयांसाठी म्हणे, मी आपली एक एकर जमीन गहाण ठेवली त्याच्याकडे! त्या जमिनीवर कब्जा करून घ्यायला दोघांजणांबरोबर काल दुपारी आला. साक्षीदारांच्या सह्या आहेत; त्याचीच माणसे होती ती!" त्रिलोचन म्हणाला.

"काका, काळजी करू नका. कोर्टात त्याची केस टिकणे शक्य नाही. एवढे खरे की, तुम्हांला थोडा त्रास सोसावा लागेल आणि वेळही थोडा फुकट घालवावा लागेल. एकट्या किशोरी ठाकुराचेच कशाला, गावांत कोणी शिकला सवरलेला नसल्यामुळे

आणखी कित्येकांना फावते आणि जीव घ्यायला तयार होतात. फसवेगिरी अशीच चालू आहे. याविषयी काय करायचे ते मी पाहून घेतो. तुम्ही अगदी बेफिकीर रहा." असे सांगून मुरारीने त्रिलोचनला निरोप दिला.

मुरारी वकीली नुकतीच पास करून जवळच्या तालुक्याच्या गावी 'प्रॅक्टिस' करू लागला होता. तो दर रविवारी आपल्या कमलापूर गावी येऊन आपल्या आईवडिलांबरोबर रहात असे. कमलापूर गावी शेतकरीवर्गच जास्त होता. काही ग्रामीण उद्योगधंद्यात गुंतलेले गावकरीही होते. त्यांना कोणालाच लिहितां वाचतां येत नव्हते. विद्याभ्यास करावा, शिकावे अ[illegible] परंतु [illegible] जवळ जवळ सर्वच अशिक्षितच होते.

लिहिता वाचतां येत नसल्यामुळे आपल्या गांवकऱ्यांना किती कष्ट सहन करावे लागतात याची कल्पना मुरारीला चांगली होती. त्याने वयस्कर लोकांना शिकविण्यासाठी पुष्कळ प्रयत्न करून पाहिले, पण कोणी त्यात रस घेत नव्हता.

ते म्हणत–"बाबारे! सरस्वतीची आमच्यावर कृपा असती तर लहानपणीच नसतो का शिकलो. आमचे आयुष्य एवढे झाले आणि आता कसलं शिक्षण? आमच्या नशिबातच ते नाही." मुरारी आतां काय करणार? गप्प झाला.



परंतु त्रिलोचनवर आलेला प्रसंग पाहून त्याने या संधीचा फायदा घ्यायचे ठरविले. लहान असो की वडीलधारी मंडळी असोत कोणीही निरक्षर असतां कामा नये, त्याने यासाठी कंबर बांधली. त्याने आपला कार्यक्रम पार पाडण्यासाठी त्याची बायको सुमती हिला आपल्या गांवात ठेवले आणि गावकऱ्यांशी बोलून पाहिले. विचारेतो, तेच तेच उत्तर देई, सरस्वतीची कृपा आम्हां गांवढळांवर नाही! त्यांच्याशी वादविवाद करण्यात अर्थ नव्हता. त्यांचा अंधविश्वास मूळ धरून घट्ट बसला होता त्यांच्या मनात काहीतरी अद्भुत असेल तरच त्यांचा विश्वास बसणार, अशी त्याची खात्री झाली.

काहीतरी अद्भुत दैवी आश्चर्य वाटावे असे केल्यास या गावकऱ्यांच्या मनांत विश्वास बसेल. त्यासाठी त्याने एक युक्ती योजली. त्याने सुमीतबंधु नावाच्या एका जादुगाराचा सल्ला घेतला.

मुरारीने कागदाचे शेकडो तुकडे घेऊन त्यांवर, बोरू ताज्या कडुलिंबाच्या रसात बुडवून त्याने "होय" असे स्पष्ट शब्दात लिहिले. लिहिलेले सर्व कागद वाळवून घेतले. त्यांच्या सहाय्याने गावकऱ्यांना काहीतरी अद्भुत दाखवायचे त्याने ठरविले.

कमलापूर गावाला लागून एक ओढा वहात होता. ती सरस्वती नदीचीच एक धारा आहे आणि फार पवित्र नदी आहे, असा गांवकऱ्यांचा दृढ विश्वास होता.



त्यांच्या या अंधविश्वासाचा मुरारीला फार फायदा झाला.

त्याने सर्व गावकऱ्यांना एकत्र केले व म्हणाला–"तुम्ही नेहमी म्हणता की सरस्वतीदेवीचा तुमच्यावर कोप आहे आणि तुम्हांला लिहितां वाचतां न येण्याचे कारण देवीची अवकृपा आहे, होय ना? देवीने स्वत: समोर येऊन तुम्हांला असा शाप दिला आहे का? नाही. तसे कधी होणेच शक्य नाही. फक्त तसा तुमचा विश्वास झाला आहे. मी तो विश्वास निरर्थक आहे, असेच म्हणेन. ती विद्येची देवी आहे, असे कधी म्हणणे शक्यच नाही. लहान थोर, गरीब श्रीमंत सर्वांनी शिकावे, त्यांच्यावर आपली मर्जी असावी, असेच तिला वाटत असणार. हे पहा कागदाचे कोरे तुकडे आहेत. त्यांवर काही लिहिलेले नाही. प्रत्येकाने एकेक कागद उचला. तुम्ही या सरस्वती-नदीच्या पाण्यात बुडवून विचारा, ती शिकावं म्हणते की शिकू नका म्हणते, तीच सांगेल. ती आपलं मत कागदावर लिहील."

[illegible]रारीची सूचना गावकऱ्यांना मान्य झाल्यासारखं दिसलं. स्त्रीपुरुष सर्व वयस्क गावकऱ्यांनी कागदाचा एकेक तुकडा बीरुकडून घेतला. नदीवर जाऊन पाण्यात तो तुकडा बुडवून 'आम्ही शिकावं का?' असे सरस्वतीदेवीला मनात विचारलं. काही वेळाने कागदावर "होय" अशी अक्षरे उमटलेली दिसली. म्हणून मुरारीने वयस्करांसाठी शिक्षणाचा कार्यक्रम सुरू केल्यावर कोणी नकार देऊ शकला नाही. त्यांनी शिकावं ही देवीचीच इच्छा होती!

त्या सर्वांना शिकविण्याची जबाबदारी सुमतीवर येऊन पडली. दर रविवारी येऊन मुरारी तिला आवश्यक मदत करीत असे. हळू हळू समाजसुधारणा करणाऱ्या एका संस्थेचा सहकारसुद्धा मिळाला. एका वर्षाच्या आत त्याने आपला कार्यक्रम यशस्वीरीत्या पार पाडला. आतां कमला-पूर गावी लिहिता वाचता येत नाही असा एकही गावकरी उरला नाही. त्या गावाला सरस्वतीपूर हे नाव मिळाले.





# माणसाचे मोल पैशाने!

एका गावी लक्ष्मीधर नावाचा एक गरीब माणूस रहात असे. त्याचे आईवडील लहानपणीच वारले तेव्हां तो अगदी अनाथ पोरका झाला. त्याच्यावर दया येऊन की काय त्याच्या मामाने त्याला आपल्या घरी बोलावून नेले आणि मामाच्या घरीच तो लहानाचा मोठा झाला. मामाने त्याला शाळेत घातले, परंतु मामीने त्याला शाळेतून काढून घरकामाला लावले.

लक्ष्मीधराच्या मामाला सुंदरी नावाची एकुलती एक मूलगी होती. लहानपणा-पासून दोघं बरोबर वाढली. बरोबर खेळणे, भांडणे आणि शाळेत जाणे एवढेच काम त्यांना असे. दोघांची जोडी छान जमली होती. शेजारपाजारची मंडळी त्यांचे पर-स्परांवरचे प्रेम पाहून म्हणत–"दोघांची जोडी कशी छान जमली आहे! मोठेपणी दोघांचा संसार सुखाचा होईल."

सुंदरीला नहाण लागलं तेव्हांपासून ती थोडी दूरदूर राहू लागली. मुलींना शहाण-पण लवकर येते म्हणतात. लक्ष्मीधरने सुंदरीच्या वागण्यात पडलेला फरक ओळ-खला, परंतु त्याने ती गोष्ट मनाला लावून घेतली नाही. आई रागावते म्हणून ती दूरदूर असते, तिचे आपल्यावरचे प्रेम थोडे-देखील कमी झालेले नाही, असे तो मनाचे समाधान करून घेई. त्याच्या मनात सुंदरी-वरचे प्रेम वाढतच राहिले.

एकदां सुंदरी एकटीच बसली होती हे पाहून लक्ष्मीधर मांजराच्या पावलांनी तिच्याजवळ गेला आणि तिचे डोळे दोन्ही हातांनी बंद करून उभा राहिला. नेमकी त्याच वेळी सुंदरीची आई सैपाकघरातून आली आणि तिने ते पाहिले. तिने रागा-रागाने बाहेर बैठकीत जाऊन नवऱ्याला बोलावून आणले व म्हणाली–"तुमची



मुलगी आतां मोठी झाली आणि ही थट्टा-मस्करी तुमच्या भाच्याला शोभते का? उद्यां तिचं लग्न कसं होईल हो?" असे म्हणत ती तोंडाला आले ते बोलली.

ते पाहून लक्ष्मीधर चकित होऊन म्हणाला–"मामी असं काय झालं हो, एवढे रागवायला? मी असतां तिचे आणखी कोठे लग्न करण्याचे काय म्हणता?"

"होय तर, खाऊन माजला आहेस! म्हणून असं उलटं बोलतो आहेस का? पुन्हां मुलीच्या अंगाला हात तर लाव, हातपाय मोडून घराबाहेर हाकलून देईन. लक्षात ठेव!" असे म्हणत मामी सुंदरीचा हात धरून घरात तिला ओढून घेऊन गेली.

"होय का हो मामा?" लक्ष्मीधरने मामाकडे वळून विचारले.

"हे बघ, सुंदरीचे नाव काढलंस तर तंगड्या मोडतील. कोठून ही धोंड अडकवून घेतली गळ्यात कोण जाणे? तुला कोणी विचारणारा नव्हता म्हणून नव्हेत का घरात घेतलं? तुझ्याशी तिचं लग्न करून दिलं तर तिला खायला घालायला तरी आहे का तुझी लायकी?" मामा म्हणाला.

लक्ष्मीधरने आपल्याकडून मामाला जितके सांगणे शक्य होते सांगून पाहिले–"माणसात माणुसकी पहावी, त्याचा पैसा पाहू नये; सुंदरीवर माझं प्रेम आहे, मामा!" म्हणाला लक्ष्मीधर.

"प्रेम घेऊन चाटायचं आहे का रे? घर, दार आणि खायला मिळतं का? चांगुलपणाने मूठभर तांदूळ तरी मिळतील का? ह्या तत्वज्ञानाच्या गप्पा माझ्याजवळ नको सांगूस, पैसा असेल तर हे सर्व मिळतं." मामा म्हणाला.

लक्ष्मीधरचा पुरुषार्थ जागा झाला. म्हणाला–"बरं तर मामा! रक्ताचा घाम करून पैसा मिळवीन तेव्हांच सुंदरीचा हात धरीन. पैसा मिळवू शकलो नाही तर पुन्हा तोंड दाखविणार नाही. एका वर्षाचा अवधी मागतो आहे. तोपर्यंत सुंदरीच्या लग्नाचा विचार करू नका." असे म्हणाला आणि निघून गेला.

"तू पैसा मिळविणार आणि मी माझ्या मुलीला तुला देणार. दोन्ही गोष्टी झाल्याच वाटलं होय?" मामा मनातल्या मनात म्हणत हसला.

घर सोडून निघाल्यावर लक्ष्मीधरला पैसा मिळविणे म्हणजे काय ते कळू लागले. घाम गाळून दिवसभर मेहनत केल्यावर जेमतेम पोटापुरते त्याला मिळे. मग पैसा जमायचा कसा? त्याला आपल्या जीविताचा वीट येऊ लागला. माणुसकी आणि चांगुलपणावरचा विश्वासच उडून गेला.

एके दिवशी रात्री लक्ष्मीधर कोणाच्या-तरी घराच्या पडवीत पडून झोपला असतां दोघे जण बुरखा तोंडावर घेऊन कोठून तरी चोरी करून रस्त्यावरून येत असतांना त्याला दिसले.

लक्ष्मीधरने संतापून एकाच्या थोबाडीत अशी एक लगावली की, तो दूर तोंडघशी जाऊन पडला. ते पाहून दुसरा थरथर कापू लागला.

"सरळ बोलता की नाही, कोठून आणलेत हे पैसे चोरून? नाहीतर कसे मिळाले एवढे पैसे तुम्हांला लाज नाही वाटत हे नीच काम करायला?" श्रीधरने दरडावून विचारले.



ते ऐकून दुसरा म्हणाला–"अहो, कोणाला नीतीने, चांगुलपणाने कधी पैसा मिळतो का? हीच गोष्ट तुम्ही चार पैसेवाल्या श्रीमंतांना विचारून पहा, एकदां. पहा, ते काय म्हणतात ते. चुकलो, मालक! पैसे किती आहे विचारा, कसा आला नका विचारू. पैसा मिळवू शकणाऱ्यासमोर पैसा न मिळवू शकणाऱ्याने वाकूनच वागलं पाहिजे नाही का? लग्नाची बायकोसुद्धा पैसा मिळव म्हणते, पण कसे मिळवावे हे नाही सांगत. अजून तुम्हांला पैशाची गंमत कळलेली दिसत नाही, होय ना! त्याच्या-समोर चांगुलपणाची गोष्ट काढली तर थट्टा होते."



लक्ष्मीधर विचारात पडला. थोडा वेळ थांबून म्हणाला–"मलासुद्धा पैसा हवा आहे, थोडा थोडका नाही, लाखलाख रुपये पाहिजे आहेत. मला घेतां का आपल्याबरोबर !"

चोर हसत म्हणाला–"आमच्याबरोबर किती जण आले तरी आम्हांला थोडेच पडणार. 'जागा नाही, नोकरी नाही' म्हणायला हे एखादं ऑफीस किंवा कारखाना आहे का हो? तुमच्यासारखे पराक्रमी आमच्या टोळीत सामील झाले तर आणखी काय पाहिजे? नशीबात असलं तर लाखच काय कोटीसुद्धा मिळतील. चला तर."

अशातऱ्हेने लक्ष्मीधर चोर झाला आणि हळूहळू एकेक पायरी चढत चोरांच्या टोळीचा नायक झाला. श्रीमंतांना लुटून धनाच्या राशीच्या राशी आपल्या गुप्त स्थानी जमा करू लागला. परंतु चोर झाला असूनही त्याच्यातला 'माणूस' मेला नव्हता. त्याने आपल्या अनुयायांना काही नियम घालून दिले होते आणि ते मोडणाऱ्याला तो कठीण शिक्षा करीत असे.

एकदां सुंदरीला भेटण्याची इच्छा त्याच्या मनात आली. त्याने बरोबर काही हुशार अनुयायांना घेतले. सर्वांनी सभ्य गृहस्थांचा पोशाख केला आणि सुंदरीच्या गावी गेले. गावात पाऊल टाकतांच त्याच दिवशी रात्री सुंदरीचे लग्न असल्याचे लक्ष्मीधरला कळले.

पहाटे लग्नाचा मुहूर्त होता म्हणे, म्हणून नातेवाइकांची मोठी गर्दी होती. लक्ष्मीधरने नवऱ्या मुलाला व त्याच्या बापाला पाहिले आणि आश्चर्यचकित झाला. ते अट्टल चोर होते. मागे त्याने एका लग्नाच्या मांडवात चोरी करायला गेला तेव्हां पाहिले होते तेच होते ते. त्यातला एक झाला होता नवरा मुलगा आणि दुसरा झाला होता त्याचा बाप! मामा पैशाच्या मोहाला बळी पडून सुंदरीचा गळा कापत आहे, असे त्याला वाटले.

काय करायचे हे त्याने [illegible] ठरविले आणि आपल्या अनुयायांना काय करायचे ते सांगितले.

लग्नाचा विधी सुरू झाला. मंत्रघोष आणि वाजंत्र्यांचा आवाज आणि लग्नातला इतर गोंधळ सुरू झाला. तिकडे नवऱ्या मुलीला मागच्या एका खोलीत गौरीहाराला बसविले होते. जवळ चिटपाखरू देखील नव्हते. लक्ष्मीधरचा एक अनुयायी आत जाऊन "तुला बोलावताहेत मुली!" म्हणत तिला बाहेर घेऊन गेला. दुसरा तिला म्हणाला–"तुझा दिलवर आला आहे भेटायला, भेटून जा बाई!" आणि तिला परसात घेऊन गेला.

भटजी तिकडून ओरडले–"नवऱ्या मुलीला! घेऊन या हो!" परंतु नवऱ्या मुलीचा पत्ताच नाही. मांडवात गोंधळ उडून गेला मुलीला शोधायला लोक धावाधाव करू लागले.

मुहूर्त टळला. सर्व लोक दमून भागून मांडवातच आडवे होऊ लागले.

नवरा मुलगा आणि त्याचा बाप या प्रसंगी काय करणार हे लक्ष्मीधरने बरोबर ओळखले. ते लग्न गृहातला सर्व माल पळवून नेत असतां त्याने आपल्या अनुयायांच्या मदतीने त्यांना अडविले आणि चोरीच्या मालासह त्यांच्या मुसक्या बांधून त्यांना आपल्या मामाच्या घरी आणून उभे केले. त्याच वेळी लक्ष्मीधरचा एक अनुयायी सुंदरीला घेऊन तेथे आला.

"काय हो मामा, मला नकार देऊन तुम्ही थोरांमोठ्यांशी संबंध जुळवून आणलात की!" लक्ष्मीधर म्हणाला.

"माझी अक्कल चरायला गेली होती रे! तू देवासारखा पावला नसतास तर विनाकारण मी मुलीला आणि पैशाला कायमचा मुकलो असतो." लक्ष्मीधरचा मामा म्हणाला.

लग्नाची तयारी सर्व फुकट न जातां नातेवाइकांना निराश झाल्याशिवाय सुंदरीच्या बापाने मुलीचा हात लक्ष्मीधराच्या हातात दिला. लक्ष्मीधरने चोरीचा धंदा सोडला आणि मामाच्या घरी राहू लागला.





# सोने बनविण्याचा मंत्र

रामू आणि श्यामू एका सामान्य स्थितीतल्या कुटुंबातले होते. त्यांना सोने करायची कला अवगत करून घ्यायची फार इच्छा व आशा होती. दृष्टीस पडेल त्या बैराग्याला अविचारीपणाने ते विचारू लागले–"तुम्हांला सोने कसे करायचे माहीत आहे का हो?"

काही दिवसांनी एक बैरागी त्यांना म्हणाला–"ती विद्या आमच्या गुरुजींना चांगली अवगत आहे. ते गावाबाहेरच्या डोंगरात एका गुहेत राहतात." रामू आणि श्यामू लगेच त्या बैराग्याच्या दर्शनाला गेले आणि नमस्कार करून मनातली इच्छा व्यक्त केली.

गुरु स्मित करून म्हणाला–"मला माहीत आहे कसे सोने करतात ते. परंतु गुरुदक्षिणा म्हणून प्रथम प्रत्येक शिष्याने पांच पांच सोन्याची नाणी दिली पाहिजेत. तरच मी ही विद्या शिकवीन. गुरुदक्षिणा दिल्याशिवाय ही मंत्रविद्या यशस्वी होत नाही."

रामू आणि श्यामूने त्यांच्याजवळ जेवढे पैसे होते ते देऊन पांच पांच सोन्याची नाणी विकत घेतली आणि गुरूला जाऊन भेटले. त्याने शिष्यांनी दिलेली नाणी घेतली व म्हणाला–"शिष्य असावेत तर असे! मी तुम्हांला एक मंत्र शिकवितो. तो पाठ करा. तो मंत्र कागदावर लिहिला तर मंत्राचा प्रभाव रहात नाही." असे सांगून त्याने उच्चार करायला अत्यंत कठीण मंत्र सांगितला.

श्यामूने सहजी तो मंत्र पाठ केला. परंतु रामूची जीभच वळेना. म्हणाला–"गुरुवर्य! सोने करायची कला मला प्राप्त नाहीशी वाटते आहे." बोलताना त्याच्या तोंडावर निराशा झळकली.

[illegible]

"तुझ्या दुर्भाग्याला आतां मी काय करू? परंतु मी तुला एक मदत करू शकेन. आतां श्यामूने मंत्र शिकलाच आहे, तर त्याच्या मंत्राचा प्रभाव पहिल्याने पाहिला पाहिजे. त्या प्रयोगात जे सोने तयार होईल ते सर्व तू घे."

नंतर गुरु श्यामूला म्हणाला–"आज शुक्ल पक्षातली नवमी आहे. यापुढे तू दर शुक्ल नवमीच्या दिवशी सोने करायचे. म्हणजे महिन्यातून एकदां बरं का! ते देखील फक्त एकदांच! तू हा नियम मोडलास तर तुला त्या मंत्राचे फळ मिळणार नाही. पहिल्याने मिळालेले सोने दान करावे लागते. तू रामूला दे."

त्याने दोनशेर दूध मावेल एवढे मडके आणून त्यात वाळू भरली आणि त्यावर पानेपाचोळा झांकून ठेवला. नंतर श्यामूला डोळे मिटून मंत्र म्हणायला सांगितला. श्यामूने मंत्र म्हटला आणि मडक्यावरचा पाचोळा बाजूला सारून पाहिले तर मडक्यात चकचकीत सोन्याची नाणी त्याला दिसली.

गुरूने ते मडके रामूला दिले व महिन्यानंतर वापरायला सांगितले. त्यातले सोने पाहून रामूचे डोळेच फिरले. एवढे सोने मिळाले आहे तर आयुष्य भर आपल्याला पुरे आहे, असे त्याला वाटले.



नंतर त्या दोघांना गुरु म्हणाला–"मुलांनो! मी येथे फार दिवस राहणार नाही. तुम्हांला एखादी शंका आली तर तुम्ही या गुहेत या. तुमच्या शंकेचे निरसन करून देण्याची व्यवस्था मी करून ठेवतो. बरं तर जा आतां."

त्याचा निरोप घेऊन रामू व श्यामू आपापल्या घरी परत निघून गेले. रामूने ते मडके त्याचे तोंड घट्ट बंद करून आपल्या परसात गुप्तजागी खोल खड्डा खणून त्यात छान पुरून ठेवले.

श्यामू पुढल्या शुक्ल नवमीची आतुरतेने वाट पहात बसला. त्या दिवशी त्याने आपले मोठे घंगाळ नहाणी घरातून आणून

त्यांत वाळू भरली आणि त्यांवर पानेपाचोळा झांकून ठेवला. नंतर डोळे मिटून गुरुने शिकविलेला मंत्र म्हटला.

त्यानंतर त्याने पाचोळा बाजूला सारून पाहिले तर वाळूच होती. घंगाळ हलवून उलटे करून उपडे केले आणि खूप शोधले तरी त्या वाळूत काडीइतकेही सोने मिळाले नाही. श्यामू रामूच्या घरी घाबऱ्याघुबऱ्या धावला.

सर्व ऐकून रामू म्हणाला–"तू मंत्र बरोबर म्हटला नसशील. एकदांच म्हटला तर मंत्र कसा पाठ होईल?"

श्यामू म्हणाला–"मला मंत्र बरोबर येतो आहे. एकदेखील चूक नाही त्यात."

"तू एवढा लोभीपणा नको होतास दाखवायला, श्यामू! तुला एक लहान मडकेभर सोने पुरलं नसतं का? जाऊ दे रे, मी तरी दोन दोन शेर घेऊन काय करणार? पावशेर तुला देईन!" रामू श्यामूची समजूत घालू लागला.

त्याने पुरून ठेवलेले मडके खणून बाहेर काढले आणि झांकण काढून पाहिले तर त्यातली नाणी चकाकत नव्हती. त्यांनी ती नेऊन सोनाराला दाखविली.

"हे कोठलं रे सोने? एका सोन्याच्या नाण्याने असली सोन्याची नाणी दहा हजार करतां येतील." सोनार म्हणाला.

दोघे मित्र ही काय भानगड आहे चवकशी करून यायला डोंगरातल्या गुहेकडे धावले. गुहेत कोणी नव्हते एक पत्र ठेवले होते व त्यावर दडपणासाठी एक दगड ठेवलेला होता.

"बाबांनो! मंत्राने कोणत्याही पदार्थाचे सोने करतां येत नाही. मेहनत केल्याशिवाय कोणालाच सोने मिळत नाही. परंतु मेहनतीशिवाय सोने करायची एकच एक युक्ती आहे. बुद्धिमानांनी मंदबुद्धि असलेल्यांना फसवून सोने करणे शक्य आहे. मला तीच एक विद्या माहीत आहे. सोने करायचे झाले तर तुम्ही तुमच्यापेक्षा जे मंदबुद्धीचे आहेत त्यांना शोधा हाच माझा सल्ला आहे."





# अत्तराचा सौदागर

एका गावी अमीर आणि हसन नावाचे दोघे मित्र होते. अमीर पहिल्या नंबरचा आळशी होता आणि गंमत अशी की तो कोणत्या तरी संकटात सांपडे आणि त्याला काय करावे सुचत नसे. हसन ऐन वेळी येऊन त्याला संकटातून सोडवी.

दोघां मित्रांनी एकदां कोणतातरी व्यापार करून खूप मिळवायचे ठरविले. त्यांना कोणताही कामधंदा येत नव्हता. मग कोण त्यांना काम देणार? व्यापार करायचा तर थोडे तरी भांडवल पाहिजे. म्हणून दोघांनी आपापले घर विकून भांडवल उभे केले. त्यांनी निरनिराळ्या तऱ्हेची अत्तरे एका घाऊक व्यापाराकडे जाऊन विकत घेतली. अत्तराच्या लहान लहान बाटल्या एका कातड्याच्या पेटीत घेऊन दोघे अत्तर विकायला निघाले.

अमीर पूर्वेच्या दिशेने निघाला. दिवसभर प्रवास केल्यावर तो एका जंगलाच्या टोकाला येऊन पोचला. त्याचे सर्व कपडे घामाने भिजून घामाची घाण येत होती. ही कोणत्याही अत्तराच्या व्यापाऱ्याला शोभणारी गोष्ट नाही, हे त्याला माहीत होते.

म्हणून अमीरने एका वडाच्या झाडाखाली कातड्याची बॅग उघडून अत्तराची एक बाटली बाहेर काढली. त्याने कापसाचा एक फाहा अत्तरात बुडवून आपल्या सर्व कपड्यांवर चोळला.

त्याच वेळी वडाच्या पारंब्या हलू लागल्या आणि त्याला समोर बाईचे एक रूप दृष्टीस पडले. तिने विचारले–"तू हे काय करतो आहेस रे?"

अमीरला ती भुतीण असावीशी वाटले. तो रागाने म्हणाला–"तुला दिसत नाही का, मी अत्तर लावतो आहे?"



"तर मग माझ्या अंगाला चोळ थोडे." भुतीण म्हणाली.

"तुला कोणी अत्तर लावण्याची गरजच काय? तू लघु रूप घेऊन या शिशीत शीर आणि अत्तरांत बुडी मारून बाहेर ये." अमीरने तिला ही सोपी युक्ती सुचविली.

भुतिणीला आनंद झाला. तिने लघुरूप घेतले आणि एकदम त्या लहानशा शिशीत शिरली. अमीरने चटदिशी शिशीला बूच लावले. त्याने ती बाटली आपल्या चामडयाच्या बॅगमध्ये ठेवून दिली आणि पुढे निघाला. काळोख व्हायच्या सुमारास तो एका गावात येऊन पोचला. [illegible] रात्री त्याच्या मनात एक विचार आला. दोन दिवसाच्या वाटेवर राजधानी आहे असे ऐकतो आणि म्हणे राजकन्येचा विवाहसुद्धा लवकरच होणार आहे. आपण हा सर्व माल जर राजाला नजराणा म्हणून दिला तर राजा मोठे इनाम देईल. ती रक्कम आपल्याला आयुष्यभर पुरेल.

असा विचार करून अमीर सरळ राजधानीच्या वाटेने चालू लागला आणि दोन दिवसात राजधानीत पोचला. राजवाडयाच्या दिंडी दरवाज्यातल्या पाहरेकऱ्यांकरवी, राजाकडे अत्तरचा एक सौदागर परदेशातून आला आहे, असा निरोप पाठविला. राजाने त्याला भेटायला बोलाविले. त्याने आपली पेटीच उघडून राजासमोर ठेवली आणि म्हणाला–"राजकन्येच्या विवाह प्रसंगी भेट म्हणून मी ही अत्तरे आणली आहेत आणि महाराजांनी ती स्वीकारावीत."

राजाने राजकन्येला बोलावून ती अत्तरे पहायला सांगितले. राजकन्येने एका बाटलीचे बूच काढून वास घेतला मात्र आणि वेडयासारखी ओरडत उडया मारू लागली–"माझं लग्न! चाळीस वर्षांनी माझं लग्न आहे! चाळीस वर्षांनी!"

[illegible] राजाला वाटले की [illegible] अत्तराच्या सौदागरानेच त्या बाटलीत अत्तराबरोबर भूत पिशाच्च काहीतरी ठेवले होते, म्हणून राजकन्या अशी वेडयासारखी नाचत ओरडते आहे. त्याने अमीरच्या मुसक्या बांधवून त्याला तुरुंगात टाकविले.

तुरुंगात गेल्यावर त्याला आठवले की आपण ज्या अत्तराच्या शिशीत भुताला कोंडून ठेवले होते, राजकन्येने नेमकी तीच शिशी उघडली आणि ती भुतीण राजकन्येच्या मानेवर बसली. त्या जंगलात राहणाऱ्या भुतिणीला अंतःपुरात शिरायला मिळाले आहे. ती धुमाकूळ घालणार तिथे. ती राजकन्येला कधीच सोडणार नाही आणि राजा आपल्याला सुळावर चढविणार. तिला सोडवायला एक उपाय करून पहावा.

असा विचार करून त्याने राजाकडे निरोप पाठविला की महाराज राजकन्येच्या मानेवरचे भूत उतरवायला एक युक्ती आहे माझ्याकडे.

राजाने अमीरला तुरुंगातून बोलवून घेतले व विचारले–"कोणती युक्ती करणार आहेस ते आधी सांग."

अमीर म्हणाला–"राजकन्येच्या अंगात जी भुतीण शिरली आहे, मी तिला आपल्या एका शिशीत बंद करून ठेवले होते. दुर्दैवाने नेमकी तीच शिशी राजकन्येने उघडली. आतां एकच उपाय आहे. आपण राजकन्येचा विवाह माझ्याशी करून द्यावा. मी त्या भुतिणीला जंगलातले आयुष्यच या अंतःपुरातल्या आयुष्यापेक्षां चांगले असल्याचे समजावून देईन. नाहीतर तिला अंतःपुरात मजा करायला मिळेल आणि ती येथून हलणार नाही."



ते ऐकून राजाला भाजल्यावर मीठ चोळल्यासारखं झालं. या अत्तराचा खरा हेतू हा होता तर, असेही त्याला वाटले. राजकन्येशी विवाह करून घेण्यासाठी याने ही सर्व लबाडी केली होती. राजाने शिपायांना हुकूम केला–"याला घेऊन जा, आणि अमावास्येला याला फाशी द्या."

अमावस्या फार दूर नव्हती. अमीरने शिपायांचे पाय धरून त्यांना हसनकडे कळवायला पाठविले. तो निरोप मिळतांच हसन धावतच आला. त्याने सर्व गोष्टीची चवकशी करून प्रसंगाची कल्पना करून घेतली.

तो सरळ राजवाडयात गेला आणि त्याने राजकन्येच्या अंगातले भूत काढण्याची युक्ती त्याला माहीत असल्याचे राजाला सांगितले.

राजाने त्याची थट्टा उडवीत विचारले– "मग त्यापूर्वी राजकन्येशी विवाह करून देण्याची अट कां नाही सांगून टाकीत?"

"मला तसली अट घालायची नाही. माझी एवढीच अट राहील की, मी राजकन्येसमोर जे काही बोलेन, त्याला आडकाठी असतां कामा नये. पहिल्याने मला माणसाच्या उंची एवढी एक मोठी बेताच्या तोंडाची बूच किंवा झांकण असलेली एक बरणी आणवून द्यावी." हसन म्हणाला.

[illegible]

हसन ती बरणी घेऊन राजकन्येकडे गेला आणि म्हणाला–"राजकन्येला या बरणीत ठेवून बरणीचे तोंड बंद करून बांधून ठेवा."

तत्क्षण राजकन्या मोठ्याने ओरडून बेशुद्ध होऊन जमिनीवर पडली. भुतिणीला वाटले की राजकन्येबरोबर आपल्याला पुन्हां बंद करण्याचा विचार दिसतो आहे. म्हणून ती राजकन्येला सोडून जंगलात वडाच्या झाडावर पळून गेली.

राजकन्या शुद्धीवर आली तेव्हां पहिल्यासारखी लाजाळू अंत:पुरातील मुलीसारखी चालू बोलू लागली.

राजा खूष झाला. त्याने हसनला मोठे इनाम दिले आणि त्याच्या सांगण्यावरून अमीरला तुरुंगातून सोडण्याचा हुकूम दिला. राजाने त्याला एक इनामही देऊन खूष केले.

त्यानंतर दोघे मित्र आपल्या गावी परतले. त्यांनी आपापली लग्ने करून घेऊन छान संसार थाटला.



# बक्षिसाची अदलाबदली

रामशास्त्र्यांना जेव्हां लग्न होऊन बरेच दिवस झाले तरी मूलबाळ झाले नाही, तेव्हां त्यांनी केशव नावाच्या मुलाला दत्तक घेतला. त्यानंतर शास्त्रीबुवांना मुलगा झाला. तेव्हांपासूल केशवच्या कपाळी घरकाम आले. तो शिकला सवरला नाही. परंतु त्यांचा औरस पुत्र एक थोर विद्वान झाला.

केशवने स्वत:च्या अकलेने थोडी चित्रकला शिकून घेतली.

एकदां गावाच्या जमिनदाराने आपल्या वाढदिवसाच्या वेळी कवी आणि विद्वानांचा सत्कार करण्याचे जाहीर केले. रामशास्त्री आपल्या औरस मुलाला घेऊन जमिनदाराच्या वाढ दिवस समारंभाला हजर झाले जमिनदाराने सर्व कलांत प्राविण्य दर्शविणारांना दुसऱ्या दिवशी बक्षिस देण्याचे ठरवून तसे जाहीर केले. त्याने खूण म्हणून प्रत्येकाला एकेक फूल दिले. रामशास्त्र्यांच्या मुलाला निळ्या रंगाचे आणि केशवला तांबड्या रंगाचे फूल मिळाले. फक्त केशवलाच तांबड्या रंगाचे फूल मिळाले होते. तो आनंदाने फिरत होता. रामशास्त्र्यांना हेवा वाटू लागला. त्यांनी दुसऱ्या दिवशी आपल्या मुलाच्या हातात लाल फूल आणि केशवच्या हातात निळे फूल देऊन दोघांना पाठविले.

लाल फूल पाहतांच दिवाणाने रामशास्त्र्यांच्या मुलाला कोरड्यांची शिक्षावजा बक्षिस दिले आणि निळे फूल आणणाऱ्या केशवला सोन्याची नाणी दिली. अशिक्षित केशव जमिनदाराशी असभ्यपणाने वागला होता, म्हणून त्याला लाल फूल देऊन त्याला ती शिक्षा सांगितली होती.





# लबाडीबद्दल शिक्षा

एका गावी सोमेश्वरराव नावाचे एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. त्यांनी खूप पैसा मिळविला. परंतु पैशाची हाव सुटली नाही. त्यांनी कमी मेहनत करून पैसे मिळविण्यासाठी एक युक्ती काढली.

एकदां ते रस्त्यावर फिरणाऱ्या एका भिकाऱ्याला आदरपूर्वक बोलावून त्याला आपली युक्ती सांगून म्हणाले–"तू मी सुचविलेल्या युक्तीने जे काही मिळविशील, त्यातला अर्धा वांटा तुझा. तू हे काम करण्यासाठी माझ्या घरी रहायला तयार आहेस का ?"

भिकाऱ्याला फार भूक लागली होती. म्हणून त्याने विशेष विचार केला नाही आणि सोमेश्वरराव म्हणाले तसे करायला तयार झाला.

त्या दिवशी रात्री सोमेश्वरराव एकदम "चोर! चोर! वांचवा!" असे जोराने ओरडू लागले. शेजार पाजारचे लोक काठ्या, भाले वगैरे घेऊन त्यांच्या घराकडे धावले.

सोमेश्वररावांनी त्या आधी मागचे दार उघडून ठेवले होते आणि आलेल्या शेजाऱ्यांना चोर त्या वाटेने पळून गेल्याचे सांगितले. लोकांनी त्या बाजूने चोर कोठे दिसतो का पाहिले. परंतु चोराचा पत्ता लागला नाही. म्हणून निराश होऊन लोक आपापल्या घरी निघून गेले.

सोमेश्वररावांचा डाव साधला. कारण लोक मदतीला आपल्या घराचे दार उघडे टाकून धावले होते. सोमेश्वररावांनी ज्या भिकाऱ्याला आपल्या आश्रयाला ठेवले होते, त्याने त्याला शिकवून ठेवून सांगितल्याप्रमाणे शेजारच्या घरांत शिरून जे हाताला आले ते उचलून सोमेश्वररावांच्या घरी आणले होते.

सोमेश्वररावांनी घाईघाईने मागची पुढची दारे बंद केली. पोते उघडून पाहिले. त्यात पुष्कळ भांडी व इतर वस्तू होत्या. भिकाऱ्याची पाठ थोपटून सोमेश्वरराव म्हणाले–"काय रे, तू हे सर्व उचलून आणलेस तेव्हां तुला कोणी पाहिले नाही का ?"

सोमेश्वररावांनी शाबासकी दिल्याने आधीच फुललेला भिकारी म्हणाला–"सर्व लोक तुमचा आवाज ऐकून तुमच्या घरी नव्हते का आले? आतां माझा वांटा मला काय तो द्या."

"काय रे मी तुझा वांटा दिला तर तू तो कोठे ठेवणार? दोन दिवसांनी एकदमच देईन. मग जा घेऊन तुला हवा तिकडे." असे सांगून त्या भिकाऱ्याच्या हातावर दोन रुपये ठेवले आणि त्याला बाहेर पाठवून दिले. नंतर तळघरात सर्व भांडी लपवून ठेवून दिली. तो भिकारी कोणाच्या तरी घरासमोरच्या ओटयावर घोरत पडला.

दुसऱ्या दिवशी ठरल्याप्रमाणे सोमेश्वरराव पुन्हां "चोर चोर!" म्हणून ओरडले. त्याही दिवशी लोक त्यांच्या मदतीला धावले. त्यांना आलेले पाहून सोमेश्वरराव जागच्या जागी कापरे भरल्यासारखा मोठ्याने ओरडत थरथर कापत पडून राहिले.



लोकांनी त्यांना धीर देऊन उभे करण्याचा प्रयत्न केला. तर सोमेश्वररावांनी त्यांच्यापैकी एकाला घट्ट मिठी मारली आणि ओरडू लागले–"चोर चोर!"

लोकांना वाटले की कालच्या चोरीची दहशत बसल्याने झोपेत सोमेश्वरराव ओरडत असावेत. म्हणून त्यांना धीर देत म्हणाले–"अहो, काल रात्री तुमच्याच घरात नाही, आमच्या घरातही चोरी झाली. आज रात्री पासून पाळीपाळीने आपल्या वाडीत पहरा द्यायचं ठरविलं आहे. आतां तुम्हांला भ्यायचे कारण नाही."

शेजारी निघून गेल्यावर भिकारी आला. तो सोमेश्वररावांकडे आपला अर्धा वांटा मागू लागला.

सोमेश्वरराव म्हणाले—"अरे, मी त्याच विचारात आहे. मी ती सर्व भांडी विकून तुझा वाटा तुला देईन."

दुसऱ्या दिवशी सोमेश्वररावांनी बाजारात तो चोरीचा सर्व माल विकला आणि घरी परत येत असतां तो भिकारी त्यांना भेटला. तो त्यांच्या बरोबरच त्यांच्या घरी जाऊन आपला वांटा मागू लागला.

सोमेश्वररावांनी चकित होऊन त्याच्याकडे पहात दरडावून त्याला विचारले—"कोण रे तू? कशाला आला आहेस? काय पाहिजे तुला? हो घराबाहेर. नाही तर बाहेर काढीन." त्या बिचाऱ्याने जे मिळतील ते पैसे घेऊन जाण्याचा विचार केला होता. परंतु त्याला हे उत्तर मिळाले आणि त्याच वेळी सोमेश्वरराव त्यांच्या देव्हाऱ्यात देवांच्या मूर्तीखाली चोरीचा माल विकून आणलेले पैसे ठेवीत होते.

[illegible] उडवायचे मनाशी ठरविले. त्या दिवशी रात्री तो एका झाडाच्या पारावर झोपला असतां त्याला कोणीतरी दोघेजण परस्परांशी बोलत असल्याचा भास झाला. त्याने डोळे उघडून पाहिले ते चोर होते. तो त्यांना भेटला आणि सोमेश्वररावांनी देव्हाऱ्यात ठेवलेल्या पैशाची गोष्ट त्याने त्यांना सांगितली. म्हणाला—"मी दिलेल्या माहितीप्रमाणे तुम्ही पैसे चोरून आणलेत तर त्यातला वांटा दिला पाहिजे."

चोरांनी त्याची अट मान्य केली. त्यांनी सोमेश्वररावांच्या घरात शिरून त्यांचे हात पाय बांधून ठेवले. सोमेश्वरराव "चोर चोर!" म्हणून ओरडू लागले.

परंतु लोकांनी विचार केला की स्वारी स्वप्नात बडबडत असावी. म्हणून कोणी मदतीला धावला नाही. चोरांनी देव्हाऱ्यात लपविलेले सर्व पैसे उचलून नेले. त्यांनी भिकाऱ्याला त्याचा वांटा दिला.



# वीज पडली

रत्नपूरचे महाराज रत्नपाल यांनी एकदां वनभोजनाची तयारी केली. जेवायला बसतांना त्यांनी आपल्या दरबारी तरुणाला आपल्याच शेजारी बसायला सांगितले. शेकडो लोक पंक्तीला बसले होते. सर्वांच्या पानांवर लाडू वाढले जात होते. चुकून विदूषकाच्या पानावरच नेमका लाडू वाढला गेला नाही.

विदूषक महाराजांकडे लगेच वळून म्हणाला—"यावेळी बादळ येऊन मुसळधार पावसाबरोबर वीज पडली तर किती गंमत होईल नाही?" तेव्हां राजा स्मित करून म्हणाला—"आमच्यावर वीज पडली तर तू सुटशील का, सांग!"

"कां नाही? वादळ आलं तर तुमच्यापैकी कोणाचेच पान उडणार नाही. तुम्ही लाडवावर हात ठेवाल. मी पान उडालं की पळून जाईन." विदूषक म्हणाला.

राजाच्या लक्षात ती गोष्ट आली. त्याने स्मित करून वाढप्याला बोलावून विदूषकाच्या पानावर लाडवाच्या चार जोड्या वाढविल्या.





# माणुसकी

श्रवण नावाच्या एका तरुणाने सर्व शास्त्रांचा अभ्यास केला. शिक्षण संपल्यावर तो आपल्या देशाची राजधानी मणिपूर येथे कामाच्या शोधार्थ आला. दरबारात प्रवेश मिळवायचा म्हणजे कोणाची तरी शिफारस पाहिजे किंवा अधिकाऱ्याचा हात गरम केला पाहिजे. त्या शिवाय दरबारात प्रवेश मिळविणे अशक्यच होते. शिक्षण, संस्कार आणि पांडित्य यांपैकी एकालाही किंमत नव्हती.

ते पाहून श्रवणला फार राग आला. त्याला नोकरी मिळण्याच्या आड येणारे लोक वास्तविक त्याच्याहून अयोग्य आणि खालच्या दर्जाचे होते. योग्यता आणि अधिकार यांचा परस्पर संबंध काय? योग्यतेला अधिकारासमोर नमावेच लागते.

हे पाहल्यावर श्रवण आपल्या गुरूकडे गेला आणि त्याला आलेला अनुभव निवेदन करून म्हणाला–"गुरुवर्य! मला असे कळून आले आहे की सन्मार्गावर चालून जिवंत राहणेच माणसाला अशक्य आहे. दुष्टाचाच मान आहे, त्याच्याच हातात अधिकार आहे. म्हणून मला वाटू लागले आहे की खरे खोटे, चांगले वाईट हे सर्व नीतिनियम गुंडाळून ठेवून चोरी करून आणि एखाद्याच्या मानेवर सुरा चालवूनच माणसाचा उदरनिर्वाह शक्य आहे."

तेव्हां त्याचे गुरु म्हणाले–"बाबा रे! पण ती कामे करण्यास लागणारे शिक्षण तुला मिळालेले नाही. माझ्याकडे तुला जे शिक्षण मिळाले ते तुला माणुसकी काय आहे हे कळायला, पोषक असे शिक्षण होते. दुष्टपणा करायला त्या शिक्षणाचा उपयोग होणार नाही. तेव्हां तूच सारासार विचार करून काय ते कर."

श्रवण विचार करू लागला, मनुष्य बरे वाईट काम परिस्थितिवश करतो. त्याचा संबंध शिक्षण आणि मानसिक विकासाशी यत्किंचितही नसतो. तेव्हांपासून त्याने चोरी करून स्वतःची उपजीविका चालविण्याचे ठरविले आणि मणिपूरला परतला.

एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास तो एका घरात चोरी करायचे ठरवून त्या घराच्या पिछाडीच्या बाजूने घरात शिरला. पिछाडीच्या खोलीतून दिव्याचा उजेड बाहेर डोकावत होता. श्रवण खोलीच्याजवळ भिंतीला टेकून उभा राहिला आणि आंतले बोलणे ऐकू लागला.

घरमालक बायकोला सांगत होता–"शेवटी सर्व कर्जदारांनी कर्जाची रक्कम परत केली. म्हणून दहा हजार होन आज घरात आहेत. आतां मुलीच्या लग्नाला वाट मोकळी झाली." नंतर त्याने बायकोला होन भरलेल्या पिशव्या ठेवायला दिल्या. तिने त्या पेटीत ठेवल्या. श्रवणाने हे सर्व दाराच्या फटीतून पाहिले. श्रवण विचार करू लागला, हे धन चोरून नेणे, म्हणजे एक पातक आहे. कारण मुलीच्या लग्नाला विघ्न होईल. फालतू धन ज्याच्या तिजोरीत कुजत असेल त्याच्या घरीच चोरी करायला हवी. ज्याला पैशाची गरज आहे त्याच्या घरात चोरी करणे पाप आहे.

त्यानंतर श्रवणने आपला चोरी करण्याचा विचार बदलला. त्याच वेळी त्याने आणखी एकाला पिछाडीची भिंत ओलांडून










परसात शिरताना पाहिले. संशय आल्याने श्रवण एका झाडाआड लपून उभा राहिला.

दिवे मालवून घरातली मंडळी झोपली नाहीत तोंपर्यंत चोराने घरात पाऊल टाकले नाही. लपून बाहेरच उभा राहिला. त्यानंतर त्याने भिंतीला भोक पाडले आणि आत शिरला.

श्रवणाने खिडकीतून पाहिले, चोराने घरात शिरून पेटीतल्या थैल्या उचलल्या आणि भिंतीच्या भोकातून निसटून जाण्यासाठी आला. तेव्हां श्रवण बाहेर भिंतीच्या भोकाशी दबा धरून बसला. भोकातून चोर बाहेर आल्याबरोबर त्याने चोराला धरले व मोठ्याने ओरडला—"चोर, चोर!"

घरातली मंडळी जागी झाली. शेजारपाजारची मंडळी धावली आणि सर्वांनी मिळून चोराला खूप बडविले आणि मुद्देमालासह राजासमोर नेऊन उभे केले. चोरीची चवकशी राजाच्या समोर झाली. तेव्हां राजाने श्रवणला साक्षीदार म्हणून बोलाविले. तेव्हां श्रवण म्हणाला—"महाराज! मी अनेक शास्त्रांचा अभ्यास करून शिक्षण पूर्ण केले आहे. नोकरीच्या शोधार्थ हिंडत होतो. एका घरात चोराला शिरतांना पाहून मला संशय आला. मी त्याचा पाठलाग केला आणि तो चोरी करून परत येत असतां त्याला मी पकडले."

राजाने श्रवणच्या समयसूचकतेची व धाडसाची खूप प्रशंसा केली आणि त्याला मोठे बक्षिस देऊन त्याच्या योग्यतेनुरूप दरबारात नोकरीसुद्धां दिली.

त्यानंतर श्रवण पुन्हां एकदां आपल्या गुरूच्या दर्शनाला गेला. म्हणाला—"गुरुवर्य! आपण चोरी करण्याचे शिक्षण दिले नव्हते. म्हणून चोरी करायला जाऊनसुद्धां नीतिनियम आड आले आणि मी मागे फिरलो. परंतु एवढे मात्र मला आढळून आले की दुष्टपणाने मला उपजीविकेचे साधन मिळाले नसले तरी दुसऱ्याने जो दुष्टपणा करून नीतिनियम मोडले त्यांमुळेच, माझा उदयनिर्वाहाचा मार्ग मोकळा झाला."



# चोरच चकला

एका विद्वान पंडिताला महाराज कृष्णदेवरायांनी त्याच्या विद्वत्तेची पारख करून त्याचा सत्कार केला व एक हजार सुवर्णमुद्रा दिल्या. तो पंडित सुवर्णमुद्रा घेऊन एका धर्मशाळेत जाऊन उतरला. धर्मशाळेतल्या लोकांना कसे कोणास ठाऊक कळले की तो एक थोर पंडित आहे आणि राजाने त्याला एक हजार सुवर्णमुद्रा दिल्या आहेत.

रात्री त्या पंडिताने आपले अंथरूण अंथरले आणि झोपला. थोड्या वेळाने एका माणसाने येऊन दुसरीकडे जागा होती तरी त्या पंडिताच्या शेजारीच आपले अंथरूण अंथरले आणि झोपला. तो चोर होता.

मध्यरात्रीच्या सुमारास सर्व लोक छान झोपले असतां चोराने त्या पंडिताची पिशवी उशा खालून काढून नेली आणि उघडून पाहिली. पिशवीत महत्वाचे असे काही नव्हते. त्याने पंडिताच्या बिछान्याच्या जवळपास त्याला कळू दिल्याशिवाय चाचपून पाहिले. पण सुवर्णमुद्रा मिळाल्या नाहीत.

तो चोर रात्रभर पंडिताने त्या सुवर्णमुद्रा कोठे ठेवल्या आहेत हे पहावे म्हणून जागत राहिला. उजाडल्यावर पंडित उठून बसला. तो सरळ उठला आणि त्याने चोरासमोरच त्याच्या उशाखालून सुवर्णमुद्रा काढून आपल्या पिशवीत ठेविल्या आणि आपल्या गावी निघून गेला. चोर चकित होऊन पहात राहिला.





# धर्मदेवता

एकदा पार्वतीच्या मनात आले की धर्मदेवता भूलोकात नीतीधर्माचे कसे पालन करीत आहे व सत्चरित्र लोकांचे रक्षण वगैरे कसे करीत आहे, पाहिले पाहिजे. पार्वतीची ती इच्छा पूर्ण व्हावी म्हणून शंकराने तिला विजयपूर राज्यात पाठविले.

विजयपूरच्या गादीवर अमरसेन नावाचा राजा राज्य करीत होता. त्यांच्या दरबारात विवेकवर्मा नावाचा एक उच्च अधिकारी होता. तो अत्यंत नीतिवान आणि स्वामिभक्त होता. त्याच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना लाचलुचपत वगैरे करतां येत नव्हती. या लाचखोर अधिकाऱ्यांचा प्रमुख सुरेंद्र नावाचा एक दुष्ट माणूस होता. त्याने लाचखोर साथीदारांच्या मदतीने विवेकवर्माला गोत्यात आणण्याचा कट केला. त्यांनी सर्वांनी मिळून एक हजार सुवर्णमुद्रा एका भांड्यात ठेवून ते भांडे विवेकवर्माच्या परसात पुरून ठेवून दिले. त्यानंतर त्यांनी सर्वांनी मिळून राजाच्या नांवी एक गुप्त पत्र पाठविले. त्यात विवेकवर्मा पहिल्या नंबरचा लाचखोर असल्याचे लिहून पुढे त्याने लाच खाऊन जमविलेले सर्व पैसे आपल्या घराच्या परसात ईशान्येला पुरून ठेवले असल्याचे व पाहिजे तर महाराजांनी प्रत्यक्ष पाहून खात्री करून घ्यावी वगैरे लिहिले होते. पत्र अर्थातच निनावी होते.

पत्र मिळताच राजाने काही शिपायांनेबरोबर विवेकवर्माच्या घरी जाऊन परसातील ईशान्येकडील जागा खणून पाहिली. त्यात एक भांडे सुवर्ण मुद्राऐवजी खडे भरलेले मिळाले.

विवेकवर्माने राजाला समजावून सांगितले की, त्याच्या शत्रूची ही कारवाई असावी.

भांड्यांतल्या सुवर्णमुद्रा नाहीशा होऊन त्यांच्या जागी खडे आले ते असे. लाचखोराने रात्री भांडे पुरून [illegible] ते एका चोराने पाहिले होते. तो ते भांडे विवेकवर्माच्या घरी नेत असतांना त्यांच्या पाठोपाठ गेला होता. लाचखोर भांडे पुरून निघून गेल्यावर सुवर्णमुद्रा काढून भांड्यात खडे भरून तो पसार झाला होता.

अशातऱ्हेने धर्मदेवतेने विवेकवर्माचे रक्षण केले. पार्वतीने ते प्रत्यक्ष पाहिले.

आपला कट फसलेला पाहून सुरेंद्र जास्तच चिडला. तो व त्याचे साथी निराश होऊन स्वस्थ न बसतां नवीन कारस्थानाचा विचार करू लागले. त्यांनी खूप विचार करून नवीन कारस्थान रचले.

त्यानंतर सुरेंद्रने एके दिवशी रात्री विवेकवर्माच्या घरी आपल्या दोघां अनुयायांना व आभूषणे घालून एका बाईला पाठविले. ते विवेकवर्माच्या घरी जाऊन म्हणाले—"दिवाण, आम्ही प्रवासी यात्री आहो. आमच्या जवळ पुष्कळ धन व दागदागिने आहेत. आजची रात्र आम्ही आमचा सर्व ऐवज आपणांकडे ठेवावा, म्हणतो. उद्यां गावी जातांना आम्ही आपला ऐवज घेऊन जाऊ."

विवेकवर्माने त्यांचा ऐवज घेऊन सुरक्षित स्थानी ठेवून दिला.

राजाच्या घरी त्याच दिवशी एक निनावी पत्र आले. विवेकवर्मा पहिल्या नंबरचा लाचखाऊ आहे. त्याने एकाकडून खूप पैसे व जडजवाहीर घेऊन त्याला सोडून दिले आहे. झडती घेऊन पाहिल्यास सर्व



माल सापडेल व चोर मुद्देमालासकट पकडला जाईल.

त्या दिवशी रात्री राजा शिपायांना बरोबर घेऊन दिवाणाच्या घरी गेला. घराची झडती घेऊन पाहिली, परंतु पत्रात लिहिलेला माल मिळाला नाही.

विवेकवर्माने ते निनावी पत्र वाचून राजाला समजावून सांगितले की महाराज, या पत्रातला काही अंश खरा आहे. आज संध्याकाळी दोघे पुरुष व एक स्त्री माझ्याकडे आले होते खरे. त्यांनी मला सांगितले की ते यात्रेकरू आहेत व त्यांच्याकडचा ऐवज धर्मशाळेत चोरी जाण्याची भीती असल्याने तो माझ्या घरी ठेवावा. त्यांनी आपला ऐवज माझ्या घरी ठेवला. परंतु काही वेळाने त्यांच्यापैकी एक पुरुष व एक स्त्री दोघं आली व हे सांगून की त्यांना लवकर गावी परतायचे आहे, आपला ऐवज मागून घेऊन गेले.

विवेकवर्मा ही गोष्ट राजाला सांगतच होता, त्याच वेळी काही शिपाई एका पुरुषाला व एका स्त्रीला धरून घेऊन आले. म्हणाले–"महाराज! ही दोघं पुष्कळसा माल घेऊन राजधानी बाहेर पळून जात होती. आम्ही संशयावरून यांना धरले तेव्हां कळले की त्यांना सुरेंद्रने सांगितल्याप्रमाणे त्यांनी ते केले. विवेकवर्माला वाटेल ते करून त्याच्या पदावरून हुसकावून लावण्यासाठी महाराजांना तो लबाड असल्याचे दाखविण्याच्या दुष्ट हेतूने हे सर्व नाटक रचले होते. परंतु विवेकवर्माच्या घरी ऐवज ठेवल्या नंतर या दोघांच्या मनात एक दुष्ट विचार आला की, सुरेंद्रलाच कां फसवू नये व त्यांनी तो ऐवज लांबविला."

त्यानंतर राजाने सुरेंद्र आणि त्याचे साथीदार यांची चवकशी करून त्यांना योग्य ती शिक्षा केली. विवेकवर्मावर कोणते ही कुटाळ आले नाही. त्यांच्या विषयी राजाच्या मनांत आदर वाढला.

ते सर्व पाहून पार्वती धर्मदेवतेची प्रशंसा करीत कैलास पर्वतावर परतली.





# महाबली हनुमान

शोक करीत बसलेल्या रामचंद्राला बिभीषण काय म्हणत होता ते कळले नाही. म्हणून काही वेळाने रामाने स्वत:ला आवरले व बिभीषणाला म्हणाला– "बिभीषणा, तू आतांच काहीतरी मला सांगितलेस. मला ते बरोबर कळले नाही. पुन्हां सांग."

बिभीषण पुन्हां सांगू लागला :

"रामा, तू बिनाकारण शोक करीत आहेस आणि आम्हांला सुद्धां दु:खी करीत आहेस. आनंद होतो आहे तो तुझ्या शत्रूला. राक्षसांचा वध करून सीतेला पुन्हा प्राप्त करणे हाच तुझा हेतू असेल तर युद्ध चालू ठेवले पाहिजे. लक्ष्मणाला वानर सैन्याबरोबर देऊन निकुंभि क्षेत्रात पाठव. इंद्रजिताशी युद्ध करून त्याचा वध करायला त्याला सांग. इंद्रजित होम करण्यासाठी निकुंभिवनात गेला आहे. त्याचा तो होम जर पूर्ण झाला तर आपणां सर्वांचे मरण टळणार नाही. ब्रह्मदेवाने इंद्रजिताला तसाच वर दिलेला आहे. त्याच्या होमाला विघ्न आले तर लक्ष्मणाच्या हाती इंद्रजिताचे मरण निश्चित समज. इंद्रजित मेला तर रावण आणि त्याचे उरलेले साथीमित्र मेल्यासारखेच."

रामाच्या आज्ञेने लक्ष्मणाला इंद्रजिताचा वध करून यायला सांगितले. त्यासाठी लक्ष्मण वानरांचे बलाढ्य सैन्य घेऊन निघाला. भल्लूक सैन्य सुद्धा बरोबर गेले. निकुंभि वनाची वाट दाखविण्यासाठी



बिभीषण स्वत: निघाला. लक्ष्मणाबरोबर हनुमानही निघाला.

निघतांना लक्ष्मण सोन्याने मढविलेले धनुष्य, बाण घेऊन आणि कवच धारण करून गेला. दुरूनच राक्षसांचे फार मोठे सैन्य व्यूह करून होमाच्या रक्षणासाठी उभे असलेले दिसले.

बिभीषण ते राक्षससैन्य लक्ष्मणाला दाखवून म्हणाला–" इंद्रजिताचा होम पुरा होण्यापूर्वीच वानर सैन्याने राक्षस सैन्य उध्वस्त केले पाहिजे. तू तो व्यूह भेद करून पुढे जा. तेव्हां इंद्रजित तुला दिसेल. तेव्हां तुला त्याचा वध करतां येईल."

त्याप्रमाणे वानर, भल्लूकांची सैन्ये लक्ष्मणाच्या पाठोपाठ राक्षसांच्या व्यूहावर तुटून पडली. घोर युद्ध झाले.

आपल्या सैन्यात हा:हाकार उडालेला ऐकून इंद्रजित आपला होम अर्धवट सोडून उठला आणि आपल्या रथात बसून युद्ध करण्यास सज्ज होऊन आला.

बिभीषण आणि लक्ष्मण दोघांना निकुंभिवनात इंद्रजित होम कोठे करणार हे माहीत होते. तेथे एक काळाकुट्ट महावृक्ष होता. इंद्रजित तेथेच बली देऊन युद्धाला येणार होता. त्यानंतर युद्ध करतांना तो कोणाला दिसलाच नसता.

हे सर्व बिभीषणाला माहीत होते व त्याने ते लक्ष्मणाला सांगून ठेवले होते. म्हणून लक्ष्मण थोडादेखील वेळ न घालवितां त्या महावृक्षाजवळ येऊन उभा राहिला होता. त्याच सुमारास रथात बसून इंद्रजित सर्व तयारी करून त्या महावृक्षाजवळ आला.

लक्ष्मण त्याला म्हणाला–" मी तुला युद्ध करायला येण्यासाठी आह्वान करीत आहे. ये माझ्याशी युद्ध कर!"

इंद्रजिताने लक्ष्मणाचे ते आह्वान ऐकले व त्याच्याबरोबर बिभीषणाला आलेला पाहून संतापून तो म्हणाला–" बिभीषणा, तू राक्षस असतांही आपल्या कुळाचा अभिमान

कसा काय सोडलास? ही तुझी जन्मभूमी! तू माझ्या पित्याचा सख्खा भाऊ! माझ्याशी कां वैर? तू धर्मद्रोही दुरात्मा आहेस. तुला बंधुमित्र, कुलधर्म, रक्तसंबंध वगैरे पैकी काहीच कसे नाही रे? आपल्या सख्ख्या बांधवांना सोडून शत्रूचा दासानुदास झाला आहेस! तुझे नातेवाईक तुझ्या नावाने 'छि:थू' करीत आहेत. थोर लोक तुला नावे ठेवीत आहेत. आप्तमित्रांत राहून मरण्यात जो थोरपणा आहे आणि शत्रूला सामील होऊन त्याच्या कृपेवर जगण्यात जो हीनपणा आहे तो तुला कळत नाही का? माझा तू सख्खा चुलता आहेस आणि तू माझा होम भंग करून तू माझा अशा तऱ्हेने अपकारच केला आहेस. असे नीच कर्म दुसरा कोणी कधी करणे शक्य नाही."

सर्व निमूटपणे ऐकून घेऊन शेवटी बिभीषणाने खडसून उत्तर दिले. म्हणाला–" माझा स्वभाव तुला माहीतच आहे. सात्विकवृत्तीने मी राहतो. कोणी अधर्म केलेला मला आवडत नाही. नाहीतर मी आपल्या दादाला कधी सोडले असते का? त्याने कोणते दुष्कर्म केले नाही? त्याचे फळ सर्व राक्षस वंशाला भोगावे लागत आहे. लवकरच त्याच्याबरोबर सर्व लंकेवर वरवंटा फिरणार आहे. तुझं मरणही जवळ येऊन ठेवले आहे. मला काय वाटेल ते





तू म्हण. तू मृत्यूच्या दारात उभा असतांना तुला मी काय बोलू? परंतु मायारूप सीतेचा वध करून तू राम-लक्ष्मणांचा अपमान केला आहेस. आतां लक्ष्मणाच्या हातीं त्याचे फळ तुला भोगावे लागेल.”

लक्ष्मणाकडे पाहून इंद्रजित म्हणाला– “त्या रात्री माझ्या बाणाचा प्रताप पाहून सुद्धा तू माझ्याशी युद्धाला आला आहेस. तेव्हां तुझी बुद्धी मंद तरी पडली आहे किंवा तुझी शंभर वर्षें तरी भरली आहेत.”

लक्ष्मणाने त्याच स्वरात उत्तर दिले– “चोरासारखा लपून युद्ध करणार तू, स्वत:ला वीर म्हणवितोस? आता तुझा प्रताप काय तो दाखव.”

इंद्रजिताने शरवृष्टी करून लक्ष्मणाचे सर्व अंग क्षतविक्षत केले. लक्ष्मणाने इंद्रजिताला रक्तस्नान घातले. दोघे शौर्यात समसमानच होते.

काही वेळ युद्ध होत राहिल्यानंतर बिभीषणाला इंद्रजिताच्या तोंडावर भयाची रेखा दिसली. तो लक्ष्मणाला म्हणाला– “इंद्रजिताला बरेच लागल्यासारखे दिसते आहे. त्याचा शेवट करायला हीच वेळ अनुकूल आहे.”

लक्ष्मणाने आणखी जास्त तीक्ष्ण बाण सोडून इंद्रजिताला नामोहरम केले. इंद्रजित बेशुद्ध होऊन पडला.

थोड्या वेळाने शुद्ध आल्यावर समोर लक्ष्मणच दिसला. इंद्रजिताला स्वत:च्या पराक्रमाची आठवण झाली. त्याने लक्ष्मणावर आणि त्याहून जास्त बिभीषणावर रुष्ट होऊन बाणांचा वर्षाव केला.

लक्ष्मणावर त्या बाणांचा काहीच परिणाम झाला नाही. तो इंद्रजिताला म्हणाला–“युद्धात जयाची अपेक्षा ठेवणाऱ्याने असले पुचके बाण सोडावयाचे असतात का?” असे म्हणत लक्ष्मणाने निवडक बाण सोडले.



लक्ष्मणाच्या या शरवृष्टीने इंद्रजिताचे कवच तुकडेतुकडे होऊन रथात पडले. त्याच्या सर्वांगाला जखमा झाल्या. इंद्रजिताने संतापून लक्ष्मणाचे कवचही फोडून तोडून टाकले. अशातऱ्हेने दोघांचे घनघोर द्वंद्व बराच वेळ चालू राहले. दोघे बरोबरीचे पराक्रमी वीर होते. दोघांपैकी एक मरून पडेपर्यंत द्वंद्व युद्धथांबणे शक्य नव्हते.

बिभीषणानेसुद्धा आपल्या चौघां मंत्र्यांना बोलाविले व वानरांना म्हणाला–"शूर वानरवीर हो! इंद्रजिताशिवाय रावणाकडे दुसरा वीर उरलेला नाही. याच्याकडे तुम्ही दुर्लक्ष करून चालणार नाही. तुम्ही आत्तापर्यंत अनेक राक्षस वीरांना ठार केले आहे. हा इंद्रजित तेवढा उरला आहे. याला वाटेला लावलात की रावणाला विचारणारा देखील कोणी राहणार नाही. मी याला ठार केला असता, परंतु तो माझ्या भावाचा मुलगा, म्हणजे माझ्या मुलासारखाच आहे. मी त्याला मारणे पुत्रहत्येच्या पापासारखे होईल. इंद्रजिताच्या मदतीला जे सैन्य आहे ते समूळ नष्ट करा."

ते ऐकून वानरांनी जयघोष केला आणि राक्षस सैन्यावर तुटून पडले. बिभीषणाने आणि त्याच्या मंत्र्यांनीसुद्धां राक्षस सैन्यावर हल्ला केला.

मध्यंतरी लक्ष्मणाने इंद्रजिताच्या सारथ्याचा शिरच्छेद केला. तेव्हां इंद्रजित स्वतःच रथ हाकीत युद्ध करू लागला. ते खरोखरी कौतुक करण्यासारखेच त्याचे कौशल्य होते. परंतु लक्ष्मणाने त्याच्या वाटेवर जास्तच अडथळे उभे केल्यासारखे युद्ध केले. तेव्हां मात्र इंद्रजिताचा धीर खचला. त्याच्या तोंडावर ती गोष्ट उमटली. म्हणून वानरांचा उत्साह जास्त वाढला.

प्रमाथी, शरभ, रभस, गंधमादन चौघां वानर वीरांनी इंद्रजिताच्या रथाच्या चारी घोड्यांचा समाचार घेतला. ते चारही घोडे रक्त ओकून जमिनीवर आदळले.

इंद्रजित रथावरून जमिनीवर उडी टाकून लक्ष्मणावर बाण टाकीत पुढे येऊ लागला. त्याच्या आजूबाजूला मदतीसाठी राक्षसवीर धावले. इंद्रजित त्यांना म्हणाला–"तुम्ही युद्ध करीत रहा. मी राजधानीत जाऊन आणखी एक रथ घेऊन येतो."

तो त्याप्रमाणे लंका नगरीत गेला. एक उत्तम रथ सिद्ध केला आणि त्यात बसून पुन्हां युद्धाला आला. त्याला पुन्हां द्विगुणित उत्साहाने युद्धाला आलेला पाहून लक्ष्मणाला व बिभीषणाला आश्चर्य वाटले.

या खेपेस इंद्रजिताने वानरसैन्यावर बाणांचा मारा करून त्याचा विध्वंस करण्याचे जणुंकाही ठरविले होते. तेव्हां लक्ष्मणाने एक बाण सोडून इंद्रजिताचे धनुष्यच तोडून टाकले. नंतर त्याच्या सारथ्याला यमसदनी पाठविले. तरी देखील इंद्रजित युद्ध करीत राहिला, एवढेच नव्हे तर बिभीषणाला त्याने आपल्या बाणाने विद्ध केले. तेव्हां बिभीषणाने रुष्ट होऊन आपल्या गदेने इंद्रजिताच्या रथाचे घोडे ठार केले.

त्यानंतर इंद्रजित आणि लक्ष्मणाने परस्परांवर दिव्यास्त्राचा प्रयोग केला. शेवटी लक्ष्मणाने प्रयोग केलेल्या ऐंद्रास्त्राने



इंद्रजिताचे डोके उडाले व जमिनीवर आदळले.

बिभीषण आणि वानरवीर जयघोष करू लागले. वानर द्विगुणित उत्साहाने राक्षससैन्यावर तुटून पडताच राक्षस रणांगण सोडून लंकेच्या वाटेने पळून गेले.

इंद्रजित मेल्यावर वानरांचा आत्मविश्वास वाढला. त्यांनी लक्ष्मणाचा जयजयकार करून त्याच्या शौर्याची फार प्रशंसा केली. लक्ष्मणाने रामाकडे जाऊन त्याला नम्रपणे नमस्कार केला व तुझे काम करून आलो असे दर्शवीत बाजूला उभा राहिला. रामाने गाढ आलिंगन करून लक्ष्मणाची पाठ थोपटली व म्हणाला–

"इंद्रजिताचे मरण म्हणजे रावणाचा उजवा हातच गळून पडल्यासारखे आहे. आतां रावणाचा वध सहजी होऊ शकेल." असे म्हणत लक्ष्मणाच्या अंगावर पडलेल्या जखमांचा औषधोपचार करायला रामाने सुषेणाला सांगितले.

इंद्रजिताबरोबर युद्धाला येऊन शौर्याने जागोजागी युद्ध करीत असलेले राक्षस इंद्रजिताच्या वधाची वार्ता ऐकून हतोत्साह झाले. ते शोक करीत रावणाकडे धावले. बिभीषणाच्या मदतीने लक्ष्मणाने इंद्रजिताचा वध केल्याचे वृत्त त्यांनी रावणाला सांगितले. ती दुःखवार्ता ऐकून रावण बेशुद्ध होऊन पडला.

शुद्ध आल्यावर आपल्या शूर पराक्रमी मुलाच्या वधाबद्दल तो बराच वेळ शोक करीत राहिला. तो शोक हळूहळू क्रोधात बदलत गेला. सीतेचाच शिरच्छेद करून टाकावा असे त्याला वाटू लागले. तो समोर उभे असलेल्या राक्षसांना म्हणाला–

"माझ्या मुलाने मायारूप सीतेचा वध वानरांसमक्ष केला होता. मी या सीतेचाच वध करतो. रामावरचे तिचे प्रेम यत्किंचितही कमी न झाल्याबद्दल मी तिचा वध करतो." असे म्हणत त्याने तलवार उपसली आणि अशोकवनाकडे, सीता होती तिकडे, निघाला.

ते ऐकून मंदोदरी व त्याचे मंत्री रावणाला त्या दुष्कर्मापासून परावृत्त करण्यास धावले.

मंदोदरी रावणाला म्हणाली–"आतां तरी सीतेला रामाकडे पोचती कर आणि सर्वनाशापासून स्वतःचे व राज्याचे रक्षण कर."

"तुला जो राग आला आहे तो रामावर काढ. सीतेचा वध करून काय मिळणार?" रावणाचे मंत्री म्हणाले.

रामाचा वध हेच आपले मुख्य कर्तव्य आहे, सीतेचा वध नाही, हे समजून रावणाने उग्र लंकायज्ञ सुरू केला.






भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यात असंख्य भारतीयांनी आपल्या प्राणाच्या आहुती दिल्या. अशा थोर वीर पुरुषात बाघा-जतीन ह्याचे नाव अत्यंत आदराने घेतले पाहिजे. याचा जन्म १८७९ मध्ये बंगाल प्रांतातील एका गांवी झाला.

बाघा म्हणजे वाघ. त्याला हे नाव कसे मिळाले? तर एक कारण झाले. एके दिवशी सकाळी त्याच्या गावा शेजारी एक वाघ आला असता एक लहानसा सुरा हाती घेऊन जतीन त्याच्याशी झुंजला व वाघाला ठार केले. वाघाने त्याला ओरबाडले, परंतु डॉक्टर म्हणतात तसा जतीन 'केवळ आत्मबलाने' वांचला.





वाघाला ठार करण्यावरच जतीनचे काम थांबले नाही. त्याला सिंहाशी–मातृभूमीवर कब्जा करून बसलेल्या ब्रिटीशांशी–त्याला झुंजायचे होते. स्वामी विवेकानंद आणि श्री अरविंद यांनी सांगितलेले राष्ट्रीय चैतन्य त्याच्या रोमारोमात भिनले आणि परकीयसत्ते विरुद्ध बंडाचे निशाण उभे करण्यासाठी त्याने तरुणांची एक










त्याने त्या तरुणांना लाठीकाठी फिरविणे व इतर व्यायाम आणि बंदूक चालविणे शिकविले. त्यांनी भारतीय स्वातंत्र्यासाठी प्राणोत्सर्ग केला. त्यांच्या गुप्त कारवायांच्या मुळाशी जतीन असल्याचे कळल्यावर सरकारने त्याला अटक केली.

जतीनला धमक्या दिल्या, त्याची छळणूक केली. परंतु त्याने कोणतीही कटातली गुप्त गोष्ट बाहेर पडू दिली नाही. भय दाखवूनही तो मार्गावर येत नाही असे पाहून त्याला धन-दौलतीचा आणि ऐशआरामाचा लोभ दाखविला. तेव्हां त्याने टेबलावर जोराने हात आपटून "तोंड बंद करा" म्हटले. टेबल मोडले.





कोणताही आरोप लावतां न आल्याने शेवटी जतीनला सोडावे लागले. मध्यंतरी त्याने आपल्या साथीदारांना बंड यशस्वी व्हावे म्हणून शस्त्रास्त्रे आणायला युरोप खंडात पाठविले. जर्मनांनी मदत करण्याचे वचन दिले. जतीन आपल्या तिघां साथीदारांसह बालासोर नजीक-च्या एका जुन्या घाटाजवळ आयुधे

भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यासाठी आयुधे आणणाऱ्या जर्मन बोटीचा ब्रिटीश बोटींनी पाठलाग केला. त्यांच्या हातात सापडण्यापूर्वी जर्मन बोटीने सर्व शस्त्रास्त्रे समुद्रात फेकली. ही गोष्ट कळल्यावर जतीन म्हणाला—"म्हणजे परकीय मदतीवर अवलंबून चालायचे नाही !"





पुढे काय करायचे हे जतीनने ठर-विण्यापूर्वी सरकारच्या हेरांना त्याच्या सर्व गुप्त ठिकाणांचा शोध लागला, पोलीसांनी त्याला व त्याच्या अनु-यायांना पकडण्यासाठी येण्याचे ज्या दिवशी ठरविले होते. त्या दिवशी खूप पाऊस पडत होता. तरी जतीन व त्याचे साथीदार त्यांच्या हातावर तुरी देऊन निसटले.

डाव फसल्याने पोलीसांनी ओरडा सुरू केला की, भयंकर चोर आणि लुटेरे पळून गेले. त्यांना पकडून देणा-ऱ्यांना बक्षिस मिळेल, असे त्यांनी जाहीर केले. हे चार तरुण मात्र लपतछपत स्वतःचा बचाव करीत बुधबलंग नदी काठी येऊन पोचले.





तिथले गावकरी त्यांना चोर लुटेरे समजून ओरडले. परंतु ते तरुण न घाबरतां बंदुकी आणि दारूगोळा घेऊन नदी ओलांडून पसार झाले.

पोलीस व सैनिकांची तुकडी तेथे आली तेव्हां एका मातीच्या ढिगावर झुडपाआड ते लढा द्यायला तयार होऊन बसले. कित्येक तास गोळ्यांचा मारा होत राहिला. त्या चौघांच्या गोळ्यांच्या माऱ्याने अनेक इसम पोलीस जमिनीवर लोळले. स्वत: रक्तबंबाळ झाले असूनही त्यांनी शस्त्रे खाली ठेवली नाहीत. दारूगोळा संपे-पर्यंत लढत राहिले.





शेवटी जतीन पकडला गेला. परंतु त्याच दिवशी रात्री तो मरण पावला. त्याला कैद करणाऱ्यांना तो म्हणाला– "माझ्या अनुयायांना शिक्षा करू नका. सर्वांना मी जबाबदार आहे!' पोलीस कमीशनर सर चार्लस टिगार्टने जतीनविषयी हे उद्गार काढले– "सर्व भारतीयांत एका शूरबहाद्दराला

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

हसन व अली नावाच्या दोघां अरबांमध्ये एका बकरीसाठी भांडण झाले. दोघे ती बकरी त्यांची असल्याचे सांगू लागले. भांडण वाढतच गेले. ते पाहून त्यांच्या ओळखीच्या चार-चौघांनी त्यांना जुहा नावाच्या न्यायाधिशाकडे जाऊन तक्रार करायला सल्ला दिला.

जुहाने त्यांना विचारले–"एवढे भांडण व्हायचे कारणच काय घडले?"

"प्रभो! ह्या बकरीला मी लहानपणापासून आपल्या घरी पाळले आहे. एके दिवशी ही एकाएकी नाहीशी झाली. मी ह्याच्याकडे बकरीला पाहून ह्याला माझी बकरी चोरल्याचे सांगितले. पण हा म्हणतो की मीच त्याची बकरी चोरून नेली आहे. हा सपशेल खोटे बोलतो आहे." हसनने निवेदन केले.

अलीने तीच गोष्ट सांगितली. म्हणाला–"बकरी लहानपणापासून मीच पाळत आलो आणि हसनने ती चोरून नेली."

जुहाने दोघां फिर्याद करणाऱ्यांचा चेहरा खोल नजरेने पाहून निवाडा दिला–"ही गोष्ट सर्वांच्या माहितीची आहे की दोघे जण जवळजवळ जास्त दिवस रहात आले तर त्यांच्या चेहऱ्यामोहऱ्यात बरेच साम्य येऊ लागते. तुम्ही अलीचा चेहरा जरा पहा! बिलकुल बकरीसारखा आहे की नाही? म्हणून ही बकरी त्याचीच आहे." असा निकाल सांगून तो आपल्या गाढवावर बसून निघाला.

हसन चिडला. तो जूहाकडे पाहून म्हणाला–"बरोबर म्हणता आहां तुम्ही. म्हणून हे गाढव आणि जूहा दोघांमध्ये खरोखर गाढव कोण आहे, कळत नाही खरे!"

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार* करून एका कार्डावर स्वत:च्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०० ०२६ या पत्त्यावर पाठवा.

२० एप्रिल १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल जून १९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

फेब्रुवारी महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "डाव उलटला"



# अमरवाणी

अनुपायेन कर्माणि
विपरीतानि यानि च
क्रियमाणानि दुष्यन्ति
हवींष्य प्रयतेष्विव ॥ १ ॥

[ पद्धत असल्याशिवाय केलेली कामे, अपात्रांना केलेल्या अन्नदानासारखी (परिणामी) हानिकरच सिद्ध होतात.]

यः पश्चात् पूर्वकार्याणि
कर्माण्यभिचिकीर्षति
पूर्वम् चापरकर्माणि
न स वेद नयानयौ ॥ २ ॥

[ जी आधी करायला हवीत ती कामे नंतर आणि जी नंतर करायला हवीत ती आधी करणाऱ्याला बरं वाईट कळत नाही.]

चपलस्य तु कृत्येषु
प्रसमीक्ष्याधिकम् बलम्
क्षिप्रमन्ये प्रपद्यन्ते
क्रौंचस्य ख मिव द्विजाः ॥ ३ ॥

[ जास्त बळ असूनही चंचळ माणूस काम करीत असला की इतर लोक संधी साधून बिघाड करतात.]



# मित्रलाभ

[ ४५ ]

हरणाला सोडवून आणण्यासाठी कावळा आणि उंदीर गेले ते बराच काळ लोटला तरी न आलेले पाहून कांसव काळजीत पडले. वाट पहात थांबायला ते तयार नव्हते, म्हणून दोघांच्या पाठोपाठ निघाले.

कांसवाला येत असलेले पाहून कावळा घाबरला. कारण शिकारी आला तर कावळ्याला उडून जाणे शक्य होते. उंदीर कोठेतरी लपून बसेल. हरण पळून जाऊ शकेल; परंतु कासव कसे निसटून जाणार?

कावळ्याने कांसवाला विचारले—"तू कशाला आलास बाबा? इकडे शिकारी येण्यापूर्वी तावडतोब परत निघून जा."

"मी तरी काय करू रे? हरणावर संकट आले होते; तुम्ही दोघे त्याला सोडवायला गेलात ते बराच वेळ परतला नाहीत. मला नाही राहवलं, निघून आलो." कासव म्हणाले.

त्यांचं असं संभाषण चालू असतांनाच शिकारी येत असलेला कावळ्याला दिसला आणि कावळा मोठ्याने ओरडला. उंदराने घाईघाईने हरणाचे जाळे तोडून त्याला सोडविले. हरणाने मागेपुढे पाहिले नाही आणि पसार झाले. कावळा झाडावर जाऊन बसला. उंदीर जवळच एक बीळ दिसले त्यात शिरला.

हरण हातचे निघून गेल्याबद्दल शिकारी हात चोळू लागला. परंतु त्याला कांसव दिसले. त्याला आनंद झाला. त्याने कांसवाला धरून गवताची दोरी वळून आपल्या धनुष्याला बांधले आणि घरी निघाला.

शिकाऱ्याला, कांसवाला धरून घेऊन जात असलेला पाहून उंदीर फार काळजीत

पडला. एका संकटांतून सुटका मिळाली असा विचार करीत होतो तर हे दुसरे संकट येऊन कोसळले. आपल्यावर अशी एकामागून एक संकटे कां येत आहेत, त्याला कळेना. सुरवातीला त्याचं सर्वस्व गेलं. नंतर स्थानभ्रष्टत्व नशिबी आलं. परंतु मित्र लाभले ते संकटात सांपडले. कपाळावर लिहिलं असतं, त्यातून सुटका नाही, हेच खरं!

इतक्यात हरण व कावळा परतले. कांसवावर आलेल्या संकटाबद्दल त्यांना देखील फार वाईट वाटलं.

उंदीर त्यांना म्हणाला–"दुःख करीत हातावर हात धरून बसून राहण्यात काय फायदा? कांसव दृष्टीआड होण्यापूर्वी त्याला वांचविण्याचा उपाय करू या."

कावळा म्हणाला–"मला एक युक्ती सुचली आहे. शिकाऱ्याच्या घराच्या वाटेवर एक तळे आहे. तो लौकरच तेथपर्यंत पोचेल. त्यापूर्वी हरणाने मधल्या वाटेने पळत जाऊन तळ्याच्या काठी मेल्यासारखं निःश्चेष्ट पडून राहायचं. मी उंदराला आपल्या पाठीवर बसवून तिकडे घेतो. मी त्याला काठावर उतरवून ठेवून हरणाचा डोळा कुरतडण्याचे सोंग करतो. ते पाहून हरण मेले असावे असे शिकाऱ्याला वाटेल. तो हरणाला उचलून घेण्यासाठी कांसवाला धनुष्यासह काठावर ठेवून हरणाकडे जाईल. तेव्हां उंदराने चटदिशी जाऊन कांसवाला बांधलेली दोरी तोडून टाकावी. कांसव सुटका होताच तळ्यात पळून जाईल. हरणाला घ्यायला शिकारी जवळ येऊ लागला की मी उडून जाईन. हरणाने टुण्णदिशी उडी मारून पळून जावे. तुम्हांला काय वाटतं?"

"फार छान! चांगली युक्ती आहे! आपण कांसवाला हा उपाय करून सोडविल्या सारखेच समजा. चला तर." हरण म्हणाले.

ते मधल्या वाटेने तळ्याच्या काठी जाऊन मेल्यासारखे पडून राहिले. कावळ्याने उंदराला पाठीवर बसवून तळ्याच्या काठावर उतरविले आणि हरणाच्या डोक्यावर बसवून कान कुरतडल्याचे सोंग करू लागला.



थोड्याच वेळाने शिकारी तेथे आला. हरणाला व त्याच्या डोक्यावर कावळ्याला बसलेला पाहून त्याला वाटलं की हरण जाळ्यातून सुटलं खरं, परंतु दमून भागून शेवटी मेलेलं दिसतं आहे. कांसवाला त्याने चांगलं बांधलंच होतं, म्हणून त्याला काठावर ठेवून तो हरणाला धरायला निघाला. उंदराने चटदिशी येऊन कांसवाला बांधलेली दोरी कुरतडून तोडून टाकली. कांसव काठावरून तळ्यात उडी मारून दिसेनासे झाले.

शिकाऱ्याला जवळ येत असलेला पाहून कावळा उडाला. हरीण टुण्णदिशी उडी मारून पाहतांपाहतां दृष्टीआड झाले.

शिकारी हताश होऊन मागे परतून पाहतो तर कांसव देखील नाहीसे झाले होते.

"फुटक्या नशीबा! माझ्या जाळ्यात हरण कसं छान सांपडलं होतं. तू त्याला सोडविलेस! माझ्या पकडीत कांसव आले होते त्यालासुद्धा तू सोडविलेस! बायकापोरांना घरी सोडून मी सकाळपासून आतां पर्यंत रानोमाळ भटकलो आणि रिकाम्या हाताने मला परतलेला पाहून त्यांची उदास झालेली तोंडेच मी पाहू म्हणतोस का?" असे म्हणत शिकारी कपाळावर हात मारून पश्चात्ताप करू लागला.

तो निघून गेल्यावर चौघे मित्र परस्परांना प्रेमाने भेटले आणि लगेच स्वस्थानी परतून सुखाने राहू लागले.



# १८३. विलक्षण मूर्ती

कोलंबियातील शान आगस्टस् प्रातांत पुरातत्व विभागतर्फे खोदकाम झाल्यावर या सारख्या मूर्ती शेकडो उपलब्ध झाल्या आहेत. या देवतांची पूजा करणारे या काळात कोणी नाही. या 'कोरल' देवतांच्या उजव्या हातांत हतोडीसारखी साधने, डाव्या हातांत शंखासारख्या वस्तू आणि तोंडावर राग दिसतो.





# माया सरोवर

[ १५ ]

[ गिड्डुयांच्या राणीचा शत्रू गडेकोंड वनमाणसाला वश करून घेण्यासाठी मदतीला धावला. त्याच वेळी जयशीलने त्या वनमाणसाबरोबर जो माणूस होता तो आपला शत्रू कृपाणजित असल्याचे ओळखले. जयशीलने वनमाणसावर एक बाण सोडला तेव्हां गिड्डुयांच्या सेनापतीने आपल्या सैन्याला डोंगर चढून जायला आव्हान केले. पुढे– ]

गिड्डुयांचे सैन्य टेकडीवर चढू लागलेले पाहून, त्यांच्या राणीचा शत्रू गडेकोंड आपल्या सैनिकांना डोंगर चढून वर यायला सांगू लागला. त्याच्या आज्ञेचे पालन होत असतां, गिड्डुयांचे सैन्यदेखील डोंगर चढून आलेले दिसले. त्यांच्या हातात भाले होते व ते शत्रूवर वार करायला तयार होऊन येत होते. वनमाणसाला दोरखंडांनी बांधून वश करण्याचा प्रयत्न कृपाणजित करीत होता व त्याला गडेकोंडचे अनुयायी मदत करीत होते.

जयशील गडेकोंडच्या अनुयायांना डोंगर चढून येत असलेले पाहून सिद्धसाधकाला म्हणाला–"साधका! आपण राणीच्या सैनिकांना यावेळी मदत केली नाही तर तिचे शत्रू तिला सहजी जिंकू शकतील. त्या कृपाणजिताला पाहिलेस का? त्याने रानटी जातीच्या लोकांचे सोंग केले आहे.



तरी त्याला मी चांगले ओळखले. त्याने मला सुद्धां ओळखले असणार."

सिद्धसाधकाला वाटू लागले की आपण पुढे होऊन राणीला मदत करणे आवश्यक आहे. तो राणीकडे वळून म्हणाला–"राणी, तू इकडे राहण्यातच तुझे हित आहे. आम्ही तुझ्या सैनिकांबरोबर जाऊन तुझ्या शत्रूच्या सैनिकांना आणि त्या दुष्ट गडेकोंडाबरोबर आमचा एक शत्रू आहे त्याला ठार करून नाहीतर पळवून लावतो."

साधकाचे बोलणे संपण्यापूर्वीच ते वनमाणूस फार मोठ्याने ओरडले. ते ऐकून जयशील, साधक व इतरांनी डोंगराच्या टोकाकडे वळून पाहिले. त्यावेळी एकटा कृपाणजित वनमाणसाच्या कंबरेला बांधलेली सांखळी धरून उभा होता. तो सरळ उभा राहून टेकडीच्या उताराकडे पहात हातवारे करीत ओरडत होता.

"साधका! आतां पुन्हां ते वनमाणूस त्या दुष्टाच्या हातात सापडलेले दिसते आहे. आता जर का त्याने एखादा खडक उचलून टाकला तर राणीच्या सैनिकांपैकी अर्धेतरी नक्कीच चिरडून मरतील. तरसग हूं, चल!" असे म्हणत जयशील टेकडीवर चढू लागला. सिद्धसाधक त्याच्या मागोमाग निघाला.

दोघे धावत चढत जाऊन टेकडीवर गिड्डुचांचा सेनापती व त्याचे सैनिक जेथवर गेले होते तेथवर पोचले. त्याला म्हणाले– "सेनापती! आपल्या अनुयायांना थोडा वेळ थांबायला सांग! ते वनमाणूस पुन्हां एखादा खडक तुमच्यावर टाकण्याच्या बेतात दिसते आहे."

"अहो! तुम्ही त्या वनमाणसाबरोबर तो महाकाय आहे ना, त्याच्या पासून काय वाटेल ते करून आम्हांला बांचवा! आम्ही त्या टेकडीवर जाऊन त्या गडेकोंडचा व त्याच्या अनुयायांचा समाचार घेतो. आपल्या भाल्यांचा हल्ला करून त्यांना डोंगरावरून खाली रेटतो."

"ओ हो! तुझं बोलणं आणि तुझ्या भाल्याचं टोकही खूप पाणीदार आहे रे! परंतु तू विचार केलास तसा करायला तू समर्थ आहेस का? तू देव आहेस की राक्षस आहेस, एकाएकी एवढा मोठा पराक्रम करून दाखवायला? तू एक गिड्डु खुजा आहेस हे विसरलास वाटते?" सिद्धसाधक म्हणाला.

जयशीलने गप्प रहा रे, असे हात हलवून साधकाला सुचविले. तितक्यात तिकडून वनमाणसाने एक मोठा दगड उचलून खांद्यावर घेतला. तो पाहून थोडासा चिडल्यासारखा सिद्धसाधक म्हणाला–"अस्सं! म्हणजे या माकडाला दगड फेंकण्या व्यतिरिक्त दुसरे काहीच येत नाहीसे दिसते आहे! मी त्याला नरकलोकांत पाठवितो." असे म्हणत हातातले त्रिशूल वर उचलून वनमाणसाकडे साधक धावला.

साधक काहीतरी मूर्खासारखा धाडस करायला निघालेला दिसतो आहे. असा विचार करून जयशीलने त्याला थांबायला सांगितले आणि धनुष्यावर बाण चढवून वनमाणसावर सोडला. परंतु नेम चुकला आणि कृपाणजितच्या हातातल्या सांखळीला लागला. त्या धक्कयाने साखळी हातातून निसटून पडली. लगेच वनमाणूस हातातला दगड खाली टाकून पळाला. परंतु कृपाणजितने चटदिशी साखळी धरून वनमाणसाला ओढले. त्याच वेळी बाण सोडणारा त्याचा शत्रू जयशील आहे हे कृपाणजितने ओळखले.





भीतीने आणि आश्चर्याने त्याचा थरकाप उडाला. त्या क्षणापर्यंत तो जयशील असेल असे कृपाणजितला स्वप्नातही वाटले नव्हते. त्याने सिद्धसाधकाला पूर्वी कधी पाहिलेच नव्हते.

"अरे गडेकोंडा! शत्रूचा नायनाट करायला ही वेळ उपयुक्त नाही. तो धनुष्य बाण घेऊन आला आहे ना, तो दुरूनच आपल्यावर बाण सोडून आपला वध करू शकेल. वनमाणूस एक रानटी प्राणी आहे, म्हणून बाण लागला तरी उभा राहू शकले. आपण धूळ चाटीत जमिनीवर पडलो असतो." डोंगरांच्या शिखरावरून वनमाणसाला मागे ओढीत कृपाणजित म्हणाला.

गडेकोंडने एकदां जयशील व सिद्धसाधकाला डोळे भरून पाहून घेतले व कृपाणजिताला म्हणाला—"अहो महाकाय! तुमच्या आज्ञेबाहेर मी नाही. परंतु मला एवढेच विचारायचे आहे, तुम्ही वनमाणसाला बरोबर घेऊन एकदम हल्ला केलात तर त्या दोघांना ठार करतां येणार नाही का? आम्ही त्याच वेळी राणीच्या सैनिकांवर तुटून पडतो आणि आपल्या भाल्यांनी त्यांना उभे फाडून काढतो."

ते ऐकून कृपाणजित संतापून वनमाणसाला टेकडीवरून खाली ओढीत नेत म्हणाला—"काय रे गडेकोंडा! तुझ्या टोपांत खोसलेली पिसे असणारा मी एखादा पक्षी किंवा गिधाड आहे असे वाटले का तुला तुझ्या म्हणण्याप्रमाणे उडत जाऊन त्यांना ठार करायला? त्यांना ठार करायला निराळी युक्ती काढली पाहिजे. पहिल्याने सर्वांना जिवंत आपल्या गावात घेऊन चल."

गडेकोंडने आपल्या सर्व अनुयायांना पळायला आणि आपल्या गावात पोचायला आज्ञा केली. त्या पाठोपाठ मेंढेस्वार आणि भालधारी सैनिक मागे फिरले आणि टेकडी उतरू लागले. शत्रूला पळून जात असलेले पाहून जयशील गिड्डूंच्या सेनापतीला म्हणाला—"सेनापती, हीच उत्तम संधी आहे! जो हाती येईल त्या शत्रूला भाल्यांनी ठार करायला सांग आपल्या सैनिकांना. जे निसटून जातील त्यांच्यावर वरून मोठमोठे खडक ढकलून त्यांना ठार करा. शक्य तितक्यांना नरकात धाडा."

शत्रूला पाठ फिरवून पळत असलेला पाहून खुजांच्या सेनापतीला आणखी जास्त उत्साह चढला. तो आपल्या सैनिकांना प्रोत्साहन देत म्हणाला—"अरे शूरवीर गडेकार सैनिक हो! सिंहासारखे तुटून पडा गडेकोंडाच्या पळपुट्या सैनिकांवर त्यांना आपल्या भाल्यांनी फाडून काढा. तो भयंकर प्राणीसुद्धा पळू लागला आहे. आतां आपल्याला भिण्याचे कारण नाही."

आपल्या सेनापतीची आरोळी ऐकून सर्व गडेकार वीर उत्साहाने मोठ्याने जयघोष करीत टेकडीं चढून गेले. त्यांनी आणि मेंढेस्वार आणि भालदार गडेकार वीरांनी जे शत्रू सांपडले त्यांना ठार केले. जे हाती आले नाहीत त्यांना टेकडीच्या पायथ्यापर्यंत पळवून लावले. खुजांचा सेनापती आपल्या मेंढ्यावर बसून धावत आपल्या अनुयायांना प्रोत्साहन देत होता.

जयशील व सिद्धसाधक त्याच वेळी तेथे गेले. त्यांना गडेकोंडचे अनुयायी पळून जात असलेले दिसले. वनमाणसाला ओढून नेत असलेला कृपाणजित सुद्धां त्यांना दिसला.



सिद्धसाधक आपले त्रिशूल उचलून आणि "महाकाल की जय" असा जयघोष करून मोठ्याने आरोळी मारीत म्हणाला—"जयशीला! अरे असा पहात काय उभा आहेस? त्या गडेकोंड दुष्टांचे गाव टेकडीच्या पायथ्याशीच तर आहे त्या गर्द झाडीत. त्यांच्यावर छापा मारून कृपाणजिताला, त्या वनमाणसाला आणि त्यांच्या आश्रयाला असलेल्या गडेकोंडाला यमसदनास पाठवू या."

सिद्धसाधक म्हणाला ते ऐकून जयशील थोडा हसून म्हणाला—"शत्रूची शक्ती कमी लेखण्यात धोका आहे, लक्षात ठेव. त्यांना या टेकडीवरून घाबरवून सोडून पळून











लावणे निराळे आणि सरळ त्यांच्यावर हल्ला करून त्यांचे गाव व घरे उध्वस्त करणे निराळे. शिवाय या गडेकोंडाच्या अनुयायांना, त्यांचा पाठलाग करून ठार करण्याची आपल्याला गरजच काय? आपण त्याच्याशी आणि खुजांच्या राणीशी समेट घडवून आणू शकलो तर त्याचा प्रयत्न ही करून पहायला हरकत नाही."

"तर मग आपला शत्रू तो कृपाणजित आहे, त्याचं काय आणि त्याने पाळलेल्या वनमाणसाचं काय? त्याच्या मदतीने तो दुष्ट या जवळपासच्या पन्नास एक मैलांच्या परिसरात स्वतःचं राज्य स्थापन करून गोरगरीब दुबळ्यांवर अत्याचार करीलच की नाही? आपण हे सर्व पहात गप्प बसायचं का?" सिद्धसाधकाने विचारले.

जयशील त्याचे उत्तर देण्याच्या विचारात होता, तेवढ्यात खुजांचा सेनापती त्याच्या समोर येऊन उभा राहून म्हणाला–"काय हो, तुमची अनुज्ञा व मदत असेल तर सरळ टेकडी उतरून जाऊन त्या गडेकोंडाच्या गावावरच हल्ला करतां येईल आणि त्यांची वस्ती बेचिराख करतां येईल! मग काय हुकूम?"

जयशील एकदां चारीबाजूला नजर फिरवून पाहून म्हणाला–"सेनापती, तुझं साहस आणि शौर्य प्रशंसा करण्यालायकच आहे. सहज सापडले त्यांना तू ठार केलेस. बाकी लोक वनमाणसाला घेऊन आपल्या वस्तीत पोचले आहेत. आतां ते सावध होऊन स्वरक्षणाची सर्व तयारी करून सिद्ध असणार. आपण या वेळी हल्ला करून रक्तपाताशिवाय जास्त काय मिळविणार? जय मिळणे तर अशक्यच."

"तरमग आम्ही आता काय करावे, अशी आपली आज्ञा आहे?" खुजांच्या सेनापतीने विचारले.

"सर्वजण टेकडी उतरून जाऊन राणीकडे जा. नंतर आपल्या वस्तीच्या सुरक्षिततेची उत्तम व्यवस्था करा. आपण जो विचार त्यांच्या विषयी करीत आहो, तोच त्यांच्या मनात आला नसेल कसा करून? त्यांनी एकाएकी हल्ला चढविला तरी तुमची स्वतःची हानी होणार नाही, यासाठी काळजी घ्या. आम्ही दोघे लौकरच तुमच्या वस्तीत परत येऊ." जयशील म्हणाला.

खुजांच्या सेनापतीने आपल्या अनुयायांपैकी एकाला जयशील व सिद्धसाधकाला वाट दाखवायला म्हणून मागे रहायला सांगितले आणि बाकी सर्वांना बरोबर घेऊन जयघोष करीत टेकडीवरून उतरून राणी होती तेथे गेला.

जयशील निस्तब्ध होऊन गडेकोंडांच्या वस्तीकडे पहात उभा राहिला. सिद्धसाधक त्याच्याकडे पहात राहल्यावर म्हणाला–"कायरे इतका विचार करतो आहेस? आपण व्यर्थ या खुज्या गिड्ढांच्या भांडणात फसलो बघ!"

"अरे, आपण हौशीखातर इकडे आलो का? त्याला कारण तो मकराकृती दुष्ट मकरकेतू आहे, नाही का? आपण धबधब्यात सापडलो आणि डोंगरावरून खाली कोसळून, इकडे काही अपाय न होता, येऊन पोचलो. हिरण्यपूरच्या राजाचा मुलगा व मुलगी दोघांचे अपहरण झाले; त्यांच्या शोधार्थ आपण निघालो होतो, होय ना? जंगलीलोकांच्या भांडणात असे अडकून पडणे आश्चर्य करण्यासारखेच आहे. परंतु इकडून पुढला मार्ग काढण्यापूर्वी त्या दुष्टाला, कृपाणजिताला मात्र परलोकाला पाठविल्याशिवाय मला चैन पडणार नाही." जयशील म्हणाला.



"महाकालाच्या कृपेने त्या कामाबरोबर त्या दुष्टाने पाळलेले जे वनमाणूस आहे त्याला सुद्धा ठार करून त्याचे कातडे काढता आलं तर पाहिले पाहिजे. चल तर, खूप भूक लागली आहे; खुजांच्या राणीच्या गावात वेळेवरच पोचले पाहिजे." असे म्हणत सिद्धसाधक वळला आणि चालू लागला.

जयशील व सिद्धसाधक टेकडीच्या टोकावर असे बोलत उभे असतां तिकडे झाडीत गडेकोंड आपल्या वस्तीत पोचल्यावर कृपाणजितावरोबर भांडत होता. दोघे परस्परांना दोष देत होते की 'तुझ्यामुळे ही हार खावी लागली.'

गडेकोंड म्हणाला—"अहो महाकाय! तुमचा देहच तेवढा मोठा आहे, परंतु तेवढी मोठी शक्ती तुमच्या अंगात नाही आणि तेवढे साहसही तुमच्या काळजात नाही. आमच्या आधीच तुम्ही पळ काढलात. तुम्ही पाळलेले हे वनमाणूस तुम्हांलाच ठार करायला निघाले होते."

ते ऐकून, दात ओठ खूप चावून आणि चिडून जाऊन कृपाणजित म्हणाला—"अरे आंधळ्या! मी शत्रूला भिऊन नाही पळालो; वेळ बरोबर नाही म्हणून पाय मागे घेतला, समजले! माझ्यावर ज्याने बाण सोडला होता तो जयशील नावाचा माझा हाडवैरी आहे. त्याला उजाडण्यापूर्वी ठार केले नाही तर माझे नाव कृपाणजित नाही. आतां माझ्या वनमाणसाची गोष्ट विचारशील तर तो माकडाच्या पिल्लासारखा मी सांगेन ते बिनचूक करील. त्याचं प्रमाणच..." असे म्हणत वनमाणसाला गडेकोंडाकडे खूण करीत कृपाणजिताने हात हलविला.

वनमाणूस विद्युत्वेगाने धावला आणि गडेकोंडाला उचलून मोठ्याने ओरडू लागला, आपल्या मालकाचा जीव धोक्यात आहे, हे पाहून गडेकोंडचे सर्व अनुयायी आपापले भाले सावरून वनमाणसावर व कृपाणजितावर हल्ला करायला सरसावले.

(क्रमशः)



# अर्धवटपणा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने निघाला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू ही फुकटची मेहनत स्वतःच्या खुशीने करतो आहेस की अनिच्छने, हे माहीत नाही. परंतु एवढे मात्र खरे की, काही लोक स्वतःच स्वतःवर संकटे ओढवून घेतात आणि यश हाती यायच्या ऐन वेळी ते लाथाडतात. असल्या अर्धवटपणाचे किंवा मूर्खपणाचे उदाहरण म्हणून मी तुला चंद्रहासाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी रविवर्मा आणि शशिवर्मा नांवाचे दोन अधिपती परस्पराला लागून असलेल्या दोन राज्यांवर राज्य करीत होते. अनादि कालापासून त्या दोन्ही राज्यांचे

## वेताळाच्या गोष्टी



परस्परांशी हाडवैर होते. मधून मधून त्यांची युद्धेही होत. दोन्ही राज्ये एकत्र करून राज्य चालविण्याचे सामर्थ्य एकात ही नव्हते.

एकदां रविवर्माने आपल्या मुलीचे स्वयंवर रचले आणि त्यासाठी सर्व राजे रजवाड्यांकडे निरोप पाठविले वेळी शशिवर्माचा मुलगा चंद्रहास, याच्याकडे देखील खास दूताकरवी निमंत्रण पाठविले. त्या दूताने शशिवर्माला भेटून रविवर्मा ह्या निमित्ते दोन्ही देशात परस्पर सख्य स्थापन करण्यासाठी हा प्रयत्न करीत असल्याचे सांगितले.

ते ऐकून शशिवर्माला आनंद झाला. कारण त्याला एकुलता एक मुलगा होता आणि रविवर्माला एकच एक मुलगी होती. हे लग्न झाले तर चंद्रहास दोन्ही राज्यांचा अधिपती होईल आणि अशा तऱ्हेने वाडवडिलांची इच्छा पूर्ण होईल असे शशिवर्माला वाटले

शशिवर्माने चंद्रहासला बोलावून हे निमंत्रण स्वीकारण्यास सांगून स्वयंवराच्या वेळी हजर राहण्यास प्रोत्साहन दिले. चंद्रहासला जाण्याची मनापासून इच्छा नव्हती. परंतु वडिलांची आज्ञा मोडणे बरोबर नाही असे वाटून तो सुबुद्धि नांवाच्या आपल्या एका मित्राला बरोबर घेऊन रविवर्माच्या राजधानीस निघाला.

दोघे घोड्यावर बसून जंगलाच्या वाटेने जात असता त्यांना रानटी जातीच्या लोकांनी अडविले. त्यांनी दोघांच्या मुसक्या बांधून त्यांना नायकासमोर नेले.

सुबुद्धीने स्वतःची व आपल्या मित्राची ओळख सांगून दोघे कोणत्या कामासाठी जात आहेत हे देखील सांगितले.

"तुम्ही असाल कोणी, आम्हांला काय त्याचे? आमच्या राज्याच्या हद्दीत तुम्ही पाय टाकलात. तुम्ही परकीय आहां. आमच्या नियमाप्रमाणे आमच्या देवीसमोर आम्ही तुम्हा दोघांना बळी देणार. ते मान्य नसेल तर तुमच्यापैकी एकाने आमच्यापैकी एका शूर बहाद्दराशी युद्ध करून त्याला जिंकले पाहिजे. त्यानंतर तुम्हांला सुटका मिळेल." जातीचा नायक म्हणाला.

"मी त्याच्याशी द्वंद्व करायला तयार आहे." चंद्रहास म्हणाला.

"यांची बंधने सोडा आणि यांना मोकळेपणे हिंडू फिरूं द्या. उद्यां सकाळी द्वंद्वयुद्धाची तयारी ठेवा." नायक म्हणाला.

त्याने चंद्रहासला व त्याच्या मित्राला मुक्त केले, एवढेच नव्हे तर त्यांच्या जेवणाखाण्याची उत्तम व्यवस्था केली.

रात्री सुबुद्धी चंद्रहासाला म्हणाला— "मित्रा! आपण पळून जाऊ या चल. आपल्यावर कोणाचा पाहारा नाही. उद्यां तू या रानटी लोकांशी द्वंद्वाला उभे राहण्याची गरजच काय? काय होईल काय सांगता येईल का?"

"असे भित्र्यासारखं पळून जाण्याऐवजी एका शूराच्या हाती मरण आलेले काय वाईट? आपल्यावर विश्वास ठेवूनच नाही का या लोकांनी आपल्याला मुक्त केले. त्यांच्याशी लबाडी करण्या इतके नीच काम आणखी काय असू शकेल?"

दुसऱ्या दिवशी चंद्रहासाचे एका रानटी माणसाबरोबर द्वंद्वयुद्ध झाले. त्यात यशस्वी झाला. नायकाने चंद्रहासाला व सुबुद्धीला इनामे देऊन अत्यंत आदरपूर्वक निरोप दिला.

आपल्या निमंत्रणाला मान देऊन चंद्रहासाला आलेला पाहून रविवर्माने त्याच्या आतिथ्याची उत्तम व्यवस्था केली.














स्वयंवरासाठी आलेल्या उमेदवारांच्या मध्ये अनेक तऱ्हेच्या चढाओढी व द्वंद्वयुद्धे झाली. चंद्रहास सर्व चढाओढींत व द्वंद्वयुद्धांत यशस्वी झाला. सर्वांनी त्याच्या प्राविण्याची प्रशंसा केली.

रविवर्मा चंद्रहासला म्हणाला–"उद्यां सकाळी तुला कमलनाथ नांवाच्या एकाशी द्वंद्वयुद्ध करावे लागेल. त्याने आतांपर्यंत झालेल्या एकाही चढाओढीत भाग घेतला नव्हता. तुम्हां दोघांत जो यशस्वी होईल त्याला मी आपला जांवई करून घेईन."

ते ऐकून सुबुद्धीला राग आला. ते उतरले होते त्या जागी गेल्यावर सुबुद्धी चंद्रहासाला म्हणाला–"काय रे, स्पर्धांत भाग घेणाऱ्या प्रत्येकास तू जिंकलेस. आता आपल्या मुलीचे तुझ्याशी लग्न करून देण्या-ऐवजी आणखी एकाशी द्वंद्व कर म्हणतो आहे, यात याचा हेतू तरी काय असेल? मी जाऊन विचारून येऊ का?"

"तू काही विचारून यायची गरज नाही. मला सर्व काही चांगलं कळलं आहे." चंद्रहास म्हणाला.

त्याने मध्यरात्रीच्या सुमारास सुबुद्धीला उठविले आणि म्हणाला–"चल, आपण निघूं या. उजाडण्या पूर्वी या राज्याची सरहद्द ओलांडून निघून गेले पाहिजे."

ते ऐकून सुबुद्धीची झोप उडाली. तो चकित होऊन म्हणाला–"अरे हे रे काय? उद्यां ते द्वंद्व जिंकून राजकन्येशी विवाह करणार नाहीस का? लग्न करणे आतां तुझ्या हातांत आल्यासारखे आहे, ते सोडून जाणार का?"

चंद्रहास, सुबुद्धी म्हणाला ते ऐकूनही न ऐकल्या सारखे करून लगेच त्याला बरोबर घेऊन निघाला. दोघे आपापल्या घोड्यावर बसून निघाले आणि दुसऱ्या दिवशी तीन प्रहरी आपल्या गावी येऊन पोचले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, तुला चंद्रहास हा अक्कलशून्य होता, असे वाटते का? की तो फार धाडसी की भितरा होता? तो रानटी जातीच्या वस्तीतून पळून जायच्या ऐवजी त्यावेळी द्वंद्वयुद्धास कां कबूल झाला? तो हारला असता तर काय झाले असते? स्वयंवरात इतर चढाओढी जिंकल्यावर त्या एकाच चढाओढीला तो कां तयार झाला नाही आणि पळून कां गेला? या सर्व शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"चंद्रहास हा बुद्धिमान, शूर, साहसी, उदार आणि आत्मविश्वासी होता. तू म्हणतोस ती अवलक्षणे त्याच्यात मुळीच नव्हती. रानटी जातीच्या सचोटीचे कौतुकच त्याने केले. त्यांच्यासारखे दिलेले वचन पाळावे असे त्याला वाटले. रविवर्मा विश्वासघात करतो आहे, हे त्याला पूर्वीच कळले होते. आपल्या मुलीच्या स्वयंवरासाठी चढाओढीची व्यवस्था करून खास दूताकरवी निमंत्रण पाठविण्यात त्याचा काहीतरी दुष्ट हेतू होता हे त्याला बरोबर पूर्वीच कळले. चंद्रहासच्या वडिलांना वाटलं होतं अगदी तसाच रविवर्माने चंद्रहासचा वध करण्याचे ठरवून त्याचा तो हेतू पार पडला असता तर शशिवर्माचे राज्य आपल्याला मिळेल व वाडवडिलांना शक्य न झालेली गोष्ट पूर्ण करता येईल असा त्याचा दुष्ट हेतू असावा. चंद्रहासला त्याचा हा दुष्ट हेतू कळला. सुबुद्धीला ते कळले नव्हते. परंतु भितरा म्हणवून घेणे त्याला आवडले नाही. म्हणून त्याने सर्व चढाओढीत भाग घेऊन त्या जिंकल्या. रविवर्माने आणखी एका द्वंद्वयुद्धाची गोष्ट काढली तेव्हां त्यांत त्याचा दुष्ट हेतू होता हे स्पष्ट झाले. ती संधी रविवर्माला देणे त्याला साहजिकच इष्ट वाटले नाही. म्हणून चंद्रहास मध्यरात्रीच्या सुमारास निघून गेला.

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



     



# चोराचा पोर

एका गावी राजू नावाचा एक अट्टल चोर रहात असे. त्याच्या नावाची दहशत त्या गावाच्या परिसरातील वस्तीत होती. कारण त्याच्या मनात आलं की, तों कोणाचाही जीव घ्यायला मागेपुढे पहात नसे. आपल्या वाटेस त्याने जाऊ नये म्हणून मोठमोठे श्रीमंत लोक त्याला मोठ्या रकमा देऊन त्याचे तोंड बंद करीत असत.

अशा तऱ्हेने राजूने पुष्कळ सोने व धन जमविले. त्याला भीमू नावाचा एक मुलगा होता. भीमू बापाच्याहून जास्त धाडसी होता. भीमूला सोळावे वर्ष लागल्यावर राजू त्याला चौर्यकलेचे शिक्षण देऊ लागला. आपला मुलगा आपल्याहून थोर चोर होणार असे राजूला वाटत होते.

एकदां राजूने चोरी करायला निघतांना भीमूलाबरोबर चलायला सांगितले. परंतु भीमूला बापाची चौर्यवृत्ती मुळीच पसंत नव्हती. तो बापाला म्हणाला–"बाबा, तुमच्यासारखी चोरी करून जीवित घालविणे मला मुळीच पसंत नाही. शिवाय, तुम्ही काय कमी मिळवून जमा केले आहे! आणखी हाव कशासाठी? ही वृत्ती आतां सोडा."

ते ऐकून राजू संतापला. म्हणाला–"मूर्ख आहेस, लहान तोंडी मोठा घास घ्यायचा सोड. मी चोरी करतो आहे ती पोटाला पोटभर मिळत नाही म्हणून नाही. आपल्या वाडवडिलांपासून आलेली ही वृत्ती आहे. माझ्या आजोबांच नुसते नाव कानावर पडलं तर पोलादी तिजोऱ्या थरथर कांपत. तूसुद्धा तसाच शूरसाहसी होशील असे मला वाटत होते. तू माझ्या पोटी जन्माला आलास. मी तुझ्या तोंडी असलं बोलणं ऐकायला मुळीच तयार नाही. टीचभर पोटाची खळगी भरायला वावभर काम करावे लागत. परंतु ज्यांना दुसरी कामे करतां येत नाहीत त्यांनाच ते कष्ट सहन करावे लागतात. आपण पिढ्यान् पिढ्या चोर म्हणून जगात ओळखले जात आहोत. आतां एकाएकी चांगले व्हायचं ठरविलं तर लोक हंसतील."

भीमू म्हणाला–"तुमचा वंश पिढ्यान् पिढ्या चौर्यवृत्तीच करीत रहावा असा विचार करणे, यात मोठा थोरपणा असेल असे मला वाटत नाही. ही वृत्ती घृण्य व धोक्याची आहे; जगही पालटू लागलं आहे."

"तरमग तू आपल्या इच्छेप्रमाणे स्वतःची वृत्ती निवड. पुढे तुला माझ्याच मार्गाने यावे लागेल." राजू मुलाला म्हणाला.

भीमूला बापाचा विचार बदलण्याचा मार्ग सुचला नाही. त्याने बापाचे घर सोडले आणि स्वतःच्या पोटापाण्याची काळजी स्वतः वहायचे ठरविले. भीमूच्या वयाची मुले अनेक प्रकारची कामे करून उदरनिर्वाह चालवीत. परंतु 'चोराचा पोर' म्हणून कोणी त्याला जवळ येऊ देई ना. गवळी, फळ भाजीवाले देखील त्याला संशयी नजरेने पहात होते.

निराश होऊन घरी परतलेल्या मुलाला पाहून बाप म्हणाला–"काय रे बाबा, नीतिधर्माने जगायचा मार्ग मिळाला का?"

"तुम्ही अट्टल चोर आहां, हे ज्यांना माहीत आहे ते मला कसे जवळ येऊ देणार?





तुमचा मुलगा म्हणवायला सुद्धा लाज वाटते, म्हणून तुम्हांला किंवा मला ओळखणार नाहीत अशा जागी जाऊन रहायचा विचार करतो आहे." भीमू म्हणाला.

"चार दिवस धक्के खाल्ल्यावर स्वत:च परत येशील." राजू म्हणाला.

"परत येईन, परंतु धक्के खाऊन पश्चात्ताप करीत येणार नाही. दरोडे वगैरे केल्याशिवाय पोट भरतां येत नाही हा तुमचा विचार बदलेल त्याच दिवशी परत येईन! आपलं पोट भरण्यासाठी इतरांच्या पोटावर पाय आणणं ही माणुसकी नाही." असे सांगून भीमू गांव सोडून निघून गेला.

भीमू निघून गेल्यावर राजूला जेवण जाईनासे झाले. चोरी करायला जाणं त्याने सोडलं. राजूच्या राहण्यात व वागण्यात दिसू लागलेला बदल सर्वांच्या दृष्टीस आला. हळूहळू लोकांच्या मनातली चोराची भीती कमी होऊ लागली.

परंतु तितक्यात एका व्यापाऱ्याच्या घरात एका लाखाची मोठी चोरी झाली. ते ऐकून राजू धक्कच झाला. ती चोरी त्याने केली नव्हती. परंतु लोकांना त्याचीच शंका येत होती. राजूने त्या व्यापाऱ्याला भेटून ती चोरी त्याने केली नसल्याचे सांगितले.

परंतु राजूच्या बोलण्यावर कोणाचाच विश्वास बसला नाही. त्या परिसरात त्याला कळल्याशिवाय कोणतीही चोरी त्यापूर्वी झाली नव्हती. म्हणून निर्दोषी असल्याचे लोकांना पटावे यासाठी चोराला धरून देण्याची जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली होती.

चोऱ्या चालू होत्या. रात्री राजू डोळ्यात तेल घालून सावध राही. परंतु काही फायदा झाला नाही. चोराला पकडवून देण्याची प्रतिज्ञा राजूने सर्वासमक्ष केली होती, परंतु तो ती पुरी करू शकला नव्हता.

आणि गंमत अशी की मध्यंतरी राजूच्या घरातच चोरी झाली. चोराला धरण्यासाठी राजू बाहेर फिरत असता चोर त्याच्या घरात शिरला आणि होतं नव्हतं ते सर्व झाडून घेऊन निघून गेला. ते ऐकून राजू धावत घरी आला तेव्हां त्याने बायकोला हातपाय बांधलेल्या अवस्थेत पाहिले. राजूने कित्येक वर्षे चोरी करून जे काही जमविले होतें ते सर्व गेले आणि राजू भिकारी झाला.

ही गोष्ट कळल्यावर गावकऱ्यांना राजूविषयी जो संशय येत होता तो पार नाहीसा झाला. श्रीमंत लोकांना त्याच्याबद्दल सहानुभूती वाटू लागली. ही सहानुभूती खरी नसून त्यांना वाटत असलेला आनंद त्या रूपे व्यक्त होत असल्याचे राजूला कळत होते.

आपलं सर्वस्व घालवून बसल्यावर राजूने पुन्हा आपला जुना धंदा सुरू करायचे ठरवून श्रीमंतांकडे जाऊन आपलं वहिवाटीचे बक्षिस मागायला सुरवात केली.

लोक म्हणाले—"हे बघ ही सोंगं पुन्हां करू लागलास तर तुझी पाठ शेकली जाईल, लक्षात ठेव!"

पूर्वी असे कोणी म्हणाला असता तर राजू त्याचे रक्तच प्याला असता. परंतु मूग गिळून आज गप्प राहिला. हा बदल कसा काय घडला, हे त्याचे त्यालाच कळेना.

त्या दिवशी रात्री राजू बायकोबरोबर गाव सोडून जायचे ठरवून निघाला. थोडे अंतर चालून गेल्यावर राजूला त्याचा मुलगा भेटला. दोघांनी परस्परांना प्रेमाने



मिठीच मारली. राजूने घडलेले वृ[illegible] मुलाला वर्णन करून सांगितले.

भीमू स्मित करून म्हणाला–"एवढे मनाला लावून घेऊ नका. गांवकऱ्यांनी तुम्हांला जिवंत सोडले याबद्दल देवाचे आभार माना. चला माझ्या घरी. पुढलं आयुष्य तेथेच घालवा."

"माझ्या नावाने थरथर कापणारे लोक मला कुत्र्याहून तुच्छ मानू लागले आहेत. हा बदल कसा काय घडला? मला कळत नाहीसे झाले आहे. माझ्यात झालेला बदल त्यांना कळू लागला आहे, असे म्हणायचं का?" राजूने मुलाला विचारले.

"तुम्हांला तुमच्या धंद्याचा अभिमान आणि विश्वास वाटे तोंपर्यंत श्रीमंत लोक तुम्हांला भीत असत. तुम्ही चोरी करण्याचे सोडलेत ही गोष्ट लोकांना पटावी यासाठी नाना तऱ्हेचे प्रयत्न केलेत. ते लोकांना कळलं तेव्हां तुमची भीती त्यांना वाटेनाशी झाली. आतां तुमचे विषाचे दांत काढले गेले आहेत. तुमच्याहून मोठा चोर जन्मला [illegible]असून [illegible] निघून गेला आहे. आतां श्रीमंत भितील तर त्याला, व त्याचे तोंड बंद करायला द्यायचं, ते देतील. तुमच्याकडे कशाला पाहतील? तुमचा हा धंदा तुमच्या हातचा गेला. या वृत्तीची लक्षणेच अशी असतात. एका काळचे मोठेपण कधी नाहीसे होतेच. समाजाला भारभूत झालेल्यांचे पतन होणारच!" भीमू म्हणाला.

"तू हे पूर्वी सांगितले असतंस तर ते माझ्या डोक्यात शिरलं नसतं. या नव्या चोराने माझं सर्वस्व लुटलं आणि त्याच्याबरोबर माझे डोळेही उघडले. यापुढे मी चोरी करणार नाही. मेहनत करून पोट भरणार." राजू म्हणाला.

"तो खरा चोर नव्हता. तुमच्यात बदल व्हावा म्हणून चोरी करायला आला होता." भीमू म्हणाला.

"अस्सं! मग कोण होता रे तो?" राजूने विचारले.

"मीच!" भीमू स्मित करून म्हणाला.





# राजाहून थोर

विशाल देशात राजा उदारसेन याने आपल्या प्रजेच्या सुखसोयीसाठी अनेक कायदे केले होते. परंतु त्या कायद्यांचा सामान्य प्रजेला विशेष असा काहीच फायदा झाला नाही. गरीबी वाढतच होती. अव्यवस्था कोठे आहे, दोष कोठे आहे, कळायला मार्गच नव्हता. ते कळावे म्हणून राजाने रक्तवर्ण नावाच्या आपल्या अत्यंत विश्वासू अशा अधिकाऱ्याला शोध काढण्यासाठी नेमले.

रक्तवर्ण वेश पालटून हिंडू लागला. तेव्हां त्याला देशातले श्रीमंत लोक आणि कांही अधिकारी सरकारी नोकरांना वश करून घेऊन प्रजेवर अत्याचार व अन्याय करीत असल्याचे, परंतु ते उघड बाहेर सांगण्याची छाती कोणाला नसल्याचे कळले. कारण अन्याय व अत्याचार करणारेच राजाचे सल्लागार होते.

रक्तवर्ण त्यांच्यावर नेमलेला महाराजांचा एक हेर आहे हे त्या अत्याचारी अधिकाऱ्यांनादेखील कळले.

त्यांनी त्याला बोलावून बजावले की, बऱ्या बोलाने तू आमच्याविषयी महाराजांना चांगलं सांगितलेस तर ठीक, नाहीतर तुला कसा वाटेला लावायचा हे आम्ही पाहून घेऊ. आम्ही सांगितल्याप्रमाणे वाग, नाही तर तुला व तुझ्या कुटुंबातल्यां प्रत्येकाला तुझ्या पापाची फळे भोगायला लागतील. रक्तवर्ण सावध झाला.

राजाकडे परत गेल्यावर गूढार्थाने, त्याने पाहिलेल्या व अनुभवलेल्या गोष्टी निवेदन केल्या त्या अशा:

"महाराज, देशात दुष्काळासारखी स्थिती कां उत्पन्न होते, गरीबी दिवसेंदिवस कां वाढत चालेली आहे, हे काही कळले नाही मला. परंतु एक गोष्ट माझ्या लक्षात आली



की, आपल्या राज्यात काही कर्तबगार व्यक्ती आहेत. काही जण माती खड्यांपासून धान्य उत्पन्न करणारे आहेत तर काही पाण्याचे ,दूध करू न दाखविणारे सिद्धपुरुष आहेत. एका देवाच्या मदतीने दुसऱ्या देवांकडून चाकरी कशी करवून घ्यायची हे माहीत असलेले सिद्धपुरुषही काही आहेत. समुद्राला बांध घालू शकण्याची सिद्धी त्यांना प्राप्त आहे. असे समर्थ पुरुष आपल्या राज्यात असता गरीबी फार काळ राहणेंच शक्य नाही."

रक्तवर्णाकडून हे कळल्यावर राजाला फार आनंद झाला. त्याने रक्तवर्णाचा सत्कार समारंभ ठेवून देशातल्या श्रीमंत सावकारांकडे अभिनंदनाची खास पत्रे पाठविली. रक्तवर्णाने आपल्याविरुद्ध काही न सांगितल्याबद्दल श्रीमंत लोकांनी रक्तवर्णाला भेटून त्याला मोठमोठी इनामे दिली.

अशा परिस्थितीत विशाल देशात त्या वर्षी पाऊस मुळीच पडला नाही. शेते वाळून गेली आणि पिके नष्ट झाली. अन्न धान्याचा दुष्काळ पडला. हाःहाकार उडून गेला.

तेव्हां उदारसेनाने रक्तवर्णाला बोलाविले व म्हणाला–"मागे तू मला म्हणाला होतास की खड्या मातीचे धान्य करणारे सिद्धपुरुष आपल्या देशात आहेत. आतां अशा सिद्धपुरुषांची गरज आहे. त्यांना बोलावून आणतोस का?"

"हे काम करायला धनगुप्त समर्थ आहे, महाराज! आपण त्याला बोलावून हे काम सांगितलेत तर तो 'ना' म्हणणार नाही, असे मला वाटते." रक्तवर्ण म्हणाला.

महाराजांनी निरोप पाठविताच धनगुप्त धावत येऊन हात जोडून महाराजांसमोर उभा राहिला. महाराज म्हणाले–"शेटजी, तुमच्या बलपराक्रमावर देशातली अन्नधान्य समस्या सुटणार आहे. अन्नधान्याचा दुष्काळ आहे, हे तुम्हांला माहीतच आहे. मी आठ-दहा मजूर दगड माती भरून आणायला देतो. तुम्ही त्याचे धान्य करून द्या. धान्याचे ढीग लागले पाहिजेत."

धनगुप्त चकित होऊन म्हणाला–"महाराज, हे कसं काय होईल?"

राजा संतापून म्हणाला–"वाद घालण्यात अर्थ नाही. लौकर जाऊन कामाला लागा."

तरी धनगुप्त साहस करून म्हणाला–"महाराज! आपल्याला कोणीतरी खोटं सांगितले असावे. खड्यामातीचे धान्य करून दाखविणारा कोणी या जगात जन्मला असेल असे मला नाही वाटत."

या खेपेस राजाचा राग रक्तवर्णाकडे वळला.

परंतु रक्तवर्ण थोडादेखील न घाबरतां म्हणाला–"धनगुप्त असे कां खोटे बोलता आहेत नकळे. मी स्वतःच्या डोळ्यांनी त्यांना दगडखड्याचे तांदूळ गहू करतांना पाहिले आहे. ते विशिष्ट-खडे व दगड ते रखूशेटकडे विकत घेतात, हेदेखील मला माहीत आहे."

ते ऐकून धनगुप्त दबकला. यात काही तरी गुपित असले पाहिजे असे राजाला वाटले. राजा लगेच बरोबर रक्तवर्ण व धनगुप्ताला घेऊन मुळात काय भानगड आहे, या गोष्टीची चवकशी करण्यासाठी



निघाला आणि त्याला सर्व कळलेंदेखील. रखूशेट तांदुळात सहजी खपतील असे खडे पोती भरून धनगुप्ताला विकत असे. धनगुप्त प्रत्येक नऊ पोती तांदुळाबरोबर एक पोते खडे मिसळीत असे.

"पाहिलेत प्रभो? हा एक पोते खडे नऊ पोती तांदुळात मिसळून दहा पोती तांदूळ करतो. कळलं ना आपल्याला या सिद्धपुरुषाचे सामर्थ्य? हे सामान्य माणसाला शक्य आहे का?" रक्तवर्णाने राजाला विचारले.

"अस्सं! ही सिद्धी याला प्राप्त आहे का?" असे राजा म्हणाला आणि त्याने शिपायाकरवी त्याला अटक करविली.

नंतर रक्तवर्णाकडे वळून राजाने विचारले–"म्हणजे तू म्हणालास त्या सर्वांतच काहीतरी गूढार्थ आहे, म्हणावयाचा? पुन्हा एकदां सांग पाहू!"

रक्तवर्ण म्हणाला–"दुधांत पाणी मिसळून विकणे म्हणजे पाण्याचे दूध करणे नव्हे का? देशातले सर्व व्यापारी अशा तऱ्हेने सर्व पदार्थ मिसळीचे विकत आहेत. लक्ष्मीची कृपा ज्यांच्यावर आहे ते सरकारी सेवकांना आपल्या पदरी नेमून त्यांच्याकडून वाटेल ती कामे करवीत आहेत, हे इतके मोठे समाजद्रोही आहेत, तरी, प्रजा त्यांच्याविरुद्ध बंड करीत नाही. म्हणजे या श्रीमंतांनी जनसमुद्राला बांध घातल्यासारखेच नव्हे का? त्यांचे त्यांना दुप्पट फळ मिळते आणि पैशाकडे पैसा ओढला जातो."

सर्व गोष्टी ऐकून राजा आश्चर्यचकित होऊन म्हणाला–"देशात इतका अन्याय चालू असता मी तुझ्यावर टाकलेली जबाबदारी न ओळखून तू घरी स्वस्थ बसून राहला आहेस का?"

"मी तरी काय करू सरकार? आपण केलेले कायदे मोडणाऱ्याला मोठमोठ्या शिक्षा ठरविलेल्या आहेत. परंतु मी अपराध्याची चवकशी केली ते सर्व कायदे मोडणारेच होते. परंतु त्यांच्यापैकी कोणालाच शिक्षा झाली नाही. म्हणून मला वाटले की ते आपणाहून जास्त बलाढ्य थोरपुरुष असले पाहिजेत. म्हणून त्यांच्याविरुद्ध समक्ष आपणांकडे येऊन तक्रार करू शकलो नाही." रक्तवर्ण म्हणाला.

"तू म्हणालास ते बरोबर आहे. कायदा मोडूनही त्यांना शिक्षा झाली नाही, म्हणजे ते राजापेक्षा मोठेच झाले. असे लबाड लोक देशात फार वाढले आहेत, म्हणून देशाची ही अधोगती झाली. यात सुधारणा झाली पाहिजे." असे सांगून उदारसेनाने लगेच आवश्यक कारवाई करून देशात जो भ्रष्टाचार पसरला होता त्याला आळा घातला. लबाड लोक कैदेत पडले. राज्यकारभारात राजा जातीने लक्ष देऊ लागला. हळूहळू देशातली गरीबी दूर झाली.



# वडाची छत्रछाया

वज्रगिरीचे महाराज फार पराक्रमी होते. जवळपासची लहानमोठी राज्ये जिंकून त्यांनी आपल्या राज्याचा खूप विस्तार केला. बापाची ही राज्याकांक्षा युवराज रत्नपाल याला आवडली नाही.

एकदां तो शिकारीला गेला असतां त्याला एक मोठे वडाचे झाड दिसले. त्याच्या पारंब्या जमिनीपर्यंत लोंबत होत्या. ते झाड पाहतांच त्याला बापाची आठवण झाली. त्या झाडाचा विस्तार जेथवर होता तेथवर दुसरे झाड एकही नव्हते. म्हणून त्याने ते झाड मुळासकट तोडून जाळून टाकले आणि त्या जागी दुसरी झाडे लावली.

काही दिवसांनी तो पुन्हा येऊन पाहतो तर तेथे एकही झाड नव्हते. वडाच्या सावलीत पारंब्यांना धरून झोपाळा करणाऱ्या धनगरांच्या मुलांनी ती सर्व झाडे रागाने उपटून टाकली होती. तेव्हां रत्नपालला स्वतःची चूक कळली. त्याने दुसरे वडाचे झाड तेथे आणून लावले. त्याच्या रक्षणासाठी कांटेरी कुंपण लावले आणि आपल्या वडिलांचा द्वेष करायचे सोडले.





# भक्तीची भेट

एका गावी एक शिकारी रहात असे. तो सामान्य शिकारी नव्हता. तो रानटी श्वापदांना जिवंत धरून पिंजऱ्यात ठेवी आणि कोणी राजाने प्राणिसंग्रहालयात ठेवायला विकत घेतल्यास विकून पैसे मिळवी.

एकदां एक चवदापंधरा वर्षाचा मुलगा त्या शिकाऱ्याकडे येऊन म्हणाला–"या गावात एक बाई आहे. दर शुक्रवारी तिच्या अंगात देवी येते. कालीमाता तिच्या तोंडी बोलते. तिच्या दर्शनाला दूरदूरचे लोक येतात आणि तिला अनेक वस्तू भक्तिभावनेने भेट देतात. परंतु ही सर्व लबाडी आहे. ही लबाडी बाहेर काढण्यासाठी तू मला मदत केली पाहिजेस."

"मी काय करावे म्हणतोस?" त्या शिकाऱ्याने त्या मुलाला विचारले.

त्या मुलाने मनात जी युक्ती योजली होती ती सांगितली.

दुसऱ्या दिवशीच शुक्रवार होता. तो शिकारी पार्वती नावाच्या त्या बाईच्या घरी गेला. त्या वेळी त्या बाईच्या अंगात आले होते. तिच्या चारीबाजूला पुष्कळ भक्त मंडळी जमली होती.

शिकाऱ्याने पार्वतीचे पाय धरले व म्हणाला–"माते देवी, मी इतके दिवस तुझ्यावर विश्वास न करून किती पाप केले असेल कोणास ठाऊक? आज प्रत्यक्ष दर्शन घडल्यावर माझे डोळे उघडले. पुढल्या शुक्रवारी मी आपली भेट,–चरणी अर्पण करीन. या पूर्वी एकाही भक्ताला साध्य झाली नाही अशी तुझ्या ती स्वीकारून माझ्यावर अनुग्रह कर माते!"

पार्वतीच्या आलेल्या अंगात कालीमातेने या नव्या भक्ताला आशीर्वाद दिला.

शिकारी निघून गेल्यावर सर्व भक्त विचार करू लागले की हा भक्त कोणती

श्री अ. स. देसाई

बरे भेट देवीसमोर ठेवणार असेल? आपल्यापैकी कोणालाही शक्य होणार नाही, अशी भेट म्हणे. सर्वांना फार उत्सुकता होती ते पाहण्याची. म्हणून पुढल्या शुक्रवारी भक्तमंडळींची खूप गर्दी जमली होती.

नवा भक्त बराच वेळ झाला तरी आला नाही. भक्तमंडळींना प्रसाद आशीर्वाद देऊन निरोप द्यायची वेळ सुद्धा झाली. पार्वतीच्या अंगात आलेल्या कालीमातेला राग आल्यासारखा दिसला. त्या नव्या लबाड भक्ताला देवी शाप देणार, इतक्यात शिकारी आला. त्याच्या हातात भेट काहीच नव्हती.

"कायरे, तू भेट आणतो म्हणाला होतास ना? कुठे आहे भेट? मूर्खा, माझ्याजवळ ही लुच्चेगिरी का?" पार्वती गरजली.

"भेट आणली आहे, बाहेर आहे माते. ये दाखवितो." शिकारी म्हणाला.

पार्वती बरोबर सर्व भक्तमंडळी बाहेर आली. बाहेर एका पिंजऱ्यात एक वाघ मागेपुढे येरझारा घालीत होता.

"हे पहा, माते, तुझे वाहन आहे! या भक्ताची ही अल्प भेट स्वीकारून आपल्या वाहनावर बस." असे म्हणत शिकारी पिंजऱ्याचे दार उघडू लागला.

सर्व भक्तमंडळींच्या सर्वांगावर शहारे उभे राहले. वाघ डरकाळ्या फोडीत होता.



पार्वती मोठ्याने ओरडून म्हणाली–"नको, नको रे! दार नको उघडूस!

"अशी भितेस का माते? आपल्या वाहनावर स्वारी करून सर्व भक्तांना दर्शन दे." असे म्हणत शिकारी पिंजऱ्याचे दार उघडू लागला.

पार्वती घरात पळून जाऊ लागली. शिकारी तिची वाट अडवून म्हणाला–"आतां हे नाटक तू बंद करतेस की नाही? तू कालीमाता असशील तर आपल्या वाहनावर निःशंकपणे बस; नाहीतर इतके दिवस तू या भक्तमंडळीस फसवीत होतीस हे कबूल कर. या पापाचं प्रायःश्चित्त म्हणून वाघाने तुला गिळलं तरी हरकत नाही."

पार्वतीची बोबडी वळली होती. आता आपणाला या संकटातून कोण वांचवितो म्हणून चहूकडे ती पाहू लागली. भक्तांना तिचा खोटेपणा चांगला कळला. पार्वतीचा नवरा तिच्या तर्फे वकीली करायला आला तर सर्व लोकांनी त्याला बाजूला ढकलले.

"माझ्यावर त्या वाघाला सोडू नकोस. मी आजपर्यंत लोकांना फसवीत आले!" पार्वती ओरडली.

सर्व भक्त चिडून पार्वतीला शिव्याशाप देत निघून गेले. तिच्या नवऱ्याने सर्व भक्त मंडळींना त्यांनी आणलेल्या भेटी परत न्यायला सांगितल्या. शिकारी पिंजरा घेऊन निघून गेला. तो मुलगा शिकारी गेला त्या वेळेपासून त्याच्या घरीच बसून वाट पहात होता. परत आल्याबरोबर त्याने शिकाऱ्याला विचारले–"काय झाले?"

"तू म्हणालास तसेच झाले. त्या बाईने आपली लबाडी कबूल केली. परंतु या जगात पोट भरायला लोक असल्या किती लबाड्या करतात? परंतु तू याच एका बाईच्या पाठीशी लागण्याचे कारण काय? तिच्यावरच तुझा एवढा राग कां?" शिकाऱ्याने विचारले.

"मला तिच्यावर राग नाही. ती माझी आईच आहे. माझ्या वडिलांनी तिच्याकडून ही सर्व लबाडी करविली. ते काही कामधंदा करीत नाहीत आणि अशातऱ्हेने पैसे मिळविण्याचा धंदा त्यांनी सुरू केला आहे. मला कळू लागल्यापासून मला हे सर्व आवडलं नाही. ही लबाडी लोकांना कळली तर आईवडिलांवर मोठे संकट येईल या भीतीने त्यांना वांचविण्यासाठी मी हा उद्योग केला. तुझ्या मेहरबानीने हे काम झाले. तू केलेल्या या मेहनतीबद्दल हे बक्षिस घे." असे म्हणत मुलगा शिकाऱ्याला काही पैसे देऊ लागला.

"अरे तू माझ्या करवी एक पुण्यकार्य करविलेस. त्या बद्दल बक्षिस घेऊन मी पाप करू होय?" असे सांगून तो शिकारी त्या मुलाला निरोप द्यायला गल्लीच्या टोकापर्यंत गेला.





# नवरा मुलगा

श्रीरामपूर गावी रघुनाथराव व रुक्मिणी नावाचे नवराबायको रहात असत. त्यांनी अनेक व्रते, अनुष्ठाने व नवस केले, परंतु त्यांना अपत्य झाले नाही. परंतु एके दिवशी त्यांच्या घरी एक साधू आला. त्याने रुक्मिणीबाईंना चिमुटभर कोणाचा तरी अंगारा दिला आणि तो पाण्यात घालून प्याल्यावर नक्की मुलगा होईल असे सांगितले. त्या मुलाचे लग्न होईपर्यंत तो अर्धवटसा राहील आणि लग्न झाल्याबरोबर त्याला सामान्य बुद्धीचा लाभ होईल, असे सांगून त्याचे नाव 'नवरा मुलगा' असेच ठेवावे असे साधूने सुचविले.

साधूने सांगितले होते तसेच सर्व घडत गेले. एक वर्ष उलटण्याच्या आत रुक्मिणीबाईंना मुलगा झाला. बारशाच्या दिवशी त्याचे नांव 'नवरामुलगा' असेच ठेवण्यात आले. नावाप्रमाणे मुलाने असावे म्हणून आईवडील त्याला नवऱ्यामुलासारखे सजवून ठेवीत.

मुलाला पांचवे वर्ष लागतांच अक्षराभ्यास करवून मुलाला शाळेत घालण्यात आले. वयात येईपर्यंत तो नावापुरता शाळेत जात असे. विद्याभ्यासाचा संस्कार त्याच्यावर झाल्याचे चिह्न मात्र दिसत नव्हते. नंतर त्याने शाळेत जायचेच सोडले आणि जांवयासारखा कद नेसून आणि उभे गंध लावून तो गावात हिंडू फिरू लागला. दिसायला मुलगा बऱ्या पैकी होता आणि नावचमुळी 'नवरामुलगा' होते त्याचे. अशा अर्धवटाला गावात कोण मुलगी देणार?

एके दिवशी रघुनाथरावांना बायकोला व मुलाला बरोबर घेऊन दूर गावी जावे लागले. वाटेत एका गावाच्या वेशीवर त्यांची गाडी थांबली वाटेवर लोकांची गर्दी होती. कसलं तरी भांडण चाललं

होतं. जवळच एका घरी लग्नसमारंभ[illegible] तयारी दिसली. हुंड्याबद्दल भांडण निघाल्यामुळे वरपक्षाचा वधूपक्षाशी खूप वादविवाद चालू होता.

हे भांडण एवढ्यावर थांबणार नाही आणि गाडी पुढे जाणे शक्य नाही असे वाटले. 'नवरा मुलगा' गाडीतून उतरला आणि गंमत पहात हिंडू लागला. त्याला मांडवात वाजंत्र्यांचा आवाज ऐकू आला. मांडवात जाऊन लग्नाची गंमत पाहण्याचा विचार करून तो मांडवात शिरला. भटजींनी त्याच्याकडे काहीसे संशयी मुद्रेने पहात विचारले–"कोणरे बाबा, तू?"

त्याला वाटलं की नाव विचारीत असावेत. म्हणून नवऱ्यामुलाने उत्तर दिले– "मी 'नवरामुलगा' आहे!"

भटजींना वाटलं की भांडण संपलं असावे. म्हणून नवऱ्यामुलाला पुढे पाठवून दिलं असावे, मुहूर्त जवळ येऊन ठेपला होता. मुलगी पाटावर येऊन बसली होती. म्हणून भटजींनी नवऱ्यामुलाला पाटावर [illegible] सुरवात केली.

बाहेर भांडण चालूच होते. मुलीचा बाप धावत आत आला, लग्न मोडल्याचे सांगायला आणि मुलीला घरात पाठवायला. परंतु लग्नविधी बराच उरकलेला होता. 'नवरामुलगा' निश्चितपणे सर्व धार्मिक-विधी पुरोहिताच्या म्हणण्या प्रमाणे करीत होता. मुलीचा बाप, भानगड काय आहे, नंतर पाहू असा विचार करून काही बोलला नाही आणि पहात उभा राहिला.

अशातऱ्हेने नवऱ्यामुलाचा विवाह समारंभ संपला. त्याच्या आईवडिलांना काही प्रयत्नच करावा लागला नाही. मुलाचे लग्न अनायास झाल्याचे पाहून त्यांना आनंदच झाला. साधूने सांगितले होते तसे लग्न झाल्याबरोबर 'नवऱ्यामुला'वर शाळेत अभ्यासाचा जो संस्कार झाला होता तो सर्व त्याला आठवला आणि तो त्या दिवसापासून चांगला शिकल्या सवरलेल्या मुलासारखा वागू लागला.



# पैज

कांजीवरमचा राजा चंद्रवर्मा याच्या दरबारात एके दिवशी एक ज्योतिषी आला आणि राजाला म्हणाला–"एका महिन्याच्या आत तुमचे राज्य दुसऱ्याच्या हातात जाईल."

राजाचा ज्योतिष शास्त्रावर विश्वास होता, म्हणून घाबरून गेला. ती गोष्ट प्रधानाच्या लक्षात आली. तो ज्योतिष्याला म्हणाला–" ते झालं नाहीं तर तुमचा शिरच्छेद होईल, लक्षात ठेवा."

"आणि मी म्हटल्यासारखं झालं तर एक लक्ष वराह देण्याची पैज मारायला तयार आहां का, प्रधान?" ज्योतिष्याने ठासून विचारले.

प्रधानाने ते मान्य केले. त्याच दिवशी मंत्र्याने चंद्रवर्माला काशीयात्रेला पाठविले आणि सर्व राज्यकारभार स्वतःच्या हाती घेतला.

एक महिना होऊन गेल्यानंतर राजा तीर्थयात्रा संपवून परत आला आणि पुन्हा सिंहासनावर बसला.

ज्योतिष्याने प्रधानाकडे पैज हारल्याबद्दलचे एक लाख मागितले.

मंत्र्याने क्षणभर विचार केला आणि ज्योतिष्याला निमूटपणे लाख वराह दिले.





# आशेवर पाणी फिरले

**ची**न देशातल्या एका डोंगराळ प्रदेशात एक देवीचे देऊळ प्राचीन काळातले होते. रात्री त्या देवळात जो कोणी झोपतो, देवी त्याच्या इच्छा पूर्ण करते, असा लोकांचा विश्वास होता.

त्या देवळापासून थोड्याच अंतरावर चिन नू नावाचा एक तरुण युवक रहात असे. तो एखाद दिवशी कामाला जाई तर तीनचार दिवस आरामाने झोपा काढी. त्याला एके दिवशी देवीचा महिमा कळला.

चिन नू त्या डोंगरावरच्या देवीच्या देवळात गेला आणि देवीला नमस्कार करून देवळातच झोपला. रात्री त्याला एक स्वप्न पडले.

स्वप्नात त्याला देवीने दर्शन देऊन म्हटले–"तुझ्या मनातली इच्छा मला कळली आहे. मी तुला दररोज दहा सोन्याची नाणी मिळतील अशी व्यवस्था करून देते." परंतु तुला कधी सुख मिळेल का?"

तो म्हणाला–"माते! तू माझ्यावर एवढी कृपा केलीस तर मला आणखी काय पाहिजे?"

"तथास्तु!" म्हणून देवी अंतर्धान पावली.

चिन नूला त्यानंतर झोप लागेना. त्याने उठून पाहिले तर त्याला बाजूला एक पिशवी दिसली. हात घालून पाहिले तर खरोखरच आत नाणी असल्याचे कळले.

देवीचा महिमा खरा ठरला. चिन नूने ती दहा नाणी आपल्या खिशात टाकली आणि पुन्हां पिशवीत हात घालून पाहिला, परंतु एकही नाणे त्याच्या हाताला लागले नाही. यावरून हे स्पष्ट झाले की एका दिवसात एकदांच दहा नाणी मिळणार.

चिन नू पिशवी घेऊन आपल्या गावी परतला. त्याला दररोज जी दहादहा नाणी मिळत तेवढ्यावर त्याला पोटा पाण्याला पुरेसे मिळू लागले.

परंतु पिशवी मिळाल्यानंतर त्याने काम धंदा करण्याचा विचार कायमचाच मनातून काढून टाकला. खायचं प्यायचं आणि झोपायचं, एवढेच काम. मग खाल्लेले पचायचं कसे? तेव्हां त्याला वाटू लागलं की, जगायचं म्हणजे फक्त पोट भरणे नाही.

गावात फिरत असतां त्याला एक सुंदर मुलगी दिसली. ती एका श्रीमंत माणसाची मुलगी होती. चिन नूने तिच्याशी लग्न करण्याचे मनाशी ठरवून तिच्या बापाला विचारले. तेव्हां तो म्हणाला–"तू एक हजार नाणी कन्याशुल्क म्हणून द्यायला तयार असलास तर मी आपली मुलगी देईन."

चिन नूच्या सुपीक डोक्याला एक शक्कल सुचली. तो आपली पिशवी घेऊन एका सावकाराकडे गेला. पिशवीचा महिमा प्रत्यक्ष दाखवून त्याने ती पिशवी सावकराकडे गहाण ठेवली आणि एक हजार नाणी कर्ज मागून घेऊन त्या मुलीच्या बापाला दिली, त्या श्रीमंत माणसाने चिन नूशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले.

चिन नूच्या आयुष्यात कष्टाला सुरवात त्याचे लग्न झाले त्या दिवसापासून झाली.



बायको खुष रहावी व पिशवी परत मिळावी. यासाठी तो अंग मोडून काम करू लागला, त्याच्या सासऱ्याकडे पैसा खूप होता, परंतु त्याने कर्ज द्यायला सुद्धा नकार दिला. त्याची बायको त्याला सांगू लागली की, काहीतरी व्यापार करून पैसे मिळवा आणि समाजात मान मिळवा. त्यासाठी त्याने व्यापार सुरू केला. परंतु त्याला व्यापाराचा अनुभवच नव्हता, थोड्याच दिवसात दिवाळे निघाले. सावकाराचे कर्ज फेडण्याचा अवधी पुरा होत आला. वेळेवर कर्ज फेडले नाही तर ती पिशवी कायमची जाणार हे त्याला माहीत होते आणि कर्ज फेडायला एक पैदेखील जवळ नव्हती.

अवधी संपायच्या एक दिवस आध[illegible] त्याने आपल्या बायकोकडे पैसे मागितले. आपला पती मूर्ख व नालायक असल्याची तिची खात्री झाली होती. म्हणून ती म्हणाली–"अरे, पण तुला त्या पिशवीची एवढी फिकीर कां? शिवाय त्या पिशवीच्या भरंवशावर का तू माझ्याशी लग्न केलेस?"

तेव्हां चिन नूचा पारा चढला आणि त्याने बायकोला खूप मारले. ती रुसून माहेरी निघून गेली.

बायको माहेरी निघून गेली त्यापेक्षां पिशवी हातातून निघून जात असल्याचे चिन नूला जास्त वाईट वाटत होते. रात्री त्याला झोपच लागेना. त्याने त्या सावकाराच्या घरात चोरी करण्याचे ठरविले. आणि त्याने आपली पिशवी चोरून आणली.

पिशवी मिळाल्यावर त्याला पुन्हां बायकोची आठवण झाली. त्याने सासऱ्याकडे जाऊन बायकोला पाठवून देण्याची [illegible] परंतु [illegible] चिन नूला परत पाठविले.

या अपमानामुळे त्याला फारच वाईट वाटले. भ्रमिष्टासारखा तो फिरू लागला. एकदां तो दारूच्या गुत्यात गेला आणि मनसोक्त दारू प्याला. त्याने आपल्या पिशवीतून दहा नाणी काढून गुत्तेदाराला दिली. गुत्तेदाराला वाटले की, पिशवीत आणखी पुष्कळ नाणी असली पाहिजेत. म्हणून दुकानदाराने ती पिशवी बळकावण्याचा प्रयत्न केला. तेव्हां चिन नूला राग आला. त्याने एक सोटा जवळ पडला होता तो घेऊन गुत्तेदाराच्या टाळक्यात घातला. लोकांची गर्दी जमली. राजाच्या शिपायांनी येऊन चिन नूला कैद केले.

आतां चिन नूच्या मनाला त्या पिशवीविषयी घृणा वाटू लागली. सर्व कष्टांच्या मुळाशी ती पिशवीच असल्याचे त्याला वाटू लागले. त्याने सर्वांसमक्ष ती पिशवी, एक भट्टी पेटलेली दिसली तीत, फेकून दिली आणि शिपायांबरोबर निघून गेला.





# करावे तसे भरावे

मदुरा नगरीत गोपाळ अय्यर नावाचे एक गृहस्थ राजाच्या दरबारात नोकरीला होते. त्यांना जो पगार मिळे तो त्यांच्या व त्यांची बायको राजलक्ष्मी दोघांच्या उदरनिर्वाहाला पुरेसा होता.

त्यांच्या शेजारपाजारी श्रीमंतांची घरे होती. उंच इमारतीत ते रहात. त्यांच्या बायका दररोज रेशमी साड्या नेसत आणि हिऱ्याचे दागिने घालीत. राजलक्ष्मीला साड्यांचा व दागदागिन्याचा मोह वाटू लागला. ती दररोज संध्याकाळी नवरा घरी आला की त्याच्या डोक्याशी कटकट करू लागली–"तुम्ही एवढे मोठे सरकारी नोकर आणि तुमची बायको गोणपाटे नेसून बुच्च्या हाताने राहते हे तुम्हांला आवडते का हो? मला तर बाहेर निघायला लाज वाटू लागली आहे. परंतु भाग्यात तुमच्याबरोबर संसार करायचे लिहिलं आहे ते चुकतं का?"

अय्यरांनी बायकोची समजूत घालण्याचा प्रयत्न करून पाहिला. म्हणाले–"अग! सरकारी नोकराला जो पगार मिळतो त्याला त्यातच संसार चालवायचा असतो. तू एवढी चांगली सुगरण तुला मी का सांगायला हवं?"

परंतु बायको हट्ट सोडायला तयार नव्हती. शेवटी कंटाळून जाऊन अय्यरांनी फावड्याने पैसे ओढायचे ठरविले आणि मिळेल त्या मार्गाने पैसे मिळवायला सुरवात केली. त्यांची वरची मिळकत इतकी झाली की दोन वर्षांत लाख दीडलाख रुपये जमले. बायकोची इच्छा पूर्ण झाली. तिला पाहिजे होत्या तशा रेशमी जरीकाठी साड्या आणि अंगभर दागिने घालायला मिळाले. अय्यरांनी एक घर स्वत: राहण्यासाठी बांधले आणि एक घर बांधून भाड्याने दिले. शिवाय दहा एकर जमीन पाटा-










खालची स्वतःच्या नावावर करून घेतली. एवढे वैभव मिळाल्यावर राजलक्ष्मी नवऱ्याला म्हणाली–"काय हो! एवढी मिळकत असता सरकारी नोकरी हवी आहे कशाला? घरात लागणारे धान्य आपल्या शेतातून येईल. भाडे येईल त्यावर इतर सर्व खर्च भागेल."

अय्यरांनी बायकोचा तोही सल्ला मानला आणि नोकरी सोडून दिली. परंतु त्यांच्या मनात ही शंका राहून गेली की उद्या कोणी विचारलेच की इतके पैसे कोठून आले हो तुमच्याकडे, तर सर्व बिंग फुटेल. परंतु चाणाक्ष राज्यलक्ष्मीने सुचविले–"अहो, तुमचा तो मित्र गोविंद शेट आहे ना, त्याला एक कर्जरोखा लिहून ठेवून घ्यायला सांगा. वर्षा दोन वर्षांनी तो फाडून टाकला की झालं."

त्याप्रमाणे गोपाल अय्यरांनी गोविंद शेटला सर्व समजावून सांगून एक लाखाचा कर्जरोखा लिहून त्यांच्याकडे ठेवून दिला आणि निश्चित झाले.

परंतु दैव दुर्विलास असा की गोविंदशेट एकाएकी आजारी पडून दोन महिन्यांच्या आत परलोकी गेला. त्याला कोणी वारस नव्हता, म्हणून त्याची सर्व इस्टेट सरकार जमा झाली. अधिकाऱ्यांनी त्याच्या घरातले सर्व कागदपत्र पाहिले त्यात गोपाल अय्यरांनी लिहून दिलेला कर्जरोखा होता. त्यांनी गोपाल अय्यरांकडे कर्जाची रक्कम फेडायला सांगितले. खोट्या तारखा कर्जरोख्यात होत्या व कराराप्रमाणे कर्ज फिटले नाही तर घर स्वाधीन करून घ्यायची कबुली लिहिली गेली होती. त्याप्रमाणे गोपाल अय्यरांची दोन्ही घरे जमीनजुमला सर्वांचा सरकारने ताबा घेतला. राजलक्ष्मीला अंगावरचे सर्व दागिने काढून द्यावे लागले तेव्हा कसेबसे 'कर्ज' फिटले.

गोपाल अय्यरांनी बायकोच्या सांगण्यावरून नोकरी सोडली होती, म्हणून उदरनिर्वाहासाठी भिक्षापात्र हाती धरणे भाग होते. दोघां नवरा बायकोंनी गांव सोडले आणि भीक मागून उरलेले आयुष्य काढले.





# संदीपचा व्यापारी

संदीप नावाच्या समुद्रकाठच्या एका व्यापारात पुढारलेल्या नगरात हीरादत्त नावाचा एक व्यापारी परदेशाशी व्यापार करीत असे. तो परदेशात माल पाठवी व त्याने पाठविलेल्या मालाला खूप मागणी असे. त्याला त्या व्यापारात फायदा देखील खूप होत असे. परंतु आश्चर्य म्हणजे त्याचा काही गोष्टींवर-ज्योतिष्य, मुहूर्त वगैरेवर फार म्हणजे अंधविश्वास होता.

संदीप नगरी इतर व्यापारीही होते. परंतु त्यांच्यापैकी एकालाही हीरादत्तची बरोबरी करतां येत नव्हती. त्यांच्या मनात, हिरादत्तचा वाढता व्यापार पाहून जळफळाट होई. त्याला कसे खड्डयात आणता येईल, हाच विचार ते नेहमी करीत. हेवा करणारात हीरादत्ताचा एक जवळचा नातेवाईक सोमदत्त नावाचा होता. हीरादत्ताचा शुभाशुभ मुहूर्त वगैरेवर जो विश्वास होता, त्याचा फायदा घेऊन त्याने हीरादत्ताचे मोठे नुकसान करण्याचे ठरविले.

एकदां हीरादत्ताने खूप कीमती माल गलबतात भरवून सुवर्णद्वीपाकडे जाण्याचे ठरविले. त्या साठी त्याने त्याच्याकडे जे भांडवल होते त्यातले अर्ध्याहून अधिक खर्च करून माल विकत घेतला आणि गलबतात भरविला. हीच संधी बरोबर आहे, असा विचार करून सोमदत्ताने आपल्या मित्रमंडळींचा सल्ला घेऊन एक कट केला. त्याने आपल्या काही लोकांना खलाशी म्हणून हीरादत्तच्या गलबतात बसविले. परंतु या कटासंबंधी हीरादत्तला थोडीदेखील माहिती नव्हती. नांगर काढून गलबत थोडे अंतर समुद्रात गेल्यावर सोमदत्ताच्या माणसांनी गलबताच्या तळाला बारीक बारीक भोके पाडली. गलबत सुटण्यापूर्वी ते सर्व लहानलहान होड्यातून



किनाऱ्यावर निर्विघ्नपणे पळून गेले. त्यानंतर काही वेळाने गलबत बुडू लागले. हीरादत्त आपल्या माणसांबरोबर होडक्यात बसून किनाऱ्यावर सुखरूप येऊन पोंचला. सर्व मालासकट ते गलबत बुडाले.

कोठेतरी चूक झाली असावी, भिण्याचे कारण नाही असा विचार करून हीरादत्ताने पुन्हां दुसऱ्या गलबतात माल भरला आणि निघाला. परंतु या खेपेसही सोमदत्ताच्या लबाडीमुळे गलबत बुडाले.

या दोन घटनांमुळे हीरादत्ताचा सर्व धीरच खचला. आतां व्यापार करण्यापुरेसे त्याच्याकडे भांडवलही उरले नाही. काही तरी अपशकून घडल्यामुळे आपल्यावर हे आकाश कोसळले असावे असा त्याचा समज होता. आतां आपल्या नशिबात समुद्रपार व्यापार करण्याचे लिहिलेले नाही अशी त्याची ठाम समजूत झाली होती. "माझा माल ज्या गलबतात असेल ते शीड उभारल्यावर लगेच बुडणारच."

हीरादत्तच्या मित्रांनी त्याच्या मनातली ही समजूत दूर करण्याचा अनेक प्रकारे प्रयत्न करून पाहिला. परंतु तो म्हणे– "माझे दिवस चांगले नाहीत हो, माझं एकही गलबत सुमुद्रावर तरंगणे शक्य नाही."

त्याच्या शत्रूंनी त्यांची ही समजूत दूर करण्याऐवजी दृढ व्हावी यासाठीच प्रयत्न केला.

परंतु संदीपनगराचा राजा प्रतापराय याला हीरादत्तबद्दल फार सहानुभूती वाटत असे. म्हणून त्याने हीरादत्तला प्रोत्साहन देऊन पुन्हां व्यापार सुरू करायला सांगितले. खजिन्यातून लागेल तेवढे भांडवल पुरविण्याची हमी सुद्धा दिली. परंतु हीरादत्ताचे मन पालटले नाही. तो म्हणाला– "महाराज! कशाला हो हे सर्व? माझं गलबत शीड उभारतांच बुडणार, हे ठरलेले आहे."

राजाने भर दरबारात हीरादत्ताचे मन वळविणारा कोणी आहे का विचारले, तेव्हा फक्त सोमनाथ नावाचा दरबारी जादुगार एकटा पुढे आला ती जबाबदारी घ्यायला. तो म्हणाला–"महाराज, मला काही दिवसाचा अवधी द्यावा, मी करतो जादू!"

सोमदत्ताने हीरादत्ताला निराश करण्यासाठी केलेली एक युक्ती म्हणजे त्याने एका ज्योतिष्याला बोलावून हीरादत्ताचा हात दाखविला आणि त्याच्याकडून आयुष्यात मोठमोठी कामे होणार नसल्याचे सांगवून त्याला कायमचा हताश करून सोडले.

ही गोष्ट सोमनाथ जादुगाराला माहीत होती. त्याने दरबारी ज्योतिष्यालाच हीरादत्ताचा हात पहायला सांगितले. त्याने हातच नव्हे तर हीरादत्तची जन्मकुंडली सुद्धा पाहून त्याचे भविष्य उज्वल असल्याचे सांगितले.

तरी हीरादत्त समुद्र पार व्यापार करायला तयार झाला नाही. म्हणाला– "समुद्रावरचा प्रवास माझ्या नशिबात नाही आहे, बाबा! एकदां नाही, दोनदां नाहीका गलबते बुडाली?"

"या खेपेस मी येतो तुमच्या बरोबर. मला जादू मंत्राची माहिती आहे, हे तुम्हांला देखील माहीत आहेच. मी तुमचे जहाज बुडणार नाही, याची जबाबदारी घेतो. शिवाय महाराज बंदोबस्तासाठी



जहाजावर आपले शिपाई पाठविणार आहेत." सोमनाथाने सांगितले.

"गलबत बुडणार हे नशिबात लिहिले असल्यावर तुझ्या जादूचा आणि मंत्राचा काय उपयोग होणार रे?" हीरादत्त निराशा दर्शवीत म्हणाला.

"माझी जादू तुम्हांला साधी वाटली का? तर मग आजच तीन प्रहरी दाखवितो." सोमनाथ म्हणाला.

त्याप्रमाणे हीरादत्त सोमनाथाच्या घरी गेला. सोमनाथाने पाणी भरून एक ग्लास हीरादत्तासमोर टेबलावर आणून ठेवला. त्याने हीरादत्ताला एक सुई दिली आणि ती पाण्यात टाकायला सांगितली. सुई बुडाली

आणि तळाला गेली. त्याने ती पाण्यातून काढून हीरादत्ताला देत ती पाण्यात तरंगते का ते पहायला सांगितले. हीरादत्ताने कित्येकदां पुन्हां पुन्हां पाण्यात टाकली आणि प्रत्येक वेळी ती पाण्यात बुडाली.

सोमनाथाने आपल्या मुलाला बोलाविले आणि हीरादत्तला फराळ करायला काही द्यायला सांगितले. हीरादत्त सोमनाथच्या मुलाबरोबर फराळ करायला घरात गेला. हीरादत्त गेल्याबरोबर सोमनाथाने सुई पुसून छान कोरडी केली. नंतर त्याने एका बारीक तारेच्या तुकड्यावर सुई ठेवून पाण्यात सोडली. तारेचा तुकडा पाण्यातबुडाला, परंतु सुई बुडाली नाही. त्याने हळूच खालचा तारेचा तुकडा काढून घेतला आणि सुई वर तरंगत राहिली. तारेचा तुकडा त्याने लपवून ठेवून दिला.

फराळ झाल्यावर हीरादत्त बाहेर येऊन पाहतो तर सुई तरंगत होती. तो थक्कच झाला. म्हणाला—"आश्चर्य आहे, बुवा!"

[illegible] तर माझा धंदा आहे! मी गलबतात असे-पर्यंत गलबत बुडणे शक्य नाही." सोमनाथ छातीठोकपणे म्हणाला.

सोमनाथाची जादू पाहून हीरादत्ताला थोडा धीर आला. त्याने पुन्हां एकदां समुद्र यात्रेची तयारी केली. या खेपेस बरोबर सोमनाथ असल्याची व राजाचे हेर असल्याची गोष्ट कोणाला कळू नये याची खबरदारी सर्वांनी राखली. खलाश्यांची निवड होत असतांना सोमदत्ताचे लोक याही खेपेस शिरले. परंतु सोमनाथ व राजाचे हेर वेष पालटून तयारच होते त्यांच्यावर पाळत ठेवायला. मध्यरात्रीच्या सुमारास लुच्चे गलबताला भोंक पाडायला निघाल्याबरोबर त्यांना कैद करण्यात आले. गलबत संदीपकडे लगेच परतले.

सोमदत्ताला व इतर व्यापाऱ्यांना आणि त्यांच्या माणसांना चवकशी होऊन उचित शिक्षा झाली. हीरादत्त पुन्हां पहिल्यासारखा समुद्रपार जाऊन व्यापार करू लागला.





# पितळ उघड झालं

एका गावात संताजी नावाचा एक शेतकरी त्याच्याजवळ जी थोडी जमिन होती, तिच्यात पीक काढून आपल्या छोट्याशा कुटुंबाचा उदरनिर्वाह चालवीत असे. त्या वर्षी पाऊस वाजवीपेक्षा जास्त पडल्यामुळे पिकाची नासाडी झाली. म्हणून त्याला सोनूशेट नावाच्या सोनाराकडे कर्ज काढावे लागले. तो धंद्यात जी लबाडी करी त्याच-बरोबर सावकारीसुद्धा करीत असे.

पुढे काही दिवसांनी संताजीची कोणी नातेवाईक म्हातारी वारली. तिने आपल्या जवळचे थोडे सोने संताजीला द्यायला म्हणून ठेवले होते. सोने हाती घेताच संताजीने सोनूशेटला त्यातले थोडे देऊन कर्जाची फेड केली, संताजीच्या बायकोने थोडे सोने देऊन सोनूशेट कडून एक माळ करवून घेतली. सोनूशेटने त्या सोन्यातले अर्धे सोने चोरले आणि बाकी सोन्यात तांबे मिसळून एक सुंदर माळ करून दिली. सोनूशेटची मुलगी संक्रांतीला माहेरी आली. ती संताजीच्या घरी भेटायला गेली. संताजीच्या बायकोने तिला ती नवी माळ दाखविली.

सोनूशेटच्या मुलीला ती फार आवडली. ती बापाकडे जाऊन भांडली. म्हणाली—"तुम्ही संताजीच्या बायकोला करून दिलात तसा सुंदर नग मला कां नाही करून दिलात? किती नाजुक आहे तो! माझी माळ घ्या आणि तसाच नग करून द्या, मी परत जायच्याआत. नाहीतर मी संताजीच्या बायकोचा मागून घेऊन जाईन. मग तिला दुसरा करून द्या."

सोनूशेटला विंचू चावल्यासारखे झाले. त्याने घाईघाईने तसाच एक नग करून दिला. घाईचे एक तसेच कारण झाले. त्याला दुसऱ्या गावी जायचे होते.









सोनूशेटची मुलगी त्या दिवशी रात्री [illegible] आपला नग घेऊन संताजीच्या घरी गेली. संताजीची बायको तो नग पाहून तिला म्हणाली–"किती झाली तरी लाडकी लेकच की नाही!" परंतु शोनूशेटच्या मुलीला संताजीच्या बायकोचा नगच जास्त आवडला. ती म्हणाली–"मावशी! आपण आपापल्या नगांची अदलाबदल करू या. तुमचा नग वजनात जास्त असेल तर मी तेवढे सोने देईन. तुमचा कमी भरला तर तुम्ही काही देण्याची गरज नाही."

संताजीची बायको नकार देऊ शकली नाही. दोघी सोनूशेटच्या घरी गेल्या. सोनूशेट गावाला गेला असल्या कारणाने त्याच्या बायकोने वजन करून पाहिले. मुलीचा नग एक मासा जास्त होता. लगेच नगांची अदलाबदल झाली.

दुसऱ्या दिवशी उजाडतांच सोनूशेटची मुलगी सासरी निघून गेली. तिच्या नवऱ्याने तो नग पाहून, संशय आला म्हणून की काय, घासून पाहिला. त्यात तांबे [illegible] सासऱ्याच्या घरी गेला आणि रागावून म्हणाला–"मामा! मुलीला केलेल्या दागिन्यातसुद्धां तुम्ही ही लबाडी करावी का?"

सोनूशेटला कळेना की त्याने खऱ्या सोन्याचा नग केला होता, तो कोठे गेला? संताजीच्या बायकोसाठी केलेला नग मुलीकडे कसा गेला? त्याने बायकोला बोलावून विचारले–"काय ग, मुलगी संताजीच्या घरी गेली एवढ्यात कधी?" गुपित बाहेर पडले तर नवरा जिवंत सोडणार नाही असे वाटून ती–"नाहीबाई!" म्हणाली.

सोनूशेटला जांवयाची क्षमा मागावी लागली. स्वतःचे नाव राखण्यासाठी संताजीकडचे चोरून ठेवलेले सोने वापरून नवा नग करून द्यायचे कबूल करावे लागले.

जावई म्हणाला–"तुम्ही नको करून द्यायला! सोनाराचे गुपित सोनाराला कळणार नाही का? मी करून देईन तिला हवा तसा!" असे सांगून जावई सोने घेऊन निघून गेला.






# महाबली हनुमान

रावण 'लंकायज्ञ' नावाचा यज्ञ करीत असल्याचे बिभीषणाला कळले. तो रामाला व वानरवीरांना म्हणाला–"रावणाचा हा होम पुरा झाला तर पोलादी देहाचे वीर व चतुरंग सैन्य यज्ञकुंडातून जन्माला येईल. मग रावणाला जिंकणे अशक्यच समजा! म्हणून रावणाचा हा यज्ञ भंग झाला पाहिजे."

परंतु ते व्हायचं कसं हा मोठा प्रश्न सर्वांसमोर उभा राहिला.

"अंगदाला 'अदृश्यकरणी' नावाची विद्या माहीत आहे. त्या विद्येचा प्रयोग करून रावणाच्या होमाला विघ्न आणणे शक्य आहे!" जांबुवंताने सूचना केली.

'अदृश्यकरणी' शक्तीचा प्रयोग करून अंगदाने अदृश्यपणे रावणाच्या अंतःपुरात प्रवेश केला आणि मंदोदरीला बुचडा धरून फरपटत ओढीत रावण होता तेथे आणले. ते पाहूनही रावण यज्ञकार्यातून परावृत्त झाला नाही. तेव्हां अंगद मंदोदरीला तेथून ओढून नेऊ लागला.

"त्रिलोक जिंकणाऱ्या शूर वीराच्या बायकोचे रक्षण करणारा कोणी नाही का?" असा मंदोदरी आक्रोश करू लागली. आतां मात्र रावणाला राहवले नाही. तो यज्ञवेदिकेवरून उठला आणि त्याचा यज्ञभंग झाला. अदृश्य रूपात असलेल्या अंगदाने मुकाट्याने तेथून पाय काढला.



"आतां तरी रामाबरोबर संधी कर!" असा सल्ला मंदोदरीने रावणाला दिला.

स्वतःच्या पराक्रमावर आणि अपूर्व शक्तिसामर्थ्यावर पूर्ण विश्वास असल्या कारणाने रामाशी शेवटपर्यंत युद्ध करण्याचे ठरवून रावण म्हणाला—"आपले बंधुमित्र, आप्तेष्ट, धाकटा भाऊ आणि लाडका मुलगा सर्वांचा युद्धात वध झाल्यावर रामाशी मी संधी करू म्हणतेस का? राम माझा या युद्धात वध करील असे समजूनच नाही का तू हा सल्ला दिलास? रामाने माझा वध केला, अशी कीर्ति त्याला मिळू देण्याऐवजी, मीच उपवास करून योगबलाने स्वतःचा कपाळमोक्ष करून घेऊन प्राणत्याग करतो. माझा वध करून बिभीषणाला राज्य देण्याची प्रतिज्ञा करणारा राम माझा वध करू शकणार नाही. त्याची प्रतिज्ञा भंग होईल. बिभीषणाला राज्यलाभ होणार नाही. माझा वध करून सीतेला सोडवून नेण्याची रामाची प्रतिज्ञादेखील आपोआप भंग होईल. राम चोरासारखा येऊन आपल्या बायकोला केव्हांही घेऊन जाऊ शकणार नाही. मी मेल्यावर तुम्ही सर्व सहगमन कराल त्या वेळी सीतेलासुद्धां बरोबर ओढा. सीतेच्या वियोगाने राम स्वतःच मरेल." असे बडबडत मतिभ्रम झाल्यासारखा रावण पश्चिमेकडे निघाला.

लंकेत ही परिस्थिती असतां लंकेपासून सहस्रयोजनांवर पाताळलोकात आणखी एक घटना घडत होती.

पाताळलोकांवर मैरावणाचे राज्य होते. त्याला निरनिराळ्या मंत्रविद्या अवगत होत्या. त्याच्या मोठ्या भावाचे नाव अहिरावण असे होते.

मैरावणाने नागलोकातून वासुकीची मुलगी चंद्रसेना हिचे अपहरण केले आणि आपल्याशी लग्न करून घेण्यासाठी तिच्यावर बळजबरी करू लागला. चंद्रसेना अप्रतिम रूपवती होती. तिने रामाला मनाने वरले होते व तोच माझा पती आहे असे मैरावणाला सांगितले होते. सीतास्वयंवराच्या वेळी ती नागकुमारांबरोबर गेली असतां रामाला तिने पाहिले होते. तेव्हांपासून ती रामाच्या मूर्तीची पूजा करीत असे.

लंकेत रावण पश्चिम किनाऱ्यावर पोचला. तेथे त्याने दर्भ पसरून ठेवले आणि त्यावर पडून उपवासाला सिद्ध झाला.

त्याच वेळी नारद तेथे आला आणि विचारू लागला—"रावणा, तुला कोणी बंधुमित्र उरला नाहीं असे वाटले का? तुझा मित्र, मोठा सख्या भाऊ मैरावण आहे ना, त्याला कसा विसरलास?" असे सांगून नारद निघून गेला.



ते ऐकतांच रावण नवीन उत्साहाने उठून बसला आणि डोळे मिटून त्याने एकदां मैरावणाचे स्मरण केले. त्या वेळी मैरावण चंद्रसेनेच्या महालात गेला होता. तेथे ती रामाच्या मूर्तीची पूजा करीत होती. ती मूर्त तिच्या हातातून हिसकावून तो तिला म्हणाला—"मी या रामाला धरून आणून कालीमातेला बळी देतो."

"तो रामच तुझा वध करील." चंद्रसेना म्हणाली.

"माझा वध करणे इतके सोपे आहे, असे वाटलं का तुला? या पाताळ लोकापासून सहस्र योजन खाली एका भयंकर गुहेत ठेवलेल्या एक रत्नांच्या पेटीत पांच

उघडतां एकदम 'घूं घूं' करीत वर आलेल्या पांचही भुंग्यांना एकदम ठार केले तरच मी मरणार. तेथे मी भयंकर भुते व पिशाच्चे नेमलेली आहेत. माझा वध करण्याची शक्ती त्रिलोकात कोणाच्याही अंगात नाही." असे म्हणत मैरावणाने रामाची मूर्त हिसकावून घेतली आणि जमिनीवर आपटली. त्या मूर्तीचे तुकडे होऊन गेले.

त्याच वेळी रावणाने स्मरण केल्याचा भास मैरावणाला झाला.

रावणाने डोळे उघडून पाहिले तेव्हां जमीन दुभंगली होती आणि त्याच्यासमोर मैरावण उभा होता. दोघे परस्परांना



रावणाने मैरावणाला रामलक्ष्मणांना वाटेला लावायला विनंती केली.

"मला पाहिजे होते तेच तर करायला तू सांगतो आहेस. उद्यां त्या दोघांना धरून घेऊन जाऊन कालीच्या चरणावर त्यांचा बळी देतो." मैरावण म्हणाला. रावण अत्यंत आदरपूर्वक मैरावणाला आपल्या महालात बोलावून घेऊन गेला.

हेरांकडून हे वर्तमान बिभीषणाला कळले तोंपर्यंत रात्र झाल्यामुळे रामलक्ष्मण झोपण्याच्या तयारीत होते. बिभीषण वानरांकडे आला आणि मैरावणाचा जो बेत होता त्याची कल्पना करून देऊन म्हणाला—"मैरावण रामलक्ष्मणांना अपहरण

सर्वांनी त्यांच्या रक्षणाची व्यवस्था केली पाहिजे." असे सांगून सर्वांना सावध करून बिभीषण निघून गेला.

हनुमानाने आपले शेपूट वाढविले आणि ते किल्लयाच्या कोटासारखे रामलक्ष्मणाच्या चारीबाजूला वेटोळी करून ठेवले. नंतर तो त्या वेटोळ्यावर बसून मुंगीला देखील आत प्रवेश मिळणार नाही अशातऱ्हेने डोळ्यात तेल घालून पाहारा देऊ लागला.

काही वेळाने बिभीषण पुन्हां आला व हनुमंताची पाठ थोपटून एकदा आत जाऊन रामलक्ष्मणांच्या हातात रक्षाबंधन बांधून ठेवले पाहिजे असे त्याने सांगितले. म्हणून हनुमानाने बिभीषणाला आत जाण्यापुरेशी शेपटीच्या वेटोळ्यांतून वाट करून दिली.

बिभीषण आपले काम पुरे झाल्यावर बाहेर येऊन म्हणाला—"हनुमंता! तो मायावी मैरावण कधी माझे रूप घेऊन, नाहीतर आपल्यापैकी कोणाचेतरी सोंग घेऊन येईल आणि तुला फसवील. म्हणून सावध रहा!" हनुमंताला सावध रहायला सांगून बिभीषण निघून गेला.

तो म्हणाला अगदी तसेच झाले. बिभीषण पुन्हा आला. हनुमंत त्याचा गळा धरून त्याच्या डोक्यात आपली गदा उगारीत म्हणाला—"मैरावणा! तुझ्या गमजा माझ्याजवळ नाही चालणार!"

"अरे, वेड्या! मग खरोखरच लबाडी केली का त्याने? माझे रूप घेऊन मैरावणच आला होता का? रामलक्ष्मणांना तो उचलून तर घेऊन गेला नाही ना?" बिभीषण विचारू लागला. हनुमंताने आपल्या शेपटीच्या वेटोळ्याच्या आत डोकावून पाहिले, रामलक्ष्मण तेथे नव्हते!

हनुमान आश्चर्यचकित होऊन तत्काळ हताश झाल्यासारखा जमिनीवर पडला. तेव्हां जांबुवंताने त्याला धीर देऊन म्हटले—"उठ रे, रामलक्ष्मणाचे रक्षण करू शकणारा तू एकटाच आहेस! हताश होऊन कसे चालेल?"

हनुमानाने बिभीषणाकडून पाताळ लंकेला जाण्याचा मार्ग विचारून घेतला आणि गरिमाशक्तीने आपले शरीर वाढवून उड्डाण केले.

पहिल्याने बिभीषणाचे रूप घेऊन आलेल्या मैरावणाने रामलक्ष्मणाजवळ जाऊन त्यांना लहान मूर्तीत बदलले आणि त्यांना आपल्या वस्त्रात लपवून पाताळ लंकेत प्रवेश केला. त्याने चंद्रसेनेला रामलक्ष्मणाला दाखविले व म्हणाला—"हा पहा, तुझा राम! आणि हा त्याचा धाकटा भाऊ लक्ष्मण. या दोघांना उद्यां कालिकेच्या चरणी वाहून



तुझे लग्न उरकून टाकतो," असे म्हणत दांत काढून हसला.

हनुमान पश्चिमेकडील समुद्रात शिरला आणि कमळाच्या कळी एवढे रूप घेऊन ठिणगीसारख्या चकाकत असलेल्या एका पर्वताजवळ पोचला. त्या पर्वताच्या शिखरावर गेल्यानंतर त्याला एक तुळतुळीत भोक दिसले. एक सूक्ष्मरूप धारण करून तो त्या बिळात शिरला आणि पाताळ लंकेत उतरून गेला. ते बीळ पाताळ लंकेच्या सिंहद्वारापर्यंत होते.

त्या सिंहद्वारावर एक महाबलवान तरुण राक्षस पाहरा देत उभा होता. त्याचे बळ व पराक्रम त्याच्या अंगातून जणकाही









ओसंडून पडत होते. हनुमानाला कां कोणास ठाऊक त्याला पाहून त्याच्याबद्दल आत्मीयता वाटली.

हनुमान सूक्ष्म रूपात असूनही त्या द्वारपालकाने हनुमानाला ओळखले व त्याला विचारले–"कोण रे तू? माझ्या दृष्टीस पडल्याशिवाय दारातून आत शिरण्याचा घाट होता .नाही का तुझा? हे पहा, तुझं मरण जवळ येऊन ठेवले आहे." असे म्हणत त्याने हनुमानाला मुठीत धरून आवळले. हनुमान त्या द्वारपालकाचा पराक्रम पाहून चकित झाला व कौतुक करू लागला.

"हा कोणी का असेना, माझ्यासारखाच माझी बरोबरी करू शकणारा दिसतो आहे ... लबाडीच करावी लागणार." असा विचार करून हनुमान हातपाय गळून गेल्यासारखा पडून राहिला.

आपला शत्रू हारलेला पाहून तो द्वारपालक आनंदाने हसत म्हणाला–"अरे मायावी, चोरा! तू मला काय म्हणून समजून माझ्याशी युद्धाला आलास? माझे नाव मत्स्यवल्लभ आहे. शूर महाबली हनुमान माझे वडील आहेत, समजले?"

त्या तरुणाचे ते बोलणे ऐकून हनुमान चकितच झाला. त्याच बरोबर त्याला भयंकर रागही आला. तो दातओठ चावीत म्हणाला–"अरे माशाच्या पोरा! जगविख्यात बालब्रह्मचारी हनुमान तुझा बाप काय? असलं खोटं बोलल्याच्या पापाचं प्राय:श्चित्त मी आत्तांच तुला देतो."

हनुमान आपल्या पोलादी मुठीने द्वारपालकाचा वध करण्यास सिद्ध झाला असतां एकाएकी त्याला ऐकू आलं–"प्रभो! घाई करू नका, थांबा!"

हनुमानाने लगेच मान वळवून पाहिले. विद्युतज्योतीसारखी एक सुंदर स्त्री धावत पळत येत असलेली हनुमानाला दिसली. ती हनुमंताच्या पाया पडून म्हणाली–"तो म्हणाला ते खरं आहे. माझे नाव सुवर्चला देवी. माझ्या वडिलांचे नाव दक्षिणसागर

असे आहे. असंख्य जलचर प्राण्यांची मी राणी आहे. आपण मला ओळखले नसणार, परंतु मी मात्र आपणांला ओळखते. एकदां समुद्र-पार करून जात असतां सिंहिका नावाच्या राक्षसिणीने आपली सावली धरून ओढली. तेव्हां आपण तिच्याशी युद्ध केलेत. त्या वेळी मी मत्स्य रूपात समुद्रात पोहोत होते. आपण सिंहिकेचा वध केल्यानंतर कपाळवर आलेला घाम बोटाने काढून समुद्रात टाकलात. त्या घामाचा एक थेंब माझ्या तोंडात पडला. मी तो गिळला. त्यामुळे मी गरोदर झाले आणि माझ्या पोटी हा मत्स्यवल्लभ जन्मला. म्हणून हा आपला मुलगा आहे."

ती म्हणाली ते संपताच एक दिव्यवाणी झाली–"हनुमंता! सुवर्चला म्हणाली ते खरे आहे. मत्स्यवल्लभ तुझा मुलगा आहे!"

हनुमंताला ते सर्व ऐकून व पाहून आश्चर्याचा धक्काच बसला. तो स्वतःला अद्याप सावरू शकला नव्हता, इतक्यात सुवर्चला देवी म्हणाली–"मत्स्यवल्लभ शैशवावस्थेपासूनच साहसी व पराक्रमी आहे. तो मोठा झाल्यावर पराक्रमी वीर होत असलेला पाहून मैरावण त्याला उचलून घेऊन गेला आणि त्याने आपला गुलाम करून ठेवले. तुमचा दर्शनाशिवाय त्याला दास्यमुक्ती नाही असे दिव्यवाणी म्हणाली होती. आजपासून तो दास्यातून मुक्त झाला आहे, हे आतां मी प्रत्यक्ष पाहतेच आहे."

"सुवर्चला म्हणाली ते सर्व खरे आहे. मत्स्यवल्लभ हा हनुमानाचा मुलगाच आहे!" दिव्यवाणी पुन्हा म्हणाली.

मत्स्यवल्लभाने हनुमानाला पायावर डोके ठेवून नमस्कार केला. हनुमानाने त्याला त्याचे दोन्ही खांदे धरून उभे केले आणि प्रेमाने भेटला.

सूवर्चला देवी फार आनंदात हनुमानाला म्हणाली–"तू चंद्रसेनेकडे जाऊन तिला मैरावणाच्या पंचप्राणांचे गूढ विचारून घे. तिला माहीत आहे. ती तुला सर्व मदत करील." असे सांगून व हनुमानाला नमस्कार करून सुवर्चला मत्स्यवल्लभाला बरोबर घेऊन निघून गेली.





## प्रतिकार

कित्येक शतकांपूर्वी परकीयांच्या भारतीय राज्यांवर स्वाऱ्या होत असत. भयंकर युद्धे होत आणि अमानुष अत्याचारही होत. कधीकधी स्वाऱ्या करणारे भारतीय किल्ले जिंकीत तर कधीकधी त्यांचा पराभव होई.

बगदादच्या खलीफाचा प्रतिनिधी अल हजाज टर्की हा इराण देशाचा शासक म्हणून काम करीत असे. त्याने आपले सैन्य सिन्ध प्रांतावर स्वारी करण्यासाठी अनेक वेळा पाठविले होते. परंतु प्रत्येक वेळी त्याच्या सैन्याला माघार घ्यावी लागली. त्या वेळी सिंध राज्याच्या गादीवर दाहीर नावाचा राजा होता.







शेवटी अल हृजाज याचा जावई महंमद बिन कासिम याला सेनापती नेमण्यात आले. तो हुशार व साहसी होता. कित्येक दिवस युद्ध केल्यावर त्याने सिंध देशाच्या राजाचा किल्ला जिंकला.

राजा व राजकुमार सर्वांना वीरगती मिळाल्यावर राणी व तिच्या सुना जोहार करून सती झाल्या.





परंतु राजाच्या दोन रूपवती राजकन्या जोहार जाण्यापूर्वी कासिमच्या हाती कैद झाल्या.

सेनापतीने राजाचा खजीना लुटला आणि स्वदेशी निघाला. दोघां राजकन्यांना तो बरोबर घेऊन गेला. त्याचा त्याला गर्व वाटत होता.





सेनापती कासिमने आपला सासरा अल हृजाज याला त्या राजकन्या नजराणा म्हणून दिल्या. परंतु अल हृजाजने त्यांना खलीफांकडे पाठविले. त्यांचे सौंदर्य पाहून खलीफा चकित झाला. त्याने त्यांना आपल्या जनानखान्यात पाठविले आणि सेनापतीला एका दूरच्या प्रांताचा शासक म्हणून नेमले.

काही काळ लोटल्यावर खलीफांना दोघां राजकन्यांनी सांगितले की, सेनापतीने यापूर्वीच आमच्याशी लग्न करून घेतले आहे. "आपल्या बायकांना कोणाला नजराणा म्हणून दिला तर तुमच्या देशात चालतो का ?" असे त्यांनी विचारले.





ते ऐकून खलीफांच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन भिडली. त्याने कासीमला कैद करून हजर करायला हुकूम सोडला आणि म्हणाला– "त्याला जिवंत नाही, त्याचे प्रेत हजर करा."



खलीफांच्या हुकमाची अंमलबजावणी होऊन कासिमचे प्रेत खलीफांच्या समोर आणून ठेवल्यावर दोघी राजकन्या स्मित करून म्हणाल्या– "कासिमने आमच्या अंगाला स्पर्शही केला नाही. त्याने आमच्या वडिलांचा वंशनाश केला, आम्ही त्याचा सूड उगविला, एवढेच!"



आपण फसल्याची जाणीव होताच खलीफाने चिडून जाऊन राजकन्यांचा वध करविला. त्या तयारच होत्या. कासिमच्या वधाला कारण झाल्याच्या दुःखाने स्वतः खलीफा लवकरच पैगंबरवासी झाले.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एकदा काही दर्यावर्दी व्यापाऱ्यांना समुद्रात एक बेट दिसले. पन्नास वर्षांपूर्वीपासून त्या वाटेने जाणाऱ्या येणाऱ्या दर्यावर्दी लोकांनादेखील ते बेट पूर्वी कधी दिसले नव्हते.

गलबताच्या मालकाने त्या बेटाच्या किनाऱ्यावर नांगर टाकला. तेथे एक शहर होते व नगर लोकही होते. अनेक प्रकारे ते जीवन व्यापन करीत होते.

परंतु व्यापाऱ्यांना त्यांपैकी कोणी ओळखले नाही. व्यापाऱ्यांनी कित्येकांनी हाक मारून बोलाविले, परंतु कोणी काहीच उत्तर दिले नाही. व्यापाऱ्यांनी त्या लोकांच्या अंगाला हात लावून पाहिला. परंतु हाताला त्यांचा स्पर्शही झाला नाही. अर्थातच त्यांना त्या गोष्टीचे आश्चर्य वाटले व ते राजवाड्यात गेले. राजाचा दरबार चालू होता.

गलबताच्या मालकाला, त्याला कोणी ओळखू शकणार नाही, हे माहीत होते. तो सरळ राजाच्या जवळ गेला आणि त्याच्या डोळ्यांना डोळे लावून निरखून पाहू लागला, परंतु आश्चर्य म्हणजे राजा तत्क्षण निश्चेष्ट होऊन पडला.

दरबारी मांत्रिक जवळ येऊन राजाची वैद्यकी परीक्षा करून म्हणाला–"जिवंत माणसांचा वारा राजाला लागला आहे. मी त्यांचा मारणहोम करतो." ते कानांवर पडताच व्यापारी पळून गेले आणि आपल्या गलबतात बसून आपल्या वाटेने निघून गेले. थोडे अंतर गेल्यावर त्यांनी मागे वळून पाहिले, तेथे ते बेट नव्हते.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास ६०० ०२६ या पत्त्यावर पाठवा.

२० मे १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल जुलै १९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.



# अमरवाणी

आर्तोवा, यदिवा दृप्तः
परेषाम् शरणागतः
अरिः प्राणा न्परित्यज्य
रक्षितव्यः कृतात्मना ॥ १ ॥

[संकटात पडलेला, शत्रु मग तो घमेंडखोर असला तरी शरण मागायला आला तर स्वतःच्या जीवाची फिकीर न करतां त्याचे रक्षण करणे शाहण्याचे कर्तव्य आहे.]

स चे द्भया द्वा, मोहा द्वा,
कामा द्वापि न रक्षति
स्वया शक्त्या यथा सत्वम्
तत्पापम् लोक गर्हितम् ॥ २ ॥

[भयभीत होऊन, अज्ञानाने किंवा कामातुर होऊन कोणी शरण मागायला आला तर त्याचे यथाशक्ति रक्षण न करील तो पापी लोकनिंदेस पात्र होतो.]

विनष्टः पश्चत स्तस्या
रक्षिण श्शरणागतः
आदाय सुकृतम् तस्य
सर्वम् गच्छे दरक्षितः ॥ ३ ॥

[शरणागताचे रक्षण न करणारा आपलं सर्व पूर्वसंचित पुण्य घालवून बसतो.]



# कावळा आणि घुबड

[ ४६ ]

विष्णुशर्मा राजकुमारांना शत्रू आणि मित्र याविषयी सांगताना म्हणाला :

"शत्रू हा मित्रासारखा वागण्याचे नाटक करू लागला तर तर ते ओळखून त्याच्यावर विश्वास करू नये. अशा कपटी मित्राची मदत घेतल्याने कावळयांनी घुबडांचे घर जाळले." "ते कसे?" राजकुमारांनी विचारले.

तेव्हां विष्णुशर्माने त्यांना 'काकोलूकीयम्' गोष्ट सांगितली.

*  *  *

दक्षिणेकडील प्रदेशातल्या एका मोठ्या अरण्यात असंख्य शाखा व उपशाखा असलेले असे एक मोठे वडाचे झाड होते. त्याच्यावर मेघवर्ण नावाचा कावळयांचा एक राजा कळपाबरोबर रहात असे.

तेथून सुमारे एका कोसावरच्या डोंगरातल्या गुहेत अरिमर्दन नावाचा घुबडांचा राजा आपल्या अनुयायांसह रहात असे. त्याचं कावळयांच्या राजाशी आणि कावळयांच्या जातीशी हाडवैर होते. घुबडांचा राजा अगर घुबडे कावळे जेथे कोठे दृष्टीस पडत तेथे त्यांना ठार करून टाकीत असत. त्यामुळे वडाच्या झाडाखाली दररोज काही कावळे मरून पडलेले दिसत.

एकदा कावळयाने आपल्या मंत्र्यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. म्हणाला,–

"थोर विचारवान वृद्ध हो! आपण रात्री गाढ झोपलेलो असतां आपला शत्रू येऊन आपले फार नुकसान करतो, ही गोष्ट आपणां सर्वांच्या माहितीची आहे. दिवसां घुबडांना दिसत नाहीं हे खरे आहे. परंतु ती आपल्या गुहेत दडून बसतात. शत्रू आणि व्याधी वाढू देता कामा नये, असे मोठ्यांचं म्हणणं आहे. तेव्हां आपण जगात

स्वरक्षणासाठी का होईना, हा प्रश्न सोडविलाच पाहिजे. जिवावरच्या संकटाला तोंड द्यायला सहा उपाय आहेत. शत्रूशी सुमेट करून घेणे, युद्ध करणे. आपली जागा बदलणे अगर ती बळकट करणे, बलवान मित्राशी मैत्री करणे आणि युक्तीने किंवा दगा करून कार्यात यशस्वी होणे. आपण यांपैकी कोणता मार्ग अवलंबवावा या विषयी सल्ला विचारण्यासाठी मी ही गुप्त बैठक बोलाविली आहे."

असे सांगून कावळ्यांच्या राजाने आपल्या उज्जीवी, संजीवी, अनुजीवी, प्रज्जीवी, चिरंजीवी नांवाच्या आपल्या पांच मंत्र्यांशी आणि स्थिरजीवी नांवाच्या एका पोक्त व वृद्ध सल्लागाराशी गुप्त मंत्रणा केली. [illegible] मंत्र्याला त्यांचे मत विचारले.

उज्जीवीने आपला विचार सांगितला– "राजा! आपला शत्रू बलाढ्य आहे. त्याच्याशी समोरासमोर युद्ध करणे आपल्याला शक्य नाही. आपण आपले बळ वाढेपर्यंत शत्रूसमोर नमून राहलं पाहिजे. जिवावर संकट आले असतां बलवानांशी किंवा दुष्टांशी सलोख्याने वागले पाहिजे. जीव असेल तरच पुढल्या सर्व उड्या! युद्ध हे जुगारीसारखे आहे. गत्यंतर नसेल तरच युद्धाची गोष्ट काढावी. शक्यतो अनुकूल अटींसर समेट करून घ्यावा.

संजीवीचे मत असे होते–"नीती अनीतीचा विचार ज्या शत्रूला नाही, त्याच्याशी शांती व समेटाच्या गोष्टी करणे निरर्थक आहे. त्या संभाषणाचा उपयोग शत्रू आपल्या नाशासाठीच करू शकेल. तेव्हां माझ्या मतें युद्धच केले पाहिजे."

"शत्रू पापी व दुष्ट आहे. तो बलाढ्य ही आहे. शिवाय तो द्रोही आहे. माझ्या मते त्याच्याशी युद्ध करणे चुकीचे होईल. समेटही करण्याचे कारण नाही. मला वाटते की, आपण हा प्रदेशच सोडून जाणे हिताचे होईल. आपण पळपुटे म्हणविले जाऊ असे मानणेही चुकीचे होईल. परिस्थिती अनुकूल होतांच परत येतां येईल." अनुजीवी म्हणाला.

"मला असे वाटते की आपली जागा सोडून जाणे शुद्ध मूर्खपणा होईल. मगरही पाण्यातच हत्तीसारख्या बलाढ्य प्राण्याला जिंकते. तीच पाण्याबाहेर गेली तर कुत्रीसुद्धां तिला फाडून खातात. आपण एकदा ही जागा सोडली तर परत येण्याच्या नुसत्या गप्पाच! आपले आपसांत ऐक्य असेल तर आपल्याला जिंकू शकणार नाही." प्रज्जीवीने मत दिले.

चिरंजीवीने सल्ला दिला–"आपण बलवान लोकांशी सख्य वाढवावे. मित्राची मदत मागण्यात काहीच गैर नाही. अग्नी सर्व वस्तूंचा नाश करतो. परंतु त्याला सुद्धां वाऱ्यासारख्या मित्राची गरज असते. तरी आपण आपल्या घराला धरून राहल्याशिवाय आपल्याला इतरांची मदत मिळणे शक्य नाही. आपली शक्ती व पराक्रम पाहूनच इतर आपल्या मदतीला येतील. जो वारा वणवा पेटवितो तोच ज्वाला क्षीण झाल्या त्यांना विझवितो."

अशा तऱ्हेने मंत्रीवर्गाने आपापले मत दिल्यानंतर कावळ्यांचा राजा मेघवर्ण स्थिरबुद्धीला म्हणाला–"आपण वृद्ध आहां व पोक्तही आहां! मंत्र्यांनी आपापला विचार सांगितला. तो ऐकल्यावर आपले जे मत असेल ते कृपा करून सांगावे."





## १८४. कांस्ययुगातील सस्यदेवी

मनुष्यप्राणी पाशविक युगातून बनजारी युगात आला व नंतर शेतीभाती करू लागला तेव्हां सस्यदेवीची आराधना सुरू झाली. सीरिया देशात "रस षम्रा" जवळच्या राजाच्या समाधींतून ही हस्तीदंती मूर्त मिळाली आहे. ही दागिन्यांच्या पेटीच्या झांकणासारखी उपयोगी पडत होती.





# माया सरोवर

[ १६ ]

[ जयशीलने सोडलेला बाण वनमाणसाला लागतांच कृपाणजिताने तो बाण सोडणारा त्याचा शत्रू जयशील आहे, हे ओळखले. त्यानंतर तो लगेच गडेकोंड व त्याच्या अनुयायांसह टेकडी उतरून त्यांच्या वस्तीकडे पळून गेला. नंतर गडेकोंडने कृपाणजिताच्या भित्रेपणाची थट्टा उडविली. तेव्हां रागावून त्याने वनमाणसाला चिथवून त्याच्यावर सोडले. पुढे— ]

गडेकोंडचे अनुयायी आपापली आयुधे घेऊन आपल्या अंगावर धावून येत असलेले पाहून कृपाणजित घाबरून गेला. ते सर्व गिड्डे व बुजे असले तरी तो एकटाच होता. शिवाय आपल्या नायकाला वांचविण्यासाठी ते सर्व मरायला तयार असल्याचे दिसत होते.

कृपाणजिताला काय करावे याचा निश्चय करायला थोडादेखील वेळ लागला नाही. तो स्मित करून हसत चारी बाजूंनी त्याच्यावर हल्ला करायला येणाऱ्या खुजांना म्हणाला–"अरे असे हातघाईवर येण्याचे कारण नाही. मी वनमाणसाला जितक्या प्रेमाने पाळत आलो आहे, तितक्याच प्रेमाने तुमच्या नायकाला त्याने सांभाळावे, यासाठी त्याला घ्यायला सांगितले होते. असे सांगून वनमाणसाच्या हातातून गडेकोंडला कृपाणजिताने सोडविले.



गडेकोंड थरथर कांपत धावत जाऊन जवळच्या एका झोपडीसमोरच्या एका ओटयावर जाऊन बसला. त्याचे अनुयायी त्याच्या चारी बाजूला जमा झाले आणि त्याला विचारु लागले–"पुढे काय हुकूम?" परंतु तो त्यांना काही उत्तर देण्याऐवजी तो विचार करीत होता, हा महाकाय कोठून आला कोणास ठाऊक, आपण विनाकारण एक संकट स्वतःवर ओढवून घेतले.

त्याने थोडया वेळाने आपल्या सर्व अनुयायांकडे पाहून फक्त त्यांनाच ऐकू जाईल इतक्या बेताच्या आवाजात त्यांना म्हटले–"मी सांगतो आहे ते लक्ष देऊन ऐका. तो रेडा आपल्या वनमाणसाशेजारीच उभा राहून, आपण पुढे काय करणार हे पहात उभा आहे. त्याच्याशी समोरासमोर युद्ध करून त्याला जिंकणे आपल्याला शक्य नाही. त्याच्या हातातली ती तलवार आणि ते माकड दूर केले पाहिजे. त्यानंतर आपल्या पैकी काही जणांना मरावे लागले तरी चालेल, आपण त्याला ठार करून त्याच्या हातातून आपला गळा सोडविला पाहिजे.

"ते बरोबर आहे, परंतु कसे?" एका खुजाने नायकाला विचारले.

"हा महाकाय मेल्यावर गडेकाऱ्यांची राणी आपल्या सर्वांचा सहज नाश करील त्याचे काय? त्या बयेच्या मदतीला राक्षसांसारखे दोघेजण आणखी मदतीला आले आहेत त्याचे काय?" आणखी एका खुजाने विचारले.

गडेकोंडने, ते प्रश्न विचारणाऱ्या दोघां अनुयायांकडे थोडयाशा रागाने पहात म्हटले–"समजा, मरण चुकणे शक्यच नसेल तर आपल्या सारख्यांच्या हातून मरणे पत्करेल, परंतु या परक्यांच्या हातून कां? शिवाय, मी असे म्हणतो की, आपण त्या राणीला जाऊन भेटू, तिची सेवा करायला तयार आहो, असे सांगू. ती आपल्याला माफ करणार नाही का?"

[illegible] या." असे एक जण मोठयाने म्हणत उठून उभा राहिला.

गडेकोंडने एक काठी जवळ दिसली ती घेऊन त्याला एक लगावली. दुरून उभा राहून सर्व पहात असलेल्या कृपाणजिताच्या मनात संशय येत होता की, हे सर्व मिळून आपल्याविरुद्ध काही तरी भयंकर कट करीत असावेत, असा विचार करून त्याने वनमाणसाच्या अंगाला बांधलेली दोरी ओढून त्या सर्वांच्याकडे जात विचारले–"तुम्ही सर्व मिळून कोणता कट करण्याच्या विचारात आहां? एकदम हल्ला करून मला ठार करण्याच्या विचारात आहां, होय ना? खरं बोला!"

गडेकोंडने सर्वांना गप्प रहायला हाताने खुणावले व उभा राहून म्हणाला–"अहो महाकाय! आम्ही कोणतेही कारस्थान करीत नाही. तूर्त अशी परिस्थिती आहे की, तिकडे ती गडेकाऱ्यांची राणी आहे आणि इकडे तुम्ही, मनात आले तर एका क्षणात ठार करू शकाल आम्हांला. म्हणून सूर्यास्त व्हायच्या आधी हे गाव सोडून दूर कोठे तरी अरण्यात जाऊन रहावे, असा विचार करीत आहो."

गडेकोंड म्हणाला ते ऐकून कृपाणजित फार घाबरला. कारण या खुजांच्या गावात येण्यापूर्वी त्याला या अरण्यात एका मागून एक अनेक संकटांना तोंड द्यावे लागले होते, त्यांची आठवण झाली. यावेळी हे खुजे





किती निर्बल अशक्त असले तरी यांच्या मदतीशिवाय आपला हाडवैरी जयशील या अरण्यात आपली शिकार नक्कीच करील याची कृपाणजिताला धास्ती वाटत होती.

कृपाणजित हा विचार करून अत्यंत नम्रपणे गडेकोंडला म्हणाला–"अरे गडेकोंडा! तुम्हांला माझ्याकडून झाली तर मदतच होईल. तुमचे अहित कधीच होणार नाही. तुमची शत्रू ती राणी आणि तिच्या मदतीला आलेले ते दोघे माझे शत्रू आहेत त्यांना सूर्योदयापूर्वी परलोकांत पाठवू या. आज मध्यरात्री तुमच्या पैकी काही माझ्या बरोबर मदतीला आलात वाट

घोरत पडले असतील तेव्हां हल्ला करून, मी व माझा हा वनमाणूस दोघे मिळून त्या सर्वांचा नाश करू. नंतर तू या सर्व जंगलाचा राजा होशील. तुला आव्हान करणारा कोणी उरणार नाही. कळलं का? जय महाराज गडेकोंड की! असा मोठ्याने जयघोष केला आणि तलवारीच्या मुठीने वनमाणसाला एकदां जोराने मारले.

वनमाणूस रागाने चिडून जाऊन एकदा ओरडले, आणि आपले भयंकर दात विचकाळीत कृपाणजिताला धरण्यासाठी हात पुढे करू लागला. परंतु त्याच्या हातातल्या तलवारीकडे पाहून पुन्हां गप्प होऊन एक पाऊल मागे सरकले.

गडेकोंडने जणुंकाही मनाचे समाधान झाल्याचे दर्शवून म्हटले–"अहो महाकाय! तुम्ही पाळलेल्या आपल्या या माकडाची थोडी कीव करून त्याच्याशी थोडे प्रेमाने वागलात तर ते मधून मधून तुमच्यावरच उलटते ते उलटणार नाही."

"यासाठी मी या जनावराची सेवा करू, पाय धरू म्हणतोस? छे! तसे केले तर ते माझ्याच डोक्यावर बसेल मालकासारखे! या जगात मार खायला न भिणारा कोणी प्राणी आहे का? बरें तर ते मी पाहून घेईन. तुम्ही आम्हां दोघांच्या

आपल्या झोपडीकडे निघालो." कृपाणजित म्हणाला आणि त्याच्या झोपडीकडे निघाला.

"तेथे सर्व सिद्ध करून ठेवले आहे!" गडेकोंड म्हणाला.

कृपाणजित आपल्या झोपडीकडे जात असतां जरा मागे वळून पहात म्हणाला–"सूर्यास्तापूर्वी माझी झोप मोडू नका कोणी. रात्री नक्कीच झोप मोडेल व जाग आलीच पाहिजे. बरोबर मध्यरात्री शत्रूचा संहार करावयाचा, बरं का?"

गडेकोंडने वरकरणी मनाचे समाधान झाल्यासारखी मान हलविली. नंतर आपल्या चारी बाजूला घोळका करून उभे असलेल्या आपल्या अनुयायांना उद्देशून म्हणाला–"ते वनमाणूस त्या दुष्टावर संकट येईल तेव्हां त्याच्या मदतीला येणार नाही; नक्की पळून जाईल. आतां राहिली त्याची तलवार; आपण ती आधीच पळविली पाहिजे." असे आपल्या अनुयायांना सांगून त्यांच्यापैकी अगदी विश्वासातले व थोडे धाडसी अशा चौघांना आपल्याबरोबर आपल्या झोपडीत बोलावून घेऊन गेला.

त्यानंतर दोन तीन तास होऊन गेले. खूप खाऊनपिऊन कृपाणजित झोपडीत घोरत पडला होता, त्याची झोप एकाएकी मोडली. "हा कसला वास बुवा, तेलाचा?"



रे तिकडे आहे? हा घाणेरडा वास कसला तेलासारखा येतो आहे?"

बाहेरून एक आवाज आला–"अहो महाकाय! अहो, तो एरंडाच्या तेलाचा वास नाही. कडुलिंबाच्या तेलात तिळाचे तेल घातल्याने तसा वास वाटतो आहे. किडे, डास मच्छर येऊ नयेत म्हणून शिंपडतो आहो झोपडीवर. आमच्या नायकाने आपली झोपमोड होऊ नये म्हणून आमच्यावर ही जबाबदारी टाकली आहे."

"अस्सं होय, बरं तर चालू दे!" असे म्हणत कृपाणजिताने एक मोठी जांभई घेतली आणि पुन्हां डोळे मिटून पडला.



बांधून ठेवलेले वनमाणूस मात्र तो वास सहन न झाल्याने स्वतःची सुटका करून घेण्यासाठी जोरजोराने गळयातला साखळ-दंड सोडवून पळण्यासाठी धडपडत होते. खांब मुळासकट उपटून निघतो की काय असे वाटत होते.

कृपाणजित गाढ झोपेत घोरत पडला असतां गडेकोंड आपल्या काही अनुयायांसह तेथे आला आणि नायकाने खूण केल्या-बरोबर एक खुजा झोपडीचे दार चटदिशी उघडून आत गेला आणि कृपाणजिताच्या शेजारी ठेवलेली तलवार उचलून बाहेर आला.

गडकोंडने ती तलवार हातात घेऊन फिरवून पाहिली व आपल्या अनुयायांना म्हणाला–"त्या माहाकायाची झोप त्याच्या अंगावर झोपडी पडल्याशिवाय मोडेलसे दिसत नाही. आपल्याला ही तलवार वापरतां येईल की नाही कोण जाणे, परंतु ती उचलून दूर नेऊन ठेवणे शक्य आहे." त्याने ती लपवून ठेवायला आपल्या अनुया-याला दिली.

नंतर प्रथम योजून ठेवल्याप्रमाणे गडे-कोंडचे अनुयायी भाले घेऊन झोपडीच्या चारी बाजूला जमा झाले. त्यांच्यापैकी काही मेंढेस्वारही होते. गडेकोंड एकदां सर्वांकडे पाहून म्हणाला–"आतां आपण किंवा तो कोण मरतो, हे पहावयाचे! झोपडीला सर्व बाजूंनी आग लावा. तो जिवंत बाहेर आला तर त्याला भाल्याने भोसकून ठार करा. वनमाणूस साखळदंड तोडून बाहेर येऊ शकणार नाही, कदा-चित! ते आगीत जळून जाईल."

नायकाची आज्ञा होतांच चौघे जण काकडे घेऊन धावले व त्यांनी झोपडीला चारी बाजूंनी आग लावली. ताडपत्रांची झोपडी तेलात चांगली भिजली असल्याने एकदम भडकली आणि मोठमोठ्या ज्वाळा येऊ लागल्या.

एक दोन मिनिटेंच कृपाणजित पडून राहिला असेल. आगीचा ताप लागताच तो उठून उभा राहिला. त्याने डोळे उघ-डून पाहिले तर सर्व झोपडीला आग लागली होती. तो मोठ्याने ओरडला–"दगलबाजी, लबाडी! चोरांनी गळा कापला! पाहतो, तुम्हांला, गुलामांनो!" असे म्हणत त्याने आपली तलवार कोठे आहे, चाचपून पाहिले. परंतु ती त्याने ठेवलेल्या जागेवर नव्हती.

कृपाणाजित आतां मात्र घाबरला. काय करावे त्याला सुचेना, चारी बाजूला आगीचा डोम उठला होता. इतक्यात एक जळते ताडपत्र झोपडीच्या छपरातून सरकून त्याच्या डोक्यावर पडले. वनमाणूसाने प्राणभयाने एकदां डरकाळी फोडली. त्याने सर्व बळ एकवटून जोराने साखळदंडा-सकट स्वतःला सोडवून घेण्यासाठी खांब ओढला आणि साखळदंड तुटला. ते कृपाण-जिताला धरण्याच्या बेतात होते, परंतु जाळ जवळ येत असलेला पाहून बंद करून ठेवलेल्या दाराकडे धावले.

आतां मरण चुकत नाही असे वाटून कृपाणजिताने, वनमाणसाच्या कंबरेला लोंबत असलेला साखळदंड धरला. वन-माणसाने जोराने ढकलल्याबरोबर दार तुटून पडले आणि वनमाणसाने बाहेर उडी टाकली. कृपाणजित सुद्धा साखळदंड धरून होता म्हणून तोसुद्धा झोपडीच्या बाहेर ओढला गेला. परंतु त्या गडबडीत त्याच्या हातातला साखळदंड सुटला.

वनमाणूस व त्याच्या पाठोपाठ कृपाण-जित अकस्मात झोपडीबाहेर पडलेले पाहून






गडेकोंड व त्याचे अनुयायी घाबरून गेले. परंतु कृपाणजिताच्या हातांत या वेळी तलवार नव्हती. वनमाणूस संधी मिळतांच अरण्यात पळून जाण्याची वाटच पहात होते!

गडेकोंडने हिंमत करून पळून जाण्याच्या बेतात असलेल्या आपल्या अनुयायांना प्रोत्साहन दिले व म्हणाला–"अरे, वन-माणसाला द्या सोडून, त्याला जाऊ द्या आपल्या वाटेने. या दुष्टाला मात्र सोडू नका. भाल्यांनी भोसकून करा ठार!"

गिड्यांना नायकाने प्रोत्साहन दिल्यावर जरा धीर आला. परंतु वनमाणसाने चिडून जाऊन हाताला आले त्या दोघां तिघांना धरले आणि उचलून, त्याला दूर फेंकता आलं तितकं दूर फेंकू लागला. काहीजण वनमाणसाच्या हातातून निसटून दूर पळाले तर काहीजण आपापले भाले संभाळून त्याला भोसकायला तयार झाले.

या गडबडीत कृपाणजिताला चांगली सवड मिळाली. त्याने आपल्याला स्वरक्षणा-साठी काही शस्त्र मिळते का चारीबाजूला पाहिले तेव्हां त्याला झाडाची एक वाळलेली मोठी फांदी दिसली. त्याने चटदिशी ती उचलली आणि एकदां जोराने आरोळी ठोकून गडेकोंडच्या अनुयायांना झोडपू लागला. ते देखील स्वतःला वांचविण्यासाठी साहस एकवटून कृपाणजिताला मारण्यासाठी भाले संभाळून त्याला टोचू लागले.

खुजांच्या वस्तीत आग लागलेली होती व धुराचे लोट व ज्वाळा आकाशात उठत होत्या. त्या बाजूने येत असलेला आरडा-ओरडा जवळच जंगलात दोन विचित्र माणसे ऐकत होती. ते दोघे घोड्यासारख्या दोन विचित्र जनावरांवर बसलेले होते. त्या जनावरांची अंगे माशांच्या कातड्यांनी झांकलेली दिसत होती. पाहायला मकर-केतूच्या जलग्रहासारखीच ती जनावरे होती. दोघे स्वार माशांच्या कातड्याचे कपडे शिवून घालून येत असल्यासारखे दिसत होते. त्यांच्या कंबरांना लांब तलवारी लोंबत होत्या.

(क्रमशः)





## देशाटन

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तुला हे मेहनतीचे काम करावे लागत आहे. ते तुझ्या बापाने तर तुझ्या गळ्यात बांधले नाही ना? कारण मुलाला खूप कष्ट करायला लावल्याशिवाय काही जणांच्या मनाचे समाधान होत नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला कलिंग देशाचा राजा गुणशेखर याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कलिंग देशाचा राजा गुणशेखर याला राजशेखर नावाचा एकच एक मुलगा होता. तो वयात आला तेव्हां सर्व विद्या आणि कलांत त्याने प्राविण्य प्राप्त करून घेतले

वेताळाच्या गोष्टी



होते. त्याची ग्वाही त्याच्या सर्व गुरूंनी दिली होती. या पुस्तकी ज्ञानाबरोबर प्रत्यक्ष अनुभव मिळाला तर राजशेखरचे सर्व आयुष्य सुखी होईल व तो राज्यकारभार उत्तम प्रकारे चालवू शकेल असे गुणशेखरला वाटले. म्हणून त्याने राजशेखरला देशाटन करून यायला सांगितले.

बापाच्या इच्छेलाच आज्ञा मानून राजशेखर एकटाच देशाटनाला निघाला. तो पूर्व दिशेला निघाला,राजाने त्याच्या पाठोपाठ आपले शिपाई गुप्तपणे पाठविले. हेतू हा की, वेळप्रसंग पाहून त्यांनी मुलाच्या मदतीला धावावे.

राजशेखर नवनवीन देश पहात, नैसर्गिक देखाव्याचा आनंद घेत एके दिवशी अंधार पडण्याच्या सुमारास एका जंगलात येऊन पोचला. तो काय करावे या विचारात असतां त्याला कोणीतरी कण्हत असल्याचा भास झाला. तो आवाजाच्या अनुरोधाने गेला तेव्हां त्याला भुयारात उतरण्यासाठी केलेल्या पायऱ्या दिसल्या. तो जिना उतरून भूगर्भात गेला तेव्हां त्याला पाताळ भैरवीची एक मूर्त व तिच्या समोर एका खांबाला बांधून ठेवलेली एक सुंदर स्त्री दिसली.

"कोण ग बाई तू? तुला कोणी बांधून ठेवले?" राजशेखरने तिला विचारले.

"मी मालव देशाच्या राजाची राजकन्या आहे. माझे नाव मणिमाला. म्हणे, एका मांत्रिकाची मुलगी मेली. तिच्या जन्मकुंडलीतील नक्षत्रावर जन्मलेल्या मुलीला देवीसमोर बळी दिल्यास आपली मुलगी जिवंत होईल असे वाटून त्या मांत्रिकाने, त्या नक्षत्रावर जन्मलेल्या मला इकडे आणले. आज रात्री तो मला बळी देणार आहे." ती म्हणाली.

"तू मुळीच भ्यायचे कारण नाही. मी तुझे रक्षण करीन आणि त्या मांत्रिकाची भीती कायमची नाहीशी करीन." असे सांगून राजशेखर दुसऱ्या एका खांबाआड लपून उभा राहिला.

थोड्या वेळाने तो मांत्रिक आला. देवीसमोर बसून मंत्रोच्चार करू लागला. राजशेखरने खांबाआडून आपली तलवार उपसली आणि चटदिशी पुढे येऊन त्या मांत्रिकाची मान छाटून टाकली. नंतर त्याने मणिमालाला सोडवून तिच्यासह घोड्यावर बसून मालव देशाला आला.

मालव देशाच्या राजाने राजशेखरचे आभार मानून त्याचे मणिमालाशी लग्न करून दिले. त्यानंतर राजशेखर सपत्नीक कालिंग देशात परत आला. त्याने घडलेले सर्व वृत्त वडिलांना सांगितले. गुणशेखरला आनंद झाला.

आणखी काही दिवस गेले. गुणशेखरने मुलाला बोलाविले व म्हणाला—"तुझ्या या देशाटनाने माझ्या मनाचे समाधान झालेले नाही. म्हणून तू पुन्हां देशाटनास जा."

या खेपेस राजशेखर पश्चिमेच्या दिशेने निघाला. या खेपेसही त्याला कळल्याशिवाय शिपाई त्याच्या पाठोपाठ होतेच.

या खेपेस राजशेखरला निराळेच दृश्य पहायला मिळाले. शेते वाळून गेली होती. जागोजागी प्रेतांचे अपार ढीग अस्थिपंजर पडलेले होते. त्याला फार वाईट वाटले. लोक देश सोडून जात होते. दुष्काळात पिके निघाली नाहीत तरी राजाचे अधिकारी करवसुलीसाठी प्रजेला



छळत असल्याचे त्याला कळले. आणखी पुढे गेल्यावर एक गाव लागले. राजाचे शिपाई प्रजेकडून करवसूल करणासाठी गावातच पडाव टाकून बसले होते. ते गरीब शेतकऱ्यांना मारीत होते. राजशेखर ते दृश्य पाहून स्वतःला आवरू शकला नाही. तो त्या देशाच्या राजाला जाऊन भेटला आणि त्याने त्याच्या कारभाराची खूप निंदा केली.

मूर्ख राजाने राजशेखरला कैदेत टाकले. ती बातमी शिपायांच्या तोंडी गुणशेखरला कळली. तो एक मोठे सैन्य घेऊन त्या राज्यावर चालून आला. त्याने त्या राजाचा पराभव करून आपल्या मुलाला कैदेतून



होते. त्याची ग्वाही त्याच्या सर्व गुरूंनी दिली होती. या पुस्तकी ज्ञानाबरोबर प्रत्यक्ष अनुभव मिळाला तर राजशेखरचे सर्व आयुष्य सुखी होईल व तो राज्यकारभार उत्तम प्रकारे चालवू शकेल असे गुणशेखरला वाटले. म्हणून त्याने राजशेखरला देशाटन करून यायला सांगितले.

बापाच्या इच्छेलाच आज्ञा मानून राजशेखर एकटाच देशाटनाला निघाला. तो पूर्व दिशेला निघाला,राजाने त्याच्या पाठोपाठ आपले शिपाई गुप्तपणे पाठविले. हेतू हा की, वेळप्रसंग पाहून त्यांनी मुलाच्या मदतीला धावावे.

राजशेखर नवनवीन देश पहात, नैसर्गिक देखाव्याचा आनंद घेत एके दिवशी अंधार पडण्याच्या सुमारास एका जंगलात येऊन पोचला. तो काय करावे या विचारात असतां त्याला कोणीतरी कण्हत असल्याचा भास झाला. तो आवाजाच्या अनुरोधाने गेला तेव्हां त्याला भुयारात उतरण्यासाठी केलेल्या पायऱ्या दिसल्या. तो जिना उतरून भूगर्भात गेला तेव्हां त्याला पाताळ भैरवीची एक मूर्त व तिच्या समोर एका खांबाला बांधून ठेवलेली एक सुंदर स्त्री दिसली.

"कोण ग बाई तू? तुला कोणी बांधून ठेवले?" राजशेखरने तिला विचारले.

"मी मालव देशाच्या राजाची राजकन्या आहे. माझे नाव मणिमाला. म्हणे, एका मांत्रिकाची मुलगी मेली. तिच्या जन्मकुंडलीतील नक्षत्रावर जन्मलेल्या मुलीला देवीसमोर बळी दिल्यास आपली मुलगी जिवंत होईल असे वाटून त्या मांत्रिकाने, त्या नक्षत्रावर जन्मलेल्या मला इकडे आणले. आज रात्री तो मला बळी देणार आहे." ती म्हणाली.

"तू मुळीच भ्यायचे कारण नाही. मी तुझे रक्षण करीन आणि त्या मांत्रिकाची भीती कायमची नाहीशी करीन." असे सांगून राजशेखर दुसऱ्या एका खांबाआड लपून उभा राहिला.

थोड्या वेळाने तो मांत्रिक आला. देवीसमोर बसून मंत्रोच्चार करू लागला. राजशेखरने खांबाआडून आपली तलवार उपसली आणि चटदिशी पुढे येऊन त्या मांत्रिकाची मान छाटून टाकली. नंतर त्याने मणिमालाला सोडवून तिच्यासह घोड्यावर बसून मालव देशाला आला.

मालव देशाच्या राजाने राजशेखरचे आभार मानून त्याचे मणिमालाशी लग्न करून दिले. त्यानंतर राजशेखर सपत्नीक कालिंग देशात परत आला. त्याने घडलेले सर्व वृत्त वडिलांना सांगितले. गुणशेखरला आनंद झाला.

आणखी काही दिवस गेले. गुणशेखरने मुलाला बोलाविले व म्हणाला—"तुझ्या या देशाटनाने माझ्या मनाचे समाधान झालेले नाही. म्हणून तू पुन्हां देशाटनास जा."

या खेपेस राजशेखर पश्चिमेच्या दिशेने निघाला. या खेपेसही त्याला कळल्याशिवाय शिपाई त्याच्या पाठोपाठ होतेच.

या खेपेस राजशेखरला निराळेच दृश्य पहायला मिळाले. शेते वाळून गेली होती. जागोजागी प्रेतांचे अपार ढीग अस्थिपंजर पडलेले होते. त्याला फार वाईट वाटले. लोक देश सोडून जात होते. दुष्काळात पिके निघाली नाहीत तरी राजाचे अधिकारी करवसुलीसाठी प्रजेला



छळत असल्याचे त्याला कळले. आणखी पुढे गेल्यावर एक गाव लागले. राजाचे शिपाई प्रजेकडून करवसूल करणासाठी गावातच पडाव टाकून बसले होते. ते गरीब शेतकऱ्यांना मारीत होते. राजशेखर ते दृश्य पाहून स्वतःला आवरू शकला नाही. तो त्या देशाच्या राजाला जाऊन भेटला आणि त्याने त्याच्या कारभाराची खूप निंदा केली.

मूर्ख राजाने राजशेखरला कैदेत टाकले. ती बातमी शिपायांच्या तोंडी गुणशेखरला कळली. तो एक मोठे सैन्य घेऊन त्या राज्यावर चालून आला. त्याने त्या राजाचा पराभव करून आपल्या मुलाला कैदेतून

सोडविले आणि त्या देशात उत्तम शासन व्यवस्था करून दिली.

त्यानंतर गुणशेखरनें आपल्या मुलाने दर्शविलेल्या कर्तव्यबुद्धीची वाखाणणी केली आणि त्याच्या मनाचे समाधान झाल्याचे सांगून त्याला आपला युवराज म्हणून रीतसर त्याचा राज्याभिषेक केला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा! माझ्या मनात एक शंका आहे. मुलगा पहिल्या खेपेस देशाटन करून परत आल्यावर गुणशेखरच्या मनाचे कां समाधान झाले नाही? ते देशाटन किती सुखाचे व आनंदाचे झाले होते? शिवाय एका सुंदर मुलीशी लग्न करून तो आला होता. दुसऱ्या देशाटनाच्या वेळी राजशेखर मोठ्या संकटात सांपडला असूनही त्या देशाटनाच्या बाबतीत गुणशेखरला कां आनंद झाला? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य उत्तरादाखल म्हणाला– "गुणशेखरने मुलाला देशाटनाला पाठविले होते ते मजा उडवायला किंवा लग्न करून यायला पाठविले नव्हते. राजशेखर गादीला वारस होता. ती जबाबदारी सांभाळण्याची लायकी त्याच्यात आहे की नाही, प्रजेचे सुखदु:ख त्याला कळते की नाही हे कळावे म्हणून त्याने मुलाला देशाटनाला पाठविले होते. परंतु पहिल्या प्रवासात त्याच्या अंगात ती लायकी असल्याचे आढळले नाही. त्यात त्याला जो अनुभव मिळाला तो अगदी व्यक्तिगत होता. परंतु दुसऱ्या प्रवासात त्याला मिळालेला अनुभव त्याच्या हिताचा व राजपुरुषाला आवश्यक असा होता. दुसऱ्या प्रवासात त्याने आपली लायकी सुंदर तऱ्हेने दर्शविली. म्हणून राजाला मुलाच्या दुसऱ्या देशाटनाबद्दल समाधान वाटले."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# भूदान

फूलपूर नावाच्या गावाबाहेरच्या भागाला एक मोठी पडीत जमीन होती. त्या जमिनीला शाप आहे असे गावकरी मानीत. कारण एका काळी त्या जमिनीत सोन्या-सारखे पीक होत असे. परंतु केव्हांतरी एकदा फार मोठा पूर येऊन पीक काढणे अशक्य झाले. तेव्हांपासून ती जमीन पडीतच राहिली. त्यानंतर काही दिवसांनी जंगली गवत उगवून ती जमीन शेतीला निरुपयोगी ठरली.

त्या जमिनीची मालकी रघुराम नावाच्या एका सधन शेतकऱ्याकडे होती. परंतु तो स्वभावाने फार चिक्कू होता.

त्या गावातल्या एका सधन शेतकऱ्याचा रतन नावाचा मुलगा शेतकीचा पदवीधर झाल्यावर आपल्या गावी परत आला. ती पडीत जमीन पाहून त्याला तिच्यात पीक काढतां येईल असे वाटू लागले. कित्येक गरीब शेतकऱ्यांना रहायला सुद्धा घरे नव्हती. अशा परिस्थितीत इतकी मोठी जमीन पडीत म्हणून सोडून द्यायला त्याचे मन मानेना. काय वाटेल ते करून त्या जमि-नीत पीक काढून दाखवायचे त्याने ठरविले.

त्याने जमिनीतली थोडी माती नेऊन परीक्षा करवून पाहिली तेव्हां एका विशिष्ट रसायनाच्या अभावी ती निरुपयोगी झाल्याचे समजले. त्यात विशिष्ट प्रकारचे खत घातल्यास पीक काढता येईल हे सिद्ध झाले. ती जमीन रघुरामकडून दान करवून घेऊन गरीब शेतकऱ्यांना वाटता येईल, असा एक विचार त्याच्या मनात आला.

परंतु रघुरामकडून दान करविणे शक्य होईलसे वाटत नव्हते. परंतु काही गोष्टींचा अंधविश्वास त्याच्या मनात दृढमूळ झाला होता. त्याचा फायदा घेऊन काही करतां

आले तर करण्याचे रतनने मनाशी ठरविले. या बाबतीत शेजारच्या शहरात राहणारा देबाशीश नावाचा मांत्रिक काही मदत करू शकेल का विचारून पाहण्याचा विचार त्याच्या मनात आला. तो रतनच्या ओळखीचा होता. त्याला त्याने विचारून पाहिले तेव्हां त्याने एक उपाय रतनला सुचविला.

एकदां रतन उजाडतांच रघुरामच्या घरी गेला आणि नमस्कार करून कुशल वार्ता विचारली.

रघुराम म्हणाला–"सर्व ठीक आहे. या वर्षी पीकपाणी देखील चांगले निघाले आहे. परंतु काय रे, तू इतक्या लवकर कसा काय उजाडलास?"

[illegible] पडीत जमिनीचे एक विचित्र स्वप्न काल पडलं. ते सांगावे म्हणून आलो होतो. मला रात्री अन्नपूर्णेचा दृष्टांत झाला. तिने मला एक वर दिला. तिने दहा वेळ तुमच्या नावाचा उल्लेख केला असेल आणि म्हणाली–"मी कशाही प्रकारच्या जमिनीत लागवड केली तरी उत्तम पीक निघेल." ती पुढे म्हणाली–"रघुरामकडे जाऊन त्याला तुला प्राप्त झालेली अद्‌भुत शक्ती दाखव आणि त्याच्याकडून ती पडीत जमीन दान करवून गरीब शेतकऱ्यांना वाटून दे. तू आपली अद्‌भुत मंत्रशक्ती दाखविल्यावरही रघुरामने त्या जमिनीचे दान केले नाही तर मी त्याला शाप देऊन त्याची सर्व सुपीक जमीन [illegible] सर्व पैसा धुळीला मिळवीन, त्याच्या गोठ्यातली सर्व गुरे पटापट मरतील, त्याच्या घराकडे कुत्रीदेखील फिरकणार नाहीत." रघुरामने आपले स्वप्न वर्णन करून सांगितले.

रघुरामने सर्व शांतपणे ऐकून घेऊन विचारले–"तुझी ती अद्‌भुत शक्ति काय ती तरी पाहू दे."

"ती गोष्ट मला तरी अजून कोठे कळली आहे? आज संध्याकाळी पूजा वगैरे करून पाहतो, म्हणजे काय ते कळेल. परंतु पहिल्याने हे सांगा, देवीने सांगितल्यासारखे करायला तुम्ही मान्य करतां का?"

"तुझी अद्‌भुत शक्ती काय ती पाहू दे, ती पटली तर देवी म्हणाली तसे करायला मी तयार आहे." रघुराम म्हणाला.

त्या दिवशी संध्याकाळी रघुराम काही वडीलधाऱ्या शेतकऱ्यांना बरोबर घेऊन रघुरामच्या घरी गेला. त्याने आपल्या खिशातून एक अष्टकोनी ग्लास बाहेर काढला आणि तो खोलीत एका कोपऱ्यात टेबलावर ठेवून म्हणाला–"कोणी तरी जाऊन त्या पडीत जमिनीतली एक मूठभर माती घेऊन या."

रघुरामचाच एक मुलगा जाऊन माती घेऊन आला. रतनने ती माती पेल्यात टाकून त्यावर एक हातरुमाल झांकायला








म्हणून टाकला. नंतर टेबलासमोर हात जोडून डोळे मिटून ध्यानमग्न होऊन बसला. नंतर डोळे उघडून पेल्यावरचा रुमाल काढला. एक चमत्कार घडला. पेलाभर मातीच्या जागी धान्य होते.

"अन्नपूर्णा माता की जय!" सर्व शेतकऱ्यांनी जयघोष केला.

रघुरामच्या चेहऱ्यावर आश्चर्याबरोबर भयं झळकू लागले. तो दाटलेल्या कंठाने म्हणाला–"मित्र हो, मी ती शाप पावलेली जमीन तुम्हांला देतो. कागद घेऊन या लिहून देतो."

एक वीतभर देखील जमीन नसलेल्या गरीबांना जमीन मिळाली. रतनने त्यांची एक सहकार समिती स्थापन करून सहकारी पतपुरवठा करविला आणि सहकार पद्धतीने नवीन पद्धतीने बियाणे, खते वगैरे देववून त्या जमिनीत पीक काढले. शेतकऱ्यांच्या मेहनतीला यश आले आणि सोने पिकले. सर्व शेतकऱ्यांनी ते समसमान वांटून घेतले. सर्व गांवकरी खूष झाले, एकट्या रघुरामचे तोंड उतरल्यासारखे दिसले. तरमग, रतनने मातीचे धान्य कसे करून दाखविले हा प्रश्न राहिलाच! त्याने उपयोगात आणलेला अष्टकोनी पेला सामान्य पेला नव्हता. एकाच लांबी रुंदीच्या पाठीलापाठ लावून आणि समोरचे प्रतिबिंब दर्शविणाऱ्या बाजू बाहेरच्या बाजूला राहतील अशा आरशाच्या दोन पट्ट्या पेल्याच्या मधोमध त्याचे दोन भाग करण्यासाठी ठेवल्या होत्या. आरशातल्या प्रतिबिंबामुळे पेल्याचे अर्धेअर्धे भाग पुऱ्या पेल्यासारखे भासत होते. एका रिकाम्या भागात माती घातली आणि तो समोरून दिसेल असा सुरवातीला ठेवला आणि दुसऱ्या भागात पहिल्यापासून धान्य घालून ठेवले होते. फक्त प्रेक्षकांना दाखविताना रिकाम्या पेल्याची बाजूसमोर ठेवून माती टाकली आणि वर रुमाल टाकला. परंतु रुमाल काढताना धान्याचा भाग पुढे करून ठेवला. प्रतिबिंबामुळे अर्धी बाजूसुद्धा पुरा ग्लास असल्यासारखी भासत होती.



# प्रत्युत्तर

वज्रगिरीचा राजा वज्रपाल याने आपल्या राज्यात कोणी दुष्ट, लबाड व गुन्हेगार वृत्तीचा माणूस राहू नये असा विचार करून गुन्हेगारांना हुडकून त्यांना देशाबाहेर पळवून लावले. एक वर्ष भर नवीन कायद्याचा अंमल होत होता. परिणाम असा झाला की राज्यातल्या प्रत्येक कुटुंबातल्या एकाच व्यक्तीस देशाबाहेर जावे लागले.

पुढे एकदा काही बुद्धिमान लोकांनी एका जागी गुप्तपणे भेटून राजाचा हा अत्याचार बंद करण्यासाठी एक उपाय करून पहायचे ठरविले. ती युक्ती यशस्वी झाली आणि राजाच्या कानावर राज्याच्या सरहद्दीवरील गावातून दररोज गाऱ्हाणी येऊ लागली. शेजारच्या जंगलातून वाघ, लांडगे वगैरे हिंस्र श्वापदे गावात शिरून धुमाकूळ माजवू लागली.

राजाने मंत्र्याला बोलावून विचारले–"प्रधान, यापूर्वी असे कधी घडले नाही आणि आताच कां हा जनावरांचा सुळसुळाट झाला?" त्याला उत्तर म्हणून प्रधान म्हणाला– "*जंगली जातीच्या राजाने आपल्या राज्यातील हिंस्र पशूंना आपल्या राज्यातून हाकलून काढायची आज्ञा केली आहे.*"

"त्याने त्यांना आवरले पाहिजे! इतरांच्या देशात कां पाठवीत आहे?" राजाने विचारले. "आपण नाही का गुन्हेगारांना राज्याबाहेर पळविले?" प्रधान म्हणाला. राजाला ज्ञानबोध झाला व त्याने आपली पद्धत बदलली.





# नशीबी असते!

राजाराम वाण्याच्या दुकानात कारकून होता. त्याचे नुकतेच लग्न झाले होते. सकाळी झोप मोडली तेव्हां अंगणातून फुले काढून घरात येत असलेली बायको दिसली. "जाग आल्यावरोबर तुझे तोंड पाहिले, दिवस कसा जातो देवालाच माहीत!" राजाराम म्हणाला.

ती हसत मुखाने म्हणाली—"माझं तोंड पाहणाऱ्याचे नेहमीच चांगलं होतं. म्हणून आमचे बाबा मला बोलवीत व मी समोर आले म्हणजे डोळे उघडीत."

राजारामाने काही बोलला नाही. जेवून खाऊन दुकानावर निघाला. वाटेत दृष्टी जमिनीवर होती, काही लाभ होतो का पहायला. परंतु काही लाभले नाही.

कदाचित दुकानात चांगलासा सौदा पटेल व त्या आनंदात मालकाकडून बक्षिसाचा योग असेल असे वाटून तो संध्याकाळपर्यंत वाट पहात राहिला. परंतु त्या दिवशी व्यापार रोजच्यापेक्षा थोडा मंदच होता. शिवाय मालकाचं बायकोशी काही तरी भांडण झाल्याने तो थोडासा चिडलेलाच होता. तरी राजारामाच्या मनात थोडीशी आशा होती. संक्रांतीचा सणजवळ होता; गेल्यावर्षी सासऱ्याने बराच सन्मान सत्कार केला होता. या वर्षी सासरा काही तरी नक्कीच पाठवील.

काळोख पडायच्या सुमारास सासऱ्याकडून खरोखरच एक माणूस दुकानात भेटायला आला. म्हणाला—"तुमचे सासू-सासरे तीर्थयात्रेला निघत आहेत म्हणे. त्यांनी शंभर रुपये तुमच्याकडून मागून आणायला सांगितले आहेत.

"माझ्याकडे काय पैशाचं झाड आहे का?" असे रागाने म्हणत राजारामाने त्या माणसाला निरोप दिला.

काळोख पडला, आठ वाजले. राजारामाला काहीच लाभ झाला नाही. मनात कुढत तो घरी निघाला.

वाटेत त्याला एक म्हातारी भेटली. रस्त्यावरच्या दिव्याच्या उजेडात त्याच्याकडे न्याहाळून पहात म्हणाली—"कोण? राजाराम का?"

त्या म्हातारीला पाहतांच राजारामाचा खालचा श्वास खाली व वरचा वर राहून गेला. त्या म्हातारीने राजारामाला पूर्वी आपल्या मुलासारखे मानले होते. राजारामाचे आईवडील वारल्यावर तो अनाथ होऊन रस्त्यावर भटकत असतां तिने त्याला आपल्याजवळ ठेवून घेतले होते. त्या आधी दोन महिन्या पूर्वीच तिचा मुलगा गेला होता. तिच्या मुलाचा चेहरामोहरा अगदी राजारामासारखाच होता, म्हणे.

"तुला पाहिले की मुलगाच भेटल्यासारखं झालं मला, माझ्याकडेच रहा यापुढे!" असं ती तेव्हां म्हणाली होती.

म्हातारी दूध गोवऱ्या विकून चार पैसे मिळवी व स्वतःच्या जिवापलीकडे राजारामाला संभाळी. तो तिच्याकडे दोन वर्षे आनंदाने वाढला. हळूहळू म्हातारी क्षीण होत गेली. तिला दूध काढणे कठीण झाले आणि गोवऱ्या थापायला अंगात शक्ती



म्हणाली—"बाबा रे! तुझ्या रूपे देवच मला पावला, बघ! मी खाट धरली की तूच विचारलंस तर चार दिवस सुखाने जगेन आणि रामाचे नाव घेईन."

ते ऐकून त्या वेळी राजारामाला या म्हातारीच्या घरून केव्हां सुटका मिळते, असे वाटू लागले. हिच्या सेवेतच आपलं सर्व आयुष्य घालवावे लागतं की काय, कोण जाणे? असा विचार करून राजारामाने म्हातारी रात्री झोपली असतांना रात्री तिच्या घरातून पाय काढला आणि तो आतां होता त्या गावी येऊन नोकरी करू लागला. लग्न करून घेऊन त्याने

त्याने म्हातारीला सोडलं तरी तिने त्याला सोडलं नाही. 'मी यापुढे तुझ्याकडेच राहते, बाबा!' असे म्हणते की काय राजाराम विचार करू लागला.

"अरे राजारामा! तू ओळखलं नाहीस का रे मला? अरे, मी तुझी मानलेली आजी आणि तू माझा दत्तक नातू! मला सांगितल्याशिवाय कसा रे घर सोडून निघून गेलास? किती कष्ट सहन करावे लागले, ते माझे मलाच ठाऊक. तुझा शोध काढीत निघाले आणि आज इतक्या दिवसांनी माझ्या नशिवाने तू भेटलास, आतां फार दिवसांची पाहुणी राहिले नाही रे बाबा मी!" म्हातारी म्हणाली.

राजारामाने आपला हात तिच्या हातातून सोडवीत म्हटलं–"म्हातारे! म्हातारपणामुळे तुझे डोळे अधू झाले आहेत. तुला बुद्धिभ्रम झाला आहे. माझं नाव राजाराम नाही. तुला पूर्वी कधी पाहिल्याचं मला नाही आठवत." तो घरी आल्यावरोवर बायकोला म्हणाला–" उजाडतांच तुझं तोंड पाहिल्याचा [illegible] पूर्वी कधी ओळखत असलेली एक म्हातारी आज भेटली आणि आयुष्यभर आपल्या उरावर बसण्यासाठी आपल्या घरी येऊन राहायचं म्हणत होती. आपला जीव सोडवून घरी येतां येतां इतका उशीर झाला मला."

"छान! प्राप्त नसेल तर तोंडापर्यंत आलेला घाससुद्धां तोंडात पडत नाही कधी कधी!" राजारामाची बायको म्हणाली.

आणि आश्चर्य म्हणजे ती म्हणाली ते अक्षरअक्षर सत्य होते! कारण त्या म्हातारीला तिच्या अंगणात एक मोठा धनाचा सांठा सापडला होता. तो, दोन वर्षे प्रेमाने वाढवलेल्या दत्तक नातवाला देऊन टाकावा म्हणून ती गाव सोडून आपल्या नातवाचा शोध काढीत त्या दिवशी रात्री राजारामाला अचानक भेटली होती. परंतु ते धन त्याच्या नशिबी नव्हते, म्हणून तो तिच्याशी निष्ठुरपणाने ओळख न दाखवून घरी निघून गेला.





# मालिश करणारा

प्रचंड देशाचा राजा प्रभंजन याचा सेनापती एकाएकी मरण पावला. त्या पदावर नवीन माणसाची नेमणूक करायची होती. त्या जागेसाठी योग्य समजले जाणारे चार जण होते. त्यांच्यापैकी एकाला कसे निवडावयाचे हा प्रश्न राजासमोर होता.

महाराजांचा न्हावी दररोज उजाडतांच येऊन महाराजांच्या सर्वांगाला तेल लावून छान मालिश करीत असे. महाराज त्याच्याजवळ, त्यांच्या समोर असा काही प्रश्न उभा राहिला की बोलत असत.

त्या दिवशी महाराजांनी न्हावी आल्यावर या नव्या प्रश्नासंबंधी चर्चा केली. सर्व ऐकून घेऊन न्हावी म्हणाला–"महाराज! सेनापतीच्या अंगात फक्त शौर्य असून भागत नाही. त्याच्या अंगात स्वामिभक्ती सुद्धा असली पाहिजे. देवासमोर माणूस लाजलज्जा संकोच करीत नाही तशी राजभक्ती सुद्धा सेनापतीच्या मनात असली पाहिजे."

"पण ते कळायचे कसे?" राजाने विचारले. न्हाव्याने उपाय सुचविला.

राजाने चौघां उमेदवारांना निरोप पाठविला. त्या प्रमाणे चौघे हजर झाले.

चौघे आल्यावरोवर राजा त्यांना म्हणाला–"तुमची एका बाबतीत परीक्षा घेण्यासाठी मी तुम्हाला बोलाविले आहे. परंतु मालिश करणाऱ्या न्हाव्याला आज विंचू चावला आहे, म्हणे. म्हणून तो आला नाही. सर्व अंग सारखे ठणकते आहे. तेव्हां आतां तुम्ही परत जा."

चौघे परतायला म्हणून निघाले. परंतु त्यांच्या पैकी एक जण परत येऊन म्हणाला–"न्हावी आला नाही म्हणून महाराजांना इतके कष्ट सहन करण्याचे कारण नाही. आपली सेवा करणेच तर








आमचे कर्तव्य आहे!" असे सांगून महाराज 'नकोनको' म्हणत असूनही त्याने राजाच्या अंगाला तेल लावून अंग खूप चोळले. त्याला सेनापतीचे पद मिळाले. त्याचे नाव शूरवर्मा असे होते.

त्यानंतर आणखी काही दिवसांनी प्रधानाचे पद खाली झाले. शूरवर्माने आपल्या महामती नांवाच्या एका मित्राला एक युक्ती सुचविली. महामतीने त्याप्रमाणे उजाडतांच महाराजांकडे जाऊन मालिश केली. त्याला प्रधानकी मिळाली.

तेव्हांपासून कोणतेही पद रिकामें पडले की राजा उत्तम मालिश करून खूष करी त्याला त्या पदावर नेमू लागला. काही जागांवर नेमणूक करताना स्पर्धेची अगर परीक्षेची वगैरे गरज भासत नसे. दरबारी पुरोहिताच्या रिकाम्या जागेवर माजी पुरोहिताच्या मुलाशिवाय आणखी कोणाची नेमणूक केली जात नसे. परंतु मालिश करवून घेतल्याशिवाय अशा नेमणूका करणे राजाला आवडेना. म्हणून राजाने असा नियम केला की त्याच्या पदरी नोकरी करणाऱ्या प्रत्येकाने एकदां तरी मालिश केली पाहिजे.

त्यानंतर राजाला कोणता तरी चर्मरोग झाला. राजवैद्य म्हणाला–"कोणाला तरी हा चर्मरोग असला पाहिजे. त्याने मालिश केल्यामुळे आपल्याला हा चर्मरोग झाला. याला औषध आहे, परंतु आपण वाटेल त्याच्याकडून मालिश करवून घेणे थांबविले पाहिजे." राजाचा आजार बरा झाला. मालिश करण्याचा नियम रद्द झाला. राजाने ती गोष्ट न्हाव्याला सांगितली.

न्हावी स्मित करून म्हणाला–"राजभक्तीची परीक्षा करून घेण्यास एकच एक उपाय नाही. कारणाशिवाय शिव्या दिल्या तरी सहन करून घेणारा राजभक्त असतो." या नवीन सूत्राचा अवलंब करून राजा रिकाम्या पडलेल्या जागांवर नव्या नेमणुका करू लागला. मालिश करण्याची पद्धत म्हण म्हणून कायम झाली. "याने कोणाची तरी नक्कीच मालिश केली असली पाहिजे."



# गाढवावरचे ओझे

एका गावी भिकू नावाचा धोबी होता. त्याला मुलेबाळे पुष्कळ होती. कुटुंबाचा भार सहन करणे अशक्य झाल्यामुळे तो एके दिवशी घरातून पळून गेला. त्यानंतर भिकूचा तेरा वर्षांचा सर्वांत मोठा मुलगा कुटुंबाचा सर्व भार आपल्या शिरावर घेऊन काम करू लागला.

पांच वर्षांनंतर भिकू घरी परतला, तेव्हां मोठा मुलगा कुटुंबाचा सर्व भार संभाळीत असलेला पाहून त्याला आनंद झाला. बाप आपल्या वरचा थोडा भार उचलून आपली जबाबदारी कमी करील, असे मुलाला वाटले.

परंतु भिकूने परत आल्यावर मुलाला कोणत्याही प्रकारे मदत केली नाही. तो खाऊन पिवून स्वस्थ गप्पा मारीत बसे. काही दिवसांनी मुलाने बापाला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून द्यायच्या हेतूने गाढवाच्या पाठीवर कपड्यांची मोठमोठी गाठोडी त्याला वाहून नेणे कठीण जाईल एवढी ठेवली व स्वतः वर चढून बसला.

ते पाहून भिकू ओरडला–"अरे, अरे! गाढवाचा जीव जाईल की रे! त्याच्या पाठीवर टाकलेले ओझे त्याला वाहून नेणे अशक्य आणि वर, चढून बसला आहेस का?"

"तेच मी तुम्हांला विचारावे म्हणतो आहे, बाबा! वहात असलेले ओझे पुरेसे नाही असे समजून का तुम्ही माझ्या छातीवर येऊन बसलां आहां?" मुलगा म्हणाला. ते ऐकून भिकूची बुद्धी ठिकाणावर आली.





# स्वर्गाला शिडी

फार पूर्वी रामपूर नावाच्या गावी रामशर्मा नावाचा एक तरुण युवक रहात असे. गावकरी त्याला जे काम सांगत ते तो करी आणि ते जे खायला देत ते खाऊन रात्री तो देवळात झोपत असे. त्या देवळात कीर्तन पुराण वगैरे होत. तेव्हां स्वर्गलोक, इंद्रसभेचे वैभव, अप्सरांची नृत्ये आणि स्वर्गातील सुखोप भोगाचे वर्णन रामशर्माला ऐकायला मिळे.

एकदां कीर्तनकार देवळात रिकामे बसलेले पाहून रामशर्मा जवळ जाऊन त्यांना आदरपूर्वक नमस्कार करुन म्हणाला– "बुवा! स्वर्गसुख उपभोगायला सोयीचा, सोपासा मार्ग आहे का?"

"बाबा रे, स्वर्गसुख म्हणशील तर थोर पुण्यपुरुषांशिवाय कोणाला उपभोगायला मिळत नाही. इहलोकांतच शक्य होईल तेवढे भोगून घे!" कथेकरी म्हणाले.

परंतु रामशर्माचे तेवढयाने समाधान झाले नाही. म्हणाला– "मला इहलोकातल्या सुखाची अपेक्षा नाही, स्वर्गातच जायची फार इच्छा आहे."

तो हरिदास थेवटी कंटाळून म्हणाला– "वैकुंठ एकादशीच्या दिवशी गंगेत बुडी मारलीस की सरळ स्वर्गाला जाशील."

रामशर्मा त्याच दिवशी निघाला. डोंगर, पर्वत, नद्या, वाळवंटे ओलांडत वैकुंठ एकादशीच्या दिवशी गंगाकाठी येऊन पोचला. त्याने गंगेला भक्तिपूर्वक नमस्कार केला आणि गंगेत उडी टाकली.

तो पुन्हां शुद्धीवर आला तेव्हां तो नरकलोकात होता. समोर यमधर्मराज व चित्रगुप्त होते. त्यांना पाहून त्याने चित्रगुप्ताला विचारले– "मी इकडे कसा काय आलो हो? एका महापर्वदिनी आत्मत्याग करणारा नरकात जातो का?"

"ते सर्व [illegible] आहे, परंतु तुझे आयुष्य अद्याप सरले नाही. मृत्युलोकांत तुला करावयाची सर्व कामें अजून संपली नाहीत. ती संपेपर्यंत तुला स्वर्ग मिळणार नाही." चित्रगुप्त म्हणाला.

"तरमग तू आता जा." असे यम हाताने खुणावीत रामशर्माला म्हणाला. त्या पाठोपाठ रामशर्मा गरगर फिरत गंगाकाठी येऊन पडला.

उठून अंगावरची वाळू झाडून रामशर्मा जवळच एक गाव दिसले त्या गावात गेला. तेथे एका सुखवस्तू माणसाच्या घरी त्याला काम मिळाले. तो त्या माणसाच्या कुटुंबातलाच एक माणूस म्हणून वावरू लागला. त्या माणसाला एकुलती एक मुलगी होती. त्याने रामशर्माशी तिचे लग्न करून देऊन त्याला आपला जावई करून घेतले.

पुढे कालक्रमाने रामशर्माला दोन मुले झाली. पुन्हां आणखी काही दिवसांनी त्याला स्वर्गसुखाची ओढ वाटू लागली. कारण त्याने इहलोकात लग्न करून संसारसुख भोगले. दोन मुलं त्याला झाली. मुलं लहानाची मोठी झाली. आतां संसारात स्वारस्य उरले नाही, असे वाटून त्याने स्वर्गलोकी जायचे ठरविले आणि घरात कोणाला सांगितल्याशिवाय पुन्हां गंगेत उडी टाकली.

पुन्हां तो नरकातच पोचला.

यमधर्मराज त्याला पाहून डोळे वटारून म्हणाला– "अरे, तुझं कर्म अजून संपले



नाही आणि इतक्या लवकर कशाला आलास?"

रामशर्मा घावरत म्हणाला—"मला वाटलं, जगात मी करण्यासारखं असं काही उरलं नाही!"

"मूर्खा! तुझं आयुष्य अजून सरलं नाही! म्हातारपण येऊन तुला सहज मरण येईपर्यंत तू पुन्हां इकडे येण्याचा प्रयत्न करू नकोस. जा आलास तसा परत!" यमाने त्याला दरडावून सांगितले आणि निरोप दिला.

आणखी काही काळ लोटला. रामशर्मा संसारात छान गुरफटला. त्याची मुलं वयात आली. त्यांची लग्ने झाली, त्यांना मुलं झाली. तीसुद्धां 'आमचं घर' 'आमचं कुटुंब' म्हणू लागली.

एकदा रामशर्मा आपल्या नातवाला खेळवीत असतां यमदूत येऊन उभे राहिले. त्यांना पाहून रामशर्मा चकित होऊन विचारू लागला—"इतक्यात कशाला रे आलात?"

"या जगातलं तुझं आयुष्य संपलं. तुला तू असशील तसा उचलून घेऊन यायला धन्याची आज्ञा झाली आहे!" असे सांगून यमदूतांनी आपला पाश रामशर्माच्या गळ्यात टाकला आणि त्याला धरून घेऊन गेले.

यमाने रामशर्माला आलेला पाहून स्मित करून म्हटले—"तुझ्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या का? प्रथम शिक्षा भोगायला जा."

"हा अन्याय आहे. तुम्ही म्हणालात तसे मी सर्व केले. मग मला शिक्षा कां?" त्याने यमाला विचारले.

"तू चित्तशुद्धीने आपली सर्व कर्मे न करतां स्वर्गाला शिडी लावून येण्याची दोनदां घाई केली होतीस. तुझ्या नशिबात थोडेसे स्वर्गसुख आहे, ते तू आपल्या कुटुंबावर दाखविलेल्या प्रेमाचं फळ म्हणून तुला मिळालं आहे. म्हणून पहिल्याने नरकात सर्व शिक्षा भोगून घे, नंतर तुला स्वर्गसुख भोगायला मिळेल." यम म्हणाला.





# मूर्खांची वस्ती

रंगपूर नावाच्या गावी धोंडोपंत म्हणून एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. वडिलांनी ठेवलेल्या दौलतीचा चांगला उपयोग करून त्यांनी परदेशाशी व्यापार केला आणि खूप पैसे मिळविले. त्यांनी जमिनी, बागा विकत घेतल्या. त्यांना उतारवय आल्यावर त्यांच्या मुलांनी व्यापाराची जबाबदारी उचलली.

धोंडोपंताचे नारोबा नावाचे एक दूरचे नातेवाईक होते. कोल्हा वाघाशी हेवा करू लागला की जो करतो, नारोबा अगदी तसेच करीत. परंतु नशीबाने साथ दिली नाही आणि नारोबा सर्व घालवून बसले. धोंडोपंतांचं सर्व नीट चाललेलं पाहून नारोबांच्या मनात जळफळाट होई.

दर सायंकाळी सर्व गावकरी धोंडोपंतांच्या बरोबर गप्पा मारायला पिंपळाच्या पारावर जमत. तेथे गप्पा गोष्टी होत.

एकदां धोंडोपंत म्हणाले—"आपल्या गावचा जमिनदार अगदी बेफिकीर माणूस आहे. करवसूलीच्या वेळी मात्र हजर. परंतु प्रजेला काय हवं नको याची चवकशी त्याने कधी केली आहे का? दर वर्षी पुराने शेते वाहून जातात. नदीला घाट बांधला तर ही पीडा जाईल. त्यासाठी जो खर्च होईल त्यातला अर्धा मी करतो. बाकी अर्धा तुम्ही सर्वांनी मिळून उचला."

सर्वांनी होकार दिला. ते कळल्यावर नारोबांनी प्रत्येकाच्या घरी जाऊन त्यांच्या मनांत विष कालविले. म्हणाले—"तुम्ही सर्व मूर्ख आहांत? तो आहे लबाड. नदीला पूर आला तर त्याची नदीकाठची जमीन वाहून जाते. आपल्याला काही धोका नाही. तो स्वत:च्या गरजेसाठी तुमच्या सर्वांवर उपकार करायला निघाला आहे. त्याच्या फायद्यासाठी तुम्ही अर्धा खर्च करण्याची गरजच काय?"











सर्वांना ते पटलं आणि नदीला घाट बांधायची योजना बारगळली. आणखी एकदां घोंडोपंतांनी सुचविले—"आपल्या गावाजवळून जाणाऱ्या कालव्यावर पूल असला की गावाबाहेर गाड्या न्यायला आणायला सोय होईल. पूल बांधायला जो खर्च होईल त्यातला तृतीयांश मी करतो बाकी गावकऱ्यांनी उचलावा."

सर्वांना ते मान्य होते. परंतु नारोबा शिकले. म्हणाले—"पूल बांधला की धोंडूचा व्यापार खूप चालेल. त्याची पोती न्यायला आणायला गाड्या लागतात ना!"

झालं, ती योजनासुद्धा बारगळली.

आणखी काही दिवसांनी धोंडोपंतांनी सुचविले—"पूर्वेकडच्या वेशीवर माझी एक जमीन आहे. तीत जंगलच आहे. ते जाळून कोणी कोळसा वापरला तर मला हरकत नाही."

सर्व गावकरी चढाओढीने धावले त्या छोटेखानी जंगलाला आग लावून कोळसे लुटायला. परंतु आग लावल्याबरोबर पूर्वेकडून वारा आला आणि त्या बाजूची काही घरं जळून बेचिराख झाली.

नारोबांनी गांवप्रमुखांचे कान भरले. ते धोंडोपंतांना येऊन म्हणाले—"तुमच्यामुळं गावाचं केवढं नुकसान झालं? या नुकसानाची भरपाई तुम्हीच केली पाहिजे."

आतां मात्र धोंडोपंत स्वतःला आवरू शकले नाहीत. सर्वांवर उसळले. म्हणाले—"तुमचं चांगलं करायला गेलो ते तुमच्या डोक्यात शिरलं नाही. कोणी तुमचे कान भरले आणि तुम्ही पाय मागे घेतलात. परंतु तुमच्या कामाचे [illegible] मी एक सांगितले, त्याबरोबर कोणाचा सल्ला घेतल्याशिवाय, मला एका शब्दाने विचारल्याशिवाय, डोळे मिटून धावलात. तर भोगा त्याची फळे, तुमच्या मूर्खपणाला मी नाही जबाबदार!"

गावकरी माना खाली घालून गुपचूप निघून गेले. एक पैदेखील खर्च केल्याशिवाय धोंडोपंतांचे जंगल साफ झालं. त्यांत त्यांनी नारळाची बाग लावली.



# मुलानें बापासमोर हात टेकले

एका लहानशा कोपऱ्यातल्या गावी सोनूशेट नावाचा एक चिक्कू मारवाडी रहात असे. त्याचा मुलगा रामू जिल्ह्याच्या ठिकाणी विद्याभ्यासासाठी रहात असे. आईच्या वाढदिवसाला भेट म्हणून त्याने दोनशे रुपये खर्च करून एक इरकली लुगडे पाठविले. किंमत कळली तर बाप रागवेल म्हणून त्याने शंभर रुपयाला मिळाल्याचे बापाला कळविले.

दोन दिवसांनी रामूला बापाचे पत्र मिळाले—

"तू पाठविलेले लुगडे मी इथे दीडशेला विकले. तेव्हां तू अगदी याच नमुन्याची आणखी दहा लुगडी पाठव. येथे तसल्या लुगड्यांना खूप मागणी आहे."

ते पत्र पाहून रामूने कपाळ बडवून घेतले.





# खून माफ

खेडेगावात पंच न्यायनिवाडा करीत त्या काळातली ही गोष्ट आहे. सीतापूर नावाच्या एका खेडेगावात गोविंद नावाचा एक शेतकरी होता. एकदां गोविंद आपल्या वृद्ध वडिलांबरोबर मळ्यात काम करीत असतां एक बकरी मळ्यात शिरली आणि नुकतीच लावलेली रोपे तिने खाऊन टाकली. ते पाहून गोविंदच्या बापाने एक दगड त्या बकरीला मारला, तो नेमका तिच्या डोक्याला लागला आणि बकरी तत्काळ जागच्या जागी मरून पडली.

दुसऱ्याच क्षणाला कुंपणाबाहेरून एक दगड आला आणि गोविंदाच्या बापाच्या डोक्याला लागला. म्हातारा तिरीमिरी येऊन जमिनीवर पडला तो उठलाच नाही.

गोविंदाने कुंपणाबाहेर धांवत जाऊन पाहिले तर एक धनगराचा मुलगा मेंढ्या बकऱ्यांना चरायला घेऊन आलेला दिसला. त्याच्याशिवाय तेथे दुसरे कोणी नव्हते. म्हणून गोविंदाने त्याला धरून गावात ओढून नेले. पंच जमले व त्यांनी गोविंदाची तक्रार ऐकून त्या मुलाला विचारले–"हा म्हणतो आहे, ते खरे आहे का?"

धनगराचा मुलगा म्हणाला–"माझे नाव गोपाळ, आमचे गांव येथून सहा कोसांवर उत्तरेकडे आहे. या वर्षी पाऊस न पडल्याने मेंढरांना चरायला न्यायला जागाच मिळाली नाही. म्हणून मी मेंढरं चरायला घेऊन फिरत येथवर आलो. माझ्या कळपातली एक बकरी यांच्या मळ्यात शिरली आणि चरू लागली. त्या म्हाताऱ्या काकांनी तिला दगड मारला आणि ती मेली. मला राग आला व मी मागचा पुढचा काही एक विचार न करतां एक दगड त्या काकांना मारला. तो त्यांना मर्मी लागला आणि ते मरण पावले. जसं घडलं तसं मी सांगितलं आहे. आपण वडील मंडळी जो निवाडा द्याल तो मला मान्य आहे."

त्याने सर्व खरे सांगितल्याबद्दल सर्व खूष झाले. परंतु त्या काळच्या रीतीप्रमाणे पंचांनी त्याला मृत्युदंड द्यावा असा निकाल दिला. गोपाळकडून नुकसानभरपाई म्हणून काही रक्कम घेऊन गोविंदने त्याला सोडायचे म्हटलं तरी त्याला पंचांनी संमती देऊन ठेवली होती. परंतु गोविंदाला ते मान्य नव्हते. म्हणून गोपाळला मृत्युदंड द्यायचा निकाल कायम झाला.

गोपाळ पंचांना म्हणाला–"मी आपल्या कर्माचे फळ भोगायला तयार आहे. माझ्या भाग्यात तेच लिहिले असेल तर कोण काय करू शकणार? परंतु मला एक विनंती करावीशी वाटते. माझा एक पांच वर्षांचा धाकटा भाऊ आहे. माझ्या वडिलांनी मरते वेळी आपली सर्व इस्टेट आम्हां दोघां भावात वांटून दिली आणि धाकट्या भावाचा संभाळ करण्याच्या जबाबदारीबरोबर त्याच्या वांट्याच्या रक्षणाची जबाबदारीदेखील माझ्यावरच टाकली. मी त्याच्या वांट्याचे धन स्वत:च्या वांट्याबरोबर एका गुप्त जागी पुरून ठेवले आहे. ही गोष्ट माझ्याशिवाय इतर कोणालाही माहीत नाही. मी येथे फाशी गेलो तर ते धन जमिनीतच कायमचे राहून जाईल. माझा भाऊ अनाथ होईल. तीन दिवसांचा अवधी मिळाला तर मी ते धन बाहेर काढून मी कोणातरी विश्वासपात्र माणसाकडे धाकट्या भावाबरोबर पोचते करून येतो."



"तसं करायचं झालं तर कोणी तरी जामीन राहलं पाहिजे तुझ्या वतीने!" पंच म्हणाले.

त्या गावात गोपाळला ओळखणारा एक-ही माणूस दिसला नाही. गोपाळने तेथे हजर असलेल्या सर्वांच्या तोंडाकडे न्याहाळून पाहिले. कृष्णा नावाच्या एक शेतकऱ्याकडे बोट दाखवून गोपाळ म्हणाला—"हे काका राहतील जामीन."

कृष्णाने ते मान्य केले आणि तिसऱ्या दिवशी सूर्यास्तापूर्वी गोपाळने हजर झालं पाहिजे असे सांगून पंचांनी त्याला सोडले. गोपाळ आपला कळप घेऊन निघून गेला.

तिसऱ्या दिवशी दुपार उलटून गेली तरी गोपाळचा पत्ता नव्हता.

"बिचाऱ्या कृष्णाचा जीव उगाच जाणार असे दिसत आहे!" असे गावकरी परस्परांशी बोलू लागले. कारण रीतीप्रमाणे जामीन राहणाऱ्याला गुन्हेगाराची मूळ शिक्षा भोगावी लागणार होती.

संध्याकाळी पुन्हा पंचांबरोबर गावकरी विचार करायला जमले.

आतां सूर्यास्त व्हायला फक्त एक घटका उरली होती. तितक्यात गोपाळ धावत पळत तेथे येऊन पोंचला आणि उशीर झाल्याबद्दल माफी मागू लागला.

त्याला पाहिल्याबरोबर सर्व एकदम म्हणाले—"शाबास, मुलगा खरा आहे!"

"दिलेले वचन पुरे व्हावे म्हणून आलो आहे." गोपाळ म्हणाला.

"मानवधर्म राखण्यासाठी मी जामीन राहलो होतो!" कृष्णा म्हणाला.

"गोपाळने आपले वचन पाळले. कृष्णरावांनी मानवधर्म राखण्यासाठी आपले प्राण पणाला लावले. मी दया आणि वात्सल्य यांच्या रक्षणासाठी गोपाळला क्षमा करतो." गोविंद म्हणाला.

पंचांनी तिघांची मनःपूर्वक वाखाणणी केली. त्या दिवशी गोविंदाच गोपाळला जेवायला बोलावून घेऊन गेला. दुसऱ्या दिवशी त्याला प्रेमाने निरोप दिला.





# पंच पेचात पडले

एका गावी शिवराम नावाचा एक तरुण युवक रहात असे. घरात कोणी वडील-धारी मंडळी नव्हती. वडिलार्जित जी थोडी फार इस्टेट होती तीवर सर्व खर्च भागवून घेण्याचा तो प्रयत्न करी. तो हुशार मुलगा आहे हे कळल्यावर मुली सांगून येऊ लागल्या. त्यात शेजारच्या गावच्या कुळकर्ण्याने आपली मुलगी दाखविली. मुलगी चांगली होती. शिवराम तिच्याशी लग्नाला तयार झाला.

लग्न झाल्यानंतर तीन महिन्यांच्या आत शिवरामपंत आणि त्यांची बायको पार्वतीबाई यांचा लहानसहान गोष्टीवर वादविवाद होऊ लागला. त्याला मुख्य कारण पार्वतीचा अगाऊपणाच होता.

लग्न होऊन तीन महिने लोटल्यावर शिवरामपंतांनी बायकोने घरखर्चासाठी किती पैसे खर्च केले हा हिशोब पाहिला आणि थक्कच झाले.

पार्वती चार माणसांच्या घरातून सासरी आली असल्या कारणाने तिला पक्वान्नांची संवय होती. परंतु तिला ते जमेना. दारा-वर लुगडी विकायला विणकर येत. ती प्रत्येकाकडून एखादे लुगडे विकत घेई. एक दिवशी तिने नवऱ्याला विचारल्या शिवाय एकदम दोन लुगडी विकत घेतली. ती पाहून आगीत तेल ओतल्यासारखे शिव-रामपंत संतापले. दोघांमध्ये लहान मोठ्या कारणावरून बाचाबाची होतच होती.

शेवटी शिवरामपंत बायकोला घेऊन तिला माहेरी पोचती करून यायला निघाले. सासुरवाडी पोचताच ते सासूसासऱ्यांना म्हणाले—"तुमच्या मुलीचा खर्चिकपणा मला असह्य झाला आहे. तिच्याबरोबर संसार करणे अशक्य आहे. तिची समजूत घालून तिचे डोके ठिकाणावर येतं का पहा, नाहीतर आयुष्यभर सांभाळा तिला."

"मुलीला तिच्या हिताचे काय तिला समजावून सांगण्याची जबाबदारी आमची. असे रागावलात तर कसे चालेल?" पार्वतीच्या आईवडिलांनी शिवरामपंतांना शांत करण्यासाठी म्हटले. मुलीचा संसार कायमचा बिघडतो की काय याची त्यांना भीती वाटत होती. गावात कोणाच्या घरी कौटुंबिक कलह किंवा संकट आलं की सर्व गावकरी सल्ला द्यायला येत. चार वडील-धारी मंडळी हिताच्या गोष्टी सांगत ते मान्य करून लोक वागत.

पार्वतीची आई शेजारपाजारच्या मैत्रिणी-कडे जाऊन मुलीचा संसार सुखाचा व्हावा यासाठी त्यांचा सल्ला घ्यायला धावली. बायकांना असल्या भांडणांत रस येतो. प्रत्येकीने हातातली कामे टाकली आणि पार्वतीच्या आईला सल्ला द्यायला तिच्या घरी सर्व धावल्या. कुळकर्णीसुद्धां गावातल्या वडीलधाऱ्या मंडळींचा सल्ला घ्यायला धावले व चार चौघांना बोलावून घेऊन आले.

बाहेर ओसरीवर बैठकीत एका बाजूला पुरुष मंडळी बसली आणि बायका मंडळी दुसऱ्या बाजूला घोळका करून बसली. आतल्या आत धुमसत पार्वतीसुद्धां एका कोपऱ्यात येऊन बसली. शिवरामपंतांनी पार्वतीच्या खर्चिक स्वभावाचे तिखटमीठ लावून खूप वर्णन केले व ते त्यांना जड वाटत असल्याचे स्पष्ट सांगून टाकले.

बायकात बसलेली एका पोक्त बाईने पार्वतीला हितोपदेश केला. म्हणाली–"हे पहा, मुली! आपली बायकांची जात. नवऱ्याचं मन राखूनच संसार चालवायचा असतो. तुझा नवरा तरी तुझ्या अहिताचे काय म्हणतो आहे? खर्च थोडा बेताने कर, म्हणतो आहे. तसं केलेस तर काय बिघडलं? तंटा वाढवायचं कारणच काय? त्याने शिव्या दिल्या, मारहाण केली तरी बाईमाणसाला पती व्यतिरिक्त गती नाही."

आणखी एक बाई पुढे म्हणाली– "आणखी असं पहा, दांपत्य हे शंभर वर्षे चालू राहणारे अखंड सुखाचे स्थान आहे. सोन्यासारख्या संसाराचे हट्ट करून कोणी वाटोळे करते का? तू अजून लहान आहेस. तुला अजून जग पहायचे आहे. आम्ही इतके दिवस संसार केला, परंतु असली तऱ्हा, नाही बाई कधी झालेली माहीत! नवऱ्याच्या शब्दाबाहेर काही करतां कामा नये."

त्या पाठोपाठ तिसऱ्याबाईने पोक्तपणाने सल्ला दिला–"उखळामुसळाचं भांडण नाही होत. कांडल्यावर मोत्यासारखे दाणे निघतात. संसार असावा तर तसा. बोलावं, पण तोंड संभाळून! हट्ट, लोभीपणा काय कामाचा? चार घास निश्चितपणे गिळायला मिळतात, त्यात भाग्य मानायचे असते. नवऱ्याने लाथ मारली तरी बायकोने उलट बोलायचे नसते."

तेथे हजर असलेल्या पुरुषांपैकी एक जणही, तिचे खुद्द वडीलही एका शब्दाने काही बोलले नाहीत, हे पाहून पार्वतीला





आश्चर्य वाटले. बायकांनी पोक्तपणाने तिच्या कडून काही तरी मोठा गुन्हा झाल्यासारखी मोठी व्याख्याने दिली, ती ऐकून ती संतापली.

चौथी बाई बोलायला तोंड उघडणार तेवढ्यात पार्वती एकदम उसळून म्हणाली– "पुरे झाले, तुमचे हे उपदेश! मला पत्नीचा धर्म शिकविण्याची लायकी तुमच्या पैकी एकीतही नाही. मी आपल्या लहानपणापासून प्रत्येकीला पाहाते आहे. तुम्ही आपल्या नवऱ्याच्या म्हणण्या प्रमाणे किती वागत आलात मला चांगले माहीत आहे. नवऱ्याला कळू दिल्या शिवाय तांदूळ, डाळ मागच्या दारी विकून त्या पैशांनी दागिने करणारी आणि माहेरच्यांनी करून दिल्याचे सांगून नवऱ्याजवळ लबाडी करणारी एक, तर दुसरी नवरा शेतावर जाताच गावात मोठेपणा मिरवीत भटकणारी आणखी एक! माहेरी गुपचुप पोतीच्या पोती पोचती करणारीसुद्धा एक मी पाहिली आहे. परोपदेश करण्यापूर्वी स्वतःकडे माणसाने पहावे. परंतु तुमचं मोठं नशीब की, सर्व माहीत असूनही तुमचे नवरे तोंड उघडत नाहीत. म्हणून त्यांची वाखाणणी झाली पाहिजे. तुम्ही घरातली कामे टाकून आला असाल, तर ती घरी जाऊन उरका!"

शिवरामपंत सर्व गप्प असून ऐकत होते. त्यांच्या डोक्यात एकदम प्रकाश पडला. म्हणजे अशा थोर बायका सुद्धा जगात आहेत तर, या अर्थी त्यांनी पुरुषमंडळीकडे सहज पाहिले. पार्वती म्हणाली ते त्यांना कबूल असल्याचेच त्यांच्या चेहेऱ्यावर दिसले. तुलनेने आपला संसारच बरा आहे, असे शिवरामपंतांना वाटले. त्यांच्या बायकांच्या मानाने आपली बायको हजार पटीने चांगली आहे!

सर्व लोक एक शब्द बोलल्याशिवाय उठून चालू लागले. शिवरामपंतांचा प्रश्न सुटला. ते बायकोला घेऊन त्याच दिवशी संध्याकाळी आपल्या गावी परत निघाले. त्यानंतर दोघां नवराबायकोचे कधी भांडण झाले नाही.





# मुखस्तुतीचे औषध

फार पूर्वी एका गावी सोमेश्वरराव नावाचे एक गृहस्थ रहात असत. विद्याभ्यासात त्यांचे लक्ष नसल्यामुळे वयात आल्यावर वडिलांनी मिळवून ठेवलेल्या मिळकतीवरच त्यांचा उदरनिर्वाह उत्तम प्रकारे चाले. त्यांचा राग सर्वदा त्यांच्या नाकावर असे. परंतु कोणी त्यांची वाखाणणी केली की स्वारी खूष होऊन वाटेल ते काम करायला तयार होई.

सोमेश्वररावांच्या घराशेजारी एक म्हातारे बुवा रहात असत. काम कसे काढून घ्यायचे हे त्यांना छान कळत असे. त्यांच्या बायकोने सोमेश्वररावांचा स्वभाव खूप ओळखला होता. तिला कधी गरज पडली की, सरळ त्यांच्या घरी येई आणि सोमेश्वररावांच्या अंगात असलेल्या किंवा नसलेल्या एखाद्या गुणाची प्रशंसा करून आपली पैशाची गरज भागवून घेई. एवढेच नव्हे तर जुने देणे राहून गेले असले तरी पुन्हा पैसे मागून घेऊन जाई. म्हणे–"बाबा रे! ते आणि हे एकदम परत करीन हो! तुझं मन कसे लोण्यासारखं मऊ आहे! तरी तुझ्याकडे नम्रपणे बोलायला हवंच की नाही आम्हांला? तुझ्यासारख्या थोर मनाचा माणूस दुनियेत कोठे मिळेल, बाबा!" सोमेश्वरराव फुलून जात. सोमेश्वररावांच्या मनाचा हा नाजुकपणा त्यांची बायको पार्वती हिला मुळीचआवडत नसे.

असेच दिवसामागून दिवस जात होते. म्हाताऱ्याला कधी पडसे आलं म्हणून तर कधी अकस्मात् जरूरी खर्च करणे आवश्यक झाले म्हणून सांगून म्हातारी गोड बोलून जुने कर्ज फेडल्याशिवाय नवे पैसे मागून नेई. सोमेश्वररावांच्या मुखस्तुतीवर फुलून जाण्याच्या स्वभावामुळे तिचे काम भागत असे. कसे बंद करायचे हे पार्वतीला कळेना.










एकदा सोमेश्वररावांचे मामा आले. त्या वेळी सोमेश्वरराव घरात नव्हते. तेव्हां पार्वतीने नवऱ्याच्या या स्वभावाला काही औषध आहे का विचारले.

रात्री जेवणखाण झाल्यावर मामाभाचे गप्पा मारीत बसले. सोमेश्वररावांची बायकोसुद्धां येऊन बसली. मामा म्हणाला– "आमचा सोमू किती शहाणा आहे म्हणून सांगू मुली! वाडवडिलांनी ठेवलेले उडवून टाकण्याऐवजी संभाळून राहतो आहे. याच्या वयाचाच माझा पुतण्या बघ, कोणाकोणाला कर्ज उधार देऊन स्वतःचं दिवाळं काढून बसला आहे!"

पार्वतीने शेजारच्या म्हातारीने जुने उधार नेलेले पैसे परत केल्याशिवाय नवे कर्ज मागून नेल्याची गोष्ट काढली.

मामा मोठ्याने हसून सोमेश्वररावांची पाठ थोपटीत म्हणाला–"तू चुकते आहेस मुली! तू माझ्या भाच्याचा स्वभाव नाही ओळखलास. हा जे काम करतो ते दूरदृष्टीने करतो. तुमचं लग्न झालं त्याला पुढल्या महिन्यातच एक वर्ष होत आहे ना? तुला काही तरी छान दागिना करावा म्हणून ते जुने कर्ज तसेच वसूल केल्याशिवाय ठेवलं नसेल कशावरून? पहिल्याने वसूल केले असते तर आतापर्यंत ते पैसे खर्च होऊन गेले नसते कशावरून?"

"होय हो, मामा! तिलाबांगड्या बिलवर वगैरे काहीतरी करावे म्हणतो आहे!"

"चूक. चूक, मुली! अग हा व्याजासकट सगळी रक्कम वसूल करील बघ! उद्यां या वेळेपर्यंत वसूल झाली नाही तर मला विचार;" मामाने असे म्हणत भाच्याच्या पाठीवर हात फिरविला.

झालं, सोमेश्वरराव दुसऱ्या दिवशी म्हाताऱ्या दंपतीच्या घरी धरणे देऊन बसले आणि पैसे वसूल करून घेऊन आले. त्या पैशाचे बिलवर तयार होऊन येईपर्यंत मामासाहेब घरातून हलले नाहीत.

नवऱ्याकडून काम काढून घ्यायला मुखस्तुतीच औषध असल्याचे पार्वतीला छान कळले.





# खोड कायमचीं गेली

संगमनेर नावाच्या गावी एका देवभीरू उदार श्रीमंताने गरीब ब्राह्मणांसाठी एक अन्नसत्र स्थापन केले. त्या सत्रात पांच गरीब ब्राह्मणांना दररोज जेवण मिळे. कोणी तीर्थयात्री ब्राह्मण आला तर त्याला दहा दिवस जेवायला आणि एकेक रुपया दक्षिणा मिळे. स्वतःचा एक पैसादेखील खर्च करावा लागत नसे.

शेजारच्या गावी हरभट नावाचा एक ब्राह्मण रहात असे. तो तसा गरीब म्हणण्यासारखा गरीबही नव्हता. पण लोभी होता कमालीचा. कसे तरी महिनाभर या सत्रात फुकटात जेवण मिळविले पाहिजे. दक्षिणेचे वर तीस रुपयेसुद्धा मिळतील! ही दुर्बुद्धी त्याला झाली व ती कशी अमलात आणायची याचा तो विचार करू लागला. कारण एकाला दहा दिवसापेक्षा जास्त दिवस जेवण मिळणे शक्य नव्हते. म्हणून त्याने बैराग्यासारखे केस, दाढीमिशा वाढविल्या आणि नवीन पांथस्थासारखा एके दिवशी उजाडतांच सत्रात येऊन दाखल झाला.

जेवणाची, राहण्याची व इतर गोष्टींची व्यवस्था करण्याची जबाबदारी रामराव नावाच्या एका प्रामाणिक कारकुनावर होती. तो त्या गावातल्या मारुतीच्या देवळात पुजाऱ्याचे कामसुद्धा करीत असे. त्या देवळात तशी प्राप्तीही नव्हती. म्हणून एक पेटी ठेवली. पेटीतल्या पैशावर देवाची आरती वगैरेचा खर्च निघे.

रामराव सत्रात कामाला जात तेव्हांही धर्मदायाची पेटी टेबलावर जात असे. ते ब्राह्मणांना दक्षिणा देत तेव्हां देवाधर्मासाठी त्या पेटीत शक्य होईल ती रक्कम टाकायला रामराव नम्रपणे सांगत. रुपया दक्षिणा मिळाल्यावर अतिथी चार पैसे

पेटीत अवश्य टाकीत. परंतु लोभी हरभटाने दहा दिवसात एक दिवशीसुद्धा एका पैसा पेटीत टाकला नाही.

दहा दिवस लोटल्यावर हरभट उजाडतांच उठून सत्राबाहेर गेला आणि आपली सर्व दाढी साफ काढून टाकून नांव व पेहराव बदलला आणि पुन्हां सत्रात दाखल झाला. दहा दिवस पुक्खा झोडला, दक्षिणा गाठीला लावून घेतली आणि त्यानंतर पुन्हा पहाटे उठून सत्राबाहेर गेला. नंतर मिशा काढून मुंडन करून आणि नाव व पेहराव बदलून सत्रात परतला. दहा दिवस सत्रात छान जेवला आणि दक्षिणा वसूल केली.

एक महिना ठरल्याप्रमाणे त्याने सत्रातच जेवणे वसूल करीत काढला आणि शेवटच्या दिवशी जेवण आटोपून आपल्या गावी निघाला. तितक्यात रामराव दोघां शिपायांना घेऊन आले. त्यांनी हरभटाला अटक करवून फसवेगिरीच्या आरोपावर न्यायाधिशासमोर उभे केले. त्यांनी हरभटाच्या लबाडीविषयी सविस्तर फिर्याद करून त्याला योग्य शिक्षा द्यायला विनंती केली.

न्यायाधीशाने चकित होऊन विचारले—"पण काय हो, याने आपले नाव आणि पेहराव बदलला तरी तुम्ही याला कसे काय ओळखलेत?"

रामराव म्हणाले—"नाव बदलले, पेहराव बदलला तरी खोड जाते का! या हरभटाने पहिले दहा दिवस पेटीत एक पैसाही टाकला नाही. नाव पेहराव बदलून आल्यावरही दहा दिवसात याने एकही पैसा पेटीत टाकला नाही. तेव्हां मला शंका आली आणि मी याच्या मागावर राहिलो, पाहू या तरी किती दिवस हा अशी लबाडी करतो. एक महिना याने ही फसवेगिरी चालू ठेवली आणि आता जाणार हे पाहून मी याला धरून आणून आपल्या समोर उभे केले."

न्यायाधिशाने हरभटाला पांचशे रुपये दंड केला. त्याने लबाडी केल्याबद्दल शिक्षा झाल्याचे दोन्ही गावातल्या लोकांना कळले.





# महाबली हनुमान

हनुमान सूक्ष्मरूपात निर्विघ्नपणे पाताळलंकेचे सिंहद्वार ओलांडून शहरात शिरला. त्याला शहरात एका बाजूला मोठ्याने चालू असलेला आरडाओरडा ऐकू आला. तो त्या दिशेला निघाला.

एका जागी एका मोठ्या गुहेत सुंदर शिल्पकला असलेले कालीमातेचे मोठे देवालय निर्मिलेले होते. देवालयासमोरचे अंगण तोरणे बांधून सुंदर दीपमाला लावून सजविलेले होते. मैरावणाचे सेवक राक्षस दारू भरलेली मडकी रांगेने ठेवीत होते आणि शंकराच्या स्तुतीची गीते गात होते आणि नाचत ओरडत होते.

देवळाच्या समोर डफ, डमरू व मृदंग वगैरे वाद्ये वाजत होती. रामलक्ष्मणांना उजाडतांच कालीसमोर बळी द्यायची ही तयारी असल्याचे हनुमानाला कळले. लगेच त्याने पालीच्या पिल्लासारखे सूक्ष्म रूप धारण केले आणि कालीच्या गर्भागाराच्या वर गेला. तेथे कालीच्या चरणावर अभिषेक होऊ शकेल अशा अंदाजाने एक भोंक केलेले होते. अभिषेकाची सर्व तयारी झालेली होती. हनुमानाने या भोकांतून सरळ देवीच्या गर्भगृहात उडी मारली.

कालीचे रूप उग्र होते व मूर्त पुष्कळ मोठी होती. हनुमान देवीच्या मूर्तीसमोर उभा राहला आणि मोठ्याने गरजून म्हणाला—"हे महाकाली! तू रामलक्ष्मणांच्या बळीच्या अपेक्षेने वाट पहात बसली आहेस का?"



त्या पाठोपाठ काली सौम्य रूपात हनुमानाला दर्शन देऊन म्हणाली– "हनुमंता! मैरावणाची इहयात्रा संपुष्टात आली आहे. तुला आपल्या प्रयत्नात यश लाभेल." असा आशीर्वाद देऊन देवी अंतर्धान पावली.

देवीचा आशीर्वाद मिळाल्यावर हनुमंताला फार आनंद झाला. गर्भागाराला असलेले दार त्याने लावले आणि पुढे काय काय घडते आहे ते पाहण्यासाठी देवीच्या मूर्तीमागे लपून बसला.

त्याचवेळी मैरावणाच्या अंतःपुरात फार गडबड चालू होती. तेथे रामलक्ष्मणांना बळी दिल्यानंतर मैरावणाशी चंद्रसेनेचे लग्न होण्यासाठी समारंभाची तयारी चालू होती. अंतःपुराच्या रक्षणासाठी नेमलेली कंटकी नावाची एक राक्षसीण होती. ती चंद्रसेनेला सजवून तयार करीत होती आणि त्याच बरोबर तिची समजूत घालून मैरावणाचे थोरपण तिला वर्णन करून सांगत होती.

राजवाड्याच्या बाहेरच्या विशाल अंगणात समारंभाने लग्नोत्सवाची तयारी चालू होती. रामलक्ष्मणांना आतां लहान लहान मूर्तींच्या जागी त्यांना त्यांच्या स्वतःच्या रूपांत बदलण्यात आले होते. त्यांना दोघांना एका मोठ्या शकटावर उभे करून एका लांब बांबूला त्यांना बांधून ठेवण्यात आले होते. त्यांच्या अंगावर लाल जास्वंदीच्या फुलांचे हार आणि गजरे घालून त्यांना खूप सजविण्यात आले होते. त्या गाडीला पाय असलेले भूतसर्प जुंपलेले होते. राक्षस अशातऱ्हेने रामलक्ष्मणांना वाजत गाजत देवीच्या देवळाकडे घेऊन निघाले.

राक्षसांचे ओरडणे ऐकून आणि त्याचे कारण ओळखून चंद्रसेना दचकल्यासारखी उठून उभी राहिली आणि कंटकी तिला अडविण्यापूर्वीच धावत राजवड्यासमोरचे अंगण ओलांडून रस्त्यावर आली. पिवळी वस्त्रे घातलेले आणि तोंडाला शेंदूर फासलेले रामलक्ष्मण तिला दिसले. ते पाहून ती जागच्या जागी, स्वतःला आवरू न शकल्याने बेशुद्ध होऊन पडली.

चंद्रसेनेच्या पाठोपाठच कंटकी धावत आली. तिला फार राग आला होता. मागे पुढे न पाहता हातातल्या कोरड्याने ती चंद्रसेनेला त्या बेशुद्धावस्थेतच मारू लागली. तरी चंद्रसेना निश्चेष्ट पडून होती. तेव्हां शेवटी चिडून कंटकीने चंद्रसेनेला उचलून नेऊन अंतःपुरातल्या एका खोलीत कोंडून ठेवून दिले.

कंटकी ही कालिकादेवीची खास सेविका व भक्त होती. ती देवीच्या सेवेला धावत पळत देवालयात गेली. देवीचे चरणामृत म्हणून मद्य मानले जाई. ते कंटकीच्या हातून मैरावण आणि अहिरावण घेत असत.

राक्षसांनी मद्याने कालिकेचा अभिषेक सुरू केला. गोल भोकातून मद्य पडू लागलेले पाहून हनुमानाला त्याची घृणा वाटू लागली. त्याने आपला देह गर्भागाराच्या उंची इतका वाढविला आणि गंभीर शब्दात कालीच्या आवाजात म्हणाला–"आतां हा मद्याभिषेक थांबवा आणि दुधाचा अभिषेक करा."

तो आवाज ऐकून देवालयातला गोंधळ एकाएकी थांबला व सर्व राक्षस थक्क



लेले ऐकून सर्व चकित झाले होते. कालीचे मद्यरूपी चरणामृत पिण्यासाठी मोठमोठी मडकी घेऊन जमलेले राक्षस भयचकित होऊन गप्प उभे राहिले.

मैरावण गाडीवर बांधून उभे केलेल्या रामलक्ष्मणांना पाहून हसू लागला. परंतु कंटकी त्याच्याकडे दीनमुद्रेने पहात होती. मैरावणाने अत्यंत आश्चर्याने बारीक डोळे करून जवळच उभा असलेल्या अहिरावणाकडे पाहिले. अहिरावण वळून मैरावणाकडे पहात म्हणाला–"काय रे, मैरावणा! तुला हे सर्व पाहून आश्चर्य वाटण्यासारखे काय आहे? रामलक्ष्मण














तेव्हां हा मद्याभिषेक सात्विकतेच्या विरुद्ध आहे. म्हणून देवीने दुग्धाभिषेक करायला सांगितला, त्यात आश्चर्य करण्यासारखे काहीच नाही."

"दादा, तू म्हणालास ते बरोबर आहे. नित्य देवीचे हे मद्यरूपी चरणामृत पिणाऱ्या तुझ्या व माझ्यासारख्यांना देवीच्या मनात काय आहे, हे कसे काय कळणार?" असे सांगून मैरावणाने अहि-रावण म्हणाला ते बरोबर असल्याचे कबूल करून राक्षसांना देवीचा दुग्धाभिषेक करण्यास आज्ञा केली.

राक्षसांनी मोठमोठ्या भांड्यांतून दूध

हनुमान तीर्थकुंडाच्या खाली जे छेद होते त्याच्या खाली तोंड उघडून दुधाची पडत असलेली धार पीत होता. त्याचा उत्साह वाढला व अंगात नवीन बळ आले.

काही वेळाने अभिषेक पूर्ण झाला. मैरावण गर्भागाराच्या बंद दाराजवळ जाऊन नम्रपणे म्हणाला–"कालीमाते! तुझ्या दर्शनाची अभिलाषा आहे, अनुज्ञा आहे का?"

त्या पाठोपाठ एक गंभीर आवाज झाला– "मैरावणा! प्रथम तू आपल्या थोरल्या भावाला पुष्प फळे वगैरे नैवेद्यासह पूजेला आत पाठव." मैरावणाला तो चांगला ऐकू आला.

मैरावण आपल्या थोरल्या भावाजवळ जाऊन म्हणाला–"दादा! मातेचे तुझ्या-वरच जास्त वात्सल्य आहे. तिने प्रथम तुलाच नैवेद्याबरोबर आत पाठवायला आज्ञा केली आहे."

अहिरावणाला परमानंद झाला. तो आपल्या पर्वताकार देहासह डुलत फुले व फळे घेऊन आणि प्रसादासाठी इतर पक्वान्ने घेऊन आणि सोन्याच्या भांड्यात मद्य घेऊन दाराजवळ गेला. हनुमानाने दाराची कडी काढून ठेवलेली होती. अहिरावणाने हात लावतांच दार उघडले आणि आत

अहिरावण बरोबर आणलेले नैवेद्य वगैरे ठेवू लागला. तेवढ्यात हनुमानाने त्याचा जोराने गळा दाबून त्याच्या तोंडातून एकही शब्द उमटण्यापूर्वी त्याला ठार केले. नंतर हनुमानाने अहिरावणाने नैवद्य म्हणून आणलेले सर्व पदार्थ खाऊन मद्याची भांडी मद्य पिऊन रिकामी केली. हनुमानाच्या अंगात आणखी जास्तच उत्साह चढला.

हनुमानाने चहूकडे एकदां नजर फिरवून पाहिले आणि गर्भगृहातच एका कोपऱ्यात अहिरावणाचा मृत देह ढकलून ठेवून दिला. नंतर तो दाराजवळ येऊन देवीच्या गंभीर आवाजात म्हणाला–"मैरावणा! आतां राम-लक्ष्मणांना आत पाठव. माझा आवडता भक्त अहिरावण प्रथम त्यांच्या करवी माझी शास्त्रोक्त पूजा करवील." असे सांगून दाराला आंतून लावलेली कडी काढून ठेवली.

मैरावणाने रामलक्ष्मणांना दार उघडून गर्भगृहात ढकलले. कालीच्या मूर्तीपाठीमागे लपून बसलेला हनुमान बारीक आवाजात म्हणाला–"हे रघुवीर हो! पहिल्याने दाराची कडी आंतून लावून घ्या आणि तयार रहा!" तो आवाज कालीच बोलते आहे असा वाटला.

तो आवाज ऐकून आश्चर्यचकित होऊन लक्ष्मणाने रामाकडे पाहिले. राम स्मित



कळलं नाहीका, हे सर्व काय आहे ते? पहिल्याने आंतून दार बंद कर!"

रामलक्ष्मण कालीमातेच्या मूर्तीपाठीमागे जाऊन व तेथे हनुमानाला पाहून फार खूष झाले. लक्ष्मण अद्यापि चकित होऊनच सर्व प्रसंग ओळखण्याचा प्रयत्न करीत होता. राम ते पाहुन त्याला म्हणाला– "लक्ष्मणा! कालीदेवी, तिला मद्याचा अभिषेक नको म्हणाली तेव्हांच गर्भगृहात हनुमान असल्याचे मी ओळखले."

रामाने ते सांगितल्यावर लक्ष्मणाच्या सर्व गोष्टी लक्षात आल्या. हनुमानाने राम-लक्ष्मणांना देवीसमोर पूजेसाठी म्हणून












रामलक्ष्मणांनी चटदिशी धनुष्यबाण उचलून धारण केले. नंतर हनुमानाने आपला देह वाढविला व रामलक्ष्मणांना आपल्या खांद्यावर बसवून घेतले आणि मूर्ती समोर जितके बाण ठेवलेले होते त्यांची एक मोळी बांधून ती उचलली.

गर्भगृहाबाहेर राक्षसांचा कोलाहल चालू होता. रामलक्ष्मणांना बळी देण्याचा विधी डोळ्यांनी पाहायची आतुरता त्यांच्या मनात होती. बळी देण्यासाठी ठरलेला मुहूर्त संपत आला होता. तरी देखील अहिरावणाने गर्भगृहातील रामलक्ष्मणांना बळीसाठी बाहेर आणले नाही, याचे

गर्भगृहात काहीतरी गडबड चालू असावी असा संशय सर्वांत प्रथम कंटकीला आला. तिने दाराच्या फटीतून आत पाहिले. तिला तेथे दुग्धाभिषेकाचे चिन्हच दिसले नाही. म्हणजे गर्भगृहात कोणीतरी शत्रू शिरून गडबड करीत असला पाहिजे!

कंटकीच्या मनात तो विचार आल्याबरोबर ती मोठ्याने ओरडली. राक्षस चकित होऊन तिला विचारू लागले—"अशी कां ग ओरडलीस? काय दिसले आत तुला? कालीमाता तुझाच बळी मागत आहे का?"

तो प्रश्न ऐकून कंटकी आणखी मोठ्याने ओरडून म्हणाली—"अरे मूर्खांनो! डोळ्यादेखत आपण सर्व फसलो आहो! आपली गुपिते शत्रूला सांगणारी एकच एक व्यक्ति आहे. ती म्हणजे चंद्रसेना. कोरड्याने तिच्या अंगाच्या चिंधड्या उडविल्याशिवाय ती खरं सांगणार नाही." असे म्हणत ती चंद्रसेनेच्या महालाकडे धावत निघाली.

कंटकी म्हणाली ते ऐकून सर्व राक्षस आश्चर्यचकित होऊन परस्परांच्या तोंडाकडे पाहू लागले. कंटकी म्हणते आहे तसा खरोखरीच कोणी शत्रूचा हेर देवीच्या गर्भगृहात गेला आहे का? महिरावणाच्या या पाताळलंकेत पाऊल टाकू शकणारा

असा विचार करीत काही राक्षस धीर करून गर्भगृहाच्या दाराजवळ आले. त्यांनी दाराला हात लावतांच आंतून हनुमानाने एकदां सिंहगर्जना केली आणि लाथेने दाराला एक धक्का देऊन तो बाहेर आला.

हनुमानाला पाहतांच राक्षस मोठ्याने ओरडले—"दगा, दगा!"

हनुमानाच्या खांद्यावर बसलेल्या रामलक्ष्मणांनी राक्षसांवर शरवृष्टी सुरू केली. राक्षस हा:हाकार करीत पळू लागले.

मैरावण कालीदेवीच्या देवालयासमोर आपल्या प्रमुख अनुयायांबरोबर बोलत होता. त्याने मान वळवून पाहिले तेव्हां त्याला हनुमंताच्या खांद्यावर बसलेले रामलक्ष्मण दिसले. त्यांना पाहतांच तो चकितच झाला. त्याला त्वेष चढला व त्याने धनुष्यबाण घेऊन हुंकार केला आणि युद्धाला सज्ज झाला.

रामलक्ष्मणांनी मैरावणावर शरवृष्टी करायला सुरवात केली. त्यांच्या बाणांनी मैरावणाचे अंग जागोजागी जखमी झाले आणि रक्त वाहू लागले. आश्चर्य म्हणजे त्याच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबाबरोबर जमिनीवर एकेक मैरावण उभा राहू लागला. त्यांनी सुद्धां मैरावणासारखाच हुंकार करून रामलक्ष्मणांवर बाण सोडायला सुरवात केली.

रामलक्ष्मणांना ते पाहून आश्चर्य वाटले. त्यांनी हनुमंताला विचारले—"हनुमंता, हे काय रे अद्भुत पाहतो आहों? रक्ताच्या प्रत्येक थेंबाबरोबर एक मैरावण जन्मलेला दिसतो आहे!"

तो प्रश्न ऐकतांच हनुमंताला सुवर्चलादेवीने सांगितलेल्या चंद्रसेनेची आठवण झाली. एकदोनच शब्दांत रामलक्ष्मणांना ते सांगून हनुमानाने आकाशात उड्डाण केले. तेथे पर्वताच्या एका उच्च शिखरावर रामलक्ष्मणांना उतरवून तो स्वत: चंद्रसेनेच्या महालात धावला.

रामलक्ष्मण मात्र लक्षावधी मैरावणांवर सतत बाण सोडीतच राहिले. ते दृश्य खरोखरीच 'भूतोन भविष्यति' होते.



# सरदार वल्लभभाई पटेल



आधुनिक भारताच्या निर्मात्यांपैकी एक थोर विभूती, वल्लभभाई पटेल यांचा जन्म एका शतकापूर्वी ३१ ऑक्टोबर, १८७५ दिवशी गुजरात राज्यातील करमसद नांवाच्या गावी झाला.

बालपणापासूनच वल्लभभाई दृढनिश्चयी होते. अवघड प्रसंगाला तोंड देण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगात भरपूर होते. कौटुंबिक स्थिती सामान्य असूनही त्यांनी न्यायशास्त्रात पांडित्य संपादन केले. वकीली करून त्यांनी जे पैसे मिळविले ते, थोरले बंधू श्री विठ्ठलभाई पटेल यांच्या लंडनला 'बार ॲट लॉ' शिक्षणासाठी खर्च केले. स्व. विठ्ठलभाई पटेल एक थोर राष्ट्रीय नेते म्हणून पुढे प्रसिद्ध झाले.





नंतर वल्लभभाई पटेल यांनी देखील 'बार ॲट लॉ' ही पदवी संपादन करून अहमदाबाद येथे वकीली सुरू केली. त्याच सुमारास गांधीजी दक्षिण आफ्रिकेतून भारतात आले. एकदां त्यांचे भाषण गुजरात क्लब मध्ये झाले. त्या भाषणाला एक प्रेक्षक म्हणून वल्लभभाई हजर होते, परंतु गांधीजींच्या त्या भाषणाचा त्यांच्या

# अमरवाणी

प्रशमश्च, क्षमा चैव,
आर्जवम्, प्रियवादिता
असामर्थ्यम् फलम् त्वेते
निर्गुणेषु सतां गुणाः ॥ १ ॥

[ सत्पुरुषात शांतवृत्ती, सहिष्णुता, निष्कपट स्वच्छ मन, मृदु भाषण हे गुण असतात ते दुष्ट माणसांना सामर्थ्यहीनतेची लक्षणे वाटतात.]

आत्म प्रशंसिनम्, दुष्टम्,
धृष्टं, विपरिधावकम्,
सर्वत्रोत्सृष्टदण्डम् च,
लोक स्सत्कुरुते नरम् ॥ २ ॥

[ आत्मस्तुती करणारा, दुष्ट, क्रूर आणि सर्वांना दंडित करणारा जो असतो जग त्यालाच मान देते.]

न साम्ना शक्यते कीर्तिः,
न साम्ना शक्यते यशः,
प्राप्तुम् लक्ष्मण! लोकेस्मिन्
जयो वा रणमूर्धनि ॥ ३ ॥

[ लक्ष्मणा, या जगात कीर्ति असो, यश असो किंवा युद्धात जय असो सुखासुखी मिळत नाहीत.]



# कावळा आणि घुबड

[ ४७ ]

कावळ्यांचा राजा मेघवर्ण याने, पांच मंत्र्यांनी आपापले मत दिल्यावर त्यांच्या संबंधी आपले मत सांगायला ज्ञानवृद्ध अशा स्थिरजीवीला विचारले. तेव्हां स्थिरजीवी म्हणाला :

"बाबा रे, आपण सर्वांनी आतापर्यंत पांच प्रकारचे विचार ऐकले. ते सर्व राज-नीतीवरच्या ग्रंथांच्या आधारेच आहेत. परिस्थिती निराळी असती तर ते विचार उत्तमच मानावे लागले असते. परंतु प्रस्तुत परिस्थितीत शत्रू बलवान असल्या कारणाने चातुर्याची गरज आहे. इतर पांचही उपायांनी साध्य होणारा जय त्यांच्या द्वारे, प्रस्तुत परिस्थितीत ही मिळेल. शत्रूच्या स्थानावर दृष्टी ठेवून एका व्यक्तीला बली व्हायला कबूल करवून घेतां आले तर आपल्याला शत्रूचा नाश करता येईल."

"अहो काका! कावळे आणि घुबडे यांच्या मध्ये इतके शत्रुत्व उत्पन्न व्हायला असे कारण तरी काय झाले?" मेघवर्णाने विचारले.

स्थिरजीवीने ती कथा सांगितली :

"फारपूर्वः एकदां हंस, बगळे, कोकिळ, मोर, चातक पक्षी, कबूतरे, घार गिधाड वगैरे जंगली पक्षी सर्वांनी मिळून एक सभा केली आणि असा विचार केला :

"गरुड आपला राजा आहे. तो आपला सर्व काळ नारायणाच्या सेवेत घालवितो. असा राजा असून नसून सारखाच. आपल्याला कोणी जाळ्यात धरले किंवा ठार केले तरी तो आपले रक्षण करीत नाही. प्रजेची भीती दूर करून रक्षण करू न शकणारा राजा मृत्युसमानच मानला पाहिजे. म्हणून



आपण आणखी एखाद्या पक्ष्याला आपला राजा निवडू या."

सर्व पक्ष्यांत भयंकर दिसणाऱ्या घुबडाला पक्ष्यांनी आपला राजा म्हणून निवड करण्याचा विचार केला. घुबडाचा राज्याभिषेक करण्यासाठी सर्व तयारी करण्यात आली. पवित्र नद्यांचे तीर्थ आणण्यात आले. सिंहासन तयार करून त्यावर व्याघ्रचर्म अंथरण्यात आले. ब्राह्मणांना द्यावयाची दक्षिणा वगैरे एकत्र करण्यात आली, पक्ष्यांनी स्तोत्रपाठ सुरू केला. ब्राह्मणांनी वेदमंत्र म्हणायला सुरवात केली. निरांजन, कापूर वगैरे लावून आरती फिरविली गेली. मंगलवाद्ये वाजू लागली.

घुबड व त्याची मोठी बायको पट्टराणी म्हणून सिंहासनावर बसली. अभिषेक चालू असतां. कावळ्याचा कर्कश आवाज ऐकू आला. कावळा तेवढ्यात आला.

"हे पक्षी सर्व कशाला येथे जमले आहेत? कोणता सण आहे आज?" तो विचार करू लागला.

कावळ्याला पाहून इतर पक्षी विचार करू लागले–"पक्ष्यांत कावळा सर्वांत हुशार आहे. माणसात न्हावी, चार पायांच्या जनावरात कोल्हा व संन्याश्यांत श्वेतांबर हुशार असतात. म्हणून राजाची निवड करतांना आपण कावळ्याचे मत घेतले पाहिजे!"

तोंपर्यंत कावळा पक्ष्यांच्या घोळक्यात आला होता. त्याने विचारले–"ही सभा कसली रे मित्रांनो? काही उत्सव बित्सव आहेसे दिसते आहे?"

पक्षी म्हणाले–"हे पहा, तूर्त आपल्याला कोणी राजा नाही. म्हणून सर्व पक्ष्यांनी सभा करून घुबडाला आपला राजा निवडले आहे आणि राज्याभिषेकाची तयारी चालू आहे. तुला काय वाटते? तू ठीक वेळेवर आलास?"

कावळा हसून म्हणाला–"अरे, हंस, मोर, कोकिळ, पोपट यांच्यासारखे थोर ज्ञानी पक्षी असतां या भयंकर पक्ष्याला, त्यांत ज्याला दिवसा दिसत नाही अशा पक्ष्याला, तुम्ही कसे काय निवडलेत? तुमचा हा निर्णय चुकीचा आहे. मला नाही मान्य!"

तो पुढे आणखी म्हणाला–"या घुबडाची चोंच वाकडी, डोळे केवढे मोठे! पाहतांच भीती वाटावी आणि घृणा यावी असे आहेत. त्याला राग आला तर कसे दिसतील याचा तुम्हीच विचार करा. या घुबडाला राजा करून आपलं काय बरं होणार? समजा, या घुबडात काही चांगले गुण आहेत असे धरून चालू या. परंतु गरुडासारखा आपला राजा असतांना आणखी एका राजाला निवडण्याची गरजच काय? एक राजा असतांना कधी दुसरा राजा निवडतां कामा नये. एका राजाच्या अमदानीतच प्रजा सुखी राहू शकते. इतर राजे आपल्या राज्याचा नाश करण्याचा प्रयत्न करू लागतील. गरुडाचे शत्रु पळून जातील. थोरा मोठ्यांचे नाव ऐकूनच दुष्टांचा थरकांप उडतो. थोरा मोठ्यांच्या नावाचा उच्चार केल्याबरोबर जय मिळतो. तुम्हांला जुनी गोष्ट माहीतच असेल, सशांनी चंद्राला आपला राजा केला आणि सुखी झाले?"

"ती गोष्ट ऐकू तर दे!" पक्ष्यांनी ती गोष्ट सांगायला कावळ्याला सांगितले.

कावळ्याने त्यांना "चंद्रसरोवराची कथा" सांगितली ती अशी:

"एका अरण्यात चतुर्दंत नावाचा एक गजराज होता. त्याच्या आश्रयाला अनेक हत्ती रहात असत. चतुर्दंत आपल्या अनुयायांचे उत्तम तऱ्हेने रक्षण करी.

एकदां लागोपाठ बारा वर्षे दुष्काळ पडला. डबकी, तळी व सरोवरे सर्व वाळून गेली. तेव्हां हत्ती आपल्या राजाला भेटून म्हणाले–"महाराज! तहानेने व्याकूळ होऊन लहानलहान हत्ती पटापट मरत आहेत. तेव्हां तहान भागावी म्हणून कोठे प्यायला पाणी मिळते का पहा!"

चतुर्दंताने उत्तम पळणाऱ्या हत्तींना चतुर्दिक पाठविले आणि पाणी कोठे आहे का, पाहून यायला सांगितले. पूर्वेकडे गेलेल्या हत्तींना चंद्रसरोवर दृष्टीस पडले.



# १८५. लिंगपर्वतीय देवालय

लाओस देशात वाल्पजवळ हे लिंगपर्वतीय देवालय होते. ते ब्राह्मणांनी सोडल्यावर बौद्धांनी त्याचा उपयोग केला. मीकांग नदी शेजारच्या एका डोंगराजवळ ब्राह्मणांचे एक पवित्र तीर्थ म्हणून एक कुंड होते. बौद्ध त्याचा स्नानादि साठी उपयोग करू लागले.





# माया सरोवर

[ १७ ]

[ कृपाणजितने गडेकोंडच्या मनात स्वतःविषयी विश्वास उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. परंतु तो जास्त बलवान आहे असे समजून गडेकोंडने कृपाणजितला झोपेत ठार करण्यासाठी झोपडीला आग लावली. तरी कृपाणजित जळत्या झोंपडीतून बाहेर येऊन गिड्ड्यांना फांदीने झोडपीत असतां जंगलांतल्या दोघां विचित्र माणसांनी ते पाहिले. पुढे--]

जंगलातल्या त्या विचित्र माणसांनी गिड्ड्यांच्या त्या वस्तीकडे आश्चर्यचकित होऊन एकदां दोनदां पाहिले. नंतर त्यांच्या पैकी एकजण चटदिशी आपली तलवार उपसून दुसऱ्याला म्हणाला—"कायरे सर्पनख दादा! त्यां वस्तीला कोणीतरी शत्रू आग लावून ते गाव उध्वस्त करण्याच्या बेतात दिसतो आहे! तुलासुद्धां तसेच वाटते आहे का?"

ते ऐकून सर्पनख नावाचा माणूस थोडा देखील घाई न करतां म्हणाला—"सर्पस्वरा, करू दे रे! आपण कोठल्या लोकातले? हा कोणता लोक? कोणी कसा मेला तर त्याचे आपल्याला काय सोयेरसुतक? आपण कोणत्या कामासाठी आलो आहों? आपले हे जलाश्व या अरण्यात व दऱ्याखोऱ्यांत कां पाय झिजवीत फिरत आहेत?"



"दादा, तू म्हणतो आहेस तेही बरोबर आहे. परंतु मला एक शंका वाटते." असे म्हणत सर्पस्वर नावाचा माणूस आपल्या घोड्यावर उभा राहून झाडाची फांदी सहजी हाताला आली ती धरून लोंबकळत त्या गावाकडे पहात म्हणाला–"दादा! हे काही तरी विचित्रच दिसते आहे, बघ! एक भयंकर वनमाणूस व एक सामान्य माणूस मिळून गिड्डया लोकांना ठार करीत आहेत. डोळ्यांना हे सर्व प्रत्यक्ष दिसत असतां गप्प कसे बसायचे रे?"

"अस्सं! तर त्या वनमाणसाला आणि त्याच्या मालकाला जिवंत धरले पाहिजे. त्याच्याकडून आपल्याला आपल्या अदृश्य लेल्या साथीदाराची काही तरी माहिती कदाचित कळेल!" असे म्हणत सर्पनखाने आपल्या घोड्याला टांच मारून खोगिराजवळ बांधून ठेवलेली दोरखंडाची गुंडाळी काढली.

दोघे वेगाने आपल्या घोड्यावरून गडेकोंडांच्या वस्तीजवळ येऊन पोचले तेव्हां वनमाणूस आपल्या दोन्ही बळकट हातांनी झोपड्यांची नासधूस करीत होते. कृपाणजित वेड लागल्यासारखा ओरडत त्याच्यावर धावून आलेल्या गिड्डयांना हातातल्या फांदीने झोडपीत होता.

"दादा! मी या वनमाणसाला पाहातो. तू त्या म्हसोबाला पहा. दोघांवर फांस टाकून त्यांना बंदी करू या." असे म्हणत सर्पस्वरने आपला घोडा वनमाणसाकडे वळविला.

सर्पनखाने आपल्या दोरखंडाचा फास करून कृपाणजितच्या गळ्यात पडेल अशातऱ्हेने अचूक नेम धरून "माया सरोवरेश्वराचा जय असो", असा जयघोष करीत फेकला.

विचित्र घोड्यांवर बसून अकस्मात हल्ला करायला आलेल्या सर्पनख आणि सर्पस्वर दोघांना पाहून गिड्डे व कृपाणजित थक्क होऊन पहात निःस्तब्ध उभे राहिले. सर्पनखाने टाकलेल्या फासात कृपाणजितचा गळा अडकला होता. परंतु फास आवळला जाण्यापूर्वी कृपाणजित मोठ्याने किंकाळी फोडून म्हणाला–"अहो! मला ठार करू नका! तुमच्या सारखाच एक जण,–एका विचित्र हत्तीवर बसून आला होता. त्या महाबलशाली माणसाला मी मदत केली होती."

ते ऐकून सर्पनखाने चकित होऊन विचारले–"तरमग तुला मकरकेतु माहीत आहे तर! त्याच्या सारख्या पराक्रमी बहाद्दराने तुझ्या जवळ मदत मागावी म्हणजे तो मोठ्या संकटात पडला होता म्हणावयाचा! तो मकरकेतू यावेळी कोठे आहे?"

कृपाणजित दोन्ही हातांनी नमस्कार करीत म्हणाला–"हे पहा, तुमच्या या दोरखंडाचा फास माझ्या गळ्याला असा घट्ट बसला आहे की, मला तुमच्या प्रश्नाचे उत्तर देणे शक्यच नाही. फास थोडा सैल करायला परवानगी देतां का?"

"परवानगी दिली. पळून जायचा प्रयत्न केलास तर मात्र तो फास यमपाश होईल, लक्षात असू दे, बरं का!" सर्पनख म्हणाला.

कृपाणजितने दोरखंड दोन्ही हातांनी धरून फास जरा बाजूला सारून सैल केला आणि एकदां जोराने श्वास घेऊन म्हणाला–



"तो मकरकेतू, आत्तां यावेळी कोठे आहे, हे मला नाही माहीत. तुम्हांला पाहल्यावर तो व त्या वेळचा तो प्रसंग मला, आता आठवला. आजपासून थोड्याच दिवसांपूर्वी अमरावती नगरीचा राहणारा जयशील नावाचा माणूस व त्याचा मित्र कापालिक दोघांनी मकरकेतूला अनेक तऱ्हेने त्रास दिला, असे मी जंगलात राहणाऱ्या लोकांकडून ऐकले होते."

ते ऐकून सर्पनख डोळे वटारून विचारू लागला–"लबाडा! मी तुला काय विचारले? आणि तू हे काय उत्तर देतो आहेस? तू मकरकेतूला मदत केली म्हणाला होतास. तो आत्तां या वेळी कोठे



आहे, असे मी विचारले होते तुला? तू निरर्थक-गप्पात वेळ कशाला घालवतो आहेस?"

कृपाणजित त्या भयंकर प्रसंगातून स्वतःचा जीव वांचविण्यासाठी ते बोलला होता. परंतु त्याने स्वतः मकरकेतूला प्रत्यक्ष कधीच पाहिले नव्हते. तो सपशेल खोटेच बोलला होता. एवढे खरे की, जंगलात भटकत असतां जंगलात राहणाऱ्या लोकां-कडून त्याने मकरकेतू विषयी बरेच ऐकले होते.

यावेळी आणखी एखादे खोटे बोलून वेळ मारून नेण्याच्या विचारात कृपाणजित असतां सर्व गडेकोंड गिड्डे एकाएकी

वळून तिकडे पाहिले. गडेकोंड गिड्डे वाकून नमस्कार करीत म्हणाले–"जलाश्वारूढ वीर हो! आपण या दुष्टाबरोबर बोलत असतां आपल्या साथीदाराला काय झाले ह्याचा विचारच केला नाही."

गडेकोंडने ते म्हटल्या बरोबर सर्पनखाला तत्क्षण त्याचा धाकटा भाऊ सर्पस्वर म्हणाला होता ते आठवले. तोंड वळवून इकडे तिकडे थोडा वेळ पाहल्यावर त्याने एकदम ओरडून विचारले–"अरे सर्पस्वरा! कोठे आहेस रे, ते वनमाणूस कोठे गेले?"

दोनदां तीनदां विचारून सुद्धां त्याच्या धाकट्या भावाचे काही उत्तर येत नसलेले पाहून सर्पनखाने गिड्डयांकडे दांत ओठ चावून पाहिले. ते सर्व माना खाली करून गप्प उभे होते.

"अरे, मूर्ख गिड्डयांनो! अशा माना खाली करून कां उभे आहां? काय झाले काय, बोला? सर्पनखाने गिड्डयांना दरडा-वून विचारले.

तेव्हां गडेकोंड मानवर करून भीत भीत म्हणाला–"जलाश्वारूढ वीरा! आपला धाकटा भाऊ आणि वनमाणूस दोघे मिळून तिकडे ती झाडी दिसते आहे तिकडे निघून गेले. जल अश्व आणखी दुसऱ्या बाजूला पळत गेले. ते वनमाणूस या दुष्ट कृपाण-

जिताने पाळलेले आहे. ते याच्या मनात काय आहे हे ओळखून, हा काही बोलल्या शिवाय याची आज्ञा काय आहे, हे समजून काम करते. तुमच्या धाकट्या भावाला गळा धरून त्याने खांद्यावर उचलून नेले आहे. त्याला पळून जायला यानेच खुणेने सांगितले असावे."

"कायरे मूर्खा! मरणाची वार्ता इतकी शांतपणे सावकाश सांगतो आहेस!" असे म्हणत सर्पनख फार दुःखाने ओरडून कृपाणजिताच्या गळ्यात अडकविलेला दोरखंड गडेकोंडच्या हातात देत म्हणाला–"हा दुष्ट निसटून कोठे पळून जातां कामा नये, तुझ्यावर ही जबाबदारी. त्या वन-माणसाला ठार करून मी आपल्या धाकट्या भावाला सोडवून परतलोच समज." असे सांगून सर्पनख जलाश्वावर चढून गडेकोंडने दाखविलेल्या झाडीकडे वेगाने निघाला.

गिड्डयांच्या गावातल्या घरांना लागलेल्या आगीतून धुराचे लोट निघत होते. कृपाण-जित व वनमाणूस यांच्या बरोबर गडेकोंड आणि त्याचे साथीदार भांडत बोलत होते तो गोंधळ दगडाच्या आड उभे राहून जयशील व सिद्धसाधक ऐकत होते. हा गोंधळ कसला असेल बरे, समजून येऊन सांगायला गडेकार गिड्डयांच्या सेनापतीला त्यांनी सांगितले.



सेनापती आपल्या दोघां अनुयायांना बरोबर घेऊन स्वतः टेकडीवर चढला आणि गडेकोंड जातीच्या वस्तीकडे पाहू लागला. तेव्हां त्याला काही घरे जळत असलेली दिसली कृपाणजित आणि वनमाणूस गडेकोंड गिड्डयांना निर्दयपणाने मारीत असल्याचे देखील त्याने पाहिले.

ते सर्व पाहून सेनापतीला फार आनंद झाला. ती शुभवार्ता जयशीलला जाऊन सांगण्यासाठी तो मागे वळला. तितक्यात अकस्मात् तेथे जलाश्वांवर चढून आलेले दोघे विचित्र मनुष्य दिसले आणि ते हल्ला करायला कृपाणजित व वनमाणसाकडे गेल्याचे त्याला दिसले.



"हे विचित्र घोडे कोठून आले आणि हे विचित्र लोक कोठून कसे आले बुवा?" चकित होऊन विचार करीत असतां जलाश्वारूढ एकाने आपला लांब दोरखंड कृपाणजितावर फेकला आणि त्याच्या फासात कृपाणजितचा गळा अडकला. दुसरा जलाश्वारूढस्वार तलवार घेऊन वन-माणसावर धावत असतांना दिसला.

गिड्डुयांचा सेनापती आनंदाने हंसला आणि आपल्या अनुयायांना तेथेच थांबायला सांगून म्हणाला—"अरे गडेकोंड व त्याच्या अनुयायांची कत्तल करायला आपल्याला हीच अनमोल संधी आहे. ही बातमी राणीला आणि दोघां महाकायांना सांगून मी बरोबर आपल्या शूर सैनिकांना घेऊन येतो. तुम्ही मात्र येथेच थांबा आणि काय होते ते पहात रहा."

गिड्डुचा सेनापतीने ती बातमी येऊन सांगितल्यावर आनंदाने उडी मारून सिद्ध-साधकाने "जय महाकाल!" असा जयघोष केला आणि जयशीलला म्हणाला—"जयशीला, आतां आपण आलो होतो ते काम संपल्यासारखेच समज! विचित्र घोड्यांवर बसून आलेले हे विचित्र दोघे त्या विचित्र हत्तीवर बसून पळून गेलेल्या मकरकेतूचे साथीदार किंवा अनुयायीच असले पाहिजेत! मकरकेतू आपल्या हातातून निसटून गेला. आतां या दोघांना पकडून, त्यांच्या कडून गोड बोलून अगर त्यांना ठोकून काढून तो मायासरोवरेश्वर कोठे राहतो विचारून घेतां येईल. त्यानंतर कनकाक्ष महाराजांच्या कांचनमाला व कांचनवर्मा दोघां मुलांना सोडविणे सहजी शक्य होईल!"

जयशील सिद्धसाधक म्हणाला ते ऐकून त्याच्याकडे एकदां पाहून मौन राहला. सिद्धसाधक थोडासा चिडून म्हणाला—जयशीला, मी म्हणालो ते तू ऐकले नाहीससे दिसते!"

जयशील थोडे स्मित करून म्हणाला—"प्रत्येक क्षणाला तू म्हणालास त्याचे अक्षरअक्षर माझ्या मनावर बिंबल असतां मी ऐकले नाहीं असे कां विचारतो आहेस. परंतु मला एका गोष्टीचे आश्चर्य वाटत आहे. कोणी दोघे विचित्र घोड्यांवर बसून आल्याचे ऐकतांच कनकाक्ष महाराजांचे चिरंजीव व राजकन्या आपल्याला साप-डल्यासारखेच, म्हणालास की!"

ते उत्तर ऐकून सिद्धसाधकाच्या उत्साहा-वर विरजण पडल्यासारखे झाले. तो आपला त्रिशूल जोराने एकदां जमिनीवर आपटून म्हणाला—"जयशीला! तसे असेल तर मग महाराजांची मुलं आपल्याला केव्हां सांपडतील असे वाटते तुला? आपण त्यांचा शोध काढीत या जंगलात भटकत म्हातारे होऊन जाऊ की रे!"

"ते म्हातारपण आपण राजधानीत मोठ्या वाड्यात राहलो तरी आपल्याला सुखाने जाणार नाही. मी विचार करतो आहे तो हा की, हे विचित्र लोक या प्रदेशात आलेतच कां? आणि त्यांना जिवंत धरायचं झालं तर ते कसे करतां येईल?" जयशील म्हणाला.

ते उत्तर ऐकून सिद्धसाधक हतोत्साह झाला व त्याने आपले त्रिशूल जमिनीवर टाकले. म्हणाला—"जयशीला! त्या विचित्र माणसांना जिवंत कसे कैद करायचे याचा विचार आतां तूच कर."



जयशीलने 'बरं' या अर्थी मान हलवून विचारले—"पण तू त्रिशूल कां खाली फेंकलेस? यापुढे तुला आपल्या मंत्रशक्ती-वर विश्वास उरला नाही, म्हणतोस का?

त्या प्रश्नाचे उत्तर सिद्धसाधकाने "जय महाकाल!" असा जयघोष करून दिले. आणि हळूच हुंकार करीत चटदिशी त्रिशूल उचलून हातात घेतले. म्हणाला—"जयशीला! माझा मंत्रशक्ती अजून पूर्ण फळास आली नाही. त्या दिवशी स्मशानात महाकाळाचा दास कालकालच माझा जीव घेणार होता नाही का?"

"होय, होय! त्या कालकालाच्या ऐवजी आपल्या दोघांचे प्राणहरण तो माया-

सरोवरेश्वर किंवा त्याचे नोकर करतात की काय याचा धोका आहे." असे सांगून जयशील गिद्धांच्या सेनापतीकडे वळून म्हणाला–"सेनापती! तुला काही सैनिकांसह आमच्या बरोबर यावे लागेल."

"अहो! तुमचा असाच काही तरी हुकूम होईल म्हणून मी वाट पहात होतो!" असे म्हणत गिद्धांच्या सेनापतीने दूर उभे असलेल्या सैनिकांना खूण केली.

सर्वजण खडकाळ टेकडीच्या बाजूला काही अंतर चालून गेल्यावर त्यांना त्यांच्या उजव्या बाजूला अरण्यातल्या एका झाडीत वनमाणसाच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला. जयशीलने व इतरांनी त्या बाजूला आश्चर्याने एकदां पाहिले. वनमाणूस झाडाखाली उड्या मारीत चालत होते. त्याच्या खांद्यावर विचित्र पोशाख घातलेला एक माणूस हालचाल केल्याशिवाय पडून होता.

"जयशीला! आपण ज्यांना जिवंत धरण्याच्या विचारात होतो आणि ज्यांच्याकडून मायासरोवरेश्वराची गुपिते काढून घेण्याच्या विचारात होतो त्यांच्या पैकी एकजण वनमाणसाच्या हाती गतप्राण झाल्यासारखा दिसतो आहे. तो दुसरा कोठे असावा बरे?" सिद्धसाधक म्हणाला.

जयशील एक दोन मिनिटे काहीच न बोलता निश्चेष्ट उभा राहल्यावर म्हणाला–"तो कृपाणजिताच्या हाती मेलातर नसेल?"

"तसे झाले तर कृपाणजितच जिंकल्यासारखा म्हणावयाचा. त्याने पाळलेले वनमाणूस एका विचित्र माणसाला उचलून घेऊन चालले आहे आणि दुसऱ्याला..."

सिद्धसाधकाचे ते वाक्य पुरे व्हायच्या आत सर्पनख भरधाव घोड्यावर झाडाखाली आला आणि सर्पस्वरा, कोठे आहेस रे?" म्हणत हाका मारू लागला.

जयशीलने चटदिशी हात वर करून सर्वांना खुणावले. म्हणाला–"त्याच्या नजरेस पडल्या शिवाय सर्वजण लपून बसा. काय वाटेल ते करून त्याला जिवंत धरले पाहिजे!" असे सांगून सर्वांना सावध रहायला सांगितले. (क्रमश:)





# काळाचा अपव्यय

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू कोणत्या उच्च उद्देशाने इतके कष्ट सहन करीत आहेस, मला माहीत नाही. परंतु उच्च आदर्शच कधी कधी अंगाशी येतो त्याचे उदाहरण म्हणून मी तुला सुशर्मा नावाच्या एका तरुणाची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी जलंधर नांवाच्या राज्यात सुशर्मा नांवाचा एक तरुण रहात असे. त्याला एकच एक व्यसन होते, तो दगडावर खोदकाम होते ते पाही, तो दररोज जेथे ते काम चाले तेथे जाई आणि तेथे कारागीर काम करीत ते मन लावून पाही. त्या








नादात तो भूक तहान सर्व विसरून जाई. त्याला दररोज येत असलेला पाहून कारागिरांनी त्याला एकदां विचारले–"काय रे तुला शिल्पकलेची इतकी आवड आहे तर, महाराजांनी स्थापन केलेल्या शिल्पकलेच्या महाविद्यालयात कां नाही शिकत?"

सुशर्मा शिल्पशास्त्र महाविद्यालयात गेला आणि कुलपतीला विद्यालयात प्रवेश देण्याची विनंती केली.

कुलपती म्हणाले–"मुला, शिल्पकलेचे काम करणाऱ्या कुटुंबात तू जन्मला असशील तरच तुला या विद्यालयात प्रवेश मिळू शकेल!"

सुशर्माने निराश होऊन राजदरबारात आपले गाऱ्हाणे नेले.

[illegible] पाहिला व म्हणाला–"तो एक जुना नियम आहे. परंतु त्या काळातल्या धंदा करणाऱ्या जाती आता राहिल्या नाहीत. म्हणून तुला मी त्या विद्यालयात प्रवेश देववितो. परंतु तू आपल्या कलेचा लाभ प्रजेला उपयोगी होईल असा प्रयत्न केला पाहिजेस."

सुशर्माने तसे वचन दिले आणि विद्यालयात प्रवेश मिळविला आणि शिल्पशास्त्रात प्राविण्य संपादन केले. "आता तू या विद्यालयात शिकण्यासारखे काही राहिले नाही. तू शिल्पवृत्ती सुरू करायला हरकत नाही." कुलपती सुशर्माला म्हणाला.

सुशर्मा राजाला जाऊन भेटला व म्हणाला–"महाराज! आपल्या विद्यालयात शिल्पशास्त्राचा मी आमूलाग्र अभ्यास केला. परंतु माझ्या मनाचे समाधान झालेले नाही. मला असे वाटते आहे की शिल्पशास्त्रात शिकण्यासारखे आणखी पुष्कळ आहे. आपली अनुज्ञा मिळाल्यास मी देशाटन करून पुढे आणखी काही शिकण्यासारखे असेल तर शिकावे, म्हणतो आहे."

राजाने त्या गोष्टीस आपली परवानगी दिली.

सुशर्माने अनेक देश हिंडून शिल्पशास्त्रातल्या अनेक पद्धतींचा अभ्यास केला. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे, त्याने पूर्वी कधी ऐकले नाही व पाहिले नाही, असे उत्तम शिल्प त्याला निर्जन अरण्यात एका प्राचीन देवालयात पहायला मिळाले.

सुशर्मा भूकतहान, रानटी श्वापदांची भयभीती सर्व विसरून त्या देवालयातच राहू लागला आणि त्या देवालयातल्या शिल्पाचा खोल अभ्यास करण्यात मग्न झाला. त्याच सुमारास त्या देवळात एक विचित्र व्यक्ति येऊन सुशर्मा तेथे काम करीत आहे वगैरे विचारू लागली.

सुशर्मा म्हणाला–"मी अत्यंत प्राचीन काळातल्या शिल्पकलेचा अभ्यास केला आहे. परंतु या देवळातले शिल्प कोणत्या युगातले आहे मला कळत नाही."

"हे सत्ययुगातली शिल्पकला आहे. याची माहिती असलेली एकही व्यक्ति या पृथ्वीतलावर मिळणार नाही." ती व्यक्ति म्हणाली.







सुशर्मा अत्यंत दुःखी होऊन म्हणाला– "काय पण दुर्दैव म्हणायचे माझे?"

"तू यायला तयार आहेस का माझ्या-बरोबर? मी, ह्या शिल्पशास्त्रात पावित्र्य संपादिलेल्या व्यक्तीशी तुझी ओळख करून देतो." तो मनुष्य म्हणाला.

सुशर्माला आनंद झाला, तो त्याच्या-बरोबर जायला तयार झाला. तो पाताळ लोकात गेला. तेथे असुरांचे राज्य होते. असुरांचा शिल्पी मयासुर तेथे रहात होता. सुशर्माला पाताळात घेऊन जाणारा सुद्धा एक असुरच होता.

मयासुराने सुशर्माला शिल्पकलेची सर्व तत्वे समजावून सांगितली. सुशर्माने मयासुराचे आभार मानले आणि त्याचा निरोप घेऊन भूलोकात आला. तो एका पर्वतीय प्रदेशातून जात असतां त्याला खोदकाम करण्यालायक उत्तम दगड दिसले. सुशर्मा तेथेच राहून मयासुराकडून शिकून घेतलेल्या शिल्पकलेचे प्रयोग, त्या दगडांवर करू लागला. आकाशमार्गाने देवांचा शिल्पकार विश्वकर्मा एकदां जात असतां त्याने सत्ययुगातील कोरीव काम करणारा पृथ्वीवर कोण अवतरला बूवा, म्हणून पाहण्यासाठी तेथे उतरला, सुशर्माला त्याने विचारले–"काय रे, या निर्जन अरण्यात पर्वतावर कोणाला उपयोगी न पडणारे कोरीव काम तू कशासाठी करतो आहेस?"

सुशर्माने थोडक्यात आपले आत्मवृत्त सांगितले व म्हणाला–"अहो! मी अजून पूर्ण शिल्पकार कोठे झालो आहे? थोडी फार शिल्पकला शिकलो आहे. आणखी शिकावी असे वाटते आहे? आपले सर्व जीवित शिल्पशास्त्राच्या अध्ययनात घालवायचा माझा विचार आहे. आपण कोण?"

"मी विश्वकर्मा!" विश्वकर्मा म्हणाला.

सुशर्माने त्याला साष्टांग नमस्कार केला आणि म्हणाला–"माझ्या पूर्व जन्मातले पुण्य फळास आले आणि मला सत्य युगातल्या दानवांनी निर्मिलेल्या शिल्पशास्त्रातले ज्ञान प्राप्त झाले. आपण मला आपला शिष्य करून घेऊन देवलोकातले शिल्पशास्त्र शिकविण्याची कृपा करावी. मी धन्य होईन."

"दुष्टा, पापी माणसा! तू आतांपर्यंत जे काही शिकलास त्याचा तुला विसर पडो!" असा शाप देऊन विश्वकर्मा अंतर्धान पावला.

येथवर कथा सांगून वेताळ म्हणाला–"राजा! विश्वकर्माला सुशर्माचा इतका राग येण्याचे कारण काय? त्याने त्याला इतका भयंकर शाप कां दिला? त्याने दानवांचे शिल्पशास्त्र अवगत करून घेतले म्हणून का? देवांचं शिल्पशास्त्र शिकून घ्यायची इच्छा दर्शविली म्हणून का? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"विश्वकर्माला राग येण्याचे व शाप देण्याचे कारण निराळेच आहे. सुशर्मा एक शिल्पी झाला होता खरा, परंतु तो चुकीच्या मार्गाने जाऊ लागला होता. राजाला त्याने वचन काय दिले होते? ते त्याने भंग नाही का केले? निरनिराळी शिल्परहस्ये शिकून तो आपल्या देशाच्या प्रजेच्या कल्याणासाठी काहीतरी उपयोगी कामे करील या हेतूनेच नाही का राजाने त्याला देशाटन करून यायला परवानगी दिली होती? परंतु सुशर्मा विश्वकर्माला जे बोलला त्यावरून तो सर्व आयुष्य शिल्पशास्त्राचेच अध्ययन करण्यात घालवणार या गोष्टीची विश्वकर्म्याची खात्री झाली, नांवलौकिक मिळविण्यासाठी सर्व आयुष्य घालविण्याचा हा एक क्षुद्र स्वार्थच तर आहे. त्याच्या या ज्ञानाचा प्रजेला काही एक फायदा होणार नाही ही गोष्ट स्पष्ट झाल्यावर विश्वकर्म्याने तो भयंकर शाप दिला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# झाडाने दिलेला निवाडा

दीनानाथाने, त्याच्याकडे जी थोडी इस्टेट होती ती आपल्या मागे बायकोला आणि दोघां मुलांना सोडली आणि परलोकी प्रयाण केले. मोठा काशीनाथ अठ्ठावीस वर्षांचा होता. गावातल्या जमिनदाराकडे करवसूलीचे काम करी. धाकटा निशिनाथ अजून शाळेतच शिकत होता.

काशीनाथ स्वभावाने चांगला नव्हता. बाप वारल्याबरोबर त्याने इस्टेटीचे वांटे करून घ्यायचे ठरविले व धाकटयाच्या बाबतीत थोडा अन्यायच करायला तो सिद्ध झाला. त्याने कांही गावप्रमुखांना बोलाविले आणि इस्टेटीचे दोन समसमान भाग करवून घेतले. आईला धाकटया लेकाकडे राहणेच आवडेल म्हणून सांगून तिला धाकटया भावाकडेच रहायला सांगितले. त्याबद्दल तिला सुद्धां काही देण्याचे त्याने कबूल केले.

घराच्या आवारात एक सफरचंदाचे झाड होते. त्याची फळे चांगल्या जातीची होती. त्यांचा रंग, वास आणि चव फारच छान होती. सफरचंदाचे झाड दोघांच्या वांटयाला आलेल्या भागाच्या हद्दीवर होते. काशीनाथ खरं पाहिलं तर करता सवरता व मिळविता होता. त्याला स्वतःच्या मिळकतीवर कुटुंबाचा निर्वाह उत्तम प्रकारे चालविता येणे शक्य होते. निशिनाथाला काहीच मिळकत नव्हती. म्हणून गावप्रमुखांनी सफरचंदाचे झाड निशिनाथाला सोडावे अशी सूचना केली. काशीनाथ त्या गोष्टीस कबूल झाला नाही. झाडाला जी फळं लागतील त्यातली अर्धी निशीनाथाला द्यावी असे गावप्रमुख म्हणाले.

"फळे कशाला हो? झाड तोडून टाकावे आणि लाकडे अर्धी अर्धी वांटून घ्यावी म्हणजे झाले." असे म्हणत काशीनाथ तेथून निघाला.

"असला हट्ट नाही चालायचा. लिलाव करून टाका!" एक गावप्रमुख म्हणाला.

"अहो, त्याची गरज नाही' मला ते झाड किंवा त्याची फळं मिळाली नाहीत तरी चालेल. माझा देवावर भरंवसा आहे. कष्टसमयी तोच धावेल मदतीला." निशिनाथ म्हणाला.

"बरं तर आम्ही तुझ्या फायद्याचे काही करू शकू असे वाटत नाही." गावप्रमुख म्हणाले.

असेच काही दिवस लोटले. आपल्या वांटयाच्या थोडया मिळकतीवर निशिनाथ दोघांचा खर्च भागवीत असे. त्याने मन लावून अभ्यास केला आणि शाळेचे शिक्षण पुरे करून वरच्या परीक्षेसाठी अभ्यासाला शहरात जाऊ लागला. दररोज तीन मैल जावे यावे लागे. सायकल असेल तर सोयीचे होईल, असे त्याला वाटले पण सायकल विकत घ्यायला त्याच्याकडे पैसे नव्हते.

सुदैवाने त्या वर्षी सफरचंदे खूप लागली. वांटयाची अर्धी फळे मिळाली तरी ती विकून सायकल विकत घेतां येईल असे त्याला वाटले.



"देवा, तुझ्यावरच माझा सर्व भार आहे!" निशिनाथ मनांतल्या मनात देवाला नमस्कार करून म्हणाला.

एका आठवडयाने काशीनाथ एकाएकी आजारी पडला. रोगाचे निदान होऊ न शकल्याने काशीनाथाची आज आहे उद्या नाही इतकी प्रकृती बिघडली.

आपल्या मोठया भावाची प्रकृती सुधारावी म्हणून निशिनाथाने देवाला मागणे घातले. त्याच्या नवसाचे फळ म्हणूनच की काय, काशीनाथाचा आजार बरा होऊ लागला. तो चांगला बरा झाला. परंतु फार अशक्त झाला होता आणि मनानेसुद्धां फार दुर्बल झाला होता.



गावप्रमुख त्याला भेटायला येऊन म्हणाले—"हे पहा, काशीनाथ! देवाच्या कृपेने तू मृत्यूच्या दाढेतून बाहेर आलास. ते सफरचंदाचे झाड धाकट्या भावाला देऊन टाक. तुझ्या आईलासुद्धा किती कष्ट सहन करावे लागत आहेत. कोणी परके तर नाहीत ना?"

"मला वाचविणारा देव निशीला सफरचंदाचे झाड देणार नाही का? मध्ये मी कशाला?" काशीनाथ म्हणाला.

गावप्रमुखांबरोबर निशिनाथचा सहपाठी हरकुमार आला होता. त्याने विचारले—"तरमग देवाचा निवाडा तू मानायला तयार आहेस का?"

"ते झाड कोणाला मिळावे याचा निवाडा देवच करणार असेल तर नक्कीच तो मी मान्य करीन." काशीनाथ म्हणाला.

"तसे असेल तर आपला मुलगा रामनाथ याच्या नावाची शपथ घे!" हरकुमार म्हणाला.

"तशी शपथ घेतो." हरकुमार म्हणाला.

सर्वजण आपापल्या घरी निघून गेले.

"तुझ्या भावाने शपथ घेतली तसा वागला तर सफरचंदाचे झाड तुझच समज." हरकुमार निशिनाथाला म्हणाला.

"देवाचा माझ्यावर इतका अनुग्रह व्हायला मी देवाचा एवढा मोठा भक्त थोडाच आहे?" निशिनाथ म्हणाला.

"देव स्वतः कधी काही करीत नाही, तो, त्याने ज्यांना थोडी फार बुद्धी दिली आहे त्यांच्या द्वारा सर्व करवितो. तुझ्या बाबतीत आपल्या वर्गातला नकुल आहे ना, त्याच्याशी मी सर्व बोलतो. त्याला इंद्रजाल चांगले माहीत आहे. तुझी समस्या तो नक्कीच सोडवील." हरकुमार म्हणाला.

दोन दिवसांनी गावप्रमुख काशीनाथाच्या सफरचंदाच्या झाडाखाली जमले.

हरकुमार उभा राहून म्हणाला—"हे झाड निशिनाथाला देण्याची देवाची इच्छा आहे की नाही याचे प्रमाण या झाडाच्या किंवा झाडाच्या फळात मिळाल्याशिवाय राहणार नाही. मी झाडावर चढून तीनचार फळे काढून आणतो. त्यांत काही प्रमाण मिळते का, पाहू या!"

त्याने झाडाला नमस्कार केला आणि झाडावर चढून निरनिराळ्या फांद्यांची दोन तीन फळे काढली आणि ती आपल्या खिशात ठेवून खाली उतरला. त्याने खिशातून फळे काढून तेथे जमलेल्या सर्वांना दाखविली. फळे पाहून काही प्रमाण मिळाले नाही.

"फळांच्या आत काही आहे का पाहूया!" असे म्हणत हरकुमारने काशीनाथाच्या हातात एक फळ दिले व एक चाकू देऊन, त्याचे साल काढून आत काही प्रमाण मिळते का पहायला सांगितले.

काशीनाथने सफरचंदाचे साल काढल्याबरोबर आंत फळाचे दोन भाग झालेले दिसले. आणखी एका फळाचे साल सोलून पाहिले तर ते सुद्धां दोन भागात विभागलेले दिसले.

"खरंच हो, देवाची लीला अगाध आहे!" सर्व म्हणाले.

गांवप्रमुखांपैकी एक वृद्ध होता त्याने काशीनाथाला विचारले—"हा देवाचा निवाडा आहे. आतां तरी हे सफरचंदाचे झाड आपल्या धाकट्या भावाला द्यायला तयार आहेस का?"



"तुम्ही म्हणाल तसे! आतां नाही कसं म्हणू? मी मुलाच्या नावाने शपथ घेतली नव्हती का? आतां ते झाड निशीचेच!" काशीनाथ म्हणाला.

निशिनाथने त्या झाडाची फळे विकून सायकल विकत घेतली.

एकदां त्याच सायकलीवर बसून तो व हरकुमार दोघे शहरात जात असतां वाटेत निशिनाथने त्याला विचारले–"मित्रा! सफरचंद आंतून कापलेले कसे होते मला नाही कळले. देवाने खरोखरच माझ्यावर कृपा केली होती का रे?"

"तू तेवढे पुण्य कोठे केले आहेस रे? हे सर्व आपला मित्र नकुल आहे ना, त्याचे काम आहे!" हरकुमार म्हणाला.

"ते कसं काय केले रे त्याने?" निशिनाथने विचारले.

"त्याने सांगितल्याप्रमाणे मी रात्री तुमच्या झाडावरून कोणाला कळू दिल्याशिवाय काही सफरचंदे काढून घेऊन गेलो होतो. नंतर सुईत बळकट दोरा ओवून ती सुई फळाच्या आंतल्या बाजूने सालाला लागल्याशिवाय आतल्या आत फिरवीत नेऊन फळाच्या पलीकडच्या बाजूला ओढून बाहेर काढली. नंतर सुई दुसऱ्या बाजूने पुन्हा फळात घालून फळाच्या आत सालाच्या आतल्या बाजूने फिरवीत सरकवीत पहिल्याने जेथून खुपसली होती तेथून बाहेर काढली. म्हणजे सालाखाली दोरा फळाला गुंडाळला गेला. नंतर दोऱ्याची दोन्ही टोके धरून दोरा ओढला. फळाचा आतला भाग दोऱ्याने आतल्या आत कापला गेला आणि दोरा बाहेर आला. नंतर फळ फडक्याने छान पुसले आणि त्याच्यावरच्या सुई टोचल्याचा खुणा नाहीशा करण्याचा प्रयत्न केला. अशी तयार करून ठेवलेली सफरचंदे खिशात ठेवूनच झाडावर चढलो होतो आणि समोर काढलेल्या फळांऐवजी पूर्वी तयार करून ठेवलेली फळे खिशातून काढून दाखविली." हरकुमारने हातचलाखीचे या शब्दात वर्णन केले.





# शेरास सव्वा शेर

आनंद हा वाण्याच्या दुकानात कारकून होता. त्याचे लक्ष्मीशी लग्न झाले. आनंदने तिला पाठवणी करवून आणले. दोघांचा संसार थाटला. आल्याबरोबर आनंदने लक्ष्मीला एक गोष्ट समजावून सांगितली. म्हणाला–"मी दुकानात जातो आहे. एकच एक डोळा असलेली एक म्हातारी आहे गावात. तिला चुकूनसुद्धां घरात पाऊल टाकू देऊ नकोस."

लक्ष्मी घरातले काम उरकून बाहेरच्या खोलीच्या खिडकीत बाहेरची।गंमत पहायला येऊन बसली. इतक्यात एक डोळ्याची कानी म्हातारी येतांना दिसली. ती घरासमोर चाचपडत येत होती, लक्ष्मीने चटदिशी खिडकी लावून घेतली.

ती म्हातारी दररोज घरासमोर चाचपडत येई. लक्ष्मी पाहून न पाहल्यांसारखे करी. परंतु एकदा लक्ष्मीच्या मनात एक शंका आली. ती कंबर मोडलेली म्हातारी, तिचा आपल्या नवऱ्याला एवढा का राग. की संशय? तिला येऊ न द्यायला सांगण्यात काही तरी गुपित असले पाहिजे!

तो संशय मनात आल्यावर ती स्वतःला जास्त आवरू शकली नाही. दार उघडून तिने म्हातारीला प्रेमाने आत बोलाविले. तोंड लपविल्यासारखे करून म्हातारी घरात येऊन बसली आणि लक्ष्मीशी प्रेमाने बोलली.

म्हातारी दिसायला बेताचीच होती, परंतु तिच्या बोलण्यात व वागण्यात एक तऱ्हेचे आकर्षण होते. लक्ष्मीने काही फराळाचे आणून समोर ठेवले ते खात म्हातारी म्हणाली–"मुली, तू किती चांगली आहेस ग! तुला पाहिले की माझी कोस कळवळून येते बघ. कारण, तुझ्या नवऱ्याला वाईट संवय विचारशील तर कोणती नाही? दररोज संध्याकाळी गावाच्या टोकाला



असलेल्या झोपडीत जुगार खेळून छान काळोख पडल्यावर घरी परत येतो. माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल तर संध्याकाळी स्वत: जाऊन पाहून कां नाही येत!" असें सांगून लक्ष्मीच्या मनात विष कालवून म्हातारी निघून गेली.

आपला नवरा जुगारी असल्याचे ऐकून लक्ष्मीला कोणी घागरभर पाणी डोक्यावर ओतल्यासारखे झाले. आपलं बिंग बाहेर पडू नये म्हणून नवऱ्याने म्हातारीच्या वाऱ्याला जाऊ नकोस, असे सांगितले असावे, असे लक्ष्मीला वाटले.

त्या दिवशी रात्री तिने घराची मागची पुढची दारे बंद करून बाहेरच्या दाराला कुलूप लावले आणि गावाच्या टोकाला म्हातारीने सांगितलेल्या झोपडीत वाकून पाहिले. आत कोणीतरी जुगारी जुगार खेळण्यात गढून गेले होते. म्हणजे म्हातारी म्हणाली त्यात बरेच खरे आहे तर! पण त्या जुगाऱ्यात तिचा नवरा मात्र तिला दिसला नाही.

पुन्हां दुसरा विचार तिच्या मनात आला—"म्हातारीची बुद्धीच कुजकी दिसते आहे. नवरा बायकोत भांडणे लावण्याचा धंदाच करीत असावी!" असा विचार करीत ती घरी येऊन पाहते तर परसातली भांडी, पातेली नाहीशी झालेली होती. कोणीतरी आवाराची भिंत ओलांडून येऊन उचलून घेऊन गेला असावा. नवऱ्याला, काय सांगावे, तिला सुचेना.

काळोख पडल्यावर नवरा आला. तिने रडतरडत घडलेले वृत्त जसेच्या तसे खरं खरं सांगून टाकले. "तुम्ही सांगितले त्याच्याकडे दुर्लक्ष करून म्हातारीला घरात येऊ दिले, त्याची चांगली अद्दल घडली." ती म्हणाली.

"चोरीचा धंदासुद्धा म्हातारी करीत असेल. अशी कामे करून द्यायला तिला एक दांडगा नातू आहे. ती लबाड आहे, हे सर्वांना माहीत आहे. परंतु आजपर्यंत तिला कोणी जाळ्यात पकडू शकला नाही." आनंद म्हणाला.

लक्ष्मीला म्हातारीच्या झिज्या धरून ओढाव्या असे वाटू लागले. काय वाटेल ते करून तिला आपल्या जाळ्यात पकडायचे. त्यासाठी तिने एक युक्ती योजून ती सांगितली.

लगेच दुसऱ्या दिवशी ती घराला कुलूप लावून एका ट्रंकेसह निघाली म्हातारीच्या घरी. घरात म्हातारी व तिचा तो चोर नातू दोघं होती. लक्ष्मीला पाहतांच म्हातारीचा चेहरा पालटला.

"आजी, तुम्ही माझ्या नवऱ्याचं बिंग बाहेर काढलंत त्याचं तुम्हांला पुण्य लागो! मी त्या घरात यापुढे एक क्षणही राहायला तयार नाही." म्हणत लक्ष्मी पदराने तोंड झाकून ओक्साबोक्शी रडू लागली.

आपण तोंडाला आलं ते खोटं बोललों आणि ते खरंच झालं की, असे वाटून म्हातारीला फार आनंद झाला. म्हातारीने लक्ष्मीला घरात बोलावून घेऊन खाटेवर बसायला सांगितले.

लक्ष्मी म्हातारीला म्हणाली—"माझा नवरा नुसता जुगारीच नाही, दारूसुद्धा पितो. मध्य रात्रीपर्यंत जुगारीचा अड्डा चालू असतो. घराला कुलूप लावून आले आहे. उजाडल्यावर गाडी करून माहेरी निघून जाईन, म्हणते. तुम्ही आमच्या घराजवळ राहून तो आल्याबरोबर त्याला देऊन टाका किल्ली."







म्हातारीचा त्या बोलण्यावर विश्वास बसला. म्हणाली–"मी तुला आईसारखी आहे! एवढी मदत करू शकणार नाही का?" असे म्हणत म्हातारीने किल्ली घेतली.

"दारू पिऊन येईल तो, आणि मारील तुम्हांला, म्हणून बरोबर नातवाला घेऊन जा बाई!" लक्ष्मी म्हणाली.

तो विचार म्हातारीच्या मनात त्या आधीच आला होता. लक्ष्मीच्या तोंडून तेच वाक्य बाहेर पडले. म्हणून तिला किती आनंद झाला. ती नातवाला घेऊन लक्ष्मीच्या घरी निघाली. मध्यरात्र उलटे-पर्यंत लक्ष्मीचा नवरा येतो कशाला? योग जमून आला आहे! सर्व घर साफ करतां येईल, असा विचार करून म्हातारी कुलुप काढून नातवाबरोबर घरात शिरली. हाताला आलं ते सामान घेऊन दोन गाठोडी बांधली. नंतर दोघं मागच्या दाराने पळून जायचे ठरवून, गाठोडी घेऊन निघाली. निघतांना बाहेरचे दार उघडून ठेवले. बाहेर दहाजण उभे असलेले पाहून म्हातारी घाबरून गेली. बाहेर असलेल्यांच्या हातात दिवे आणि काठ्या होत्या. त्यांना पाहून म्हातारी मागच्या दाराने पळायला निघाली तर तेथेदेखील दहाजण उभे होते.

"आज इतक्या दिवसानंतर तुमची चोरी व लबाडी बाहेर पडली, आजी! तुम्हांला पळायला मार्ग नाही, गुपचुप कैद व्हायला तयार व्हा, दोघं." आनंद म्हणाला.

मार खायला लागणार हे ओळखून म्हातारी व तिचा नातू मानाखाली करून उभे राहले. सर्व लोक म्हातारीला घेऊन तिच्या घरी गेले. मध्यंतरी लक्ष्मीने घरातले सर्व सामान आणून बाहेरच्या खोलीत ठेवले होते. तो सर्व चोरीचा माल होता, आलेल्या सर्व लोकांनी आपापला चोरी गेलेला माल ओळखला. लक्ष्मीला तिची चोरीला गेलेली भांडी पातेली मिळाली.

म्हातारीला व तिच्या नातवाला पोलीस अटक करून घेऊन गेले. सर्वांनी लक्ष्मीच्या चातुर्याची खूप वाखाणणी केली.



# वरपरीक्षा

अवंतीची राजकन्या अत्यंत रूपवती होती. तिच्यासाठी वरशोधन चालू होते. राजाने एक वरपरीक्षा ठेवली व त्यासाठी फक्त तीन देशांच्या राजकुमारांकडे दूतांकरवी निमंत्रणें पाठविली.

राजकुमार आल्यावर अवंतीचा राजा त्यांना कुत्री बांधत त्या जागी घेऊन गेला व म्हणाला–"ही कुत्री म्हणजे वरपरीक्षेत हारलेले राजकुमार आहेत. पूर्वेकडे जो डोंगर आहे, त्याच्या गुहेत प्रवेश करून परत यायचे, हीच परीक्षा आहे,"

ते ऐकल्यावर तिघांपैकी एकाने त्या वरपरीक्षेत भाग न घेण्याचे ठरविले आणि घरी निघाला. उरलेले दोघे डोंगराच्या दिशेने निघाले. ते गुहेजवळ पोचले असतील तेंव्हां त्यांना गुहेतून कुत्र्याचे भुंकणे ऐकू आले. दोघांपैकी एकाने आपला घोडा मागे वळविला आणि निघून गेला.

उरलेल्या राजकुमाराने साहस करून गुहेत प्रवेश केला. तेथे राजकन्या स्वतः त्याला सामोरी आली व तिने त्याच्या गळयात वरमाला घातली.





# सचोटी व इमान

एका जमिनदाराकडे महादू नावाचा एक माळी आणि कृष्णा नावाचा बरकाम करणारा नोकर होता. दोघे जवळजवळ एकाच वेळी कामाला लागले. परंतु दोघांचे परस्परांशी थोडेदेखील पटत नसे.

एकदां जमिनदार कृष्णाला बरोबर घेऊन फिरत फिरत आपल्या मळ्यात आला. त्या वेळी महादू झाडांना पाणी लावीत होता. जमिनदार काही वेळ महादू झाडाला पाणी लावण्याचे काम नीट करीत असल्याचे समाधान त्याच्या चेहऱ्यावर दिसले. निघून गेला. कृष्णासुद्धा त्याच्याबरोबर निघून गेला. ते दोघे उभे होते तेथे महादूला काहीतरी चकाकत असल्याचा भास झाला. जवळ जाऊन त्याने पाहिले तर ती जमिनदाराची हिऱ्याची अंगठी होती.

"चुकून पडली असेल! ही मलाच मिळाली म्हणून बरं झालं, ती त्या कृष्णाच्या हातात पडली असती तर काय झालं असतं, सांगायला हवं का?" महादूने विचार केला.

इतक्यात त्याला एक चलाखीची गोष्ट सुचली. त्याने आजूबाजूला पाहिले आणि चटदिशी अंगठी कंबरेला खोचून ठेवली आणि सर्व जण झोपल्यावर कृष्णाच्या खोलीच्या बाजूला गेला.

महादूला पाहिजे होते तसे कृष्णाच्या खोलीचे दार सताड उघडे होते. त्याने आत वांकून पाहिले. कृष्णा अजून झोपलेला नव्हता, आपली पेटी उघडून काहीतरी शोधीत होता. शेवटी पेटीतून काहीतरी त्याने काढून घेतले आणि मुठीत ठेवून पेटी बंद करून बाहेर येऊं लागला.

महादू बाजूला आड उभा राहिला आणि कृष्णाला बाहेर जाऊ देऊन मांजराच्या पावलाने खोलीत गेला. त्याने पेटी उघडून अंगठी पेटीत खाली ठेवून दिली आणि बाहेर आला.

तेव्हां त्याला इतर गोष्टी सुचू लागल्या. तो विचार करू लागला. मध्यरात्रीच्या वेळेला कृष्णा कोठे बरे बाहेर निघाला असावा? त्याने मुठीत काय ठेवले असावे? तो जास्त वेळ न थांबतां झपझप पावले टाकीत कृष्णाच्या पाठोपाठ गेला.

कृष्णाने मळ्यात जाऊन तेथे कालव्याच्या काठच्या एका झाडाच्या ढोलीत काहीतरी लपवून ठेवले. सामान्यपणे महादू दररोज स्नानाला जाई तेव्हां त्याच ढोलीत आपले कपडे ठेवीत असे. त्या ढोलीत कृष्णाने काय बरे ठेवले असेल, पहावे असे साहजिकच महादूला वाटले. कृष्णा परत निघून गेल्यावर महादू त्या ढोलीजवळ गेला. परंतु इतक्यात त्याच्या डोक्याला जोराने कसला तरी मार बसला आणि तो बेशुद्ध होऊन खाली पडला.

तो शुद्धीवर आला तेव्हां तो आपल्या खोलीत पोचलेला होता. कृष्णानेच आपल्याला पाठीमागून पाहून मारले असेल व उजाडल्यावर त्याच्या समाचाराला जाण्याचे त्याने मनाशी ठरविले.

दुसऱ्या दिवशी जमिनदाराने आपल्या दोघां नोकरांना बोलावून घेतले व विचारले— "माझ्या मनगटातली सोन्याची साखळी



कोणीतरी उडवलेली दिसते आहे. ते काम तुमच्या दोघांशिवाय इतराचे कोणाचे असणे शक्य नाही. बोला कोणी घेतली आहे ती, नाहीतर दोघांची चामडी लोळवितो."

ते ऐकून महादू चकित झाला. अंगठी हरविली होती आणि जमिनदार सोन्याची साखळी गेली म्हणतो आहे, हे काय? परंतु कृष्णामात्र निःसंकोचपणे म्हणाला—"चोर महादू आहे. मालक! तो मळ्यात रात्री काहीतरी लपवून ठेवीत असतां मी पाहिलं त्याला. पाहिजे तर दाखवितो." असे म्हणत तो जमिनदाराबरोबर त्या झाडाजवळ गेला.

परंतु ढोलीत हात घालून चांचपडून कृष्णाने पाहिले व मनात म्हणाला—"इकडेच तर लपवून ठेवली होती? कोठे गेली?"

कृष्णाची लबाडी महादूला कळली. आपल्यावर चोरीचा आळ आणण्यासाठी जमिनदाराची सांखळी या लबाडाने या झाडाच्या ढोलीत लपविली होती तर! परंतु कोणता तरी दुसराच चोर आपल्या पाठीमागून येऊन आपल्या डोक्यात मारून ती सांखळी काल घेऊन गेला!

महादूला कृष्णाचा भयंकर राग आला. तो जमिनदाराला म्हणाला—"सांखळी चोरणारा चोर कोण हे मला माहीत आहे. मुळात अंगठी हरवल्याचे आपल्याला माहीत नाही वाटते. दोन्ही कृष्णानेच उडविल्या आहेत. असे माझ्याबरोबर या जरा!" असे म्हणत जमिनदाराला कृष्णाच्या खोलीत घेऊन गेला. पेटी उघडून पाहिली. परंतु तीत अंगठी नव्हती. "पेटीतच तर ठेवली होती. काय झाली म्हणावयाची?" मनातल्या मनात महादू बडबडला.

[illegible] हात काढीत दाखवीत म्हणाला—"ही पहा, साखळी आणि ही हिऱ्याची अंगठी!"

दोघां नोकरांची तोंडे उतरली. दोघे माना खाली करून उभे राहिले.

"तुमची दोघांची परीक्षा घेण्यासाठी मी हे नाटक केले होते. माझी सांखळी आणि अंगठी तुमच्यापैकी एकेकाच्या दृष्टीस पडेल अशी मीच टाकली. ती आणून कोण देतो हे मी पाहणार होतो. तुम्ही त्या चोरल्या नाहीत, हे खरे; परंतु तुम्ही त्यांच्या सहाय्याने परस्परांना चोर ठरविण्याचा आणि आपल्यावर माझा विश्वास जास्त बसवून घेण्याचा प्रयत्न करून पाहिलात. तुमच्यात सचोटी असू शकेल, परंतु तुमचे परस्परांशी वैर आहे. म्हणून मला तुमच्यामुळे विनाकारण कष्ट सहन करावे लागण्याची शक्यता आहे. बरं तर जा, आपापल्या घरी!" जमिनदार म्हणाला.

माना खाली घालून दोघे तेथून निघून गेले.





# स्वार्थाचे पट्टे

एका गावी विद्यानाथ नावाचा एक थोर विद्वान एक गुरुकुल चालवीत असे. त्या गुरुकुलाची ख्याती ऐकून दूरदूरच्या प्रांतातून विद्यार्थी विद्याभ्यासासाठी तेथे येत असत.

विद्यानाथाचा मुलगा बृहस्पती बापासारखाच थोर विद्वान निघाला. नावाला साजेल असेच त्याने पांडित्य संपादन केले. आपल्या मागे आपल्या मुलालाच गुरुकुलाचा भार सोपविण्याचे ठरवून विद्यानाथ मुलाला म्हणाले—"बाळा बृहस्पती, तुझा विद्याभ्यास संपला. आतां तू लोकव्यवहार व लोकज्ञान प्राप्त करून घेणे आवश्यक आहे. जगाची रीत, लोकव्यवहार इत्यादी गोष्टींचे ज्ञान व अनुभव झाल्याशिवाय केवळ पुस्तकी विद्या कामाची नाही. त्याशिवाय तू आपल्या विद्यार्थ्यांना देखील शिकविण्यात पूर्ण यशस्वी होऊ शकणार नाहीस. म्हणून तू काही दिवस देशाटनाला जाऊन ये."

पित्याची आज्ञा मानून बृहस्पती देशाटनाला निघाला. गांवोगांव पायी फिरत लोक आपले जीवित कसे घालवितात हे प्रत्यक्ष पहात, पुस्तकांत त्याने कधी न वाचलेल्या गोष्टींची माहीती करून घेतली.

एका गावात पिळदार शरीरयष्टी असलेले तरुण पहिलवान एका अशक्त दुबळ्या माणसाची पादपूजा करून "महाबली की जय!" म्हणून त्याचा सत्कार करीत होते. त्याला त्या मागचे गूढ कळले नाही, म्हणून त्याने चवकशी करून पाहिली तेव्हां त्याला कळली ती गोष्ट अशी:

फार पूर्वी त्या गावात कोणी महाबली नावाचा माणूस रहात असे. त्याने, त्या गावावर आलेल्या अनेक संकटांतून गावकऱ्यांना वांचविले होते. रानटी श्वापदे

गावात फार शिरत. महाबली एकट्याने त्यांना ठार करी. असाच एकदां दुर्मुख नावाचा एक राक्षस त्या गावातच नव्हे तर पंचक्रोशीतील गावातल्या लोकांना त्रास देऊ लागला. महाबलीने महाकालीची पूजा केली आणि दुर्मुखाशी घोर युद्ध करून त्याला ठार केले. म्हणून महाबली त्या गावच्या गावकऱ्यांच्या व जवळपासच्या इतर गावांतील लोकांच्या आदरास पात्र ठरला. सर्व त्याला एक आदर्श वीर देवपुरुषच मानून त्याची पादपूजा करू लागले. त्याने दुर्मुखाचा ज्या दिवशी वध केला त्या दिवसाला एक पर्वदिन म्हणून गावकरी साजरा करू लागले. त्या दिवशी गावकरी महाबलीची पादपूजा करीत. महाबलीने इहलोकाची यात्रा संपवून परलोकी प्रस्थान केले, त्याला अनेक शतके होऊन गेली. परंतु त्या दिवशी महाबलीच्या वंशजांची पादपूजा चालू राहली.

पूर्वजांच्या थोर गुणांवरून त्यांच्या वंशजांची आराधना होत असलेली बृहस्पतीने अनेक ठिकाणी पाहिली. तर याविरुद्ध एक घटना देखील त्याने पाहिली.

तो त्या गावच्या एका श्रीमंताच्या घरी उतरला होता. विद्यानाथाचा मुलगा म्हणून देशभर, जिथे जिथे तो गेला, तिथे त्याचा खूप आदरसत्कार होत असे. कारण विद्यानाथाची ख्याती देशभर पसरलेली होती. अर्थातच त्या श्रीमंताने बृहस्पतीचा आतिथ्यसत्कार फार चांगला केला.



[illegible] गावात एका दरबारी कवीची निवड व्हायची आहे. आपल्या सारख्या विद्वानांसमोर ही निवड होणार आहे, हे आमचे केवढे मोठे भाग्य! तरी आपण त्यावेळी उपस्थित राहण्याची कृपा करावी.''

दरबारी कवीच्या पदासाठी सहा उमेदवार होते. त्यांपैकी फक्त दोघेच आशुकविता करणारे होते. त्यातल्या एकाने स्वत: रचलेली तीन काव्ये बरोबर आणली होती. त्या कवींकडे पाहून श्रीमंत म्हणाले– “तू अंबर आहेस, होयना?''

त्याने होकारार्थी मान हलविली.

“अंबर असशील तर तू निदान पांच महाकाव्ये रचली पाहिजे होतीस, दरबारी कवीचे पद मिळवायला!'' असे सांगून श्रीमंताने दुसऱ्याला दरबारी कवी म्हणून नेमणूक केली.

बृहस्पती दरबारी कवीची ही विचित्र निवड पाहून चकित झाला व त्याने विचारले–“काय हो! त्याचे नाव अंबर आहे का? त्याच्यात कोणती उणीव होती?'' तेव्हां त्याला कळले की अंबर हे माणसाचे नाव नव्हते, जातीचे नाव होते. आपण आकाशातून सरळ खाली उतरलो असे सांगून त्या जातीच्या लोकांनी ते नाव स्वत:च्या जातीला लावून घेतले. विद्याभ्यासाचा अधिकार फक्त आपल्यालाच आहे, इतरांनी शारीरिक श्रम करावे असे त्यांचे म्हणणे होते. त्या साठी त्यांनी












राजाची संमती मिळविली आणि आपल्या जातीला इतर सर्वांनी पूज्य मानावे असे सांगितले; काही जातींच्या लोकांना त्यांनी अस्पृश्य म्हणून जाहीर केले; प्रजेची नाना तऱ्हेने पिळवणूक केली. काही काळ लोटल्यावर राज्यात पुष्कळ बदल झाले. प्रजेचेच राज्य सुरू झाले. तेव्हांपासून अंबर जातीवर अनेक बंधने आली. आतांच्या अंबरांमध्ये तो अहंकार मुळीच राहिला नाही. परंतु त्यांना पूर्वजांनी केलेल्या चुकांचे फळ भोगावे लागत आहे.

बृहस्पतीने एक वर्षभर देशाटन केले असेल. तो घरी परत आला तोपर्यंत त्याला लोकज्ञान पुष्कळच झालेले होते. तोच त्याच्या वडिलांनी चालू केलेल्या गुरुकुलाचा कुलपती झाला.

एकदां तो आपल्या शिष्यांना खारीच्या भक्तीची कथा सांगत असतां खारीने सेतुबंधनाच्या वेळी जे अल्पस्वल्प सहाय्य केले त्याची वाखाणणी करून रामाने तिच्या अंगावर प्रेमाने हात फिरविला तेव्हां रामाच्या बोटांच्या खुणा तिच्या पाठीवर उमटल्या. त्या आजपर्यंत तिच्या वंशजांच्या अंगावर कायम असल्याचे सांगितले. तेव्हां त्याच्या शिष्याने एक शंका काढली. म्हणाला–"गुरुवर्य! प्राण्यांच्या देहाची रचना व रंगरूप वगैरे ज्या गोष्टी जन्मजात असतात त्याच वंशपरंपरागत चालू राहतात. परंतु कृत्रिम गोष्टी कशा परंपरागत होऊ शकतील? आमच्या वडिलांना लहानपणी खांद्याला मोठी जखम झाली आणि तिचा व्रण खांद्यावर आजपर्यंत आहे. परंतु तो आम्हां भावंडांपैकी एकालाही आला नाही!"

बृहस्पती ते ऐकून म्हणाला–"मी सांगितले त्यातला मतितार्थ तो नाही. खारीच्या पाठीवरच्या खुणा वर स्पष्ट दिसतात, परंतु मानवांच्या जातीत न दिसणाऱ्या खुणा कायम होऊन जातात." असे सांगून त्याने प्रत्यक्ष पाहिलेली महाबलीची पादपूजा आणि अंबराची गोष्ट सांगितली.



# हेवा

एका गावात रामू आणि श्यामू नावाचे दोन शेतकरी रहात असत. श्यामू गरीब शेतकरी होता आणि रामू सधन शेतकरी.

एकदा श्यामूने आपल्या शेतात सुरण लावला. त्या वर्षी सुरण मोठमोठे झाले. तो त्यांना हत्तीच म्हणू लागला. त्याने एक कांदा राजाला नेऊन दिला. तो पाहून राजाने चकित होऊन श्यामूला खूप पैसे दिले.

ते ऐकून रामूला हेवा वाटला. त्याने विचार केला, हत्तीसारख्या सुरणाला राजाकडून इतके मोठे इनाम मिळाले तर हत्तीच नेऊन नजराणा म्हणून दिला तर केवढे मोठे बक्षिस मिळेल, असा विचार करून एक हत्तीच विकत घेऊन राजाला दिला.

"याला काय इनाम द्यावे?" राजाने मंत्र्याला विचारले.

"हत्तीचा नजराणा आणून देणाऱ्याला इनाम म्हणून पैसे कशाला द्यायचे? सुरणाचा कांदा देऊन निरोप द्यावा!" मंत्री म्हणाला.

राजाने श्यामूने आणून दिलेला सुरणाचा कांदा देऊन रामूला निरोप दिला.





# झोप उडाली!

महादू नावाच्या घरगड्याला नाही म्हणतां म्हणतां एक मुलगा झाला. त्याने त्याचे नाव ठेवले सोमू आणि त्याला खूप लाडात वाढविले. सोमू मोठा होऊ लागला तसतसा बापाला कामाला मदत करू लागला.

परंतु सोमूला एक वाईट संवय लागली होती. तो सकाळी उन्हे निघाली तरी घोरत पडून असे. झोपून उठल्यावरोबर बापासाठी शेतावर न्याहरी घेऊन त्यालाच जावे लागे. मग तो काम करी.

आपला मुलगा आपल्या बरोबरीने काम करतो म्हणून महादूला किती आनंद होई? परंतु उजाडतांच न उठणाऱ्याला कोण घरगडी म्हणून काम देईल याची काळजी देखील त्याला वाटे. आपल्या मागे मुलाचे कसे होईल? म्हणून मुलाने उजाडतांच उठावे म्हणून त्याने खूप प्रयत्न करून पाहिले. परंतु सर्व फुकट गेले. सोमू बापाच्या शब्दाला मान देई, परंतु पहाटे उठण्याची गोष्ट त्याला साध्य झाली नाही.

हळूहळू महादूसमोर मुलाची ही संवय कशी मोडायची हा एक फार मोठा प्रश्नच उभा राहिला, आपण रात्रंदिवस इतके काबाडकष्ट करीत आहों आणि तरीसुद्धा एक दमडीदेखील उरत नाही. आपण जिवंत असू तोपर्यंत मुलाचे पोट भागेल, परंतु पुढे? त्याने आपल्या पायावर उभे राहिलेच पाहिजे. त्याशिवाय कसे? हातपाय हालल्या शिवाय डोके चालणार नाही. सोमूने आपली ही झोप सोडली नाही तर सारे आयुष्य त्याला कष्टच सोसावे लागतील! महादू आपल्या मनातली ही गोष्ट आपल्या मेहुण्याला नेहमी सांगे.

एकदां महादूला धन्याने सांगितलेल्या कामासाठी बाहेर गांवी जावे लागले. म्हणून त्याने मुलाला आपल्या मेहुण्याकडे नेऊन ठेवले व परत येईपर्यंत मुलाला संभाळायला सांगितले.

सोमू आपल्या मामाच्या घरी राहू लागला. त्याच्या तिसऱ्या दिवशी मामाच्या घरात पहाटे एक चोरी झाली. उजाडतांच सोमूचा मामा व मामी कामाला निघून गेली. सोमू एकटाच घरात असतांना ही चोरी झाली.

"पहाटे तू घरात असतां तुला कळल्याशिवाय ही चोरी कशी काय झाली असेल रे? तूच ही चोरी केली असावीस!" मामा सोमूला म्हणाला. शेजारपाजारचे लोकसुद्धा म्हणाले की सोमूने चोरी केली असावी. दुसरा कोण चोरी करणार?

त्याला काही एक माहीत नसल्याचे आणि तो झोपून असल्याचे सोमूने किती सांगितले. मोलमजूरी करून पोट भरणारा इतके उजाडेपर्यंत झोपतो, या गोष्टीवर कोणाचा विश्वासच बसेना.

चोर म्हणवून घेतल्यापासून बाप केव्हां परत येतो आणि त्याच्याजवळ आपण सर्व केव्हां सांगून टाकतो असे सोमूला वाटू लागले. नंतर महादू आला. मुलावर चोरीचा आळ आल्याबद्दल महादूला फार राग आला. तो मेहुण्याजवळ भांडला की, मुलाला ती वाईट संवय नाही आणि त्याला घरी बोलावून घेऊन गेला.

महादू म्हणाला ते त्याच्या मेहुण्याने गुपचूप ऐकून घेतले.

परंतु दुसऱ्या दिवशी महादू उठला तेव्हां सोमूसुद्धां उठून उभा राहिला. महादूला आश्चर्यच वाटले. त्याने विचार केला, तर मग आपल्या मेहुण्याने ही चोरीची गोष्ट मुलाची ही वाईट संवय घालविण्यासाठीच तर केली नसेल! आपण किती प्रयत्न करून पाहिला, परंतु त्याची ही संवय घालवू शकलो नाही. परंतु मेहुण्याने तेवढे यश मिळविले, त्याने त्याचे आभार मानले.

"हे पहा, महादू अण्णा! या लहानशा गोष्टी करतां हे नाटक करावे लागले लहानपणी केले म्हणून भागले, पुढे नसते जमले!" मेहुणा म्हणाला.





# पोपटपंची

एका गावी एक श्रीमंत म्हातारी बाई रहात असे. तिला एक नात होती. दुसरे कोणी जवळचे नव्हते. ती आपल्या नातीला कडक शिस्तीत वागवीत असे. नातीला सारखी बोलणी खावी लागत. म्हणे, तिने घराबाहेर जाऊन बरोबरच्या मुलीबरोबर खेळता कामा नये; त्या मुलींनी खेळायला नातीकडे येऊ नये! म्हणून नातीला घर म्हणजे एक कोंडवाडा वाटू लागला.

घरात आजीने एक पोपट पाळला होता. त्याच्याशिवाय तिला कोणाची सोबत नव्हती. आपल्या बरोबरच्या शेजारच्या मुलींना खेळतांना व आनंदाने नाचतांना व बागडतांना पाहून तिला म्हातारीचा फार राग येई. परंतु म्हातारीसमोर तिची तोंड उघडायची छाती नव्हती. ती तोंडात जीभच नसल्यासारखी राहू लागली आणि अगदी गरीब भोळ्या मुलांसारखी वागू लागली, जणुकाही तिला काही कळतच नाही. म्हातारी घरात नसे तेव्हां मात्र तिला एकदम खूप उत्साह चढे व ती बडबडे "ही म्हातारी मरत कां नाही!"

नातीच्या तोंडी ते वाक्य कित्येकदां ऐकून पोपट तेच म्हणू लागला. एकदां तो पोपट म्हातारी घरात असतांना एकदम म्हणाला—"ही म्हातारी मरत कां नाही!"

ते ऐकून म्हातारी थक्कच झाली. रात्रंदिवस पिंजऱ्यात राहणाऱ्या पोपटात हा दुष्टपणा कोठून आला, तिला कळेना. कारण तिची नात मुकीच आहे असे म्हातारीला वाटत असे. आपल्या शिवाय नातीला आहे कोण जगात? तेव्हां तिच्या मनात असले विचार येणे शक्यच नाही आणि तिला बोलतां कोठे येते आहे!

एकदां त्या म्हातारीच्या घरी तिची एक शेजारीण म्हातारी बाई आली. दोघी बसून बोलत असतां पोपट एकदम मध्ये म्हणाला—"ही म्हातारी मरत कां नाही?"

ती पोपटपंची ऐकून शेजारीण म्हातारीला कमालीचा राग आला. ती पोपटाच्या मालकिणीला काही सांगत होती ते वाक्य तोंडातल्या तोंडात राहून गेले. पोपटाची मालकीण काय हा उर्मटपणा पोपटाचा असे पुटपुटत त्या म्हातारीची माफी मागू लागली.

काय वाटेल ते होवो, पोपटाची ही वाईट खोड मोडलीच पाहिजे व असले अवाच्य बोलणे थांबविलेच पाहिजे, असे म्हातारीने मनाशी ठरविले. शेजारी एक शास्त्रीबुवा रहात होते. त्यांच्या घरात एक पोपट होता. म्हणून शास्त्रीबुवांना पोपटांचा स्वभाव कळत असावा, असे वाटून ती शास्त्रीबुवाकडे जाऊन म्हणाली—"शास्त्रीबुवा! आमचा पोपट अवाच्य बोलायला शिकला आहे हो! कोणी घरी आला की भीती वाटते. तेव्हां त्याला चांगले बोलायला काही युक्ती सांगाल का?"

"ते काही तेवढे कठीण नाही! आमचा पोपट चांगले तेच बोलतो. तोंडातून चूकूनसुद्धा अवाच्य येत नाही. पाहिजे तर आमच्या पोपटाला तुमच्या पोपटाबरोबर चार आठ दिवस ठेवून पहा. त्याच्याजवळ तुमचा पोपट चांगले बोलायला शिकेल." शास्त्रीबुवांनी सुचविले.

म्हातारीने त्याप्रमाणे शास्त्रीबुवांच्या पोपटाला आपल्या पोपटाबरोबर पिंजऱ्यात ठेवले. तिला मोठे ओझे डोक्यावरून उतरल्यासारखे वाटले.

परंतु तेवढ्यात तिचा पोपट नव्या पोपटाला जवळ आलेला पाहून डोळे वटारून ओरडू लागला—"ही म्हातारी मरत कां नाही?"

लगेच शास्त्रीबुवांचा पोपट म्हणाला—"तथास्तु!"

म्हातारीच्या सर्वांगाला आग लागल्यासारखे झाले. तिने पिंजरा उघडून दोन्ही पोपटांना सोडून देत म्हटले—"मरा, जा वाटेल तिकडे!"



# दोघांची फसवणूक

एका गावात रामनाथ व सोमनाथ नावाचे दोघे लक्षाधीश होते. दोघांना लग्नाच्या मुली होत्या. दोघांनी शहरांत राहणाऱ्या एका लक्षाधिशाच्या मुलाच्या स्थळासाठी प्रयत्न सुरू केला. त्यांनी गुरुनाथ नावाच्या एका मध्यस्थाकरवी परस्परांजवळ त्या गोष्टीचा उल्लेख न करतां त्या स्थळाविषयी चवकशी सुरू केली आणि हिंडाफिरायला व इतर खर्चासाठी म्हणून त्या मध्यस्थाला प्रत्येकीं पांच हजार रुपये दिले.

दोघांना काही दिवस गुरुनाथ भेटलाच नाही. चवकशी करता कळले की गुरुनाथने शहरातल्या त्याच लक्षाधीशाच्या मुलाशी आपल्या मुलीचे दहा हजार हुंडा देऊन लग्न करून टाकले.

दोघे गुरुनाथाला जाऊन भेटले व विचारले–"ही काय रे लबाडी ?" तेव्हां गुरुनाथ म्हणाला–"मला तरी काय माहीत हो की, माझ्या मुलीचे आणि त्या मुलाचे पूर्वी जमले होते म्हणून? तुम्हां दोघांच्या तर्फे मी त्या स्थळा करितां प्रयत्न करीत आहे, हे बोलायलाच जागा उरली नाही की हो !"





# देवाचा अनुग्रह

रंगा नावाचा एक चोर चोरी करायला निघण्यापूर्वी सोमेश्वराच्या देवळात जाऊन देवाजवळ मागणे मागे की, त्याचे काम निर्विघ्नपणे पार पडले तर ते देवाच्या अनुग्रहानेच झाले असे मानेन. त्याच्या कामात कधी विघ्न आले नाही.

परंतु एकदां रंगा एका श्रीमंताच्या घरी चोरी करायला गेला असतां पकडला गेला. त्या श्रीमंताने आपल्या नोकरांकरवी त्या चोराला खूप बडवून सोडून दिले. तेव्हां-पासून रंगाचा त्या देवावरचा विश्वास गेला. तो देवळात जाऊन देवाला म्हणाला–"हे, मायामहादेवा! तुझ्यावर विसंबून राहल्याबद्दल मला आज चांगली शिक्षा मिळाली." असे रागाने सांगून तो निघून गेला.

त्याच दिवशी एक साधू आपल्या शिष्या-समवेत त्या गावी आला. जवळपासाच्या लोकांनी येऊन त्या साधूची श्रद्धा भक्ती-पूर्वक खूप सेवा केली. रंगाची भक्ती त्या साधूवर बसली. म्हणून तो चोरी करायला निघण्यापूर्वी सोमेश्वराच्या देवळात जाण्या ऐवजी त्या साधूकडे जाऊन म्हणू लागला–"बुवा! मला माझ्या कामात यशस्वी करण्याचा अनुग्रह करा!"

"ठीक आहे, तसेच होईल! तू जा!" तो साधू म्हणत असे.

एके दिवशी रात्री तो साधू शेजारच्या गावाला एका सावकाराच्या घरी पूजेसाठी जाणार असल्याचे रंगाला कळले. तो साधू त्या गावाला निघण्यापूर्वी रंगाने साधूकडे जाऊन कामात यशस्वी होण्याचा आशीर्वाद मिळविला.

रंगाने त्या रात्री ज्या सावकाराच्या घरी साधू पूजेला जाणार होता त्याच सवकाराच्या घरी चोरी करण्याचे ठरवून

रंगा निघाला होता. तो खूप उशिरां त्या सावकाराच्या घरात शिरला तेव्हां घरातली माणसे छान झोपून घोरत पडली होती. साधूची शिष्यमंडळी देव्हाऱ्याच्या खोली-समोर पडून होती. खोलीचे दार उघडे होते.

रंगा सरळ देव्हाऱ्याच्या खोलीतच शिरला. त्याच वेळी तो साधू एक मोठे गाठोडे घेऊन समोर येऊन म्हणाला– "भक्ता! तू आज इकडे येणार आहेस हे मला दिव्य दृष्टीने कळले होते. हे देवाचे दागिने आहेत. हे घेऊन तू लगेच निघून जा!"

रंगाला परमानंद झाला. साधूने दिलेले गाठोडे घेऊन त्याच्या पाया पडून म्हणाला– "बुवा! आपणच मला देवासारखे आहां!"

परत येतांना तो सोमेश्वराच्या देवळा-जवळ थांबला व देवाला वेडावीत म्हणाला– "पहा, माझ्या देवाने माझे रक्षण करून मला सहाय्य केले. तू असून नसून सारखाच!"

दुसऱ्या दिवशी साधूने आपल्या शिष्या-सह रंगाच्या घरावर धाड घातली व सर्व दागिने उचलून घेऊन गेला.

उजाडल्यावर शेजारगावच्या सावकाराचे दोघे नोकर रंगाला धरून घेऊन जायला त्याच्या घरी आले. रंगाचा जीव तिकडे जातांना खालीवर होत होता. तो वाटेत सोमेश्वराला मनातल्या मनात नमस्कार करून म्हणाला–"प्रभो! तू फक्त या एका वेळी मला वांचविलेस तर मी ही वृत्तीच सोडून देईन."

रंगा सावकाराच्या घरी पोचण्यापूर्वी साधू त्या दागिन्यांसह पोलिसांच्या हाती अटक झाल्याचे सावकाराला कळले. म्हणून रंगा वांचला.

घरी परत येते वेळी तो सोमेश्वराच्या देवळाजवळ थांबून म्हणाला–"देवा! तूच माझे रक्षण केलेस!" असे म्हणत त्याने त्रिवार नाक घासून देवाला साष्टांग नमस्कार केला आणि पुन्हां देवाविरुद्ध काही न बोलण्याबद्दल कान धरला.





# पक्षपात

पूर्वी विजयपुराच्या गादीवर अमरसिंह नावाचा राजा होता. त्याला दोन मुलगे होते, मोठा वीरसिंह आणि धाकटा शूरसिंह. अमरसिंह वारल्यावर वीरसिंह राजा झाला. शूरसिंह आपल्या थोरल्या भावाला फार मान देई.

अचानक सेनापती आजारी पडून वारले. त्या पदावर आपल्या धाकट्या भावाला नेमावे असे वीरसिंहाला वाटले. त्याने मंत्र्याचा सल्ला विचारला.

"सेनापतीच्या पदावर कोणाला नेमण्या-पूर्वी युद्धकलेत त्याने किती प्राविण्य संपादन केले आहे, याची परीक्षा घेण्याचा प्रघात फार प्राचीन काळापासून चालून आला आहे. युद्धकलेत यशस्वी होणाऱ्याला सेना-पती नेमावे!" प्रधानाने सल्ला दिला.

वीरसिंह मनात दचकला. कारण युद्ध-विद्येच्या स्पर्धा झाल्या तर शूरसिंह त्यांत यशस्वी होईलच हे सांगणे कठीण होते. शूरसिंह तसा शूरच होता. युद्धकलेत त्याने प्राविण्य संपादिलेले होते. परंतु त्याच्याहून जास्त हुशार देशात कोणी निघणारच नाही असे कसे मानता येईल? प्रघात मोडता कामा नये आणि धाकट्या भावाला सेनापती पद मिळावे हे कसे साधावयाचे वीरसिंहाला कळेना.

तेव्हां प्रधान म्हणाला–"प्रभो! ही एक साधी सोपी गोष्ट आहे! शूरसिंह नक्कीच यशस्वी होईल!"

नाइलाजाने वीरसिंह युद्धकलेच्या स्पर्धा चालवायला तयार झाला. सेनापतीच्या पदासाठी युद्धकलेच्या स्पर्धा राजधानीत होणार असल्याचे व त्यांत वाटेल त्या तरुणाला भाग घ्यायला परवानगी मिळेल असे जाहीर करण्यात आले. विजयपुरात युद्धविद्येतील सर्व शाखात निष्णात असा

     



सुधन्वा नावाचा तरुण प्रसिद्ध होता. तो स्पर्धेत भाग घेणार हे कळल्यावर त्याच्यासमोर आपण हारणार हे ज्यांना माहीत होते ती तरुण मंडळी स्पर्धेत भाग घ्यायला आलीच नाहीत. इतर जो कोणी स्पर्धेला आला त्यांना सुधन्वाने जिंकले. त्यानंतर शूरसिंहाशी त्याचे द्वंद्व सुरु झाले.

पहिल्या दिवशी दोघांचे मल्लयुद्ध झाले त्यांत कोणी जिंकला नाही आणि सामना अनिर्णीतच राहिला.

दुसऱ्या दिवशी धनुर्विद्येची स्पर्धा होती. त्यात सुधन्वाने शूरसिंहाला सहज जिंकले. ते पाहून वीरसिंह घाबरला. परंतु प्रधानाने त्याला धीर देऊन सांगितले की, धीर सोडण्याचे काहीच कारण नाही. उद्यांच्या द्वंद्वयुद्धात विजयश्री शूरसिंहाच्या गळयातच माळ घालील.

तिसऱ्या व शेवटच्या दिवशी खड्‌गयुद्धाची स्पर्धा होती. द्वंद्वयुद्ध ऐन रंगात आले असतां सुधन्वाची तलवार तुटून पडली. शूरसिंहच जिंकला. आपल्या विरुद्ध पक्षपात झाल्याचे सुधन्वाने ओळखले.

न्यायबुद्धि परिपूर्ण असलेला वीरसिंह आपल्या बाबतीत न्यायोचित निवाडा देईल असे सुधन्वाला वाटले व त्याने त्याच्याकडे पाहिले. परंतु वीरसिंहाने त्याचा भाऊच जिंकल्याचा निर्णय दिला. सेनापतीच्या पदावर तोच नेमला जाणार या आनंदात वीरसिंह मग्न होता. म्हणून त्याने सुधन्वाकडे पाहिलेही नाही.

निदान मंत्री आपल्या बाजूने न्याय देईल असे वाटून सुधन्वाने प्रधानाकडे मोठ्या आशेने पाहिले. प्रधानाने सुधन्वाच्या नजरेला नजर भिडूच दिली नाही.

आतां प्रजाच न्याय देईल असे वाटून सुधन्वाने प्रेक्षकांकडे पाहिले. आपल्या महाराजांच्या भावाचा विजय म्हणजे आपलाच विजय असे मानून प्रजेने शूरसिंहाचा जयजयकार सुरू केला. सुधन्वाच्या बाबतीत न्याय झाला की अन्याय याकडे प्रेक्षकांपैकी कोणाचे लक्षच नव्हते.





# महाबली हनुमान

हनुमान वायुवेगाने चंद्रसेनेच्या महालाकडे धावला. तो महाल पाचुमण्यांचा होता. त्याच्या खांबांवर व भिंतींवर अत्यद्भुत कोरीव चित्रे होती. त्या काळोखातही पाचुमण्यांच्या चकाकीने सर्व महाल चकाकत होता. जागोजागी लाल पोळी बसविलेली होती. त्यांची लाल कांती पसरलेली होती.

त्या महालासमोर पाहरेकरी नव्हते. सर्वचे सर्व कालिकादेवालयात चालू असलेला उत्सव पहायला गेलेले होते. परंतु दाराजवळ बाहेर निघालेले लाललाल टपोर डोळे असलेला व पाय असलेला एक भयंकर राक्षसी साप फिरत होता.

हनुमंताने सापाला व सापाने हनुमंताला एकदमच पाहिले. लगेच साप फूत्कार सोडीत फडा वर करून उभा राहिला. त्याच्या नाका तोंडातून धूर व ज्वाळा येत होत्या. हनुमंताला गिळण्यासाठी तो साप तोंड उघडून पुढे पुढे सरकू लागला. हनुमान त्या सापाला ठार करण्यासाठी त्याच्यावर पाय ठेवणार इतक्यात महालाच्या वरच्या बाजूने किरटया आवाजात कोणत्या तरी स्त्रीचा आर्तनाद त्याला ऐकू आला.

हनुमानाने लगेच अणिमा शक्तीचा प्रयोग करून सूक्ष्मरूप धारण केले आणि त्या राक्षसी सर्पाच्या तोंडावाटे त्याच्या पोटात शिरून ते फाडून त्याला ठार केले आणि महालात प्रवेश केला, महालात सर्वत्र अंधःकार होता. मधूनमधून पोळीं व पाचुमणी चकाकत होते. हनुमान तो



आर्तनाद कोठून येत आहे हे पहात उभा असतां वरच्या मजल्यावरून फटक्यांचा आवाज आणि त्या पाठोपाठ एका स्त्रीचा आर्तस्वर त्याला ऐकू आला.

हनुमान जास्त वेळ न घालवितां चंद्रसेना ज्या खोलीत कैदेत होती त्या खोलीजवळ धावत गेला. खोलीच्या दाराला आतून कडी लावलेली होती. हनुमानाने उंच जागी एक खिडकी होती तिच्यातून आत डोकावून पाहिले. त्याच वेळी चंद्रसेना थोडी शुद्धीवर आली होती आणि कंटकी चाबकाने तिला फटके मारीत म्हणत होती— "चांडाळणी! मूर्ख मैरावण आमच्या या पाताळलंकेत एका स्पर्शजन्य किडचासारखीला तुला घेऊन आला. सांग, कालिकादेवीच्या देवालयात तू कोणाला पाठविले आहेस? तुझे डोके आतां कुऱ्हाडीने उडविते, पहा! छे! गळा दाबूनच शेवट केला पाहिजे!" असे म्हणत कंटकीने तिच्या गळ्याला हात घातला. ते भयंकर दृश्य पहात उभे राहणे हनुमंताला शक्यच नव्हते. तो विचार करण्यात वेळ घालविण्यापेक्षां चटदिशी पुढले पाऊल टाकायला तयार झाला.

हनुमानाने आपली शेपटी वाढविली आणि खिडकीतून आत सोडली आणि कंटकी चंद्रसेनेचा गळा दाबण्याच्या आत कंटकीच्या गळ्याला शेपटीचा विळखा पडला आणि कंटकी दूर ओढली जाऊन जमिनीवर आदळली व जागच्या जागी गार झाली.

हनुमानाने दार फोडले आणि खोलीत शिरला. त्याला पाहून चंद्रसेना भयचकित झाली. परंतु हनुमानाने गुडघे टेकून तिला नम्रपणे नमस्कार केला, नंतर थोडक्यात तिला सर्व गोष्टी सांगून मैरावणाचा वध कसा करावयाचा हे तिला विचारले.

रामाचे नाव ऐकतांच चंद्रसेना कंटकीने दिलेले सर्व कष्ट व पीडा विसरली व जवळ जाऊन म्हणाली—"हनुमंता! मी तुला मैरावणाचा जीव कोठे आहे, त्याचे गुपित सांगते. परंतु प्रथम तू, एक वचन मला दिले पाहिजेस. मैरावणाचा वध झाल्यानंतर आपल्या धन्याला तू माझ्याकडे घेऊन आले पाहिजेस."

हनुमंताने तिला रामाला घेऊन येण्याचे वचन दिले. चंद्रसेनेने मैरावणाचा जीव जेथे सुरक्षित गुप्तस्थानी ठेवला होता ती जागा सांगितली. लगेच हनुमान खोली बाहेर आला आणि आकाशात उड्डाण करून सप्त समुद्राच्या मध्यभागी असलेल्या ज्वालामुखीच्या पद्मस्थानी येऊन पोचला. ते पद्म म्हणजे एक कमळ होते. त्याच्या पाकळ्या ज्वाळांच्या होत्या. हनुमंताने अग्निदेवतेचे स्मरण करून त्याला नमस्कार केला आणि त्या कमळात प्रवेश करून त्याच्या देठातून सरकत मगरीच्या बिळात शिरला.

मगरीच्या बिळातून भयंकर नागसाप फूत्कार सोडीत होते. भुते व पिशाचे हुंकारत होती. हनुमानाने मोठ्याने सिंहनाद केला आणि त्या सापांना आणि पिशाच्चांना मुष्टिप्रहार करून बाजूला सारले, नंतर त्या भयंकर बिळात शिरायला पुढे सरसावला. इतर सर्व भुते त्याला पाहून पळून गेली. परंतु गुहेच्या उंचीचे एक मोठे थोरले काळे भयंकर भूत होते. त्याचे पांढरे सुळे आणि लालभडक डोळे होते.



ते गुहेच्या दारावर हनुमानाची वाट अडवून त्याला गिळायला विकट हास्य करीत उभे होते.

"हनुमानाने त्याला दरडावून विचारले— "कोण रे तू? बाजूला होतोस की नाही?"

ते ऐकून ते भयंकर भूत खदखदां हंसून म्हणाले—"मी वेताळ आहे; भूत प्रेत, व पिशाच्चांचा नायक! पण तू कोण? इकडे येऊ शकण्याची शक्ती असलेले दोघेच आहेत—एक मैरावण; आणि तू मैरावण नाहीस! तेव्हां तू दुसरा कोणी महाशक्तिशालीच असला पाहिजेस!"

हनुमान मोठ्याने हंसून म्हणाला—"अरे वेताळा! स्मशानात मोकळेपणाने हिंडणाऱ्या



तुला अशा अडचणीच्या जागी या काळोखात आणि या प्रतिकूल परिस्थितीत कां येऊन रहावे लागले? तर बाजूला हो, मुकाट्याने नाहीतर माझ्या अंगात कशी शक्ती आहे. हे तुला दाखवावे लागेल.

वेताळ मिस्किलपणे हंसून म्हणाला– "पाहू दे तर, तुझा तो पराक्रम!"

हनुमानाने लगेच त्याच्या छातीत एक जोराने मुष्टिप्रहार केला. त्या पाठोपाठ वेताळाने हनुमानाचे पाय धरले व म्हणाला– "प्रभो हनुमाना! मी धन्य झालो. माझ्या हातून चूक झाली त्याचे प्राय:श्चित्त भोगीत येथे पडून होतो. शंकराने शाप देतांना

मुक्ती असल्याचे सांगितले होते. आज माझा उद्धार झाला. महाबली हनुमान की जय!" असा जयघोष करून वेताळ अदृश्य झाला. अशातऱ्हेने अगदी अकल्पितपणे हनुमानाचा मार्ग मोकळा झाला.

हनुमान गुहेत शिरला. तेथे एका उंच दगडाच्या वेदिकेवर एक गोल रत्न मंजूषा होती, तिच्या झांकणावर अग्निज्वाळा जळत होती. हनुमान जवळ गेल्याबरोबर ज्वाळा एकदम वाढल्या आणि हनुमानाला जाळून भस्म करण्यासाठी चहूंकडे पसरल्या. हनुमानाने प्रळयमारुतासारखा तोंडाने वारा सोडून त्या ज्वाळा विझविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या विझल्या तर नाहीतच उलट वाढल्या.

हनुमानाने हात जोडून अग्निदेवाचे स्मरण केले व म्हणाला–"हे वैश्वानरा! मी तुझा मित्र वायूचा मुलगा आहे. माझ्या-वर अनुग्रह कर!" लगेच ज्वाळा शांत झाल्या.

त्या पाठोपाठ रत्नमंजूषेवरील ज्योतीतून हा आवाज ऐकू आला.

"मारुती! तुला एक मुख्य गोष्ट सांगण्यासाठीच मी हे सर्व केले. तू या मंजूषेतील सर्व भुंग्यांना एकदम ठार कराव-याचे झाल्यास तू पांच मुखे धारण करून



ओढून घे आणि त्यांना दातांनी छान चावून टाक. हें चांगले लक्षात ठेव, बरं का?"

हनुमंताने अग्नीला नमस्कार केला आणि भुंगे असलेली ती मंजूषा घेऊन वायुवेगाने रामलक्ष्मण होते त्या जागी आला. ते दोघे अद्याप असंख्य मैरावणांशी युद्ध करीतच होते. हनुमंत सिंहनाद करीत मैरावणासमोर उतरला आणि हातातली रत्नमंजूषा हातांनी वर उचलून दाखवीत म्हणाला–"हे पाताळ लंकेश्वरा! ही पहा, तुझे पंचप्राण संभाळून ठेवलेली रत्नमंजूषा. मी ही घेऊन आलो आहे. आतां तरी बऱ्या बोलाने रामलक्ष्मणांसमोर वाकून त्यांना शरण जा."

आपले पंचप्राण ठेवलेली रत्नमंजूषा पाहून मैरावण घाबरून गेला. दोन दगडामध्ये सांपडलेल्या व्यक्तीसारखी त्याची दशा झाली. तरी स्वतःला सावरून तो म्हणाला–"तू फार मोठा पराक्रम खरोखरच केलास रे! त्या पेटीत माझे पंचप्राण आहेत, ही गोष्ट खरी असली तरी ते तुझे आणि रामलक्ष्मणांचे प्राण हरण करण्यास समर्थ आहेत, हे लक्षात असू दे! ती पेटी उघडल्याबरोबर ते तुला चावतील आणि तुझे शरीर कालकूट विषाने भरून टाकतील आणि तुला उभा जाळून भस्म करतील. तू तुमच्या तिघांच्या मृत्यूलाच या रूपे स्वतः बोलावून घेऊन आला आहेस. तुला स्वतःच्या जिवाची फिकीर असेल तर गुपचूप ती पेटी खाली ठेव."

हनुमान ते ऐकून मोठ्याने हसला व म्हणाला–"रामलक्ष्मण झोपेत असतां त्यांना तू उचलून इकडे घेऊन आलास, तुझे मरण आता टळत नाही. मरण येण्यापूर्वी तुझ्यात काही मायामंत्र असतील तर ते पाहू दे!"

हनुमंत ते निर्भीकपणे म्हणाला होता. ते ऐकल्यावर मात्र मैरावणाचा धीर खचला. म्हणून त्याने एक शेवटचा प्रयत्न म्हणून मोठ्याने हाका मारल्या–"कंटकी, ए कंटकी! कोठे आहेस ग? तू जाऊन प्रथम त्या चंद्रसेनेचा वध कर!"

हनुमान ते ऐकून स्मित करीत म्हणाला–"अरे मायावी मैरावणा! ती कंटकी तुझ्याहून जास्त दूरदृष्टी असलेली होती रे! यापूर्वीच जाऊन तिने चंद्रसेनेचा वध करण्याचा प्रयत्न करून पाहिला होता. परंतु त्याच वेळी तिची आयुमर्यादा संपुष्टात आल्याने मी तिला ठार केले."

मैरावणाच्या डोक्यात सर्व गोष्टींचा एकदम प्रकाश पडल्यासारखे झाले. एकदम पिसाळल्यासारखा तो ओरडला आणि हातात आले ते शस्त्र उचलून त्याचा प्रयोग करून रामलक्ष्मणांवर धावला. तो मधून मधून स्वतःचे अंग क्षतविक्षत करीत गेला, त्याच्या अंगातून पडणाऱ्या रक्ताच्या प्रत्येक थेंबाबरोबर एकेक मैरावण पैदा होत गेला. त्या सर्व मैरावणांनी रामलक्ष्मणांना घेरले. जास्त विचार करायला वेळच उरला नव्हता. हनुमानाने शंकराचे स्मरण करून पंचमुख हनुमानाचे रूप धारण केले.

नंतर त्याने त्या पांचही मुखांतून प्रळयकाळासारखा हुंकार केला आणि रत्नमंजूषा उघडली. त्याबरोबर एकदम पांच विजा चमकाव्या तसे पांच रक्तवर्ण भुंगे हनुमानाला चावायला धावले. हनुमानाने एकेका मुखाने त्या पांचही भुंग्यांना एकेक करून तोंडात ओढले व दाताने कडकडून



क्षणाला मैरावणाची मायावी रूपे भरून जमिनीवर आदळली.

अशा तऱ्हेने त्याचे ते मायावी रूप नष्ट झालेले पाहल्यावर मैरावण पळून जाण्याऐवजी रामलक्ष्मणांवर अनेक शस्त्रास्त्रांचा प्रहार करू लागला. रामाने एक तीक्ष्ण बाण मैरावणाच्या डोक्याचा नेम धरून सोडला आणि त्याला ठार केले,

पंचमुख हनुमान व रामलक्ष्मण तिघांवर आकाशातून पुष्पवृष्टी झाली. ब्रह्मदेव वगैरे देव, स्वतः शंकर तेथे आले. ब्रह्मदेव रामाला म्हणाला–"रामा! हा मैरावण कालनेमीच्या पोटी जन्मला होता. हनुमानाच्या सहाय्याने तुझ्या हातून आज त्याचा वध झाला.

हनुमानाचा जन्म शिवशंकराच्या कृपेने झाला होता. मैरावणाच्या वधासाठी अत्यावश्यक असलेली ती रत्नमंजूषा सप्त-समुद्राच्या पोटांतून हनुमानाला आणणे शक्य झाले."

शंकर हनुमानाची पाठ थोपटून आशीर्वाद देत म्हणाला–"तुझी शक्ती व युक्ती आणि बळ व पराक्रम अपार व अवर्णनीय आहेत. मैरावणाचा वध म्हणजे सामान्य गोष्ट नव्हे. अशक्य व असाध्य असे काम तू शक्य व साध्य करून दर्शविलेस. तुझ्या या पंचमुख रूपाचे जो कोणी स्मरण करील त्याला भूतपिशाच्च बाधा होणार नाही."

हनुमानाने आपले पंचमुखरूप सोडले आणि ब्रह्मादिक देवांना व शंकराला नमस्कार केला. ब्रह्मदेव आणि शंकर आणि त्यांच्या बरोबर आलेले सर्वदेव रामलक्ष्मणांना विजयप्राप्ती होवो! असा आशीर्वाद देऊन तेथून प्रस्थान करते झाले.

ब्रह्मदेवाने प्रस्थान करण्यापूर्वी रामाला, पाताळलंकेचे राज्य मत्स्यवल्लभाला देण्यास आदेश केला. त्याप्रमाणे रामाने मत्स्यवल्लभाला बोलावून त्याला पाताळलंकेचे पालन करण्यास सांगितले व त्याचा राज्याभिषेक करून दिला.

हे सर्व झाल्यावर हनुमानाने अत्यंत नम्रपणे, त्याने चंद्रसेनेला दिलेल्या वचनाची गोष्ट सांगितली व म्हणाला–"त्या चंद्रसेनेचे सहाय्य नसते तर त्या महिरावणाचे प्राण ज्या गुप्तस्थानी होते त्याची कल्पनादेखील मला झाली नसती. कार्यसिद्धीसाठी मैरावणाचा वध झाल्यावर तुला तिच्याजवळ घेऊन यायचे वचन मी दिले होते."

रामाने काही वेळ मौन होऊन विचार केला व मान वर करून म्हणाला–"असं का? तर मग चला!"

रामाने ते म्हटल्यावर हनुमानाला परमानंद झाला. राम, भक्ताची इच्छा नेहमीच पुरी करीत असे. चंद्रसेना होती त्या महालाच्या वाटेने तो पुढेपुढे चालू लागला आणि राम त्याच्या पाठोपाठ निघाला.



# राजकुमारी ताराबाई

वय लहान असून मोठ्यांसारखे साहस, शौर्य आणि हुशारी दाखवून ताराबाई नावाच्या राजकुमारीने, आपल्या वडिलांच्या राज्यावर अधिकार गाजविणाऱ्या परकीय शासकाचा कसा वध केला ती शौर्याची अशी कहाणी आहे.



तोडा राज्याच्या गादीवर राव सुर्तान राज्य करीत होता. त्या राज्यावर लिल्ला नांवाचा एक अफगाण सरदार चालून आला आणि ते राज्य काबीज केले. तो एक क्रूर शासक होता. राव सुर्तान अरवली पर्वतीय प्रदेशात पळून गेला. ताराबाई ही त्याची मुलगी. ती बालपणापासून आपल्या वडिलांकडून आपल्या पूर्वजांच्या शौर्य साहसाच्या गोष्टी ऐकत असे.





तोडा राज्याला लिल्लाच्या क्रूर शासनातून मुक्त करण्याचा राव सुर्तान याने खूप प्रयत्न करून पाहिला. परंतु लिल्ला अफगाणाच्या शक्तिशाली सैन्यासमोर त्याचे सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले.



परकीय सत्तेखाली आपल्या प्रजेला जे हाल सोसावे लागत होते ते पाहून राव सुर्तानचे हृदय विदीर्ण होई. ताराबाई आपल्या वडिलांचे दुःख पाहून दुःखी होई. काय वाटेल ते करून आपले राज्य परकीय सत्तेच्या हातातून मुक्त करण्याचा निश्चय तिने केला. तिला सोळावे वर्ष लागले असेल, सर्व शस्त्रास्त्र विद्येत तिने प्राविण्य संपादन केले. घोडेस्वारी आणि धनुर्विद्येतही ती अद्वितीय होती.

ताराबाईच्या सखीमैत्रिणींना, तिने पुरुषांना योग्य अशा विद्या शिकणे मुळीच आवडत नसे. "तू पुरुषा-सारखी खड्गविद्या आणि धनुर्विद्या शिकते आहेस तर तुझ्याशी कोण लग्न करील गं?" असे त्या तिला विचारीत. "शूरवीर बहादूर असेल तोच येईल माझ्याशी लग्न करायला!"





ताराबाई फक्त युद्धविद्येतच निपुण नव्हती, ती अत्यंत रूपवतीसुद्धा होती. तिची कीर्ति ऐकून राजपूत तरुणांनी तिच्याशी विवाह करण्यासाठी प्रयत्न सुरू केले. परंतु ताराबाई वडिलांना म्हणाली—"आपल्या तोडा देशातून शत्रूला हाकलून लावू शकणाऱ्या तरुणाशीच मी विवाह करीन."

क्रूर व बलिष्ठ, लिल्ला अफगाणाशी युद्ध करणे म्हणजे गप्पा नव्हत्या. ती गोष्ट माहीत असल्याने अनेक क्षत्रिय वीरांनी ताराबाईशी विवाह करण्याचा विचारच सोडला. मेवाड देशाचा राजकुमार पृथ्वीराज शूर व साहसी होता. तो रावसुर्तानला भेटायला आला आणि लिल्ला अफगाणाशी दोन हात करायला तयार असल्याचे त्याने सांगितले.





ताराबाईने पृथ्वीराजाच्या शौर्यसाहसा-विषयी ऐकले होते. तिने लिल्ला अफगाणावर स्वारी करण्याच्या मोहि-मेवर जाण्याचा हट्ट धरला. पृथ्वी राजाने होकार दिला. फक्त पांचशे निवडक व तेजस्वी सैनिकांना बरोबर घेऊन दोघे तोडा नगराच्या दिशेने निघाले.

त्या सुमारास तोडा नगरीत एक मोठा उत्सव चालू होता. लिल्ला किल्ल्यातील महालातल्या गच्चीत बसून खालून त्याचे सैन्य कवाईत करीत जात असलेले पाहण्यात मग्न झाला होता.





बरोबर आणलेल्या सैन्याला किल्लया बाहेर रहायला सांगून ताराबाई व पृथ्वीराज प्रजेत मिसळून लिल्लाच्या अगदी जवळ गेले. त्यांना येत असलेले पाहून लिल्लाने सज्जातून विचारले— "ते दोघे कोण येत आहेत?" इतक्यात ताराबाईने सोडलेला बाण आणि पृथ्वीराजाने फेकलेला भाला दोन्ही लिल्लाला लागले व तो तत्काळ मरण पावला. ताराबाई व पृथ्वीराज किल्लयाच्या दाराकडे पळाले.



किल्लाचे सैनिक जे धडले ते ओळखून ते आणि दारावर उभे असलेले पाहरेकरी दोघांना अडवायला धावले. पाहरेकऱ्याने त्यांना अडवायला एक हत्ती सोडला. ताराबाई पुढे होती. तिने तलवारीने हत्तीची सोंडच कापून टाकली. हत्ती पळून गेला. दोघे किल्लयाबाहेर सुरक्षितपणे आपल्या सैनिकांजवळ येऊन पोचले.



अफगाणाचे सैनिक त्यांच्याशी युद्धाला आले. ताराबाईने आपल्या कडव्या सैनिकांच्या मदतीने त्यांना तोंड दिले. त्या चकमकीत अफगाण सैन्याचा फडशा उडाला. राव सुर्तान पुन्हा तोडाचा राजा झाला. ताराबाई व पृथ्वीराज यांचा विवाह थाटामाटाने झाला.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

एका जमिनदाराकडे एक गुराखी होता. एके दिवशी एका गंधर्वाने त्याच्या मदतीने खूष होऊन त्याला चुटकी वाजविल्याबरोबर सोन्याचा, एक कण करण्याची मंत्रशक्ती आणि डोक्यावर ठेवल्यास अदृश्य करणारी टोपी दिली.

गुराख्याने एक दिवशी रात्रभर बसून पिशवी भरून सोने तयार केले. ते कोणाला द्यावे याचा विचार करीत असता त्याला जमिनदाराच्या मुलीचे स्मरण झाले. त्याचे तिच्यावर फार दिवसांपासून प्रेम होते.

दुसऱ्या दिवशी तो अदृश्यपणे जमिनदाराच्या मुलीच्या खोलीत गेला आणि सोन्याने भरलेली पिशवी तिच्या पलंगाजवळ ठेवून आला. असे एक आठवडाभर होत राहिले. ते सोने कोण आणतो, कोणाला कळले नाही. जमिनदाराला पैशाची फार उणीव भासत होती. म्हणून ते सोने कोण आणून देतो हे कळल्यास त्याला आपली मुलगी देऊन टाकावी असे त्याने ठरविले. परंतु तो मनुष्य कोण हे कळत नसल्यामुळे, हे सोने कोणीतरी देव आणून देत असावा, असे त्याला वाटले.

एकदा तो गुराखी सोन्याची पिशवी डोक्यावर ठेवून व टोपी घालायला विसरून जमिनदाराच्या मुलीच्या खोलीत तिच्या पलंगाजवळ जाऊन उभा राहिला. तेव्हां जमिनदाराच्या नोकरांनी त्याला जमिनदारासमोर उभे केले.

"कोणता तरी देव देत असलेले सर्व सोने उडवायच्या प्रयत्नात होतास का लबाडा!" असे म्हणून जमिनदाराने त्याचे दोन्ही हात कापून टाकले.

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी, मद्रास-६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

२० जुलै १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल सप्टेंबर-१९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

मे महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "हा खेळ कल्पनेचा"



# अमरवाणी

गुणवान् वा परजन:,
स्वजनो निर्गुणोपि वा,
निर्गुण स्स्वजन: श्रेया
न्य: पर: परएव स: ॥ १ ॥

[इतर गुणवान असोत व आप्त गुणहीन असोत तरी जे आप्त आहेत तेच बरे. (कारण) परका तो परकाच ! ]

य स्स्वपक्षं परित्यज्य
परपक्षं निषेवते,
स स्वपक्षे क्षयुंप्राप्ते
पश्चात् तैरेव हन्यते ॥ २ ॥

[जो कोणी स्वजनांना सोडून परक्यांना सामील होतो, तो स्वजन नष्ट झाल्यावर परक्यांच्या हाती मारला जातो.]

श्रेयान् स्वधर्मो विगुण:
परधर्मात् स्वनुष्ठितात्,
स्वधर्मे निधनं श्रेय:
परधर्मो भयावह: ॥ ३ ॥

[परधर्म चांगला असला तरी त्याच्याहून गुणहीन असा स्वधर्मच श्रेष्ठ होय. स्वधर्माचे पालन करतांना मरण आले तरी ते पत्करले; परधर्म भयंकरच होय ! ]





# कावळा आणि घुबड

[ ४९ ]

कावळा तेथे जमलेल्या पक्ष्यांना 'चंद्र-सरोवराची गोष्ट' सांगून म्हणाला— "कळलं का, बलवान नायक पाठीराखा आहे हे कळले तरच शत्रूची कशी गाळण उडून जाते ती? किती किती हुशार व शाहणे तुम्ही इकडे जमला आहांत, आणि कुरूप, दुष्टबुद्धीच्या त्या घुबडाला तुम्ही राजा निवडलात, तर काय म्हणावे तुम्हांला? शत्रूकडून जर आपल्यावर खरोखरच एखादे संकट आले तर हे घुबड आपलं रक्षण करू शकेल असे तुम्हांला वाटते आहे का?" कावळ्याने स्पष्टच विचारले.

"तू येईपर्यंत आम्हांला तसेच वाटत होते. परंतु तू म्हणालास ते ऐकल्यानंतर मात्र आम्हांला खरोखरच घुबडाच्या बल पराक्रमाचा संशय वाटू लागला आहे." पक्षी म्हणाले.

"कमाल झाली तर! अजून तुम्हांला या नीच जातीच्या घुबडाची घृणा वाटत नाही म्हणावयाची! याच्या सारखा आपला राजा असला तर आपली पक्ष्यांची जातच समूळ नष्ट होऊन जाण्याची शक्यता आहे. असल्या तुच्छ जातीच्या प्राण्याजवळ न्याय मागण्यासाठी गेलेल्या सश्याला आणि तीतराला माझ्या डोळ्यासमोर मरण आलेले मला माहीत आहे." कावळा म्हणाला.

"ऐकू दे तरी ती गोष्ट!" पक्ष्यांनी कावळ्याला ती गोष्ट सांगायला आग्रह केला.

कावळ्याने ससा आणि तीतर यांची गोष्ट अशी सांगितली :

काही दिवसांपूर्वी मी एका नदीकाठा-वरच्या झाडावर घरटे करून रहात असे.



त्या झाडाच्या खालच्या बाजूच्या ढोलीत एक तीतर पक्षी रहात असे. आम्ही दोघं एकाच झाडाच्या आश्रयाला रहात असल्या कारणाने आमची परस्परांशी चांगली मैत्री जमली. उजाडतांच आम्ही दोघं आहाराच्या शोधार्थ जंगलभर फिरत असूं आणि काळोख पडल्यावर संध्याकाळी परत येऊन दिवसभराचे आपापले अनुभव परस्परांना सांगत असूं.

असेच एकदां आहाराच्या शोधार्थ आम्ही दोघं जंगलात निघून गेलो. मी संध्याकाळी परतलो, परंतु तीतर पक्षी मात्र परतला नाही. त्याच्या जिवाला काही झालं तर नाही, अशी मनात शंका आली आणि मला भीती वाटू लागली. कारण जंगलात आपल्या सारख्या ल्हान प्राण्याना खाण्यासाठी मोठे क्रूर पक्षी किंवा जनावरे टपलेली असतात. शिकारी जाळी टाकून कोणी त्यात सापडतो का दूर बसून पाहतात. तीतर पक्ष्यावर लांडग्या कोल्ह्याने झडप तर मारली नसेल!

म्हणून मी जवळपास घिरट्या घालून पाहिले की, माझा मित्र कोठे दिसतो का. सर्व जंगल चाळून पाहिले. पण पत्ता लागला नाही. काही दिवसांनी मी रहात असे त्या झाडाजवळ एक ससा आला आणि तीतर रहात असे त्या ढोलीत शिरून राहू लागला, त्याचे नाव होते शिखराग.

आपल्या मित्राच्या घरात शिरून बसणाऱ्या सश्याला दरडावून विचारण्याचा व त्याला बाहेर हाकलण्याचा विचार माझ्या मनात आला. परंतु इतके दिवस तीतर जिवंत राहिला असेल असे मला वाटलं नाही. म्हणून शिखराग सश्याला मी काहीच बोललो नाही, गप्प राहीलों.

प्राण्यांना आपल्या आयुष्यात किती अद्भुत गोष्टी घडलेल्या पहायला मिळतात! मी तीतर मेला असेल असे समजून होतो. परंतु तो तीतर एकदम एके दिवशी परतला. तो आतां बराच जाडजूड झाला [illegible] होती. कोठे तरी त्याला खूप खायला प्यायला मिळालं असलं पाहिजे.

तीतर पक्ष्याने परतल्यावर आपल्या ढोलीत शिरून बसलेल्या सश्याला पाहिले आणि चिडून म्हणाला–"कायरे ससा! मी घरात नसतांना माझ्या घरात शिरून बसायला तुला लाज भीती काहीच वाटली नाही का रे? मुकाट्याने बाहेर नीघ!"

तीतर म्हणाला ते ऐकून ससा फिदी-फिदी हसून म्हणाला–"डोकं फिरलं आहे का रे तुझं? पूर्वी कधी काही दिवस तू येथे राहिलास म्हणून हे तुझं कायमचं घर झालं का रे? ही सामान्य गोष्ट तुला कळू नये याचे मला आश्चर्यच वाटते आहे!"

आतां मात्र तीतरपक्ष्याला फारच राग आला. म्हणाला–"हे मूर्खा! मलाच अक्कल शिकवायला निघालास का रे? मलासुद्धां थोडं फार धर्मशास्त्र कळतं, बरं का! घरं, विहिरी, बागा इत्यादींविषयी भांडण झालं तर त्या कोणाला मिळाव्या या विषयी न्यायनिवाडा करायला जवळपास राहणाऱ्यांची साक्ष हाच एक आधार असतो, असं धर्मशास्त्रज्ञ सांगतात. तू आतां बळकावून बसला आहेस त्या माझ्या घराविषयी साक्षीदारांना बोलावून न्यायनिवाडा करवून घेऊं या का?"

शिखराग ससा नाक मुरडून कान हलवीत म्हणाला–"आपणां दोघांना माहीत असलेल्या धर्मज्ञानांत बराच फरक असावा असं मला दिसतं आहे! एकदां घर सोडून गेल्यावर परत येऊन ते माझे म्हणण्याचा अधिकार कोणालाच नसतो. माणसांची गोष्ट मला जास्त माहीत नाही, परंतु आपल्यासारखे जे ल्हान प्राणी आहेत त्यांचे अधिकार आणि हक्क यांविषयीं माहिती असणाऱ्यांचं काय म्हणणं आहे ते मला चांगलं माहित आहे. आपण ज्या घरात राहतो त्यांत पिलं झाल्यावर ती मोठीं होईपर्यंतच आपल्याला त्या घरावर अधिकार असतो. त्यानंतर वाटेल त्याला त्यात राहतां येते."



## १८७. वेडेपणातही थोरपण

१८८६ मध्ये राजा लुड्विग द्वितीय याने आत्महत्या करून घेतल्यावर साऱ्या युरोपाने त्याला वेड्यात काढले. त्याने आपल्या राज्यातल्या डोंगराळ प्रदेशात अनेक किल्ले बांधले. त्या सर्वांत सुंदर " न्यूश्वान स्टइन " ह्याचे बांधकाम आहे. आस्ट्रियाच्या सीमेवरचा संगमरमरी दगडाचा १८६९–८६ हा किल्ला मध्ये बांधण्यात आला. चढण्याला दुसाध्य अशा पर्वतशिखरावर हा बांधलेला आहे.





# माया सरोवर

[ १९ ]

[वनमाणसाने धाकट्या भावाला उचलून नेल्याचे कळल्यावर त्याच्या शोधार्थ निघालेला सर्पनख जयशील व सिद्धसाधकाला दिसला. त्यांनी त्याला धरून धमकावले की, माया सरोवराची वाट त्याने दाखविली नाही तर त्याला ठार केले जाईल. त्या वेळी कृपाणजित एका जलाश्वावर बसून तलवार फिरवीत येताना दिसला. पुढे–]

कृपाणजिताची आरोळी ऐकतांच जयशीलने सर्पनखाच्या डोक्यावरून आपली तलवार उचलून वळून पाहिले. कृपाणजित त्याला जलाश्वावर पुष्कळ अंतरावर दिसला. सिद्धसाधकाने आपला भाला आपल्या मुठीत घट्ट आवळून धरला व "अस्सं! इतक्या दिवसांनंतर कृपाणजिताचे रक्त माझ्या भाल्याला प्यायला मिळणार आहे!" असे म्हणत निघाला.

सर्पनखाने चटदिशी पुढे जाऊन सिद्धसाधकाचा हात धरला व म्हणाला–"अहो, जरा थांबा! पुन्हां एकदां खात्री करून घेण्यासाठी विचारीत आहे, हा कृपाणजितच नव्हे का त्या भयंकर वनमाणसाचा मालक?"

"होय, तेच वनमाणूस तुझ्या धाकट्या भावाला उचलून घेऊन गेले." सिद्धसाधक म्हणाला.



"तसे असेल तर त्याला ठार करण्या-पूर्वी ते वनमाणूस माझ्या धाकट्या भावाला कोठे उचलून घेऊन गेले, हे त्याला विचारा-वयाचे आहे." सर्पनख म्हणाला.

"चल, हो बाजूला, तुझ्या भावाला काय झालं त्याचं मला काय? हा आमचा हाडवैरी आहे. ह्याला परलोकी पाठविल्या-शिवाय माझ्या मनाचे समाधान होणार नाही. त्यानंतर तुझी पाळी आहे!" म्हणत सिद्धसाधक दातओठ चावू लागला.

त्या दोघांचे बोलणे ऐकत जयशील उभा होता. त्याला एकदम एक गोष्ट सुचली. सर्पनखाला वळवून घ्यायला त्याला ती अत्युत्तम संधी वाटली. तो म्हणाला—

[illegible] काढण्याच्या कामी मी तुला मदत करण्याचे ठरविले आहे. मी व सिद्धसाधक आड उभे राहतो. तू कृपाणजितला बोलावून विचार, ते वनमाणूस आणि तुझा धाकटा भाऊ कोठे आहेत?"

"अहो, मी तुमचा फार आभारी आहे. मी आपले वाहन आणि तलवार वापरली तर चालेल का?" सर्पनखाने विचारले.

जयशील सर्पनखाला त्याची तलवार परत देत म्हणाला—"तो कृपाणजित खड्ग युद्धात निपुण आहे, फार सावधपणाने रहावे लागेल तुला." असे सांगून साधकाला-बरोबर घेऊन थोडे ऊन पडले होते त्या बाजूला झाडीत दोघे लपून बसले.

सर्पनख आपल्या जलाश्वावर चढून बसला. कृपाणजित अजून हाका मारीत झाडीत इकडेतिकडे हुडकत फिरत घोडे-स्वारी करीत होता. सर्पनख क्षणभर विचार करायला थांबून स्वतःच जाऊन कृपाणजिताला भेटायचे मनाशी ठरवून घोड्याला टाच मारणार इतक्यात त्याच्या पाठीला काहीतर चुर्रदिशी बोचले.

सर्पनख घोड्यावर बसल्या बसल्याच चटदिशी तलवार उपसून वळला. त्याला समोर गिद्दुयांचा सेनापती एका मेंढ्यावर एक भाला घेऊन बसलेला दिसला.



[illegible] का रे भाल्याने माझ्या पाठीत टोचलेस?" असे रागाने फणफणत सर्पनखाने विचारले.

तो प्रश्न ऐकून खुजांचा सेनापती हसत म्हणाला—"अरे ए, पापघोड्यावर बसलेल्या माणसा, मी खरोखरच भाला भोसकला असता तर तू आतापर्यंत जमिनीवर लोळत पडला असतास की! तुझ्याशी बोलण्याच्या हेतूने मी भाल्याने थोडी खूण केली होती!"

"माझ्याशी बोलायची ही रीत झाली काय?" म्हणत आपल्या घोड्याला पुढे चलायला खूण करतां करतां थांबून सर्प-नखाने विचारले—"माझ्याशी तुझं काय रे काम? तुला माहीत नाही का की मी सर्व शक्तिमान अशा माया सरोवरेश्वराचा एक सेवक आहे; तू या जंगलात जमिनीवर हिंडणारा किडा आहेस."

ते ऐकून गिद्दुयाचा सेनापती चिडला. तो भाला उचलून वार करणार इतक्यात कृपाणजित जलाश्वावर बसून झाडीआडून बाहेर येऊन, सर्पनखाला समोर पाहून थोडा थांबून म्हणाला—"कोण रे तू? गडे-कोंडांच्या गावात माझ्यावर दोरीचा फास टाकून मला बांधणारा तोच का तू?"

"होय, माझ्या दोरीच्या फासातून स्वतःची सुटका करून घेऊन तू कसा बाहेर पडलास, हेच मला कळले नाही. नंतर तू



तो जलाश्व माझा धाकटा भाऊ सर्पस्वर याचा आहे. त्याचे तू काय केलेस?" म्हणत सर्पनखाने आपला घोडा कृपाणजित होता त्या बाजूला हळूहळू चालविला.

कृपाणजित ओरडून म्हणाला—"थांब, तू आहेस तेथेच थांब. आपण परस्परांशी बोलण्यासारखं पुष्कळच आहे."

सर्पनखाने घोड्याला थांबवून विचारले—"तुला काय रे बोलायचे आहे माझ्या-जवळ? माझा धाकडा भाऊ कोठे आहे?"

"वनमाणसाने एकाएकी हल्ला करून जलाश्वावरून तुझ्या भावाला उचलून नेले ते मी पाहिले. तो जातांजातां ओरडत होता. 'अरे दादा सर्पनखा!' तेही मी



ऐकले. म्हणजे तुझे नाव सर्पनख आहे तर! मी स्वारी करून येत आहे हा घोडा तुझ्या भावाचाच आहे. याला मी बाजूच्या झाडीत धरले." कृपाणजित म्हणाला.

"मी विचारले, फक्त त्याच प्रश्नाचे उत्तर तूं दिले नाहीस. माझा भाऊ कोठे आहे?" म्हणत सर्पनखाने तलवार उगारली.

"सर्पनखा! अशी घाई करू नकोस. नशीब हे मोठे बलवत्तर असते असे म्हणतात. तुझ्या धाकट्या भावाच्या कपाळावर त्या वनमाणसाच्या हाती मृत्यू लिहून ठेवला असेल तर यावेळेपर्यंत तेही झाले असेल. तसे झाले नसेल तर त्याने वनमाणसाला आपल्या काबूत करून घेऊन [illegible] आपल्या दोघांचे शत्रू जयशील आणि सिद्धसाधक यांचा शोध काढीत त्यांची शिकार करण्यासाठी जंगलात हिंडत असेल! तुझा साथी मकरकेतू आहे ना त्याला त्या दोघांनी किती छळलं म्हणून सांगू? ते सर्व या प्रदेशातल्या रानटी लोकांच्या तोंडी मी ऐकले होते!" कृपाणजित म्हणाला.

कृपाणजिताचे बोलणे संपण्यापूर्वी सर्पनख त्याला जोराने दरडावून म्हणाला–"दुष्टा! माझ्या धाकट्या भावाच्या मरणाला कारण तूच! इतर शत्रूंची गोष्ट मी त्यानंतर पाहीन, पहिल्याने तुझे डोके छाटून आपल्या भावाचा आत्मा शांत केला पाहिजे." असे म्हणत त्याने आपल्या घोड्याला तलवारीच्या मुठीने मारले.

जलाश्वाला आपल्याकडे वेगाने येत असलेला पाहतांच कृपाणजित घाबरून जाऊन थरथर कापू लागला आणि आपल्या घोड्याला मागे वळवून 'माझा हाडवैरी जयशील याला ठार केल्याशिवाय मी मरू इच्छित नाही. म्हणून तूर्त तुझ्याशी युद्ध करण्याची माझी इच्छा नाही.' असे म्हणत की, घोड्याला टाच मारून चौखूर पळवू लागला.

सर्पनख त्याचा पाठलाग करीत निघाला. हे सर्व झाडाआडून पहात ऐकत बसलेला [illegible] दोघां पळून जाणारांपैकी एकजण आपला हाडवैरी आहे. दुसऱ्याला आपण आपला मित्र करून घेऊ शकलो तर आपल्याला माया सरोवरापर्यंत पोचतां येईल."

"तू म्हणतो आहेस ते बरोबर आहे. परंतु ते दोघे तर आपल्याला सापडतीलसे दिसत नाही. मग आतां आपण काय करायचे?" सिद्धसाधकाने विचारले.

जयशील झाडीतून बाहेर येऊन चकित होऊन पहात उभा असलेल्या गिड्डयांच्या सेनापतीला म्हणाला–"सेनापती! घोड्यांवरून पळून गेलेल्या त्या दोघांना तू पाहिलेसच आहेस! त्यांना तू धरले पाहिजेस. या जवळपासच्या सर्व प्रदेशात तुमच्याच जातीचे लोक वस्त्या करून रहात आहेत. त्यांना सावध करून या दोघांना काय वाटेल ते करून जिवंत धरू शकशील का?"

"अहो, ते काय मोठे काम झाले? या चारीबाजूच्या जंगलात, डोंगराळ प्रदेशात, दऱ्याखोऱ्यांत, सर्व जागी आमच्या जातीच्या लोकांच्या वस्त्याच तर आहेत. डफ वाजवून प्रदेशातल्या सर्वांना सावध करतो." असे म्हणत त्या सेनापतीने आपल्या मेंढ्याला आपल्या वस्तीच्या दिशेने सोडले.

"तरमग सिद्धसाधका! आपण आता येथे बसून करण्यासारखे काही दिसत नाही.



ती समोर टेकडी दिसते आहे तेथे जाऊन हे गिड्डे काय करतात, ते जाऊन पाहू या." असे म्हणत जयशील निघाला.

"जय महाकाळ! आपण हिरण्यपुराहून निघालो ती वेळ चांगली शुभ नव्हती! किती विघ्ने येत आहेत! आणि सर्व गुंतागुंतींची!" असे म्हणत मोठ्या दुःखाने सुस्करा सोडीत सिद्धसाधक जयशीलबरोबर निघाला.

जयशील व साधक खडकाळ टेकडीवर जाऊन उभे राहिल्यावर सर्वात प्रथम त्यांना गिड्डयांच्या वस्तीतून एका डफाचा आवाज ऐकू आला. त्याच्या पाठोपाठ त्या सर्व अरण्यातून चहूकडून डफांचा, नगाऱ्यांचा



आवाज, पाठोपाठ लहान मोठी शस्त्रे घेऊन गिड्डे वीर धावत बाहेर येत असलेले दिसले.

मध्यंतरी कृपाणजितचा पाठलाग करीत निघालेल्या सर्पनखाला कळून आले की त्याला पकडून ठार करणे या जंगलातल्या झाडीत साध्य नाही. म्हणून मोठ्याने ओरडून हाक मारीत तो म्हणाला—"अरे, कृपाणजित, थांब! कदाचित् माझा भाऊ जिवंत ही असेल, ते आपल्यापैकी कोणालाच माहीत असणे शक्य नाही. तू हा जलाश्व आम्हांला परत देऊन तुला जिकडे जावयाचे असेल तिकडे निघून जा."

"जलाश्वाला घेऊन तू आपल्या तलवारीने मला ठार करणार नाहीस, कशा-

तुझ्याशी युद्ध करायला भितो आहे, असे मात्र समजू नकोस. युद्धात कोणाला जय मिळेल, हे देवाशिवाय इतर कोणालाही कळणे शक्य नाही. पहिल्याने मी त्या जयशीलला ठार करणार. त्यानंतर मी तुझ्या समाचाराला येणार आहे!" म्हणत कृपाणजित आपल्या घोड्याला चौखूर पळवीत नदीकाठी येऊन पोचला.

आतां गोडीगुलाबीने सहजी कृपाणजिताला पकडणे साध्य नाही हे ओळखून सर्पनख आपल्या जलाश्वाला कृपाणजिताच्या पाठीमागून जास्त जोराने पळवीत नदी तीरावर येऊन पोचला. नदीच्या काठाकाठाने कृपाणजित पळत होता. त्याचा पाठलाग सर्पनखाने चालू ठेवला.

त्याच सुमारास गिड्या जातीच्या लोकांनी कृपाणजिताला पळतांना व सर्पनखाला त्याचा पाठलाग करतांना पाहिले. आणि त्यांना अडविण्यासाठी एका जागी आपली शस्त्रे हाती घेऊन वाट अडवून उभे राहिले. कृपाणजिताला ते दुरूनच दिसले. आपण पुढे गेलो तर त्यांच्यावर आपण केलेले अत्याचार आठवून ते आपल्याला सोडणार नाहीत असा विचार करून त्याने पुढे जाण्याचा विचार सोडला. परंतु

येत होता!

अशा परिस्थितीत कृपाणजिताला घोड्यासकट नदीत शिरून पलीकडच्या तीरावर पळून जाणे हा सोपा मार्ग वाटत होता. त्याने आपल्या घोड्याला नदीत उतरवण्यासाठी वळविला. त्याच वेळी नदीच्या पाण्यात तरंगत पोहोत असलेल्या दोन मगरी दिसल्या. त्यांना पाहतांच कृपाणजितला धडकी भरली. काळजात भोसकला जाणारा भाला चांगला की पाठीत भोसकली जाईल ती तलवार चांगली? किंवा पाण्यावर तरंगणाऱ्या मगरींचे सुळे चांगले? असा विचार करीत तो एक क्षणभरच जागच्या जागी उभा राहिला असेल. परंतु कोणत्याही

परिस्थितीत आतां मरण टळत नाही तेव्हां जिवावर उदार होऊन प्रयत्न करण्याचे त्याने ठरविले. गिड्यांपेक्षा, कृपाणजितापेक्षां या मगरीच बऱ्या असे त्याला वाटले असावे. शिवाय आपण चढून येत आहो तो जलाश्व पाण्यात राहणारा घोडा आहे. त्याला पाण्यात स्वतःचे रक्षण कसे करावयाचे हे जास्त कळत असणार. स्वतःच्या रक्षणाबरोबर तो आपल्यालाही वांचवील. असा विचार करून कृपाणजिताने घोड्यासह नदीत उडी टाकली.

कृपाणजिताच्या पाठीमागून येणाऱ्या सर्पनखाने ते पाहिले व मोठ्याने ओरडून म्हणाला—"अरे, अक्कलशून्य मूर्खा! काय करायला निघाला आहेस तू? मगरींच्या



जबडयातून तुला स्वत:लाच नव्हे तर त्या जलाश्वालाही वांचविण्याची तू काळजी बाळगली पाहिजेस. मायासरोवर पोंचण्यासाठी माझा धाकटा भाऊ जिवंत असेल तर हा घोडाच उपयोगाचा आहे." असे म्हणत तो स्वत:देखील घोडयासह पाण्यात उतरला.

मगरींनी पाण्यात कृपाणजितला घोडयासह पडतांना पाहिले आणि त्याच्या पाठीस लागल्या, सर्पनख तलवार उपसून त्यांना ठार करायला त्यांच्या पाठोपाठ निघाला. किनाऱ्यावरून गिद्धे हाताशी आले ते दगड व वाळकी लाकडे जी मिळाली ती कृपाणजितावर फेकीत होते. सर्पनख मोठ्याने ओरडत होता–"मी तुमचा मित्र आहे रे, या दुष्टाला दगड मारून ठार करू नका. त्याला मी जिवंत धरण्याच्या प्रयत्नात आहे." एक मगर तोंड वासून कृपाणजितला धरण्यासाठी वेगाने पोहत जात होती, तिच्या पाठीत सर्पनखाने आपली तलवार खुपसली.

[illegible] गटांगळ्या खात तडफडू लागली. दुसरी मगर नदीच्या वाहत्या बाजूला खाली जाऊन कृपाणजितला धरण्यासाठी वेगाने येऊ लागली. तिला पाहून कृपाणजितचा जलाश्व घाबरला. कृपाणजित लगाम घट्ट धरून होता तरी न थांबतां नदीकाठी पोहोत जाऊ लागला आणि क्रूर वृक्षाच्या बाजूला काठाकडे आला.

त्या क्रूर झाडापासून थोडया अंतरावर उभे असलेले गिद्धे मोठ्याने ओरडू लागले–"अरे महाकाया! घोडयाला मागे वळव, नाहीतर ते झाड तुझे भक्षण करील." त्यांनी कृपाणजितला सावध केले.

परंतु, त्याने किती प्रयत्न केला तरी जलाश्व थांबायला तयार नव्हता आणि त्या क्रूर वृक्षाच्या खाली आला. कृपाणजितला धरणे सहज झाले असतां एका क्रूर वृक्षाची फांदी खाली वांकली व कृपाणजितला घट्ट धरून वर ओढू लागली.

(क्रमश:)





# हा बदल कसा?

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा? तू फार दृढ निश्चयाचा असामान्य माणूस दिसत आहेस. कारण सामान्यपणे माणूस नागपालासारखे कारण असो की नसो, काही काळाने बदलून जातात. तुला कंटाळा येऊ नये म्हणून मी तुला नागपालाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

चंद्रावर्त नावाच्या देशात देवश्रेष्ठी नावाचा एक वैश्य रहात असे. त्याच्याकडे श्वेतवदन नावाचा एक घोडा व घोड्याची एक गाडी होती. ती गाडी हाकायला आणि घोड्याचा दाणापाणी करायला त्या वाण्याने नागपाल नावाच्या एका

वेताळाच्या गोष्टी

नोकराला ठेवले होते. तो घोडा म्हणजे नागपालाला जीव की प्राण होता. ते ओळखून देवश्रेष्ठीने मरते वेळी तो घोडा व गाडी नागपालाला देऊन टाकली. नागपाल आपल्या घोड्याला कोणतीही उणीव भासू देत नसे. ती गाडी तो भाड्याने हाकी व त्यावरच त्याचा उदरनिर्वाह चाले.

नागपालाच्या शेजारी भाड्याने गाडी हाकणारा त्याच्याच सारखा एक म्हातारा गाडीवाला होता. त्या म्हाताऱ्या गाडीवाल्याला सुलोचना नावाची एक नात होती. नागपाल दररोज म्हाताऱ्या गाडीवाल्याला थोडी फार मदत करीत असे. त्यामुळे सुलोचना आणि नागपाल यांच्या भेटीगाठी होत. हळूहळू दोघांचे परस्परांवरचे प्रेम वाढत गेले आणि दोघांनी लग्न करून घ्यायचे जवळजवळ ठरवून टाकले.

श्वेतवदन घोडा म्हातारा झाला तेव्हां नागपालाने त्याला गाडीला जुंपणे बंद केले. चार पैसे जमविले होते त्यावरच तो घोड्याच्या दाणापाण्याचा खर्च करू लागला. ते पाहून म्हातारा गाडीवाला त्याला म्हणाला—"अरे मुला! माझ्याच्याने काम होतनासे झाले आहे. गाडी रिकामी ठेवण्यात तरी काय अर्थ आहे? तू चालवीत जा." नाहीतरी नागपाल घरजांवईच होणार, तेव्हां त्याने गाडी चालविली तरी चार पैसे येतील ते घरखर्चाला उपयोगी होतीलच, या विचाराने म्हातारा नागपालाला तसे म्हणाला होता.

नागपालला म्हाताऱ्याची गाडी हाकून जी प्राप्ती होई तिच्यातला एक अष्टमांश स्वतःची मजुरी म्हणून तो ठेवून घेऊन बाकीचे सर्व सुलोचनाला देई. "हे काय हो?" म्हणून ती विचारी, तेव्हां तो म्हणे—"आपलं लग्न होईपर्यंत हे पैसे तुमचेच, लग्न झाल्यावर आपले होतील."

अशा परिस्थितीत एक पैदेखील वांचविणे अशक्य झाले. कारण स्वतःच्या पोटाबरोबर त्याला श्वेतवदन साठीसुद्धां खर्च करावा लागे.

काही दिवसांनी लग्नाची चर्चा निघाली. तेव्हां नागपाल म्हणाला—"खर्चाला माझ्याजवळ पैसे नाहीत. ज्या दिवशी चार पैसे जमतील त्या दिवशी मी स्वत;च लग्नाची गोष्ट काढीन."

परंतु सुलोचनाला लग्न उरकून घ्यायची घाई होती. ती म्हणाली—"घोड्याचा भार आहे तोंपर्यंत तुला पैसे वांचविणे शक्य होणार नाही. तू गाडी आणि घोडा विकून टाक. भाड्यासाठी चालवायला आपली गाडी आहेच की, म्हाताऱ्या घोड्याचा खर्च फुकटच नाही का? विकला तर सहज पन्नास रुपये मिळतील."

दुसऱ्याच दिवशी नागपालाने गाडी विकली आणि घोड्याला घेऊन दूरच्या गांवी निघून गेला. त्याने थोडी शेती खंडाने घेऊन करायला सुरवात केली. म्हातारे घोडे शेवटपर्यंत त्याच्याचकडे होते.

-नागपालने सुलोचनेशी लग्न करण्याचा विचार मनातून काढून टाकला आणि





दुसऱ्या एका मुलीशी लग्न करून घेतले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! नागपालाने सुलोचनेशी लग्न करण्याचा विचार कां बदलला? त्याला सुलोचनेपेक्षा म्हातारं घोडं अधिक वाटलं का? तो गाडी हांकण्याचा धंदा सोडून शेतीभाती कां करू लागला? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर 'लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"नागपालाचा सुलोचनाशी लग्नाविषयी गोष्ट निघण्या-पूर्वीच गाडी आणि घोडा यांच्याशी संबंध होता. त्याशिवाय त्याच्या मालकाने जो उपकार केला होता त्याबद्दल उतराई होण्याचे कर्तव्यही त्याच्या शिरावर होते. परंतु धंदा चालू ठेवणे म्हणजे घोड्यावर अत्याचार करण्यासारखे होते. परंतु सुलो-[illegible] त्याच्या या दोन्ही कर्तव्यांची जाणीव नव्हती. तिला फक्त पैशाची व्यवस्था कशी व्हावी एवढेच माहीत होते. म्हणून म्हाताऱ्या घोड्यावर खर्च करणे तिला व्यर्थ वाटले. धंद्याला तिच्या आजाची गाडी होतीच. परंतु नागपालाला त्याच्या मालकाने दिलेल्या घोड्याचा अभिमान वाटत होता. त्याला कष्ट देणे त्याला मान्य नव्हते. त्याच्या व तिच्या विचारांत फरक होता तो ओळखून त्याने तिच्याशी लग्नाचा विचार बदलला. स्वतःच्या पोटा पाण्यासाठी मालकाने दिलेली गाडी विकून शेतीभातीची कामे मालकाची आठवण म्हणून करू लागला. त्या धंद्यात त्याला म्हाताऱ्या घोड्याचा खर्च भागविणे सोपे झाले. अशा तऱ्हेने जीवन चालविणे त्याच्या कर्तव्यबुद्धीला जास्त अनुकूल वाटले."

अशातऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसः झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंब कळू लागला.

(कल्पित)





# मंत्रग्रंथ

चंदन नांवाच्या देशात दुष्टकेतू नांवाच्या राजाच्या कारकीर्दीत त्याच्या दुष्कृत्या-विरुद्ध एक अहिंसक क्रांती होऊन राजवटच बदलली. ती अहिंसक क्रांती घडविणाऱ्या-मध्ये चाणक्य नावाचा एक थोर पुरुष आणि सूर्यकांत नावाचा एक क्षत्रिय वीर होता. दुष्टकेतूच्या जागी सूर्यकांत राजा झाला. प्रजा सुखी झाली.

चाणक्याने सूर्यकांताला दीर्घायुषी होऊन राज्याचा सांभाळ कर असा आशीर्वाद दिला व म्हणाला–"मी आतां राजा झालो आहे, मनाला येईल तसा वागेन, असे करतां कामा नये. मी देवाची प्रार्थना करून त्याच्या सूचनेप्रमाणे काही नियम राज्य व्यवस्थेसाठी तुला सांगत आहे. त्या नियमांप्रमाणे शासन कर आणि एक आदर्श राजा म्हणून राज्य कर." असे सांगून चाणक्य आपल्या घरी निघून गेला. त्यानंतर त्याने आपल्या घरी बसून एक ग्रंथरचना केली आणि तो सूर्यकांताला देऊन म्हणाला–

"हा एक मंत्रग्रंथ आहे. देवाने सांगितला तसा मी हा लिहून काढला आहे. यातील प्रत्येक वाक्य देववाणी आहे. यांत कोणी बदल करतां कामा नये."

सूर्यकांत तो ग्रंथ उचलून आदरपूर्वक कपाळाला लावून म्हणाला–"मी हा वाचून प्रत्येक वाक्याचा ठीक अर्थ समजून घेऊन काम करीन." त्याला ज्या नियमांचा अर्थ कळला नाही त्यांचा अर्थ चाणक्याला विचारून घेई. त्या ग्रंथातल्या नियमांप्रमाणे राज्य करून तो प्रजारंजक राजा झाला.

सूर्यकांताच्या मुलाचे नांव चंद्रकांत होते. त्याने बालपणापासून विद्याभ्यास करून राज्यव्यवस्थेच्या शिक्षणातही प्राविण्य संपादन केले. त्याला व्यसन म्हणून एकच होते, ते म्हणजे शिकार.



चंद्रकांताला अठरावे वर्षं लागले तेव्हां सूर्यकांताने जगाचा निरोप घेतला. चंद्रकांत गादीवर आला. तोपर्यंत चाणक्य वृद्ध होत आल्यामुळे त्याच्या जागेवर त्याचा मुलगा-श्रीशुक काम करू लागला होता.

चंद्रकांत व श्रीशुक यांची परस्परांशी गाढ मैत्री होती. परंतु मध्यंतरी अनपेक्षितपणे एक मोठा प्रश्न उभा राहिला. चंद्रकांत शिकारीला गेला असतां चुकून एका झाडीत एका माणसाला एक श्वापद समजून त्याने एका बाणाने त्याची शिकार केली.

मंत्रग्रंथातल्या अपराधाबद्दल शिक्षेच्या नियमाप्रमाणे सर्वांना शिक्षा एकच लिहिलेली होती. म्हणून राजाच्या हातून घडलेल्या [illegible] करून शिक्षा देण्याची जबाबदारी येऊन पडली. मंत्रग्रंथातील नियमाप्रमाणे चंद्रकांताला आजीवन तुरुंगवासाची शिक्षा देण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. परंतु चुकून घडलेल्या अपराधाबद्दल इतकी भयंकर शिक्षा देणे चुकीचे होईल असे श्रीशुकाचा अंतरात्मा त्याला सांगू लागला. मंत्रग्रंथातील नियमांचे उल्लंघन करावे तर त्यामुळे इतर नव्या भानगडी उत्पन्न होण्याची शक्यता होती.

श्रीशुकाने बापाचा सल्ला घेतला तेव्हां तो म्हणाला–"शिकारीच्या धुंदीत डोळे मिटून शिकार केलेल्या चुकीबद्दल चंद्रकांतने शिक्षा भोगलीच पाहिजे."

श्रीशुक आवेशाने म्हणाला–"हा मंत्रग्रंथ देवाने सांगितल्याप्रमाणेच तुम्ही रचला नाही का? त्या देवाची कृपा कशी संपादन करावयाची मला सांगाल का? मी त्याला विचारून चंद्रकांताला कसे वाचवायचे, हे विचारून घेईन."

चाणक्य स्मित करून म्हणाला–"वेड्या! मंत्रग्रंथातले सर्व नियम प्रत्यक्ष देवाने सांगितले होते असे वाटलं का तुला? अधिकारमद चढल्यावर राजकर्त्यांनी डोळे मिटून काही करून प्रजेचे अहित करू नये यासाठी मीच देवाचे नाव सांगून तो मंत्रग्रंथ लिहिला होता."

"तसे [illegible] देवाचे नाव सांगून मंत्रग्रंथात काही बदल करतो. राजावर लक्षावधी जबाबदाऱ्या असतात. म्हणून राजासाठी आणि सामान्य प्रजेसाठी एकच नियम असणे बरोबर नाही, राजाने काहीही केले तरी तो गुन्हा नाही असे मंत्रग्रंथात मी लिहितो." श्रीशुक म्हणाला.

चाणक्य रागाने म्हणाला–"मूर्खा! मित्राला वाचविण्यासाठी मंत्रग्रंथात तू बदल करणार आहेस का? त्यामुळे देशाचे व प्रजेचे केवढे नुकसान होईल याची तुला कल्पना आहे का? अपराध आणि उच्चपद यांचा असा संबंध जोडणे प्रजेच्या विरुद्ध कार्य होय!"

परंतु श्रीशुक आपल्या निश्चयापासून ढळला नाही. त्यानंतर त्याने देवाची आज्ञा असल्याचे सांगून मंत्रग्रंथात नवीन सूत्रे जोडली असल्याचे जाहीर केले. चंद्रकांत अशातऱ्हेने वाचला.

हे घडल्यावर काही महिन्यांनी त्या देशाच्या सेनापतीने राजाचा खून केला आणि स्वतः गादीवर बसला. तरी आपल्या अपराधाबद्दल प्रजेने दुर्लक्ष करून आपली राजवट मानावी यासाठी श्रीशुकाचा सहकार प्राप्त करणे त्याला आवश्यक भासले. म्हणून त्याने श्रीशुकाला बोलावून घेतले.

परंतु श्रीशुक म्हणाला–"तू खुनी आहेस, म्हणून प्रथम तुझ्या गुन्ह्याची चवकशी



झाली पाहिजे!" कारण त्याचा मित्र चंद्रकांत याच्या खुनामुळे तो चिडलेला होता.

"मी आतां राजा आहे. सर्व गुन्हे मला माफ आहेत." सेनापती म्हणाला.

"परंतु तू अपराध केलास तेव्हां राजा नव्हतास, म्हणून न्यायालयाची पायरी चढण्याशिवाय तुला दुसरा मार्ग नाही." श्रीशुक म्हणाला.

सेनापती हंसून म्हणाला—"माझ्या या गुन्ह्याने मला राजपद दिले—म्हणजे सर्व गुन्ह्यांपासून मला मुक्त केले! राजाने काही केले तरी तो गुन्हा होत नाही असे मंत्रग्रंथच सांगतो आहे. आतां आणखी एक सूत्र त्यात जोडा. नाही तर सरळ देवाघरी जायला तयार रहा!"

श्रीशुकाला डोक्यात गरगरल्यासारखे झाले. बापाचे म्हणणे न मानून आपला मित्र चंद्रकांत याला वांचविण्यासाठी आपण मंत्रग्रंथांत केलेला बदल असा उलटा अर्थ घेऊन वापरला गेला! त्याच्या आधारे [illegible] नवीन [illegible] प्रोत्साहन मिळाले.

निरुपायाने श्रीशुकने सेनापतीने सांगितल्याप्रमाणे मंत्रग्रंथात बदल केला. तो बदल प्रजेच्या सर्वनाशास ब्रह्मास्त्रासारखा वापरला गेला. अत्याचाराचे सत्र सुरु झाले. त्याविरुद्ध प्रजेने क्रांती केली. ती क्रांती दाबून टाकायला सेनापतीला संधीच मिळाली नाही. त्याचा सर्व वेळ स्वरक्षणासाठीच खर्च होऊ लागला. प्रजेचे बंड वाढत गेले आणि एका नव्या नेत्याने सेनापतीला गादीवरून हुसकावून लावून स्वतः गादी पटकावली.

श्रीशुक या नव्या राजाला भेटून म्हणाला—"तू जर प्रजेच्या हिताचाच विचार करून राज्य करणार असशील तर आतां जो मंत्रग्रंथ चालू आहे तो विसर. अनुभवी लोकांचा सल्ला घेऊन शासन चालू ठेवण्यासाठी नवे नियम, नवीन कायदे कर आणि कोणत्याही परिस्थितीत ते मोडू नकोस. स्वरक्षणासाठी देखील न्याय्य व धर्मसूत्रांचे उल्लंघन करू नकोस."



# एकाहून एक वस्ताद

एक चिक्कू माणूस होता. तो कोणाला काही देत नसे, भिक्षा देखील घालीत नसे. त्याच्याकडून भिक्षा मागून आणायची पैज एकाने मित्राजवळ लावली आणि भिक्षा मागायला गेला. "कोणी नवा दिसतो आहेस की रे, या गावात! तुला येथे काही मिळणार नाही. चालू लाग पुढे!" तो चिक्कू माणूस म्हणाला.

"बिचारा, पुढच्या जन्मी किती कष्ट सहन करावे लागतील याला?" पैज लावणारा म्हणाला.

"कोणाला रे?" चिक्कू माणसाने विचारले.

"मी मागच्या जन्मी तुमच्यासारखाच चिक्कू होतो हो, कोणाला काही दिलं नाही आणि या जन्मी हे भोगतो आहे. तुमच्या नशीबी पुढच्या जन्मी तेच असणार!" पैज लावणारा म्हणाला.

चिक्कू माणसाने दहा पैशाचे नाणं काढीत विचारलं—"हे घे, परत केव्हां फेडशील?"

"पुढच्या जन्मी आपला कर्जदार होईन!" पैज लावणारा म्हणाला.

"म्हणजे हे कर्ज वसूल करायला मी भिकाऱ्याचा जन्म घेऊन हे दहा पैसे वसूल करायचे होय? जा, जा, शहाणा कुठला?" म्हणत चिक्कू माणसाने दहा पैसे खिशात टाकले.


















# कमीत कमी योग्यता

सुवर्णपूरचा राजा चंद्रसेन याला कोणी मुलगा नव्हता. होती ती एकुलती एक मुलगी. तिचे नाव मालिनी होते. ती एकदा राजोद्यानात एकटी विचार करीत बसली होती. विवाहाचे वय होते म्हणून तेच विचार तिच्या मनात चालू होते. तिच्या वयाच्या मुली लग्न होऊन लेकुरंवाळ्या झाल्या होत्या. आई जिवंत असती तर आपलं मन तिनं ओळखलं असतं. परंतु ती तर मालिनी अगदी लहान असतांनाच वारली. बापानेच आईची उणीव भरून काढण्यासाठी मुलीला खूप लाडात वाढविले. योग्य वर मिळाल्यावरच मुलीचे लग्न करायचे त्याने ठरविले होते.

राजोद्यानाचा पाहरेकरी कोणालाही आत पाऊल टाकू देत नसे. त्या दिवशी त्या वेळेला फाटकाबाहेर कोणी म्हणत होता—"मी परदेशातून आलो आहे, किती दुरून आलो आहे. तलावाचे पाणी पिऊ दिलेत तर ते पिऊन मी आपल्या वाटेने पुढे निघून जाईन!"

मालिनीनें टाळी वाजवून पाहरेकऱ्याला बोलाविले व म्हणाली—"कोणी परदेशी आला तर त्याच्याशी प्रेमादराने बोलायचं तर दूरच, त्याला पाणी सुद्धा पिऊ देत नाहीस, हे रे काय?"

पाहरेकऱ्याने परत जाऊन त्या परदेशी माणसाला आत येऊ दिले. त्या माणसाला पाहून मालिनी चकित झाली. तो पंचवीस वर्षांचा एक तरुण होता. त्याचे अंग धुळीने माखलेले होते. कपडे अगदी सामान्यच होते तरी तो तिच्या कल्पनेबाहेर सुंदर होता. त्याला पाहतांच तिने त्याला मनाने वरले.

तिने माळ्याकडून शहाळ्याचे पाणी प्यायला देवविले आणि त्याच्याशी बोलू [illegible] होता. त्याच्या देशात दुष्काळ पडला होता म्हणून कामाच्या शोधार्थ तो या देशात आला होता. त्याचे नाव गजपती होते.

काळोख पडू लागताच मालिनी निघतांना उठून म्हणाली—"उद्यां संध्याकाळीसुद्धां तू येथे अवश्य ये." तो केव्हांही आला तरी त्याला येऊ द्यायला पाहरेकऱ्याला बजावून ती पालखीत बसून निघून गेली.

गेले दोनतीन दिवस मालिनी राजोद्यानात कोणाला तरी संध्याकाळी भेटते असे राजाला कळले. लगेच राजाने मुलीला बोलावून विचारले—"मुली! मी तुला सर्व तऱ्हेने योग्य असा एक वर गेले काही दिवस शोधीत आहे. मी तुझे लग्न करून देण्याच्या खटपटीतच आहे. अशा परिस्थितीत तू दररोज कोणाला तरी संध्याकाळी राजोद्यानात भेटतेस आणि त्याच्याशी फार सलगीने वागतेस म्हणे? तुझ्या मनाने त्याच्याशीच विवाह करण्याचे ठरविले असेल तर तू त्याला माझ्याकडे बोलावून आण. तो तुझ्या योग्य आहे की नाही मी पाहतो."

दुसऱ्या दिवशी मालिनी गजपतीला राजोद्यानात भेटली तेव्हां त्याला म्हणाली—"माझे बाबा तुझी परीक्षा घेणार आहेत म्हणे. तुझे माझ्यावर खरोखरच प्रेम असेल



तर तू त्या परीक्षेत यशस्वी झाले पाहिजेस. नाहीतर तू आपल्या वाटेने जा."

राजाने गजपतीला युद्धकलेविषयी, व्यूहरचनेविषयी आणि राजनीतिविषयी अनेक प्रश्न विचारले. गजपती एकाही प्रश्नाचे उत्तर देऊ शकला नाही. राजाचे समाधान झाले नाही. त्याने गजपतीला निरोप दिला.

नंतर राजा, गजपती तिच्या योग्य मुळींच नसल्याचे सांगून म्हणाला—"राजपुरुषामध्ये आवश्यक एकही गुण मला त्याच्या अंगात दिसला नाही. म्हणून मी त्याला जायला सांगितले आहे."

मालिनी हताश होऊन म्हणाली—"बाबा! तुम्ही थोडी घाई केलीत. तो

एक सामान्य माणूस आहे, एकाएकी त्याच्या अंगात राजपुरुषात असणारे गुण कोठून येणार? तुम्ही त्याला राजनीतीसंबंधीच प्रश्न विचारलेत! हे बरोबर झाले नाही."

त्या दिवशी रात्रभर तिला झोप आली नाही. दुसऱ्या दिवशीदेखील तिला काम करावे सुचत नव्हते. नेहमीप्रमाणे तिला एकदां राजोद्यानात जाऊन यावेसे सुद्धां वाटले नाही. तरी दोघं ज्या जागी बसून बोलत असत त्या जागेवर जाऊन यावेसे मात्र तिला वाटले.

गजपती तेथे तिची वाट पहात असलेला दिसला. तिला पाहतांच तो उठला व पुढे येऊन म्हणाला—"तुझ्या बाबांनी मला सर्व निरर्थक प्रश्नच विचारले. राज्यकारभारासंबंधी मला काय कळणार? आतां तूच काय तो निश्चय करून आपल्या वडिलांना सांगेपर्यंत आपल्याला असेच भेटत रहावे लागणार."

ते ऐकून मालिनीला त्याच्या निर्लज्जपणाची चीड आली. ती म्हणाली—"आतां [illegible] विवाह हा एक [illegible] समज. तुला राजकीय बाबतीत ज्ञान नाही याबद्दल मी तुला दोष देणार नाही. तू परीक्षेत यशस्वी होऊ शकला नाहीस तर आपल्या वाटेने जा असे मी तुला पूर्वीच सांगितले होते. तुला आत्माभिमान नावाची वस्तु माहीत असती तर तू अयशस्वी झाल्यावर मला तोंड दाखवायला आलाच नसतास, भेटलासच असतास तरी पुन्हां लग्नाची गोष्ट काढली नसतीस. माझ्याशी लग्नाविषयी इतकी उत्सुकता दाखविली नसतीस. प्रत्येक पुरुषात जो स्वाभिमान आणि पौरुष असायला हवे ती योग्यतासुद्धा तुझ्यात दिसली नाही. आणखी वर मी आपल्या वडिलांच्या इच्छेविरुद्ध काही करू शकेन हा विचार तुझ्या मनात येऊ शकला. तेव्हां तू आपल्या वाटेने चालू लाग!"

तिने पाहरेकऱ्यांना सांगून त्याला बाहेर पाठविले आणि पुन्हां राजोद्यानात त्याला पाऊलदेखील ठेवू देऊ नका असे बजावून सांगितले.





# प्रधानाची हुशारी

एका सुखी, शांत आणि सुकाळ असलेल्या एका देशात एकाएकी चोऱ्या होऊ लागल्या. नित्य गस्त लावणाऱ्या पाहरेकऱ्यांना चोरांचा पत्ता लागत नव्हता.

म्हणून राजाने चोरांना पकडण्यासाठी सैन्यातल्या हुशार सैनिकांची एक तुकडी त्या कामावर नेमली. परंतु तरीदेखील फायदा झाला नाही. तेव्हां राजाने आपला सेनापती रणधीर याला बोलावून त्या कामावर नेमले. एका आठवड्याच्या आत चोऱ्या थांबल्या पाहिजेत असे त्याला बजावून सांगितले. रणधीर राजाच्या हुकमाचे पालन व्हावे म्हणून कसून प्रयत्न करीत होता. परंतु चार आठवडे होऊन गेले तरी चोरांचा पत्ता लागला नाही.

म्हणून राजाने स्वत:वर जबाबदारी घेऊन चोरांना पकडण्याचा प्रयत्न सुरू केला. राजा रात्रभर जागून राजधानीभर गस्त लावीत राहिला, परंतु त्याचाही काही उपयोग झाला नाही. चोऱ्या नित्यासारख्या चालूच होत्या.

सर्व प्रयत्न फुकट गेल्यावर प्रधानाचा सल्ला घेण्याचा विचार राजाच्या मनात आला. प्रकृती बरोबर नसल्यामुळे प्रधान दीड महिना रजेवर घरीच होता.

म्हणून राजा प्रधानाला भेटायला त्यांच्या घरी गेला आणि त्याने चोरांना पकडण्यासाठी जे जे प्रयत्न केले होते ते सांगून म्हणाला—"प्रधान! आतां या चोऱ्यांना कसा आळा घालायचा हे तुमच्या चातुर्यावरच अवलंबून आहे!"

"जो आज्ञा, महाराज! आतां माझी प्रकृती बरीच सुधारली आहे. मी उद्या दरबारात येऊन चोऱ्या कशा थांबवायच्या हे पाहून काय ती तजवीज करतो." प्रधान म्हणाला.

दुसऱ्या दिवशी वचन दिल्याप्रमाणे प्रधान दरबारात गेला नाही. दुपार उलटली तरी आला नाही. घरी जाऊन चवकशी करतां कळले की प्रधान उजाडताच राजाला भेटण्यासाठी दरबारात गेले.

संध्याकाळी दरबाराची कामे आटोपून राजा राजवाड्यात जायच्या तयारीत असतां प्रधान घाईघाईने आला.

"चोरांच्या विषयी काय करायचं ठरविलंत, प्रधान?" राजाने त्याला विचारले.

"महाराज! चोरांना पकडणे ही मोठी समस्या आहे, असे वाटण्याचे कारण नाही! त्यांना वाटेल तेव्हां पकडून आणून महाराजांसमोर हजर करू शकेन! परंतु त्याहून एक मोठे संकट आपल्या राज्यावर आले आहे. आपल्या पश्चिमेकडील सरहद्दीवर शत्रूने सैन्याची जमवाजमव सुरू केली असून तो आपल्या राज्यात शिरण्याच्या प्रयत्नात आहे. आंतरिक सुरक्षिततेपेक्षां बाहेरचे संकट फार मोठे आहे. तेव्हां ताबडतोब [illegible] पाठविण्याची व्यवस्था करावी." प्रधान म्हणाला.

राजाच्या आज्ञेप्रमाणे रणधीर सैन्य घेऊन पश्चिमेच्या सीमेवर गेला.

दहा दिवस लोटले. रणधीर सैन्य घेऊन परत येऊन म्हणाला—"महाराज! शत्रूची स्वारी होण्याची चिन्हे तर मुळीच आढळली नाहीत. तरी सावध राहणे बरे असे समजून अर्धे सैन्य तेथेच ठेवून राजधानीत परतलो आहे." असे राजाला सांगून प्रधानाला थट्टा उडविण्याच्या स्वरात विचारू लागला—"चोरांचा शोध लागला का?"

"नाही, सेनापती! चोर कोण हे कळावे म्हणून त्याला एक उपाय करून इकडून पाठवून दिले होते. तेव्हांपासून चोऱ्या व्हायच्या थांबल्या होत्या." असे सेनापतीला उत्तर देऊन राजाला म्हणाला—"या रणधीरला अटक करवा. त्याचे अनुयायीच चोर कोण ते उघड सांगतील."



# खोटी साक्ष

एका गावात एक घमेंडखोर व तापट जमिनदार होता. एकदां एका व्यापाऱ्याशी त्याचे काही कारणावरून भांडण झाले. त्या भांडणांत जमिनदाराने त्या व्यापाऱ्याला ठार केले. त्याच गावात गोविंद नावाचा एक तरुण युवक त्या जमिनदाराची पर्वा न करणारा होता. खुनाचा आरोप त्याच्यावर ढकलून देण्याचा विचार करून त्या जमिनदाराने बाळकोबा नावाच्या एका भटाला खूप पैसे चारून व्यापाऱ्याला गोविंदने ठार केलेले स्वत: पाहिल्याची खोटी साक्ष देण्याचे मान्य करवून घेतले.

न्यायालयात बाळकोबांनी साक्ष दिली ती अशी: "मी एक भिक्षुक आहे. मला एक लग्नाचे वय झालेली मुलगी आहे. खून झाला त्या दिवशी रविवारी संध्याकाळी पांच वाजता मी कुंकुम पत्रिका लिहून घेण्यासाठी रामशास्त्र्यांच्या घरी जात असता गोविंदने व्यापाऱ्याला सुऱ्याने भोसकत असतां मी स्वत: पाहिले. तेव्हां पाच वाजून वीस मिनिटे झाली असतील."

न्यायाधीश लगेच म्हणाला—"खोटे बोलतो आहेस. रविवारी संध्याकाळी साडे चार पासून सहा वाजेपर्यंत राहूकाल होता. त्या वेळी तू कुंकुमपत्रिका लिहवून घेण्यासाठी गेला होतास का? अगदी खोटे आहे."

बाळकोबांनी गोंधळून जाऊन खरे सांगून टाकले. जमिनदाराबरोबर बाळकोबांना सुद्धा शिक्षा भोगावी लागली.





# खंडू मांत्रिक

एका गावात खंडू नावाचा एक भूतप्रेत उतरविणारा मांत्रिक रहात असे. गावात कोणी आजारी पडला की खंडू त्याच्या घरी जाऊन सांगे, तुमच्यावर अमक्याने मंत्र टाकविला आहे. तुम्ही वेळेवर इलाज केला नाही तर जीव धोक्यात पडेल. भावडे गावकरी त्याच्या बोलण्यावर विश्वास करून तो सांगे तसे करून खंडूला पैसे, बकरे व कोंबडे देत. खंडू खंडोबाला नाही तर देवीला खूष करण्याचे सांगून बकरे व कोंबडे कापी.

खंडूमुळे गावात भांडणे वाढली, परस्परांवर गावकरी संशय करू लागले. लोक त्याला भीत आणि त्याचा आदर करीत.

गावात रघू आणि सदू नावाचे दोघे मित्र होते. त्या दोघांचा खंडूच्या मंत्रतंत्रावर विश्वास नव्हता. दोघे शेजारी शेजारी रहात. रघूला व्यवहार चांगला कळे. सदूचा स्वभाव जात्याच भोळा होता. रघू सदूला आपल्या धाकट्या भावासारखा मानी. कोणी त्याला फसवू नये याची तो काळजी वाही. गोविंदचा मंत्रतंत्रावर विश्वास नसला तरी, का कोणास ठाऊक त्याला मनात मंत्रातंत्राची व लहान मोठ्या देवांची फार भीती वाटे.

खंडूने ते चांगले ओळखले होते. त्याला हेदेखील चांगले माहीत होते की रघूमुळेच सदू दूरदूर राहतो. तेव्हां दोघांमध्ये भांडण लावण्याचे त्याने मनाशी ठरविले. एकजण जाळ्यात सापडला की दुसरा आपोआप येईल असे त्याला वाटले. म्हणून एके दिवशी रात्री खंडूने कोणाच्या नजरेस पडल्याशिवाय कसलातरी पाला गोविंदच्या बैलाला खायला घातला.

उजाडण्याच्या सुमारास बैलाचे पोट फुगून आले आणि बैल धापा टाकू लागला. [illegible] रघूकडे धावला. रघूने येऊन बैलाला पाहिले व म्हणाला–"तुला भिण्याचं मुळीच कारण नाही. बैलाने काही तरी खाल्ले आहे, संध्याकाळपर्यंत बरा होईल." असे सांगून त्याने बैलाला दोन भांडी चिंचेचे पाणी पाजले.

परंतु सदूचे तेवढ्यावर समाधान झाले नाही. तो प्रत्येकाला सल्ला विचारू लागला. कारण त्या बैलावरच त्याची शेतीभाती सर्वस्वी अवलंबून होती. त्याने फार मोठी रक्कम देऊन तो बैल विकत घेतला होता. म्हणून काय वाटेल ते करून बैलाला वांचविण्याच्या खटपटीत तो होता.



खंडूचा एक साथीदार सदूच्या घरी येऊन व बैलाची ती अवस्था पाहून सहानुभूती दाखवीत म्हणाला–"बाबा रे! तू इतका बेफिकीर कसा? औषधी वनस्पती देऊन बरा होण्यासारखा का हा आजार आहे? कोणी तरी मंत्र टाकून तुझ्या बैलाची ही अवस्था केली आहे. तू जाऊन खंडूला भेट. त्यानेच वांचविला तर बैल वांचेल, नाही तर संध्याकाळपर्यंत काय होईल सांगता येणार नाही. पर्वाच नाही का गणूचा बैल असाच पोट फुगून पडला होता! त्याला खंडूनेच तर वांचविले."

सदूला जास्त विचार करायला वेळच नव्हता. तो खंडूच्या घरी धावला आणि विनवण्या करू लागला–"खंडू, काय वाटेल ते कर आणि माझ्या बैलाला वांचव."

खंडूला आपला तोरा दाखवायला चांगली संधी मिळाली. म्हणाला–"बाबारे! तुझा माझ्यावर विश्वास नाही. मी काही सांगितलं तर तू माझी थट्टा उडविशील!"

"नाही रे बाबा! असे बोलून मला लाजवू नकोस. मी पहिल्यानेच तुझ्याकडे धावायला हवे होते. तू आला असतास तर माझा बैल आतापर्यंत उठून उभा राहिला असता." सदू म्हणाला.

खंडूने सर्वज्ञ असल्यासारखा आव आणून विचारले–"तू काय म्हणालास, तुझा बैल उभा रहात नाही आणि बसल्यावर

श्री ना. ना. लेले



स्वत करीत नाही? नक्कीच कोणीतरी काहीतरी गडबड केली आहे. चल मी येतो आणि काय भानगड आहे त्याच्या मुळालाच हात घालतो." असे म्हणत आपली पिशवी घेऊन व बरोबर आणखी काही जरूरी वस्तू घेऊन खंडू सदूच्या बरोबर निघाला.

खंडूने बैलाला पाहिले. त्याच्या शेपटीचा एक केस उपटून काहीतरी मंत्र म्हटला. आणि आश्चर्य म्हणजे खंडूच्या हातातला केस गरगर फिरून गोळीसारखा गोल झाला. ते पाहून सदूचे सर्वांग हादरले.

"पाहिलेस सदू! तू थोडा उशीर केला असतास तर तुझा बैल वांचला नसता. आतां भिण्याचं मुळीच कारण नाही. उद्यां [illegible] मी आपलं नाव बदलून देईन. मी देतो त्या दोन गोळ्या तू बैलाला खायला घाल. संध्याकाळ पर्यंत तो उभा राहील." असे सांगून खंडूने सदूच्या हातात दोन गोळ्या दिल्या. रात्री काय करायचे ते त्याने सदूच्या कानात सांगून ठेवले.

काळोख पडल्यावर खंडू सदूच्या घरी आला. डोक्यावरचे केस पिंजारलेले होते. कपाळाला भस्म व हळद लावलेली होती. दारे बंद करविली, रांगोळी घालवून त्या जागी एक दिवा लावून ठेवला. नंतर लिंबू व कोहळा कापून तो मंत्र म्हणू लागला– "ह्राम ह्रीम!" आणि रांगोळी घातली होती तेथे पद्मासन घालून करून बसला.

आतां सदूला वाटू लागले, खंडू कोणी सामान्य माणूस नाही. कोणीतरी योगी किंवा महापुरुष आहे. आपण आजवर रघूच्या नादी लागून खंडूचा अपमान करीत राहलो ही केवढी मोठी चूक केली!

खंडू डोळे उघडून एकदम जोरजोराने ओरडून म्हणू लागला–"सदू ऊठ! फावडे घेऊन माझ्याबरोबर चल!" नंतर तो सदूच्या परसात गेला. ईशान्येकडील एका जागी काही हुडकल्यासारखे करून त्या जागी खणायला सांगितले. सदूने डोळे मिटून त्या आज्ञेचे पालन केले.

[illegible] एक मडके निघाले. त्यात कवड्या, केसांची एक बाहुली आणि तीन वाळलेली लिंबे निघाली.

"पाहिलेस सदू! तुझा बैल आणि दुसरी गुरे या वाळक्या लिंबांसारखी वाळून गेली असती!" खंडू म्हणाला.

ते पाहून सदू म्हणाला–"कोणाचे हे काम आहे? ऐकू दे मला!"

"सदू! अरे वेड्या हे विचारण्याची गरज नाही. तुझा माझ्या बोलण्यावर विश्वास होणार नाही, परंतु सांगतो, हे सर्व काम तुझ्या मित्राचे, रघूचे आहे!" खंडूने शांत स्वरात उत्तर दिले.

सदूचा खंडूच्या बोलण्यावर विश्वास बसला नसता. परंतु खंडूने दाखविलेला पुरावा त्याच्या डोळ्यासमोर होता. त्याला वाटले खंडू म्हणतो ते खरे असेल कदाचित!

खंडू पुढे म्हणाला–"कोणाचे का हे काम असेना, ते मागाहून पहा. पहिल्याने बैलाला वांचविण्याचा उपाय कर. एका बळीची व्यवस्था लगेच झाली पाहिजे. कोणतातरी बकरा आणून भागायचे नाही. बकरा काळा आणि त्याच्या कपाळावर पांढरा डाग असला पाहिजे. जर तसा बकरा आणता आला नाही तर आतापर्यंत केलेली सर्व खटपट फुकट जाईल."



"अरे, पण रात्रीच्या रात्री असा बकरा कोठून आणि कसा काय मिळणार?" सदूने निराश होऊन विचारले.

खंडूने विचार केल्याचे सोंग केले व म्हणाला–"मला थोडेसे आठवते, रघूच्या कळपात असा एक बकरा आहे.

"मी तसा बकरा मागितला तर तो मला निरनिराळे प्रश्न विचारील. दुसरं असं की तो बकरा देईलच असे तरी निश्चित कसे सांगता येईल?" सदूने आपल्या मनातली शंका सांगून टाकली.

"रघू मागून देईल असे वाटले होय तुला? तुला त्याच्या नजरेआड तो आणावा लागेल. कसा ते तू पाहून घे!" खंडू

म्हणाला. परंतु चोरी करायला सदूचे मन धजेना. तो घाबरून गेला.

खंडू त्याला धीर देण्यासाठी आणि रघू विरुद्ध मनात विष कालवण्याच्या हेतूने म्हणाला—"मला बोलायचे नव्हते ते आतां बोलल्याशिवाय गत्यंतर नाही. तुझ्या या दोन हजार रुपये किंमतीच्या बैलाला ठार करण्यासाठी रघूने घाट घातला होता. त्या बैलासाठी रघूचा गळा कापावा लागला तरी त्यात पाप नाही."

सदूने आपले मन घट्ट केले. रघूच्या आवारात मागच्या बाजूने शिरला आणि मुकाट्याने त्या बकऱ्याला उचलून बाहेर खंडूसमोर आणून ठेवला. खंडूने लगेच त्याचा बळी खंडोबाला दिला.

[illegible]
घराबाहेर ओटीवर बसला असता त्याला खंडू सदूच्या घरातून बाहेर पडत असतांना दिसला. त्याचे शिष्य कापलेला बकरा उचलून घेऊन पाठोपाठ निघालेले दिसले.

शेवटी सदूदेखील या लबाडाच्या जाळ्यात फसला म्हणावयाचा, रघूला वाईट वाटले.

थोड्या वेळाने त्याचा बकरा नाहीसा झाल्याचे रघूला कळले. तेव्हां त्याला खरी गोष्ट कळली. रघूने खंडूची लबाडी चवाठ्यावर आणल्या शिवाय त्याचा खेळ-खंडोबा थांबणार नाही असा विचार करून काय करायचे ते ठरविले.



[illegible] सदूच्या घरी [illegible] करीत बसलेल्या बैलाला पाहून म्हणाला—"अरे सदू! पाहिलेस ही सर्व म्हाळसाबाईची कृपा आहे. मी त्या मातेजवळ नवस केला होता की तुझा बैल बरा झाला तर मी आपला हा बकरा बळी देऊन व तिला प्रसन्न करीन. परंतु मध्यंतरी लबाडी झाली. रात्री कोणीतरी माझा बकरा चोरून नेला. म्हाळसा रागावली तर माझ्या कळपात एक देखील बकरा वांचणार नाही." असे सांगून त्याने घाबरून गोंधळून गेल्याचे सोंग केले.



म्हाळसाबाईचे नाव ऐकून सदू घाबरला. कापऱ्या हातांनी रघूचा हात धरून म्हणाला—"दादा! रात्री ती चोरी मीच केली होती रे! मला माफ कर! मातेचा राग शांत करायला काही उपाय असेल तर कर. असे सांगून त्याने घडलेली गोष्ट अथपासून इतिपर्यंत सांगून टाकली.

रघू हंसत म्हणाला—"वेड्या! तुझ्या तोंडी सर्व माहिती काढून घेण्यासाठी हे सर्व नाटक केले होते. मंत्रांतंत्रांनी होणाऱ्या या गोष्टी नाहीत. पाहू तर दे तुझ्या बैलाच्या शेणात काय आहे?"

सदूने शेण आणून रघूसमोर ठेवले. रघूने लक्षपूर्वक ते पाहिले. त्यात तो विषारी पाला निघाला. बैलाला कोणीतरी तो पाला खायला घातला असावा असे सदूने सांगितले. कारण बैल दिवसभरात कोठे बाहेर चरायला गेला नव्हता.

रघूने सदूला समजावून सांगितले, ही सर्व लबाडी त्या खंडूची आहे. आपली मैत्री फोडण्यासाठी त्याने हा सर्व कारभार केला आहे. तेव्हां सदूचे डोळे उघडले.

रघू सदूला म्हणाला—"तू संध्याकाळ-पर्यंत थांब! मी त्याचा कट उघडकीला आणतो. तू चौघांपांच जणांना तयार ठेव."

त्यानंतर रघू खंडूच्या घरी धावला. त्याच्या विनवाण्या करीत म्हणाला—"खंडू! आता तूच मला हात दिलास तर मी वांचणार! दोन दिवस झाले, माझी

गाय दूध देत नाहीशी झाली आहे. वासराला तोंड लावू देत नाही कासेला. माझ्या म्हशी पाण्याला तोंड लावीत नाहीत. माझा एक बकरा रात्रीच्या रात्री नाहीसा झाला. हे सर्व पाहून माझ्या घरावर कोणीतरी मंत्र टाकल्यासारखा वाटतो आहे मला. एकदां येऊन पहा तरी!"

रघूला सुद्धा आपल्या जाळ्यात आलेला पाहून खंडूला खूप आनंद झाला. तो त्याच्याबरोबर निघाला.

सर्व स्थिती पाहून खंडू त्याला म्हणाला– "मला सुद्धा हा कोणीतरी मंत्र टाकल्यासारखा दिसतो आहे! याची तोड आहे माझ्याकडे. उद्यां रात्रीपर्यंत सर्व ठीक करून दाखवितो, तु बेफिकीर रहा!" असे सांगून खंडू घरी निघून गेला.

त्या दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास रघूच्या मागच्या बाजूला परसात स्वत: रघू, सदू आणि आणखी चार जण एकाजागी लपून बसून राहले. खंडू काळा बुरखा पांघरून भितीवरून उडी मारून आला [illegible] एका जागी [illegible] त्याच [illegible] यमदूतासारखे सहा जण त्याच्या चारीबाजूला जाऊन उभे राहले. खंडू पळण्याचा यत्न करू लागला.

रघूने दरडावून विचारले–"काय रे खंड्या! बरोबर मडके आणलं आहेस नाही का?" असे म्हणत त्याने खंडूच्या तोंडावरचा बुरखा ओढला. मडके निसटून खाली पडले. त्यातल्या कवड्या, केसाची बाहुली आणि वाळकी लिंबे खाली पडली.

सदूने रागाने खंडूला एक मुस्कुटात देऊन विचारले–"काय रे लुच्चा! हा काय धंदा चालविला आहेस?" खंडूने रघूचे पाय धरले. रघूने खंडूचे हातपाय बांधले आणि दुसऱ्या दिवशी सर्व गांवकऱ्यांना बोलावून सर्वांसमक्ष खंडूच्या तोंडी त्याच्या कृत्याचे वर्णन बोलविले.

गांवकऱ्यांनी त्याला खूप बडविले. त्या दिवसापासून खंडूचा खेळखंडोबा कायमचा बंद झाला.



# निरुपयोगी सत्कार

कांचीपूरचा राजा कांचनवर्मा हा आपल्या राज्यातल्या कवी आणि कलाकारांचा दरवर्षी सत्कार करून त्यांना काहीतरी वस्तू सत्कारार्थ देत असे. त्या वस्तुवर राजाची मुद्रा असे. ती वस्तू राजाने दिलेला मान म्हणून स्वत:जवळ बाळगावयाची असे. ती विकायला मनाई होती.

एकदां कांचनवर्माने वेदशर्मा नांवाच्या एका विद्वान ब्राह्मणाला आपला कंठहार सत्कार म्हणून दिला. दररोज अर्धे पोटी झोपणाऱ्या त्या ब्राह्मणाने राजाला निवेदन केले– "महाराज, हा निरुपयोगी सत्कार कशाला? मला याची गरज नाही!"

राजाला आश्चर्य वाटले व रागही आला. त्याने ब्राह्मणाला कारण विचारले. वेदशर्मा आपल्या दारिद्र्यावस्थेचे वर्णन करून सांगितले.

तेव्हां राजाला कळले की तो विद्वानांचा जो सत्कार करतो त्याचा उपयोग त्यांना फारसा होत नसतो. फक्त राजाचा थोरपणाच प्रदर्शित होतो. तेव्हांपासून राजाने सत्कार करते वेळी द्यायची वस्तू उपयोगी पडेल अशी द्यायला सुरवात केली.





# पुनर्जन्म

रामभाऊंनी आपल्या आयुष्यात अनेक तऱ्हेचे अनुभव मिळविले होते. ऐन तारुण्यात त्यांनी एका जादुगाराच्या हाताखाली नोकरी केली होती. त्यापूर्वी एका फोटोग्राफराकडे ते कामाला होते. पुढे काही दिवस एका औषधांच्या दुकानात काम केले. अशातऱ्हेने नोकरी करून त्यांनी जे चार पैसे जमविले होते त्या भांडवलावर स्वत: एक औषधाचे दुकान काढले.

रामभाऊंना पन्नासावे वर्ष लागले तेव्हां कॉलऱ्याच्या साथीत त्यांच्या घरची सर्व मंडळी एक एक करून परलोकी गेली. रामभाऊंचे मन विटल आणि त्यांनी भगवी वस्त्रे धारण करून एकतारा हाती घेतला आणि ईश्वरचिंतनात पुढील आयुष्य घालविले.

एकदां फिरत फिरत ते एका गावाच्या वेशीवर पोचले तेव्हां सोसाटयाच्या वाऱ्यापाठोपाठ धुळीचे लोट आकाशात उडू लागले. म्हणून ते एका झोपडीत येऊन निवाऱ्यासाठी उभे राहले. ती झोपडी स्मशानात प्रेते जाळायला येणाऱ्यांस उभे रहायला बांधलेली होती. काळोख पडू लागला होता. रामभाऊंनी झोपडीतून बाहेर कोणी आहे का पाहिले. त्यांना एका तिरडीवर एक प्रेत दिसले. जवळपास कोणी माणूस दिसला नाही. प्रेताबरोबर आलेली मंडळी बहुतेक लाकडे आणायला गेली असावीत.

रामभाऊंची नजर प्रेतावर होती. त्या बाजूने त्यांना खाकरल्याचा आवाज ऐकू आला आणि त्या पाठोपाठ ते प्रेत हालू लागल्यासारखे दिसले. दुसरा कोणी असता तर ते दृश्य पाहून घाबरून पळून गेला असता. परंतु रामभाऊ धीट होते. त्यांनी जवळ जाऊन पाहिले. तिरडीवर बांधलेली व्यक्ती स्वत:ला सोडवून घेण्यासाठी धडपड [illegible] दिसल[illegible]भाऊंनी आपल्या पिशवीतून चाकू काढून दोऱ्या कापून काढल्या. ती व्यक्ती उठून बसली व आश्चर्यचकित नजरेने चहूकंडे पाहू लागली.

रामभाऊंनी त्या व्यक्तीला विचारले— "कोण तू?"

तो तीस वर्षांचा एक तरुण युवक होता. त्याचे नांव होते श्यामू. तो त्या गावातला एक शेतकरी होता. शेतात काम करीत असतां सकाळी त्याला एक साप चावला होता. मांत्रिकाने मंत्र घातला एवढेच त्याला माहीत होते. पुढे काय झाले त्याला माहीत नव्हते.

वादळ थांबले आणि लोक कंदील घेऊन स्मशानाकडे येत असलेले दिसले. रामभाऊंनी श्यामूला झोपडीत बोलावून नेले.

तिरडी रिकामी पाहून लोक घाबरले. त्यांना वाटले की भुतांनी प्रेत उचलून नेले असावे. आतां तेथे उभे राहण्याची कोणाची छाती नव्हती. बरोबर आणलेली लाकडे तेथेच टाकून लोकांनी गावाची वाट धरली.

"ही सर्व मंडळी मूर्ख व भित्री दिसत आहेत. तुला थोडे बरे वाटले म्हणजे मी तुझ्याबरोबर गावात येईन तुला घरी पोचवीन." रामभाऊ म्हणाले.



"घरी गेल्यावर काय होणार कोण जाणे? मी जिवंत झालो नसतो तर बरे झाले असते. माझी आई, बायको व मुले मला घरात पाऊल टाकू देतील की नाही शंका आहे. मला सर्व भूत समजून पिटाळून लावतील. मी काय करू, मला कळत नाही." श्यामू रडक्या स्वरात म्हणाला.

"तू मुळीच घाबरू नकोस, मी आहे ना तुझ्या मदतीला! तुला कोणी जवळ येऊ दिले नाही तर मी आहे ना तुझ्या पाठीशी. आपण दोघे कीर्तन भजन करीत तीर्थयात्रा करू." रामभाऊ म्हणाले.

उजाडल्यावर रामभाऊ श्यामूला घेऊन गावात गेले. नवऱ्याला जिवंत चालत येत



असलेला पाहून श्यामूची बायको भय चकित होऊन पाहू लागली. तिने घाबरून ओरडत दार लावून घेतले.

"पाहिलंत, मी जिवंत झाल्याचा काय फायदा झाला?" श्यामू रडक्या स्वरात म्हणाला.

"ते मी पाहून घेईन. तू बेफिकीर रहा!" रामभाऊंनी श्यामूला धीर दिला.

थोड्या वेळाने एकाएकी एक खिडकी उघडली. श्यामूच्या आईने भीतभीत बाहेर डोकावून पाहिले. श्यामूने आईकडे उत्कंठेने पाहिले तेव्हां ती हात जोडून त्याला म्हणाली—"ए भुता! तू आम्हांला त्रास द्यायला कशाला आला आहेस? श्यामूच्या

चांगले श्राद्ध करून पिंडदान करू. म्हणून आमच्या वर दया कर, आम्हांला उगाच त्रास देऊ नकोस."

रामभाऊंनी पुढे येऊन तिची समजूत घालण्याचा यत्न करण्याच्या हेतूने म्हटले—"बाई, हा तुमचा मुलगा श्यामूच आहे. त्याचे भूत नाही. देवाच्या कृपेने त्याला पुनर्जन्म मिळाला आहे. मी म्हणतो ते अगदी खरे आहे, माझ्या बोलण्यावर विश्वास करा."

गावकऱ्यांनी रामभाऊला विचारले—"कसा विश्वास करायचा हो तुमच्या बोलण्यावर? काल रात्री याच्या मढ्याला भुते खात होती, आम्ही आपल्या डोळ्यांनी पाहिले."

"आई, मी तुझा लाडका मुलगा श्यामू आहे. मला पुनर्जन्म मिळाला. मला तुझ्या पदराखाली राहू दे, घराबाहेर काढू नकोस." श्यामू आर्जवा करीत म्हणाला. परंतु आईचे मन अंधविश्वासाने भरले असल्यामुळे विरघळले नाही.

मध्यंतरी तेथे लोकांची गर्दी जमली. परंतु ते भीतीमुळे दूर उभे राहून गंमत पहात होते. त्यांच्यात गावप्रमुखही होता. श्यामूने त्याच्याजवळ आर्जवा करीत म्हटले की त्याला त्याच्या कुटुंबाबरोबर सुखाने

द्यावी.

परंतु गावप्रमुख शंका करीत म्हणाला—"तुझ्या अंगात भूत नाही याचे प्रमाण काय? नाही तर मेलेला माणूस कधी जिवंत होतो का?"

तोपर्यंत श्यामूच्या घरची सर्व मंडळी दार उघडून व्हरांड्यात येऊन उभी राहली होती. ती भयचकित मुद्रेने श्यामूकडे पहात होती.

रामभाऊंनी गांवकऱ्यांची अनेक प्रकारे समजूत घालण्याचा प्रयत्न केला. तो थोड्या गंभीर स्वरात म्हणाला—"समजा, एखाद्या भुताने श्यामूच्या अंगात प्रवेश केला असेल तर त्यापासून तसे मोठे नुकसान काय होणार आहे? मी तांत्रिक आहे, भूत उतरविणे हा माझा धंदा आहे. तुम्हांला वाटत असेल की श्यामूच्या अंगात भूत शिरून त्याच्याकडून बोलवीत करवीत आहे तर मी ते खोटे असल्याचे सिद्ध करून दाखवितो. तुम्हांला माहीत आहे ना की प्रेताच्या अंगातून रक्त वहात नाही. त्याच्या अंगातून रक्त वाहू लागले तर तो प्रेत नसून जिवंत माणूस आहे, हे तुम्हांला कबूल करावे लागेल."

त्यानंतर रामभाऊ श्यामूच्या पायाजवळ जाऊन बसले. जेथे साप चावला होता, तेथे रक्त गोठले होते. ते गोठलेले रक्त



दाबून काढून टाकल्यावर तेथून रक्ताचा एक थेंब बाहेर आला. ते दाखवून रामभाऊ गावप्रमुखाला म्हणाले—"यावरून हे सिद्ध झाले की श्यामू तुमच्या आमच्यासारखा एक जिवंत माणूस आहे. परंतु माझ्या मनात तुमच्यासारखीच थोडी शंका आहे की कदाचित एखादे भूत याच्या अंगात शिरले असेल. उद्या शनिवार आहे मंत्रातंत्राला चांगला दिवस आहे. तोपर्यंत मी श्यामूला आपल्याजवळ शिवालयात ठेवून घेतो.

रामभाऊ म्हणाले ते गांवप्रमुखाबरोबर गावकऱ्यांनी मान्य केले.

त्यानंतर रामभाऊ श्यामूला बरोबर घेऊन शिवालयात निघून गेले. मंत्रतंत्र करण्या-

साठी लागणारी सामुग्री एक मडके, वाळलेले गवत, कांबळे वगैरे आणि गुप्तपणे औषधाच्या दुकानातून टिंक्चर आयोडिन, फोटोचे सामान विकणाऱ्या दुकानातून तुरटीचे काही तुकडे घेतले. त्याने एक स्वच्छ पांढरे फडके काडीच्या मदतीने आयोडिन मध्ये बुडविले आणि वाळवून घेतले. ते फडके अगदी काळे पडले होते. नंतर एका मडक्यात पाणी घालून त्यात तुरटी विरघळवून घेतली. हे सर्व गुप्तपणे करण्यात आले.

दुसऱ्या दिवशी श्यामूच्या अंगातले भूत पळविण्याचा प्रयोग सुरू झाला. श्यामूला सर्वांच्या घोळक्याच्या मधोमध बसविण्यात आले. त्याच्या जवळ पाणी भरलेल्या दोन घागरी ठेवण्यात आल्या. त्यांपैकी एकीत तुरटी विरघळविलेले पाणी होते. रामभाऊंनी श्यामूसमोर बसून मंत्रपाठ सुरू केला. तासभर मंत्रपाठ झाल्यावर रामभाऊ म्हणाले—“आतां या घागरीतले पाणी मंत्रवलेले आहे. या पाण्याची परीक्षा [illegible] सर्व प्रकारची घाण स्वच्छ करू शकते.”

त्यानंतर रामभाऊंनी श्यामूच्या कपड्यात ठेवलेले काळे फडके काढले. एक काचेचा पेला मागवून तो तुरटीच्या पाण्यात बुडविला. नंतर त्या पाण्यात ते काळे फडके हळूच सरकवले. फडक्याचा काळा-रंग हळूहळू जाऊ लागला आणि फडके स्वच्छ पांढरे झाले आणि अशा तऱ्हेने मंत्रवलेल्या पाण्याची गोष्ट सर्वांना पटली.

“तुम्ही, मंत्रवलेल्या पाण्याचा महिमा पाहिलाच आहे. तेव्हां या पाण्याने श्यामूला आंघोळ घालून घेतली तर तो शुद्ध होईल. असे सांगून दुसऱ्या घागरीतले पाणी श्यामूच्या अंगावर ओतले. त्या पाण्याने आंघोळ झाल्याने श्यामूला सामान्य माणूस म्हणून गांवकऱ्यांनी मान्य केले.

रामभाऊंनी पूर्वी औषधांच्या व फोटोग्राफरच्या दुकानात काम केले असल्यामुळे आयोडिन व तुरटीचे गुणधर्म त्यांना माहीत होते.





# मनःशांती

फार पूर्वी रघुनाथराव नामक एक श्रीमंत गृहस्थ एका गावी रहात असत. त्यांना साठावे वर्ष लागण्याच्या सुमारास त्यांच्या कुटुंबातली सर्व माणसे देवाघरी गेली. त्यांचे संसारापासून मन विटले आणि त्यांनी आपली सर्व इस्टेट खर्च करून गावाच्या उन्नतीसाठी अनेक कामे केली. नंतर त्यांनी वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला आणि जंगलात एकांत स्थानी एका तलावाच्या शेजारी एक झोपडी बांधली आणि कंदमूलफलाहार करून शांतिपूर्वक राहू लागले.

एके दिवशी त्या जागी एक विचित्र गोष्ट घडली. रघुनाथराव एका झाडावरची फळे काढीत होते. तेव्हां एक वाघ त्यांच्या अगदी जवळून अंगाला घासूनच पुढे निघून गेला. त्याच्या आधी थोडा वेळ वाघाची डरकाळी ऐकून एक लाकूडफोड्या घाबरून झाडावर चढून बसला होता. त्याने ते दृश्य पाहिले.

त्या घटनेचा लाकूडफोड्याच्या मनावर फार परिणाम झाला. तो झाडावरून उतरून त्यांच्या पायां पडला व म्हणाला—“महात्मन्! मी एक गरीब लाकूडफोड्या आहे. कुटुंब फार मोठे आहे. सर्वांना अर्धपोटी झोपावे लागते. काही मुक्तीचा मार्ग सांगावा!”

रघुनाथरावांनी प्रेमाने त्या लाकूडफोड्याला समजावून सांगितले, बाबा रे! तू मेहनत करीत रहा, देवाची तुझ्यावर कृपा होईल. मुक्तीची फिकीर कशाला?

लाकूडफोड्याने शेजारच्या गावी जाऊन जंगलात त्याने पाहिलेले दृश्य वर्णन करून सांगितले. त्या दिवसापासून रघुनाथरावांच्या दर्शनासाठी गावकरी येऊ लागले. रघुनाथरावांची कीर्ती पंचक्रोशीत पसरली.



रघुनाथरावांनी मन:शांतीसाठी वनवासाश्रम स्वीकारला होता. परंतु त्यांना गोरगरिबांचे दु:ख आणि प्रश्न ऐकून घ्यावे लागू लागले. प्रजेने त्यांना राघवेंद्रस्वामी म्हणायला सुरवात केली आणि देवासारखी त्यांची पूजा करू लागले.

एके दिवशी दूरच्या गावाहून श्यामसुंदर व कांता नावाची नवराबायको राघवेंद्रस्वामींच्या दर्शनासाठी निघाली. थोडे अंतर चालून गेल्यावर तीर्थयात्रा करणाऱ्यांचे सोंग करून जाणारे चोर त्यांना भेटले. श्यामसुंदरला व त्याची वाढलेली दाढी पाहून चोरांच्या मनात एक विचार आला. ती नवराबायको उपाशी होती हे

खाद्यपदार्थ काढले व दोघांना खायला दिले. नंतर त्यांना दोघांना भगवीवस्त्रे परिधान करावयास सांगितली आणि स्वत: भगवीवस्त्रे धारण केली.

त्याच दिवशी चोरांनी त्या प्रदेशात एक लहानसा आश्रम स्थापन केला. श्यामसुंदर राघवेंद्रस्वामींचा पट्टशिष्य असल्याचे जाहीर केले. श्यामसुंदरने त्या गोष्टीस नकार दिला तेव्हां चोरांनी त्याला ठार केले जाईल असे धमकावून गप्प केले. चोरांनी या नव्या गुरूचे आपण शिष्य असल्याचे सांगून जवळपासच्या खेडोपाडी खूप प्रचार केला.

श्यामसुंदरचा आश्रम राघवेंद्रस्वामींच्या आश्रमापासून त्याच वाटेवर पुष्कळ दूर होता. म्हणून जे लोक राघवेंद्रस्वामींच्या दर्शनार्थ जाऊ शकले नाहीत ते त्यांच्या पट्टशिष्याच्या दर्शनासाठी येऊ लागले. चोरांनी श्यामसुंदरला थोडीशी हातचलाखी शिकवून तयार केले. श्यामसुंदर नुसता हातावर हात चोळून भस्म विभूती करून दाखवू लागला. तोंडाने वदल्याबरोबर शिवलिंगाची सृष्टी होऊ लागली. हे सर्व चमत्कार पाहून भक्तांचा विश्वास वाढत गेला. श्यामसुंदरलाच लोक राघवेंद्रस्वामींचा अवतार मानून मोठमोठ्या रकमा भेट म्हणून देऊ लागले. चोरांना चोरी लूट-

व मिळकतीचा वाटला.

हळूहळू जाहीर होऊ लागले की थोरल्या राघवेंद्रस्वामीपेक्षां छोट्या राघवेंद्रस्वामींचा महिमाच जास्त थोर आहे. म्हणून खोल जंगलात राहणाऱ्या खऱ्या राघवेंद्रस्वामीपेक्षां तोतया राघवेंद्रस्वामींचा मानमरातब वाढू लागला.

राघवेंद्रस्वामींना संशय येऊ लागला की, कोणी तरी त्यांच्या नावाचा दुरुपयोग करून प्रजेला फसवीत आहे. ते स्वत: 'स्वामी' झाले असले तरी त्यांनी कधी कोणाला फसविले नाही. हा तोतया 'स्वामी' कोण निघाला आहे, ते कळावे म्हणून राघवेंद्रस्वामी पहाटे उठून श्यामसुंदरच्या आश्रमाकडे निघाले. चोरांनी राघवेंद्रस्वामींना पूर्वी कधी पाहिले नव्हते म्हणून त्यांना इतर भक्तांसारखाच कोणी तरी नवा भक्त असावा असे समजून त्यांनी राघवेंद्रस्वामींचे अत्यंत आदरपूर्वक स्वागत केले.

श्यामसुंदरने आपल्या महिमेचे काही चमत्कार करून दाखवून प्रदर्शन केले. सर्व भक्त निघून गेल्यावर राघवेंद्रस्वामी एकांतात बराच वेळ श्यामसुंदरशी बोलले. श्यामसुंदरने स्वत: स्वामी असल्याचा आव आणून राघवेंद्रस्वामींच्या सर्व प्रश्नांची उत्तरे दिली.



राघवेंद्रस्वामींनी त्याला विचारले— "महात्मन्! मी आपले गुरुवर्य श्री राघवेंद्रस्वामी यांच्याविषयीं जास्त कळावे म्हणून आलों आहे."

श्यामसुंदरने डोळेमिटून गंभीर स्वरात उत्तर दिले—"बेटा! मी त्यांच्याविषयीं काय सांगू? ते एक थोर विभूती, एक तपस्वी आहेत. त्यांना देवाचा साक्षात्कार झाला आहे."

"आपण त्यांचा आश्रम कोठे आहे, तेथे कसे जायचे वगैरेची माहिती देऊ शकाल का?" राघवेंद्रस्वामींनी विचारले.

"वेडचा, त्यांच्या जन्मसमयींच एक आकाशवाणी झाली. तिने जन्मत:च त्यांना 'राघवेंद्रस्वामी' हे नाव दिले. ते ढोंगी

साधू नाहीत, एक लोकोत्तर सिद्धपुरुष आहेत." श्यामसुंदरने उत्तर दिले.

राघवेंद्रस्वामीनें श्यामसुंदरला विचारले– "कितीदिवसांपूर्वी आपल्याला त्यांचे दर्शन घडले?"

"त्यांचे दर्शन मला नित्य घडते! मनात आले की मी ध्यान करून त्यांचे दर्शन घेतो." श्यामसुंदर म्हणाला.

"तरमग मला आपण ओळखले आहे, होय ना?" राघवेंद्रस्वामींनी विचारले.

"तू कोण आहेस, बेटा?" श्यामसुंदरने सवयीप्रमाणे सहज विचारले.

"स्वामी, आपण आतापर्यंत ज्यांची वाखाणणी करीत होता तो राघवेंद्रस्वामी मीच!" राघवेंद्रस्वामी म्हणाले.

ते ऐकून श्यामसुंदर आश्चर्यचकित होऊन राघवेंद्रस्वामींकडे पाहू लागला.

"तुम्ही अशा तऱ्हेने जगाला कां फसवीत आहां?" राघवेंद्रस्वामींनी विचारले.

श्यामसुंदरने वस्तुस्थितीचे वर्णन करून चोरांच्या जाळ्यात तो कसा सापडला सर्व

खंडोबा असल्याचे सांगून टाकले. चोरांच्या तावडीतून सुटका मिळाली तर त्याला आनंद होईल हेदेखील त्याने सांगितले. "चोरांपासून आपल्या संरक्षणाची कोणी जबाबदारी घेतली तर आयुष्यभर त्या व्यक्तीचे उपकार मानीन." म्हणाला.

त्या दिवशी रात्री चोर दारू पिऊन बेसावधपणे लोळत पडले असतां राघवेंद्र-स्वामी श्यामसुंदर व त्याची बायको दोघांसह तेथून निघून गेले. पुष्कळ दूर प्रवास केल्यानंतर ते एका मोठ्या शहरात पोचले. तेथे त्यांनी उदरनिर्वाहाचे साधन शोधले आणि पुढील आयुष्य शांतचित्ताने घालविले.

जंगलांत एकांत स्थानी राघवेंद्रस्वामींना जी मन:शांती लाभली नाही, ती त्यांना या शहरात लाभली. कारण तेथे त्यांना ओळखणारा कोणी नव्हता, त्यांची विचार-पूस करणारा, काळजी वाहणारा अगर त्रास देणारा कोणी नव्हता.






सूर्योदयाच्या सुमारास वानर सैन्य आणि राक्षसांचे सैन्य दोन्हींचे युद्ध सुरू झाले. नेहमीप्रमाणे राक्षसांनी वानरांवर बाणांचा वर्षाव सुरू केला. त्यांनी तलवार, परशु, परीघ वगैरे शस्त्रांचा प्रयोग सुरू केलेला पाहल्यावर वानरांनी राक्षसांवर वृक्ष उपटून आणि दगड, खडक जे हाती आले ते फेकायला सुरवात केली. दोन्ही पक्षांचे रक्तप्रवाह वाहू लागले आणि रणांगणावर उडत असलेली धूळ भिजून गेल्याने उडण्याची बंद झाली.

राक्षसांच्या मान्धासमोर वानरांना पाय रोवून युद्ध करणे कठीण होत असलेले पाहून रामाने धनुष्य बाण घेऊन राक्षस सैन्यात प्रवेश केला आणि राक्षसांवर अग्निबाणांचा वर्षाव सुरू केला. रामासमोर राक्षसांना उभे राहणे अशक्य झाले. रामाचे बाण कोठून कसे येत आहेत याचा अंदाजच त्यांना लागेना. फक्त बाणांचा जो परिणाम होई तोच दृष्टीस पडे. झाडे वाऱ्याने हलतांना दिसतात, परंतु वारा दिसत नाही, तशी स्थिती झाली. थोड्याच वेळात सह-स्रावधी राक्षसांचा संहार झाला.

राम त्याच्याजवळ उभे असलेल्या सुग्रीव, बिभीषण, जांबवंत, हनुमंत इत्यादिकांस म्हणाला–"माझ्यासारखी शरवृष्टी करणे शंकराशिवाय इतर कोणाला जमणेच शक्य नाही."

रणांगणावर चालू असलेल्या राक्षसांच्या संहाराची शोकवार्ता राक्षसस्त्रियांना लंकेत

३४. रामाला इंद्राचे सहाय्य



मिळाली. मेलेल्या राक्षसांत त्यांच्या पैकी अनेकांचे पती होते, पुत्र होते. त्या सर्व मोठमोठ्याने रडत होत्या. 'या सर्वाला मूळ कारण ती मूर्ख शूर्पणखा आहे असे त्या म्हणत होत्या. म्हणे, ती रामाला भुरळ घालायला गेली होती. तिचं रूप पाहून रामासारखा शूर पुरुष का भुरळणार? तिच्या गप्पा ऐकून रावण तरी कसा मूर्खासारखा जाऊन सीतेला उचलून घेऊन आला? त्यानेच नाहीका रामाशी विनाकारण वैर वाढविले? ती सीता तरी रावणाच्या म्हणण्याप्रमाणे त्याच्याशी लग्नाला तयार झाली का? सीतेला उचलून नेण्यासाठी विराधाने प्रयत्न करून स्वतःच्या जिवावर [illegible]

जय होणार, रामाचे बळ व पराक्रम दोन्ही अद्याप रावणाला कळले नाहीत का?' असे म्हणत राक्षस स्त्रियां त्यांच्या पतीच्या मरणाबद्दल, मुले व भाऊ युद्धात मारले गेल्याबद्दल शोक करीत होत्या.

एका बाजूने राम बणव्यासारखा राक्षस सैन्याचा संहार करीत होता तर दुसऱ्या बाजूने रावण आपल्या बाजूच्या महोदर, महापार्श्व आणि विरूपाक्ष इत्यादींना सांगून बढाया मारीत होता–"खर राक्षसाला, कुंभकर्णाला, प्रहस्ताला, इंद्रजिताला मारणाऱ्या शत्रूचे पहा, मी एका क्षणात निर्मूलन करतो. माझे बाण पृथ्वी व आकाश सर्व सृष्टीला व्यापून टाकतील. वानरांच्या सैन्याचा वध करतो."

रावण ज्या रथात बसून येत होता त्याला आठ घोडे जुंपलेले होते. त्या रथात रावणाचे तेज भयंकर दिसत होते. त्याच्याबरोबर आपापल्या रथात बसून महापार्श्व, महोदर, विरूपाक्ष इत्यादी राक्षसवीर येत होते. शत्रूला येत असलेला पाहून राम त्वेषाने राक्षस सैन्यात शिरला आणि त्यान भयंकर युद्ध सुरू केले.

इकडून रामाने राक्षस सैन्याचा संहार सुरू केलेला पाहून रावणाने तिकडून वानरांचा संहार सुरू केला. ते पाहून

[illegible] सुषेणावर टाकला व स्वतः भयंकर युद्ध करण्याचे ठरवून जयघोष करीत राक्षसांवर तुटून पडला. त्याने अनेक राक्षसांचा वध केला आणि तसाच पुढे निघाला.

ते पाहून विरूपाक्ष जवळच एक हत्ती होता त्याच्यावर चढून वानर सैन्यात शिरला. वानरसैन्याच्या आघाडीलाच त्याला सुग्रीव भेटला. वीरूपाक्षने शरवृष्टी करून सुग्रीवाला बेजार केले. तेव्हां सुग्रीवाने चिडून जाऊन एक झाडच मुळापासून उपटले व त्या झाडाने विरूपाक्ष चढला होता त्या हत्तीला झोडपायला सुरवात केली. त्या हल्लयासमोर उभा न राहू शकल्याने हत्ती मागे सरकत शेवटी जमिनीवर लोळू लागला. विरूपाक्ष हत्तीवरून चटदिशी उतरला व हातात तलवार घेऊन सुग्रीवावर धावला. त्याने सुग्रीवावर जोराने वार केला. त्यानंतर दोघांचे परस्परांशी बराच वेळ द्वंद्वयुद्ध झाले. त्या युद्धात विरूपाक्ष रक्तबंबाळ होऊन नाकातोंडातून रक्त ओकला आणि शेवटी रणांगणावर मरून पडला.

विरूपाक्ष मरण पावल्यावर त्याच्या जागी वानरसैन्याविरुद्ध रावणाने महोदरला नेमले. महोदर वानरांचा वध करीत



झपाट्याने पुढे येऊ लागलेला पाहून सुग्रीवाने एक परीघ सापडले ते उचलून महोदरच्या रथाच्या घोड्यावर फेंकले आणि त्यांचा वध केला. महोदर चिडून जाऊन रथावरून खाली उडी मारून एक गदा घेऊन आला.

परंतु सुग्रीवाने लवकरच एक परीघ फेंकून महोदरच्या हातातील गदा फोडून टाकली. त्यानंतर दोघांचे मुष्टियुद्ध सुरू झाले. परंतु थोड्या वेळाने दोघे दमून गेले. त्यानंतर दोघांनी जे शस्त्र हाती आले ते उचलून परस्परांवर हल्ला सुरू केला. परंतु इतक्यात महोदरच्या हातातली तलवार सुग्रीवाच्या हातातल्या ढालेत अडकली. त्या



संधीचा फायदा घेऊन सुग्रीवाने आपल्या हातातल्या तलवारीने महोदरचे डोके छाटून टाकले.

मध्यंतरी महापार्श्व अंगदाच्या वानर सैन्यावर तुटून पडला आणि वानरांचा संहार करू लागला. ते पाहून अंगद संतापला व त्याने सोन्याची मूठ असलेले एक मोठे पोलादी मुदगल उचलून विरू-पाक्षावर फेकले. ते लागतांच विरूपाक्ष व त्याचा सारथी बेशुद्ध होऊन खाली पडले. त्याच वेळी गवाक्ष व जांबुवंत तेथे आले व त्यांनी मोठमोठे खडक फेकून महापार्श्वाचा रथ तोडून त्याचा चक्काचूर केला आणि त्याच्या घोड्यांना ठार केले.

त्याने गवाक्ष आणि जांबुवंतावर बाण सोडायला सुरवात केली. ते पाहून अंगद स्वत:ला आवरू शकला नाही. उग्र रूप घेऊन त्याने दुरूनच एक परिघ फेंकले आणि जवळ जाऊन महापार्श्वशी थोडा वेळ युद्ध केले आणि शेवटी महापार्श्वच्या छातीत एक मुष्टिप्रहार केला आणि त्याला ठार केले.

त्यानंतर रावणाने स्वत: युद्धाचे नेतृत्व करण्याचे ठरविले. त्याने वानरवीरांशी युद्ध करण्याचे टाळून त्यांचा मूळ पुढारी असा जो राम त्याच्याशीच युद्ध करावयाचे ठरविले. रामावर चालून जातांना त्याने तामसास्त्र वानरसैन्यावर सोडले. ते एक भयंकर व प्रचंड असे अस्त्र होते. ते सोडल्यामुळे वानरांचे फार मोठे नुकसान झाले. ते घाबरून जाऊन वाट फुटेल तिकडे पळू लागले. ते पाहून राम युद्धाला तयार होऊन पुढे आला. त्याच्याबरोबर अर्थातच लक्ष्मणही होताच.

रावणावर प्रथम लक्ष्मणानेच शरवृष्टी केली. परंतु रावणाने त्याचे बाण वाटेतच खंडित केले आणि रामाकडे वळून त्याच्या-वर बाणांचा वर्षाव सुरू केला. रामाने आपल्या बाणांनी ते बाण प्रतिबाण सोडून



तोडून टाकले. दोघां मध्ये घनघोर युद्ध सुरू झाले. दोघे परस्परांच्या अस्त्रप्रहाराचे प्रत्युत्तर देत होते.

रावणाने रामावर असुरास्त्राचा प्रयोग केला. ते एक भयंकर अस्त्र होते. त्याला उत्तर म्हणून रामाने आग्नेयास्त्राचा प्रयोग करून असुरास्त्राचा ध्वंस केला. ते पाहून सुग्रीव वगैरे वानरवीरांनी आनंदाने रामाचा जयघोष केला.

त्यानंतर रावणाने रौद्रास्त्राचा प्रयोग केला. रामाने गांधर्वास्त्राचा प्रयोग करून त्याचा ध्वंस केला. रावणाने सौरास्त्राचा प्रयोग केला. रामाने ते देखील खंडित केले.

नंतर दोघांत सामान्य बाणांचे धनुर्द्वंद्व झाले. रामाने तीक्ष्ण बाणांनी रावणाचे शरीर क्षत विक्षत केले. नंतर रामाने काही वेळ विश्रांती घेतली.

तेव्हां लक्ष्मण पुढे आला. त्याने बाण सोडून रावणाचा झेंडा तोडून खाली पाडला, रावणाच्या सारथ्याचा शिरच्छेद केला आणि रावणाच्या धनुष्याचे तुकडे तुकडे करून टाकले.

लक्ष्मण थांबल्यावर बिभीषण पुढे झाला. त्याने गदाप्रहार करून रावणाचे रथाश्व ठार केले. रावणाने बिभीषणावर चिडून जाऊन रथातून खाली उडी टाकली आणि बिभीषणावर एक अस्त्र सोडले. बिभीषणाने एक बाण सोडून मध्येच त्या अस्त्राचे तीन तुकडे करून टाकले.

आतां मात्र रावण फारच संतापला. त्याने एक भयंकर अस्त्र बिभीषणावर टाकण्यासाठी काढले. त्याच वेळी लक्ष्मण बिभीषणाच्या पुढे जाऊन उभा राहिला. त्याने रावण ते अस्त्र सोडण्याच्या बेतात असतां त्या पूर्वी शरवृष्टी करून रावणाला बाणांनी झांकून टाकले.

रावण लक्ष्मणाला म्हणाला—"तू मध्ये पडलास, तेव्हां बिभीषणाऐवजी हे अस्त्र मी तुझ्यावरच टाकतो. हे अस्त्र तुझे प्राण हृदय करून परतेल." असे म्हणत रावणाने ते अस्त्र लक्ष्मणावर टाकले.

रामाने त्या अस्त्राला शाप दिला—"तू व्यर्थ होशील!" म्हणून ते अस्त्र लक्ष्मणाच्या छातीत अगदी हळू लागले. लक्ष्मण बेशुद्ध होऊन पडला. ते अस्त्र लक्ष्मणाच्या शरीरातून पार जाऊन जमिनीवर पडले. रामाने चिडून जाऊन व दुःखाने ते अस्त्र उचलून मोडून फेंकून दिले. मध्यंतरी रावण थांबल्याशिवाय रामावर शरवृष्टी करीतच होता. परंतु रामाने त्यांच्याकडे दुर्लक्ष करून लक्ष्मणाला उचलले व हनुमंताला आणि सुग्रीवाला म्हणाला—"तुम्ही लक्ष्मणाकडे लक्ष द्या. आतां रावणाचा शेवट केल्याशिवाय भागणार नाही!"

परंतु लक्ष्मणाला शक्ति लागलेली पाहून रामाचा युद्धोत्साह थोडा कमी झाला होता. ते पाहून सुषेण रामाला म्हणाला—"लक्ष्मण फक्त बेशुद्ध झाला आहे. तू फार काळजी करण्याचे कारण नाही."

नंतर तो हनुमानाला म्हणाला—"तू पूर्वी घेऊन आलेला औषधी पर्वत दक्षिण पर्वताच्या शिखरावर आहे. ती औषधी जाऊन घेऊन ये. आपण लक्ष्मणाला वांचविले पाहिजे.

हनुमान औषधीच्या पर्वतावर गेला. परंतु जी बूटी पाहिजे होती ती ओळखतां न आल्यामुळे तो पर्वताचे दक्षिण शिखर



उपटून उचलून घेऊन आला. तो सुषेणाला म्हणाला—"तू म्हणालास ती बूटी मला काय कळणार? म्हणून ते पर्वतशिखरच उचलून घेऊन आलो आहे. तुला पाहिजे ते वनस्पती काढून घे!"

सुषेणाने हनुमंताची पाठ थोपटली व त्याला पाहिजे होती ती औषधी बूटी काढली. नंतर त्याने त्या औषधी पाल्याचा रस काढून लक्ष्मणाच्या नाकात सोडला. लक्ष्मण लगेच झोपेतून जागा झाल्यासारखा शुद्धीवर येऊन उठून बसला.

रामाच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. लक्ष्मणाला पोटाशी आवळून तो म्हणाला—"लक्ष्मणा! तुझा पुनर्जन्म झाला. तू जर

खरोखरच मेला असतास तर मला सीतेची काय गरज होती, आणि या युद्धाची तरी गरज काय होती? माझ्या नशिबानेच तू जिवंत झालास."

"दादा! तू असे दुर्बल मनाने बोलणे बरोबर नाही. रावणाचा वध करून बिभीषणाला लंकेचे राज्य देण्याचे तू वचन दिले होतेस. माझ्यासाठी निराश होण्याचे कारणच नाही. काय वाटेल ते करून तू वचन दिल्याप्रमाणे रावणाचा वध कर आणि बिभीषणाला दिलेल्या वचनाचे पालन कर. सूर्यास्त होण्यापूर्वी रावणाचा वध झाला पाहिजे, अशी माझी इच्छा आहे." लक्ष्मण म्हणाला.

लक्ष्मणाने ते म्हटल्याबरोबर रामाने आपले धनुष्य हाती घेऊन रावणावर बाणांचा वर्षाव सुरू केला.

रामरावणांच्या या युद्धांत एका गोष्टीची उणीव दिसून आली. रावण रथात बसून युद्ध करीत होता आणि राम जमिनीवर उभा राहून युद्ध करीत होता.

[illegible] उपाय [illegible] काढण्यासाठी इंद्राने आपला सारथी मातली याला आपला रथ देऊन भूलोकी पाठविले. त्या रथावर सोन्याचे नक्षीकाम केलेले होते. अनेक घंटा लावलेल्या होत्या. वैडूर्याचा दांडा होता. तो रथ सूर्याच्या रथासारखा चकाकत होता. तो रथ घेऊन मातली रामाजवळ येऊन म्हणाला.

"रामा! तुझ्या विजयाची इच्छा आणि आशीर्वादासह देवेंद्राने हा रथ तुझ्याकडे पाठविला आहे. या रथाबरोबर इंद्राने आपले धनुष्य, कवच, बाण आणि अस्त्रे पाठविली आहेत. पूर्वी इंद्राने याच रथात बसून मी सारथ्य करीत असतां दानवांचा संहार केला होता. आतां तू या रथात बसून रावणाचा वध कर."

मातली म्हणाला ते ऐकून रामाने त्या रथाला प्रदक्षिणा घातली व नमस्कार करून त्यात बसला. त्यानंतर रामरावणांचे पाहणारांना चकित करून सोडणारे भयंकर युद्ध झाले.





# संथाळांचे बंड

सुंदरबन नावाच्या प्रदेशातून गंगानदी अनेक धारा होऊन वहात समुद्राला मिळते. तो प्रदेश म्हणजे एक घनदाट अरण्य आहे. ते जंगल सुप्रसिद्ध अशा बंगाली वाघांचे आणि नद्यांतल्या मगरींचे घर आहे.

हे अरण्यच संथाळ नावाच्या आदिवासी जातीचे निवासस्थान आहे. हे लोक अरण्यातले सर्व धोके व संकटे सहन करून जीवन घालवीत आले होते. संथाळ परगणा या नावे ओळखला जाणाऱ्या प्रदेशापासून बीरभूमपर्यंतच्या प्रदेशात या जातीचे लोक वस्ती करून रहात आहेत.





१८३८ पर्यंत हे संथाळ जातीचे लोक ज्या जमिनीवर लागवड करीत त्या जमिनीचा कर म्हणून दोन हजार रुपये जमिनदारांना देत आले. परंतु इंग्रजांनी ईस्ट इंडिया कंपनी या नावाने हा प्रदेश बळकावल्यानंतर हा कर चव्वेचाळीस हजार करण्यात आला. कर न भरणाऱ्या संथाळांवर जमिनदार आणि पोलीस शिपाई एक होऊन फार अत्याचार करू लागले.



हे अत्याचार असह्य झाले तेव्हां संथाळ बंड करायला सिद्ध झाले. सन् १८५७ साली जे शिपायांचे बंड झाले त्याच्या आधी दोन वर्षे संथाळांनी देवाच्या प्रभुत्वाशिवाय आणखी कोणाचे ही प्रभुत्व आम्ही स्वीकारणार नाही अशी दवंडी पिटवून कंपनीच्या दफ्तरांना आगी लावल्या व ते पूर्ण स्वतंत्र झाल्याचे जाहीर केले.

ईस्टइंडिया कंपनीच्या सैनिकांनी संथाळांच्या वस्त्या ज्या अरण्यात होत्या त्या प्रदेशाला वेढा दिला. परंतु संथाळ रहात त्या वस्त्या शोधून काढणे सोपे नव्हते. शिपाई उंच झाडांवर चढून झाडीत जेथून धूर वर येतांना दिसे त्या जागी संथाळांची वस्ती असावी असे समजून त्या गांवांवर हल्ले चढवीत.





संथाळांना भयभीत करून सोडण्यासाठी कंपनीच्या शिपायांनी एका क्रूर पद्धतीचा अवलंब केला. डाग लावून खुणा केलेल्या हत्तींना दारू पाजून त्या मदोन्मत्त हत्तींच्या झुंडी संथाळांच्या गावावर सोडू लागले. ऐन वेळी पळून जाणे अशक्य झाल्यामुळे संथाळांची माणसं मग हत्तींच्या पायाखाली चिरडून पटापट मरू

बंडखोर संथाळांनी तीर कमान घेऊन शिपायांना नामोहरम केले. शत्रूला पाठ दाखवायची नाही अशी त्यांनी कठिण प्रतिज्ञा केली. कंपनीच्या शिपायांच्या बंदुकीच्या गोळ्यांसमोर संथाळांचे तीर निरुपयोगी ठरले. शेकडो संथाळ प्राणास मुकले.





शेवटी शिपायांनी संथाळांचे मुख्य केंद्र अशा एका गावाला वेढा घातला. तेथल्या एका घराच्या आवाराच्या भिंतीआडून शेकडो बाण एकाएकी शिपायांवर आदळले आणि पुष्कळ शिपाई हताहत झाले.

शेवटी शिपाई त्या घराजवळच्या झाडांवर चढून तेथून बंदुकीने गोळ्या झाडू लागले. त्यांचे उत्तर म्हणून त्या घरातून 'सूं सूं' करीत बाण येऊन शिपायांवर पडू लागले.





शिपायांनी तसाच गोळीबार सुरू ठेवला आणि शेकडो हजारो गोळ्या त्या घरावर झाडल्या. हळूहळू घराच्या बाजूने त्यांच्यावर येणाऱ्या बाणांची संख्या कमी होऊ लागली आणि शेवटी एकाच एका बाणाचा मारा होत असल्याचे दिसून आले. सैनिक झाडावरून उतरून घराला गराडा घालून ओरडू लागले "शरण या!"

आणखी थोड्या वेळाने तो एकुलता एक येणारा बाणसुद्धा यायचा थांबला. घरात पूर्ण स्तब्धता झाली. सैनिक दारे फोडून आत शिरले. तेथे संथाळांच्या प्रेतांचे ढीग पडलेले होते. काही जण फार जखमी होऊन मृत्यूच्या दारात उभे होते. परंतु त्यांच्या मध्ये एक म्हातारा माणूस उभा होता. त्याच्या डाव्या हाताला बंदुकीचे गोळी लागून तो जखमी झाला होता.





सैनिक त्याला कैद करण्यासाठी पुढे येताच त्या वृद्धसैनिकाने तलवार उपसून हात पोचू शकला त्यांची कत्तल केली. सैनिक हा:हाकार करीत बाहेर पळून गेले. त्यांनी दुरून गोळी झाडून त्याला ठार केले.

अशा तऱ्हेने संथाळांचे बंड अत्यंत क्रूरपणाने चिरडून टाकण्यात आले. परंतु हे बंड भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याच्या इतिहासात अत्यंत महत्त्वाची घटना म्हणून नमूद झाले.

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

आपल्या भाकड गाईला आठवड्याच्या बाजारात विकून यायला अवंतीला त्याच्या बायकोने सांगितल्यावर तो गाईला घेऊन आठवड्याच्या बाजारात गेला आणि "ही गाय दूध देत नाही, मारकी आहे, विकायची आहे, घेता का हो!" असा ओरडत हिंडू लागला.

अर्थातच ती गाय विकत घ्यायला कोणी आला नाही.

एक हुशार माणूस ते सर्व पाहून व अवंतीचा भोळसटपणा ओळखून त्याच्या जवळ येऊन म्हणाला—"मी विकून दाखवितो तुमची गाय, पहा!"

तो ओरडू लागला—"ही गाय साधु गाय आहे, मारीत नाही, दहा शेर दूध देते. स्वस्तात पडेल. वेळ टळली तर मिळणार नाही!"

ते ऐकून अवंती म्हणाला—"माझी गाय साधु होऊन, मारकी न राहतां दहा शेर दूध दररोज देते आहे तर मी ती कशाला विकू? ही गाय मलाच द्या!"

★ ★ ★

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

२० सप्टेंबर १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल नोव्हेंबर १९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

जुलै महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "दैव दुर्विलास"

नांव : कु. अनुराधा का. गावकर, २, हरी-निवास, म्हातेवाडी, मुंबई - ६८

# अमरवाणी

न गृहाणि, न वस्त्राणि
न प्राकारा स्तिरस्क्रिया:,
नेदृशा राजसत्कारा
वृत्त मावरणम् स्त्रिया: ॥ १ ॥

[ स्त्रियांना घरे, वस्त्रे, राजवाडे आणि पडदे वगैरेचा थाट ही सर्व त्यांना आवरणे नसतात.]

व्यसनेषु, न कृच्छ्रेषु,
न युद्धेषु, स्वयंवरे
न क्रतौ, न विवाहे च,
दर्शनम् दुष्यति स्त्रिया: ॥ २ ॥

[ संकटसमयी, दुःखाच्या वेळी, युद्धकाळात, स्वयंवरात, यज्ञसमयी व विवाहाच्या वेळी स्त्रियांना परपुरुषांनी पाहिले तर त्यात दोष नाही.]

सैषा युद्धगता चैव,
कृच्छ्रे च महतिस्थिता,
दर्शनेस्या न दोष स्स्यात्
मत्समीपे विशेषत: ॥ ३ ॥

[ ही (सीता) युद्धभूमीवर आहे म्हणून, मोठ्या कष्टात आहे म्हणून, शिवाय विशेष करून माझ्याजवळ (रामाजवळ) आहे म्हणून सीतेला कोणी पाहण्यात दोष नाही.] —(रामायण)

स्त्रीवर्ग पडद्यात



# कावळा आणि घुबड

[ ५० ]

**त्यां**च्या निवास स्थानाविषयी तीतर पक्षी व ससा दोघांच बराच वेळ वादविवाद झाला शेवटी तीतर पक्षी कंटाळून जाऊन म्हणाला—"तुझा धर्म, न्याय वगैरे वर इतका विश्वास असेल तर त्यांची चांगली माहिती व ज्ञान असलेल्या शास्त्रज्ञा-कडे जाऊन आपल्या भांडणाचा निवाडा करून घेऊ या, काय ?"

"सर्व माहीत असलेल्या शास्त्रज्ञाचा निवाडा मानणारा महापापी असतो. मीसुद्धा त्यांचा निवाडा मानायला तयार आहे." ससा म्हणाला.

लगेच तीतरपक्षी आणि ससा आपले भांडण बंद करून न्यायनिवाडा करणाऱ्याला भेटायला निघाले. काय होते पहावे या कुतूहलाने मी त्यांच्या पाठोपाठ निघालो. वाटेत ससा तीतर पक्ष्याला म्हणाला—

"मित्रा! आपण न्याय मागायला कोणाकडे जात आहो, त्याचं नाव नाही सांगितलंस तू!"

तो प्रश्न ऐकून तीतर पक्ष्याला फार आनंद झाला व तो म्हणाला—"नदीच्या थोड्या वरच्या बाजूला वाळूचे ढिगारे आणि झुडपे आहेत त्यात राहणारे दधिकर्ण नावाचे मार्जारमुनी आहेत ते तुला माहीत नाहीत का? ते एका काळी अरण्यात त्यांच्या जातीच्या रानटी मांजरासारखे घोर कृत्यें करूनच आपला उदरनिर्वाह चालवीत असत. परंतु त्यानंतर त्यांच्या मनात बदल झाला आणि नदीतीरावर राहून ईशचिंतनांत आपले आयुष्य घालवीत आहेत. ते थोर धर्मशास्त्रज्ञ आहेत."

दोघे लवकरच त्यांच्या रम्य स्थानावर येऊन पोचले. रानटी मांजर खूप माजलेले



गलेलठ्ठ होते. त्याचे सुळे आणि घारे मोठाले डोळे पाहून ससा आतल्या आत खूप भ्याला व तीतर पक्ष्याला म्हणाला—''या नीच दुष्टाला सल्ला विचारण्यात काय अर्थ आहे रे? याच्यासारखे कपटी साधू प्रत्येक नदीकाठच्या तीर्थक्षेत्रात आढळतात.''

ते ऐकून दधिकर्ण, जरी स्वतःचे पोट भरण्यासाठीच संन्याशाचे रूप धारण करून बसला होता, तरी आपल्याकडे फिर्याद घेऊन आलल्या दोघांचा स्वतःवर विश्वास उत्पन्न करून घेण्यासाठी हात पुढे करून बसला. योग्यासारखा त्याने डोळे बंद केले सूर्याकडे तोंड करून आणि जमिनीवर गुडघे टेकून व हात वर आकाशाकडे

... म्हणू लागला—''सत्याचे शोधक भक्त हो, ऐका! आपलं हे जीवित अगदी निरर्थक क्षणभंगुर आहे. प्रियकर मित्र-बांधवांच्या संगतीचा लाभ झाल्याने जे सुख मिळते ते स्वप्नात प्राप्त झालेल्या सुखासारखे क्षणभरात अदृश्य होणारे असत्य होय. पुत्रकलत्र, संसार वगैरे सर्व गारुड्याच्या मायेसारखे आहेत. म्हणून धर्माशिवाय इतर दुसरा मार्ग नाही. पुण्य-कार्य केल्याशिवाय जीवित घालविणारा श्वासोच्छ्वास करीत असला तरी तो लोहाराच्या भात्यासारखा आहे. त्यात प्राण किंवा आत्मा नसतो. नीती शिवायचे ज्ञान हे कुत्र्याच्या शेपटीसारखे निरुपयोगी असते. ते माशा उडवायलासुद्धा उपयोगी पडत नाही. झाडाचे सौंदर्य त्याच्या फुलात व फळात असते. दह्यातला मुख्यांश लोणी व तूप असतो. तसेच माणसातले तत्व म्हणजे धर्म होय! मी तुम्हांला धर्माचे सार नेच सांगितलं. हे सर्व कशासाठी? परोपकाराने पुण्य लाभते. परपीडनाने पाप लागते! ही एक गोष्ट तुम्ही लक्षात ठेवून त्याप्रमाणे वागलात की झाले!''

ही 'उदात्त मुक्ताफळे' ऐकून ससा तीतर पक्ष्याला म्हणाला—''तू म्हणालास ते बरो-बर आहे. मांजर खरोखरच संन्यासी आहे. थोर महापुरुष आहे.. त्याचे रूप वर वरून पाहून माझा गैरसमज झाला होता. याच्या-वर माझा विश्वास बसला. आपलं भांडण मिटवायला याला विनंती करू या.''

''बरे तर! हे जन्मापासून रानटी मांजर असल्या कारणाने आपल्या दोघांचे हे हाड-वैरी आहे. म्हणून आपण थोड्या अंतरावर राहूनच याच्याशी बोलणे बरे होईल.'' तीतर पक्षी म्हणाला.

नंतर दोघांनी थोडे दुरूनच असे बोला-यला सुरवात केली.

''हे महात्मन्, ज्ञानी पुरुषा! आमचं दोघांचं एका कारणावरून भांडण झालं आहे. आपणांस धर्मशास्त्रात पांडित्य असल्या कारणाने आपण आमचे भांडण धर्मशास्त्रा-प्रमाणे सोडविण्याची कृपा करावी. आम्हां दोघांपैकी जो कोणी अपराधी असेल त्याला आपण भक्षण करण्यास हरकत नाही.''

''मित्र हो! माझ्याजवळ असे काही बोलू नका. प्राणहत्या करून त्याला खाल्ल्याचा परिणाम निश्चित नरकवास असल्या कारणाने मी ती संवय फार पूर्वीच सोडली आहे. ''अहिंसा परमोधर्मः'' असे धर्मशास्त्रात सांगितले असल्यामुळे कीड मुंगी, ढेकूण व डांस या सारख्या क्षुद्र प्राण्यांना सुद्धा ठार करतां कामा नये. इतर प्राण्यांना ठार करून त्यांच्या मांसावर जगणाऱ्या क्रूर जनावरांनासुद्धा ठार कर-णाऱ्यासही नरक यातना भोगावी लागते, म्हणे. अशा स्थितीत निरुपद्रवी प्राण्यांस ठार करून खाणाऱ्यास नरकवास कसा सुटेल? यज्ञात पशुबली देणारेसुद्धा वेदांचा खरा अर्थ न समजणारे मूर्खच म्हटले पाहिजेत. झाडे कापून जीवहिंसा करून माणसाला स्वर्गप्राप्ती होत असेल तर कोणती कृत्ये करणारांस नरकवास भोगावा लागेल? ते सर्व सोडा. मी तुमच्यापैकी एकाला खाईन ही गोष्ट निरर्थक आहे. ते मी कधीही करणार नाही. मी आपला धर्म पाळीन. माझे उतारवय झालं आहे. मला थोडे कमी ऐकू येते. म्हणून तुम्ही थोडे जवळ येऊन तुमची फिर्याद काय ती सांगा.''



## १८८. हाच तर नसेल तो गरुड ?

पृथ्वीच्या पाठीवर राक्षसी आकाराच्या पाली रांगत फिरत असतां आर्कियोप्टेरिक्स नावाचा उडणारा एक प्राणी होता. त्याच्या पंखांत व शेपटीत पिसे असत. त्याच्या तोंडात दांत सुद्धा असत. बेव्हेरियात खडकांच्या चिरांमध्ये खडकावर उमटलेल्या त्याच्या देहाचा ठसा चित्रात दिसेल.





# माया सरोवर

[ २० ]

[मायासरोवरापर्यंत पोचायला सर्पनखाच्या मदतीची गरज आहे असे जयशीलला वाटले. सर्पनखाने प्रथम त्याचा धाकटा भाऊ कोठे आहे त्याचा शोध लावण्याचा विचार केला. वनमाणसाचा मालक कृपाणजित दृष्टीस पडतांच तो जलाश्वावर बसून त्याचा पाठलाग करीत निघाला. पळणाऱ्या कृपाणजिताला प्राणिभक्षी वृक्षाच्या फांदीने धरले. पुढे—]

प्राणिभक्षी वृक्षाच्या एका फांदीने कृपाण-जिताचे डोके धरून थोडे वर उचलल्याबरोबर त्या फांदी जवळच्या दोन डहाळ्यांपैकी एकीने त्याचे खांदे आणि एकीने हात घट्ट आवळून धरले आणि लगेच वर ओढले. कृपाणजित स्वतःची सुटका करून घेण्यासाठी हातपाय हालवून तडफडत ओरडू लागला—"मला वांचवा, मला वांचवा!"

कृपाणजिताचा आवाज ऐकला असूनही गिड्ड्यांपैकी कोणी त्याला वांचवायला पुढे गेला नाही. कोणत्याही परिस्थितीत त्या वृक्षाजवळ जायला त्यांना दहशतच बसली होती. शिवाय या कृपाणजितामुळे त्यांना फार त्रास सोसावा लागला होता. गिड्ड्यांपैकी काही जणांनी जलाश्वाला मात्र कोठे तो पळून जाऊ नये यासाठी चांगले धरून ठेवले होते.



काही अंतरावर एक खडकाळ टकाड्यावर उभे राहून जयशील व सिद्धसाधक ते पहात होते. ते धावले, परंतु त्या प्राणिभक्षी वृक्षाजवळ पोचेपर्यंत सर्पनख जलाश्वावरून तेथेपर्यंत पोचला होता. तो ओरडला– "माझ्या भावाविषयी माहिती असलेला हा एकटाच आहे. तो मरतो आहे त्याला वाचवा!" असे म्हणत त्याने अंगातले सर्व बळ एकवटून तलवारीने त्या वृक्षाची ती फांदी कापण्यासाठी वार केला.

त्या धक्कयाने ते झाड मुळापासून शेंड्यापर्यंत हादरले व सोसाट्याचा वारा लागल्याने जसे वाकते तसे खूप वांकले. त्या पाठोपाठ कण्हल्यासारखाही एक आवाज ऐकू आला. त्यानंतर [illegible] एवढी जाड व खूप लांब एक फांदी खाली वांकली आणि सर्पनखाच्या गळ्याला तिचा सापासारखा विळखा बसला. सर्पनखाने किंकाळी फोडली "माया सरोवरेश्वरा वांचव!" त्याच्या मांडीची पकड सुटल्यासारखी होताच जलाश्व निसटून पुढे पळून गेला.

जयशील व साधक एक उडी मारून तेथेपर्यंत आले. सिद्धसाधक सर्पनखाचे दोन्ही पाय धरून त्याला वांचविण्यासाठी ओढू लागला आणि जयशीलने सर्पनखाच्या गळ्याला विळखा घालणारी फांदी तलवारीचा एकच वार करून कापून टाकली. सर्पनख उलटा तोंडघशी खाली पडणार होता. परंतु सिद्धसाधकाने त्याचे पाय पकडून वरच्यावर त्याला धरले आणि जमिनीवर डोके आपटू दिले नाही. साधक ओरडला–"अरे पाण्यातल्या मूर्ख पाखरा! तुझ्या माथेफिरूपणामुळे माया सरोवराची वाट दाखविणारा वाटाड्या आमच्या हांतचा आज जाणार होता." असे म्हणत त्याला पायावर उभे केले.

सर्पनखाने दोन्ही हातांनी मानेला कळ वाटली ती चोळून कमी करण्याचा प्रयत्न करीत म्हटले–"ही सर्व त्या माया सरोवरेश्वराचीच तर कृपा आहे. तो आपल्या [illegible] हाकेला धावून येतो."

ते ऐकून सिद्धसाधक चिडून जाऊन म्हणाला–"अरे सर्पनखा! तुला आतां वांचविले ते तुझ्या मालकाने का रे?"

"तो स्वतः इकडे आला नसेल; परंतु त्यानेच तुम्हांला माझ्या रक्षणासाठी धावायला प्रेरणा दिली!" असे म्हणत सर्पनख त्या क्रूर झाडाकडे पाहून आणि झाडाला लोंबकळत असलेल्या कृपाणजिताला पाहून म्हणाला–"सर्पस्वर कोठे आहे याची माहिती असलेला तो एकटा मृत्युमुखात आहे. त्याला वांचविले पाहिजे!" आणि त्या क्रूर वृक्षाकडे घाईघाईने निघाला.

जयशीलने त्याचे दोन्ही दंड धरून त्याला मागे खेचले व तेथे आलेल्या गिड्यांना म्हणाला–"तुमचा सेनापती कोठे आहे रे? जीव जाताजाता वांचल्यावर याला मतिभ्रम झाल्यासारखा दिसतो आहे. याला नदीत चारपाच वेळ बुडवून याचे डोके ठिकाणावर आणा पाहू!"

सेनापती व गिड्यांनी येऊन सर्पनखाला धरल्याबरोबर तो मोठ्याने ओरडून म्हणाला–"मला मतिभ्रम झालेला नाही. सर्व कळते आहे! तुम्ही गिड्डे, ते दोघे जयशील व कापालिक आणि सर्वांच्या समोर आहे ती मगरी असलेली नदी!"



"अरे पाण्यातल्या माणसा! आतां तोंड बंद कर. तुला त्या मगरींच्या समोरच आम्ही टाकणार आहो." म्हणत गिड्यांनी सर्पनखाला धरले व त्याला नदीच्या पाण्यात ओढून घेऊन जाऊ लागले.

त्याच वेळी तेथे गिड्यांची राणी रथात बसून आली. गडेकोंड व त्याचे अनुयायी हात बांधून माना खाली करून रथाबरोबर होते. राणीला पाहतांच जयशील म्हणाला– "तुमच्या दोन जातींच्या आपसातील भांडणाचा फायदा स्वतःच्या हितासाठी करून घेणारा तो दुष्ट कृपाणजित या क्रूर वृक्षाच्या घशांत गेला. आतां तुम्ही सुखाने रहा. आतां आम्ही आपल्या वाटेने जातो.



जाण्यापूर्वी या क्रूरवृक्षाची होळी करावी म्हणतो आहे. हा जिवंत राहिला तर अनेक निरुपद्रवीप्राण्यांचे भक्षण करीत राहणार."

"तसंच करा हो! तुम्ही केलेल्या मदती-बद्दल व उपकारांबद्दल आम्ही फार फार आभारी आहो. वनमाणसाचा तो मालक गेला खरा, परंतु ते भयंकर वनमाणूस याच अरण्यात कोठेतरी हिंडत फिरत असणार. रात्रंदिवस आम्हांला डोळ्यात तेल घालून रहावे लागणार." राणी म्हणाली.

जयशीलला त्या राणीची कीव आली. तो म्हणाला—"जलाश्वावर बसून आलेला सर्पनख नावाचा आम्हांला एक जण [illegible] आहे. त्याच्या धाकट्या भावाला ते वनमाणूस उचलून घेऊन गेले आहेत. सर्पनखाच्या मदतीची आम्हांला गरज आहे म्हणून त्याच्या शोधार्थ हिंडत असतां ते वनमाणूस आम्हांला कोठे आढळले तर त्याला आम्ही नक्कीच ठार करू."

"त्याला ठार करण्याचा प्रश्नच नाही. त्याला मी पाळणार आहे, चांगलं शिकवून मी त्याला आपलं वाहन करून घेणार आहे. बरं तर, विस्तव कोठे आहे, आणा पाहू या झाडाला वाटेला लावून याला भस्म केल्याशिवाय आम्हांला चैन पडणार नाही." असे म्हणत त्याने कोठे विस्तव आहे का दृष्टी फिरवून पाहिले.

गिड्डयांपैकी चारपांच जण जळत्या मशाली घेऊन पुढे आले. सिद्धसाधकाने त्यांच्यापैकी एकाच्या हातातून मशाल घेत म्हटले—"प्राण्यांचं भक्षण करणारा हा वृक्ष आहे, तेव्हां याच्या अंगात मांसाचा व चरबीचा अंश निःसंशय असला पाहिजे. दूर उभे राहून फेकूं या चला, आपापल्या मशाली, आणि पाहू या काय होते ते." असे सांगून तो मशाल फेकायला तयार झाला. इतक्यात पाठीमागून आवाज ऐकू आला—"थांब, पापीकुठला! या चिरंजीवी मृत्युवृक्षाला जाळून भस्म करणार आहेस का?"

सिद्धसाधकाने आणि [illegible] ओरड-णारा कोण हे मागे वळून पाहिले. एक सामान्य गिड्डयांपैकीच तो होता तरी तो त्यांच्याहून तीनचार इंच जास्त उंच असेल कदाचित. गळयात पोत आणि मण्यांच्या माळा होत्या व खांद्यावर परशू होता. केस पिंजारलेले होते आणि धावत उडया मारीत येऊन जयशील व सिद्धसाधकाच्या समोर उभा राहिला.

सिद्धसाधकाने त्याच्या अंगाला आपला त्रिशूल हळूच लावीत विचारले—"कोण रे तू? महाकाळाच्या भक्ताला मला, पापी म्हणण्याची छाती तुला कशी काय झाली रे?"

तो अपरिचित गिड्डा निर्भयपणे सिद्ध-साधकाच्या डोळयाला डोळे भिडवून हात-वारे करीत म्हणाला—"मी या चिरंजीवी मृत्युवृक्षाचा पुजारी आहे. थोडया वेळा-पूर्वी तुम्ही तलवारीने झाडावर वार केलात तेव्हां ते मोठयाने कण्हले ते तुम्ही ऐकलेत ना? तुम्ही बहीरे तर नाही?"

ते ऐकल्याबरोबर जयशील त्या गिड्डया पुजाऱ्याकडे संशयाच्या मुद्रेने पहात म्हणाला—"झाडाच्या आडून तूच कण्हला होतास नाही का रे? खरे बोल!" आणि त्याची मान आपल्या बळकट हाताने पकडली.



तो गिड्डा पुजारी थोडादेखील न भितां म्हणाला—"होय, तसा कण्हलो तो मीच! परंतु तसं कण्हायला आज्ञा केली ती त्या वृक्षावर अधिकार असलेल्या देवीनेच. मी तिचा पुजारी, भक्त आहे."

आतां याला शिक्षा द्यायची की सोडायचे या अर्थी जयशीलने सिद्धसाधकाकडे पाहिले. साधकाने त्या गिड्डयाच्या खांद्यावरचा परशु घेऊन त्याला चांगली धार आहे की नाही हे पाहून म्हटले—"अरे, मूर्ख दुर्दैवी गिड्डया! आज या चिरंजीवी मृत्युवृक्षाचे आयुष्य संपले समज! त्याचा पुजारी तू, तुझा पोट भरायचा धंदासुद्धा आजपासून संपला, समज! हातात चांगली धार अस-



लेली कुन्हाड असतांना जंगलांत लाकडे फोडून स्वतःचे पोट भरीत जा. निरुपद्रवी प्राण्यांना खाणाऱ्या क्रूरवृक्षाचा आज कोळसा होणार आहे!" असे म्हणत सिद्धसाधक पेटलेली मशाल फेकण्याच्या बेतात असतां तो गिड्डापुजारी उडी मारून साधकाचा हात धरायला गेला.

"मूर्खा! महाकालाच्या या भक्ताच्या अंगाला हात लावायची तुझी हिंमत?" असे म्हणत सिद्धसाधकाने त्या गिड्ड्याला बाजूला ढकलले.

तो गिड्डा दूर जाऊन पडला तरी उठून उभा राहून म्हणाला—"मालक! हा मृत्यु-वृक्ष फक्त दुष्ट लबाडांचेच भक्षण करतो. [illegible] साधूच्या अंगाला स्पर्शही करीत नाही."

तोपर्यंत ते सर्व स्वस्थपणे ऐकत पहात उभा असलेला जयशील त्या गिड्ड्याला उचलून मृत्युवृक्षाकडे फेकायला तयार झाला. पुजारी मोठ्याने ओरडून म्हणाला—"मालक! मला सोडा! त्या भयंकर मृत्यु-मुखात फेकू नका." म्हणतांना थरथर कापू लागला.

जयशील त्याला जमिनीवर ठेवीत सिद्धसाधकाला म्हणाला—"साधका! आतां आपण येथे वेळ घालवण्यात अर्थ नाही. त्या मृत्युवृक्षाला आग लावून मोकळा हो!"

सिद्धसाधकाने गिड्ड्यांच्या हातातल्या मशाली एकामागून एक घेऊन झाडाच्या बुंधाजवळ व फांद्यांवर फेकल्या. एका क्षणात तेलात बुडविलेल्या वाळक्या लाकडासारखे ते झाड जळू लागले. धुराचे लोट आका-शात उडत होते.

जयशील झाडाला लोंबकळत असलेल्या कृपाणजिताच्या प्रेताकडे पहात सुस्कारा सोडीत म्हणाला—"हा अमरावती नग-राच्या अधिपतीच्या घोडदळाचा नायक होता. एका जुगारीच्या अड्ड्यावर याचे व माझे भांडण झाले म्हणून मला हा अरण्यवास भोगावा लागला. दुष्टाला [illegible] रीच्या अड्ड्यात माझा देवशर्मा नावाचा मित्र रहात असे. तो देशभर भटकत फिरतो आहे. कोठे आहे देवालाच माहीत!"

"आपण मायासरोवरापर्यंत जाऊन हिरण्यपूरच्या महाराजांच्या मुलांना सोड-विण्याच्या आत तो आपल्याला कोठे भेट-णार नाही का? वाट चुकून मोठ्या शहरात भटकणाऱ्याला शोधून काढण्यापेक्षां जंगलांत हुडकून काढणे सोपे आहे!" सिद्धसाधक म्हणाला.

"होय साधका! तू म्हणतोस ते ऐकून मला ते खरे वाटू लागले आहे. चल तर निघू या. सर्पनख कोठे गेला?" असे म्हणत जयशीलने एकदां चारी बाजूला नजर फिरवून पाहिले.

सर्पनख त्या वेळी जलाश्वावर चढून दूर दिसणाऱ्या डोंगराकडे पहात काही तरी विचारात गढून गेल्यासारखा दिसला. जयशील तेथे असलेल्या दुसऱ्या जलाश्वा-कडे बोट दाखवून म्हणाला—"साधका, या त्या घोड्याला येथे फुकट कां सोडा? आपल्यापैकी एक जण याचा उपयोग करू शकेल, नाही का?"

"जयशीला तो जलाश्व तुझाच आहे! मी पायी तुझ्या पाठीमागून येऊ शकेन. केव्हां तरी ते वनमाणूस सांपडेलच, त्याला



क्षणार्धात वश करून घेऊन त्यालाच मी आपले वाहन करून घेईन." साधक म्हणाला.

"साधका, तू म्हणतो आहेस तसं करून नक्कीच दाखवू शकशील, माझी खात्री आहे. बरं तर निघू या का?" असे म्हणत जयशील तेथे राणी, गडेकोंड यांच्याबरोबर जे गिड्डे होते त्या सर्वांना संबोधन करून म्हणाला—"तुमचा मोठा शत्रू कृपाणजित तो पहा, मृत्युवृक्षाबरोबर जळत आहे. आतां तुम्हांला कसलीच भीती नाही. आम्ही आपल्या वाटेने जातो."

जयशील पुढे जलाश्वावर आणि थोडा मागे सिद्धसाधक निघाल्यावर गिड्या-

जातीचे सर्व लोक सर्व अरण्य दुमदुमून सोडण्या इतक्या मोठ्याने दोघांचा जयजयकार करू लागले. ते ऐकून सर्पनखाने दचकून वळून त्या बाजूला पाहिले व जयशील आणि सिद्धसाधकाला हाक मारून म्हणाला– "जयशीला, सिद्धसाधका! जरा थांबा! माझ्या धाकट्या भावाचा शोध लावायचा आहे ना! मी येतो." असे म्हणत त्याने आपला घोडा ते दोघे होते त्या दिशेला जोराने सोडला.

जयशील त्याच्याकडे एकदां लक्षपूर्वक पाहून म्हणाला–"तुला नदीतल्या आंघोळीचा फायदा झाल्यासारखा दिसतो आहे. आतां तू आपल्या वाटेने जा. आम्ही दोघे मायासरोवर कोठे आहे शोधत जाऊन त्याचा शोध लागल्यावर त्याच्या मालकाची खांडखांड करून पाण्यातल्या पक्ष्यांना आणि प्राण्यांना ती खायला घालू."

सर्पनखला ते बोलणे आवडले नसल्याचे त्याच्या तोंडावर स्पष्ट दिसत होते. परंतु तो बोलला मात्र मुळीच नाही. नंतर [illegible] कांही बोलल्याशिवाय जंगलात चालत राहिले. नंतर ते मागे एका धबधब्यातून खाली पडले होते त्या जागी येऊन पोचले.

जयशील सर्पनखाला त्या प्रदेशात त्यांना धबधब्यातून खाली पडल्यावर ज्या ज्या गोष्टी पहायला अनुभवायला मिळाल्या त्या सांगायच्या विचारातच होता, तेवढ्यात सर्पनखाने हात उचलून कांही अंतरावर दिसणाऱ्या गुहांपैकी एका गुहेकडे बोट दाखवून विचारले–"त्या गुहेतून बाहेर डोकावून पहात आहे ते भयंकर जनावर वनमाणूसच आहे, नाही का?"

"होय, वनमाणूसच आहे!" असे जयशील आश्चर्य करीत म्हणतो आहे तेवढ्यात वनमाणूस मोठ्याने ओरडले व गुहेतून त्याने बाहेर उडी मारली. त्याच्या पाठोपाठ जोराने 'घीं'कार करीत मकरकेतूचे वाहन जलग्रह तो मोठा हत्ती दिसला. त्याने गुहेबाहेरच्या वनमाणसाला सोंडेने घट्ट धरून ठेवले होते. (क्रमशः)





# [illegible]

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू एवढे कष्ट करीत आहेस ते तुला अपूर्व शक्तीचा लाभ व्हावा यासाठी असतील तर मागे विश्वलोकाने ती शक्ती एका अपात्राला दिली तशी देऊन टाकू नकोस. त्याची गोष्ट मी तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला :

फार पूर्वी विश्वलोक नावाचा एक ब्राह्मण होता. त्याचा मंत्रविद्येवर अपार विश्वास होता. मंत्रविद्या शिकून घेण्यासाठी अनेक सिद्धपुरुषांचा शोध काढीत तो खूप हिंडला. शेवटी विंध्यपर्वतात त्याला एक सिद्धपुरुष भेटला. विश्वलोकाने त्याची

## वेताळाच्या गोष्टी



खूप सेवा केली आणि गुरु कृपेने त्याला एकाच वेळी दोन रूपे धारण करण्याची विद्या प्राप्त झाली.

"ही विद्या वाटेल त्याला शिकवायची नाही. जो कोणी प्रजेच्या हितासाठी झटत असेल व त्या विद्येचा उपयोग करणार असेल अशा व्यक्तीलाच ही विद्या शिकव." असे सांगून गुरूने विश्वश्लोकाकडून तशी शपथ घेवविली.

विश्वश्लोकाने आपल्या गुरूचा निरोप घेतला आणि अनेक देश फिरत आणि मंत्रविद्येचे प्रदर्शन करीत तो कलिंग देशात आला. तेथला राजा दानशूर होता. तो विश्वश्लोकाला आपल्या एकांत जागी बोला- ... म्हणाला—" हे महात्मन्! आपली दोन देह धारण करण्याची मंत्र-शक्ती अपूर्व आहे. मी प्रजेचे पालन स्वत:च्या मुलांसारखं करतो. आपल्या सारखीच मंत्रविद्या शिकवून दिलीत तर प्रजेची सेवा मी जास्त चांगली करू शकेन."

"ते ऐकून विश्वश्लोक चकित झाला. आजपर्यंत राजे लोक त्याची अद्‌भुत मंत्र-विद्या पाहून त्याची प्रशंसा करीत व त्याचा सत्कार करीत. परंतु कोणी ती विद्या शिकवून देण्याचा आग्रह दाखविला नव्हता. थोडा विचार करून म्हणाला—" मी आपल्याला ही विद्या शिकवून द्यायचे ठरविलेच तर सहा महिन्यांनी येऊन आपणास परत भेटेन." असे सांगून त्याने राजाचा निरोप घेतला.

त्यानंतर आणखी एका राज्यात तेथल्या राजकन्येने विश्वलोकाच्या मंत्रविद्येचे प्रयोग पाहून त्याला विचारले—" महात्मन् आपण मला माझ्या वडिलांसारखे आहां. एक प्रश्न मी आपणांसमोर ठेवीत आहे. माझे रूप पाहून आमच्या आजूबाजूच्या देशातले दोन युवराज मला मागणी घालीत आहेत. कोणा एकाशी लग्न करून दिले तर दुसऱ्याला राग येईल व तो आमच्या राज्यावर ससैन्य चालून येईल. दोघेही आमच्याहून बलिष्ठ आहेत. दोन शरीरे धारण करण्याची विद्या आपण मला शिकवून दिलीत तर माझ्या समोरचा प्रश्न सुटेल. प्रजेवरचे संकटही टळेल."

"तुला याचे उत्तर मी सहा महिन्यांनी देतो." असे सांगून विश्वश्लोकाने तेथून पाय काढला.

काश्मीरमध्ये त्याला एक राजवैद्य भेटला. म्हणाला—" राजाचे कुटुंब फार मोठे आहे. सर्वांची चिकित्सा मला एकट्यानेच करावी लागते. आपण अनुग्रह करून दोन शरीरे धारण करण्याची विद्या शिकवून दिलीत तर मी आपला आभारी होईन."

विश्वश्लोकाने पूर्वीच्यासारखा सहा महिन्यांचा अवधी मागून घेतला.

त्यानंतर तो चेर राज्यात येऊन पोचला. तेथील प्रजा सुखी नव्हती. प्रजेला गंगोत्री नावाच्या एका अट्टलचोरचा फार त्रास होत होता. राजाने त्याच्या अत्याचारांना आळा घालण्यासाठी आकाशपाताळ एक केले, परंतु त्याचे सर्व प्रयत्न फुकट गेले.

चेर देशाच्या राजाने विश्वश्लोकाचे प्रयोग पाहील्यानंतर त्याच्या प्रजेसाठी त्याच्या जाहीर प्रयोगांची व्यवस्था केली. एकच माणूस एकाच वेळी दोन रूपात हिंडता फिरतांना पाहून प्रजा आश्चर्य चकित झाली.

त्या दिवशी रात्री विश्वश्लोक उतरला होता त्या जागी तो अट्टलचोर गंगोत्री



येऊन म्हणाला—" मी कोण तुला माहीत आहे का? मी तो गंगोत्री. तुझ्या मंत्र-विद्येचे प्रयोग मी पाहिले आहेत. एका माणसाची दोन शरीरे होण्याची विद्या मला शिकव, नाही तर मी तुला जागच्या जागी ठार करतो."

विश्वश्लोक स्मित करून म्हणाला— "ती एक मंत्रविद्या शिकवली की पुरे ना की दुसरे मंत्रदेखील पाहिजे आहेत?"

"इतर मंत्राची मला काय गरज? तेवढी एकच एक विद्या मला पुरे!" गंगात्री म्हणाला.

"बरं तर शिकवितो. परंतु तू ही विद्या शिकवून घेणार असशील तर तिचा



उपयोग कशासाठी करणार हे सांगितले पाहिजेस." विश्वश्लोक म्हणाला.

"लहान लहान भुरट्या चोऱ्या करून कंटाळा आला आहे. दरोडा घालायचा तर राजाच्या खजिन्यावरच. परंतु ते काम माझ्या सारख्या एकट्याच्याने होणारे नाही. आणखी एक जण बरोबर हवा. खजिना लुटल्यावर आयुष्यभर मी सुखाने राहू शकेन." गंगोत्री म्हणाला.

"परंतु तू चोरी करून आणशील त्यातला चतुर्थांश मला दिला पाहिजेस. आणखी एक गोष्ट. तुझ्या दोन्ही देहांपैकी कोणत्याही शरीराला काही इजा झाली तर ती दुसऱ्या शरीरालासुद्धा होईल. माझ्या परवानगीशिवाय तू ही मंत्रविद्या दुसऱ्या कोणाला शिकवितां कामा नये. हा मंत्र खोटे बोलणाऱ्याच्या उपयोगी पडत नाही. तर हे सर्व तुला मान्य आहे ना?" विश्वश्लोकाने चोराला विचारले.

"उद्यां रात्री मला मंत्राचा उपयोग झाला की पुरे. त्यानंतर मला त्याची गरज नाही." चोर म्हणाला.

विश्वश्लोकाने चोराला शास्त्रोक्त पद्धतीने तो मंत्र शिकवून पाठवून दिले. नंतर तो राजाकडे जाऊन गंगोत्री रात्री खजिना लुटायला येणार असल्याचे सांगून तो आपल्या वाटेने निघून गेला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा, विश्वश्लोकाने कलिंग देशाच्या राजाला, राजवैद्याला आणि राजकन्येला मंत्र देण्याचे नाकारून एका दरोडेखोराला तो कसा काय दिला? आपल्या प्राणावर बेतेल अशी त्यालाभीती वाटली का? की खजिना लुटल्यावर वांटा मिळेल याचा त्याला लोभ झाला? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य उत्तरादाखल म्हणाला– "विश्वश्लोकाला धनाचा लोभ असता तर त्याला राजाला, राजवैद्याला आणि राजकन्येला मंत्रोपदेश करून पुष्कळ धनार्जन करतां आले असते. नंतर गंगोत्रीने दरोडा घालून मिळविलेल्या चोरीच्या मालातला आपला वांटा घेण्यासाठी तो थांबला नाही आणि त्याही पुढे जाऊन त्याने चोराचे गुपित राजाला आगाऊ जाऊन सांगितले. त्याला जीवाला धोका वाटण्याचे कारण नाही. कारण त्याला स्वतःच्या विद्येचा उपयोग करून स्वतःचा जीव वांचविता आला असता. लोकोपकार होणार असेल तर ती विद्या इतर कोणालाही देण्यास हरकत नाही असे सिद्धाने त्याच्याकडून वचन घेतले होते. एका चोराला ती विद्या शिकवून देण्यात लोकोपकार होता. कारण त्याने खोटे बोलल्यास त्या मंत्राचा उपयोग होणार नाही अशी त्याने अट घातली होती. चोर चोरी करायला गेला, त्याच्या आधीच विश्वश्लोकाने राजाला सावध करून ठेवले होते. म्हणून चोराच्या जिवाला धोका होता. कारण कोणत्याही शरिराला अपाय झाला तर त्याच्या परिणाम दुसऱ्या शरिरावर होणार हे गंगोत्रीला कळले होते. म्हणून त्याच्या हातून चोरी होणेच शक्य नव्हते. अशातऱ्हेने शेवटी प्रजेचे हितच होणार होते. हा लोकोपकार कलिंग देशाच्या राजाला, राजवैद्याला किंवा राजकन्येला मंत्रोपदेश केल्याने होण्याची शक्यता नव्हती. आणखी एक लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. विश्वश्लोकाने गंगोत्रीला विचारले होते की, दोन देह होण्याचा मंत्र तेवढाच पुरे का? ते दोन्ही देह एकत्र होण्याचा मंत्र चोराने मागितला नाही. चोरीचा वांटा मागण्यातही एक खास हेतू होता. काही कारणाने का होईना, खजिन्यातली चोरी निर्विघ्नपणे पार पडलीच तर वाटा द्यायला चोर येईल तेव्हां त्याला राजाच्या शिपायांकडून कैद करवू शकला असता."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेताबरोबर अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# शेतकरी व कुळकर्णी

एका गावात कुलकर्ण्यांचे मका लावलेले एक मोठे शेत होते. शेतकाम करायला म्हणून विठू नावाच्या माणसाला त्याने दरमहा पगार देऊन ठेवले. विठूने इमाने इतबारे शेताची राखण केली. एकदां कुलकर्ण्यांनी मागितली म्हणून विठूने एक टोपलीभर कणसे काढून दिली. "त्या बिचाऱ्याला द्या बरं का चार कणसं." कुलकर्ण्यांची बायको म्हणाली.

"इतक्या मोठ्या शेताची राखण करणारा चार काढून घेतल्याशिवाय राहिला असेल का?" कुलकर्णी म्हणाला. ती गोष्ट ऐकून विठू चिडला आणि त्याने शहरात त्याचा एक नातेवाईक कोतवाल रहात होता त्याला कुलकर्णी म्हणाले ते जाऊन सांगितले.

कुलकर्णी जमीन महसूल वसूल करून जमा करून यावे या विचारात असतां राजाच्या शिपायांनी येऊन महाराजांनी बोलाविले असल्याचे सांगितले.

"कशाला बोलाविले आहे? मी किती इमाने इतबारे काम करतो आहे ना!" असे कुलकर्णी बोलू लागले.

"इतक्या मोठ्या मक्याच्या मळ्याची राखण करणारा चार कणसे काढणार नाही का? तसेच तुम्ही इतका महसूल वसूल करीत असतां त्यातला थोडा खाल्याशिवाय राहला असाल का?" शिपायांनी विचारले.

ते सर्व नाटक आहे हे कळले तरी त्या दिवसापासून कुलकर्णी नोकरांच्या बाबतीत सावधगिरीने आणि औदार्य दाखवून वागू लागले.





# आंसवे ढाळणारे पैसे

अचलग्राम नांवाच्या गावी राहणारे रघुनाथ नावाचे गृहस्थ उतारवयाचे झाले होते. बायको वारली. त्याला आपला असा गुणवंत नावाचा नातू होता--वारलेल्या मुलीचा मुलगा. रघुनाथला नातू म्हणजे जीव की प्राण होता. परंतु त्याचं वागणं आजाला मुळीच आवडत नसे. कारण असं की रघुनाथ सावकारी व गहाण, व्याजबट्याचा व्यवहार करीत त्याचा गुणवंतला कमालीचा तिटकारा होता. गावकरी गरजेमुळे कर्ज घेत आणि रघुनाथ निर्दयपणे वाटेल ते व्याज लावून कर्ज देई. त्याने खूप पैसे मिळविले तरी स्वत: दारिद्र्य भोगीत आणि गुणवंतने सुद्धा तसेच रहावे असा हट्ट करीत.

त्यांचे जुने घर एकाबाजूला पडू लागले असतां गुणी विचारी--"आजोबा! कमीत कमी घराची दुरुस्ती तरी नको का करून घ्यायला?"

तेव्हां रघुनाथ म्हणे--"पैसे कोठे आहेत रे?"

तिजोरी भरून सोन्याचांदीची नाणी आहेत हे गुणवंतला चांगले माहीत होते. परंतु रघुनाथ खर्च करील तर शपथ!

गुणवंत गावात होता तोंपर्यंत गावातल्या शाळेत शिके पुढे शहरातल्या शाळेत जाऊन त्याने मॅट्रिक पर्यंतचा विद्याभ्यास पूर्ण केला. "आतां विद्याभ्यास पुरे रे! यापुढे सावकारीची कामे तू पहात जा. माझं आता वय होत आलं आहे!" रघुनाथ नातवाला म्हणाला.

"आजोबा! मला तो पापी धंदा नको!" गुणवंतने साफ सांगून टाकले.

"गरजा भागवून घ्यायला लोक तुमच्या-कडे कर्ज मागायला येतील. तुम्ही पैसे देणार, ते ठीकच आहे. परंतु तुम्ही त्यांच्या-



कडून व्याज इतके घेतां की काय सांगू? ते पापच आहे. जुने दिवस संपले आता. या काळात घाम गाळल्याशिवाय पैसा मिळविणे शक्य नाही. खरे तर हे सांगा, हे सर्व पैसे तुम्ही करणार काय?" गुणवंतने आज्याला विचारले.

"तुझ्याच साठी रे मूर्ख गाढवा!" रघुनाथ रागानें म्हणाला.

"पापाचे धन आहे ते सर्व धन तुम्ही मिळविलेले! तो पैसा नाही गावकऱ्यांच्या डोळ्यातली आसवे आहेत. तो पैसा माझ्या कामाचा नाही. ते पापाचे धन आहे. पाहिजे तर मी ते सिद्ध करून दाखवीन." गुणवंत म्हणाला.

"तू सिद्ध करून दाखवितोस? लहान तोंडी मोठा घास! मोठमोठ्या गप्पा मारू लागला आहेस तू! तुला मी शिकायला पाठविलं ती मोठी चूक झाली." रघुनाथ म्हणाला.

गुणवंत हसून म्हणाला–"जे होऊन गेले त्याबद्दल आतां काळजी करण्यात काय फायदा? तुमचे पैसे पापाचं आहेत हे मी प्रत्यक्ष सिद्ध करून दाखवितो म्हटले आहे ना, ते खरोखरीच लोकांच्या डोळ्यातले अश्रू आहेत की नाही ते पहाच!"

रघुनाथच्या मनातसुद्धा शंका होऊ लागली. म्हणाला–"तसं खरोखरच सिद्ध करून दाखवतोस का? दाखव, मी पाहातों!"

"परंतु एक अट आहे, आजोबा! गावांत कामधंदा नसलेले पुष्कळ तरुण लोक आहेत. ते सहकारी पद्धतीने शेतकीची कामें करण्याचा विचार करीत आहेत, त्यांना लागणारे भांडवल तुम्ही दिले पाहिजे." गुणी म्हणाला.

"ते सर्व नाही जमायचे!" रघुनाथ म्हणाला.

"बरं तर तुमच्या तिजोरीतले सर्व पैसे रडून रडून पाण्यासारखे वाहू लागतील. आत्तांच ते रडत आहेत." गुणवंत म्हणाला.

[illegible] घाईघाईने तिजोरीजवळ जाऊन एक नाणे आणून म्हणाला–"हे पहा, रडत नाहीत. कशाला रे मला उगाच घाबरवून सोडतो आहेस?"

"मी भेडवीत नाही, आजोबा! हा पैसा पहा, रडू लागला!" म्हणत गुणवंतने ते नाणे आपल्या डाव्या हातात घेऊन थोडे दाबले. नाण्यांतून पाण्याचे थेंब गळू लागले.

"जयदेवा! पैसा रडतो आहे रे!" म्हणत रघुनाथ घेरी येऊन जमिनीवर पडू लागला.

गुणवंतने त्याला जमिनीवर आपटू नये म्हणून अलगद धरून झोपवले. तोंडावर गार पाणी शिपडले आणि पंख्याने वारा घालून लवकरच रघुनाथला शुद्धीवर आणले.

शुद्धीवर येतांच रघुनाथने घाबऱ्या स्वरात विचारले–"काय रे, तो पैसा अजून रडतो आहे का?"

"आतां थांबला आहे; आजोबा! परंतु पैसा पेटीत बंद करून ठेवला तर तो खात्रीने रडेल. तो बाहेर आला पाहिजे. लोकांच्या डोळ्याचं पाणी आतां लोकांच्या फायद्यासाठी उपयोगात आणलं पाहिजे. म्हणून तुमच्या पैशातील काही भाग गावात जे थोडे बेकारीने बेजार झाले आहेत त्यांना द्या. ते त्याचा उपयोग करून आपल्या जीवन मरणाचा प्रश्न सोडवू शकतील." गुणवंत म्हणाला.






"त्यांच्या सहकारी क्षेत्रात तुला सुद्धा वांटा असेल तर मी तसे देईन." रघुनाथ म्हणाला.

गुणवंतने आज्याच्या पायांवर डोके ठेवले व म्हणाला–"त्या सहकार क्षेत्राचा कार्यवाह मीच आहे, आजोबा!"

रघुनाथ चटदिशी उठून तिजोरीजवळ गेला आणि तिजोरी उघडून म्हणाला– "तुला जेवढे पाहिजेत तितके घे!"

गुणवंतने तिजोरीतील काही पैसे काढून घेऊन तिजोरीला कुलूप लावले व किल्ल्या आज्याच्या हातात दिल्या.

थोड्याच दिवसात गावात सहकार क्षेत्राची स्थापना झाली. त्यात भाताच्या लागवडीबरोबर एक दुग्धकेंद्र व कोंबडी पालन केंद्र देखील उघडले गेले. त्यात गुणवंतबरोबर कामाला आलेल्या तरुण-मंडळींनी खूप परिश्रम करून एका वर्षाच्या आत खूप फायदा काढला. ते पाहून शेजाऱ्च्या गावच्या तरुण मंडळींनी त्या सहकार क्षेत्रात प्रवेश मिळविला. दोन वर्षांत ते [illegible] सहकार क्षेत्र म्हणून प्रसिद्ध झाले. गावाला एक नवीन कळा आली.

हळूहळू त्या सहकारी केंद्राने स्वतःचे आवश्यक तेवढे भांडवल जमविले. गुणवंत काही पैसे घेऊन आपल्या आज्याला भेटून म्हणाला–"आजोबा! हे घ्या, मी तुमच्या जवळून घेतलेले पैसे. याचे व्याज किती देऊ म्हणतां?"

"मी तुला कर्ज दिले होते का रे? मला मूळ धन नको आणि त्याचे व्याजही नको. ते गांवकऱ्यांनी मला व्याज म्हणून दिलेलेच पैसे होते. त्यांच्या मुलांना त्याचा उपयोग होईल म्हणून परत दिले आहे. मी त्या पैशाला हात लावणार नाही." रघुनाथ म्हणाला.

"त्यांचं मन असे पालटायला तू काय केलेस रे?" त्याच्या मित्रमंडळींनी विचारले.

"कापूस भिजवून कानाच्या पाठीमागे ठेवून दिला होता. आजोबांच्या लक्षात येऊ न देता तो काढून नाण्याच्या पाठीमागे ठेवून दाबला. नाणे अश्रू ढाळू लागले!" गुणवंत म्हणाला.





# देवासारखा जावई

एका गावात दोघे भाऊ रहात होते. थोरला भाऊ गरीब होता. धाकट्या भावाने व्यापारात खरखोट करून खूप पैसे जमविले. दोघांना लग्नाच्या मुली होत्या. धाकटा भाऊ पाहिजे तितका खर्च करून हुंडा देऊन मुलीचे लग्न करून देण्याच्या स्थितीत होता, परंतु थोरल्याला आपल्या मुलीचे लग्न करून देणे शक्य नव्हते.

थोरल्या भावाला धाकट्या भावाचा स्वभाव चांगला माहीत होता. त्याच्या-समोर त्याने कधी हात पसरला नाही. धाकट्याने सुद्धा स्वतः होऊन मोठ्या भावाला काही मदत केली नाही.

धाकट्या भावाच्या मुलीला शहरातले एक चांगले स्थळ सांगून आले. महेश नावाचा एक तरुण मोठ्या हुद्द्यावर नोकरी करीत होता. महेश व त्याचे वडील धाकट्या भावाच्या मुलीला पहायला आले.

धाकट्या भावाची बायको तिला गरज पडे तेव्हां थोरल्या दिराची मुलगी वल्ली हिला स्वैपाक वगैरेसाठी मदतीला बोलावून घेत असे. या खेपेस देखील तिने वल्लीला बोलावून घेतले होते आणि स्वतः मुलीला सजवून तिला पहायला आलेल्यांच्या आतिथ्य सत्काराला गेली.

पाहुणमंडळींना वल्लीने तयार केलेले फराळाचे मुलीच्या हाती देववून त्यांनी त्याची प्रशंसा केली तेव्हां "हे सर्व आमच्याच मुलीने केलं हो!" असं धाकट्या भावाच्या बायकोने सांगितले.

मुलीला नैसर्गिक सौंदर्य म्हणता येण्या-सारखं नव्हतं. तिला खूप नटवून सजवून आणले होते. मुलीला पाहून पाहुणेमंडळी मागाहून काय ते कळवितो, असे सांगून निघून गेली. ते निघून गेल्यावर भांडी आत उचलून न्यायला वल्ली बाहेर आली तेव्हां तिला

- श्री म. ना. पांडे

टेबलावर एक पुस्तक दिसलं. "अरे, हे पुस्तक नवरा मुलगा इथे विसरून गेला वाटतं," म्हणत तिने ते पुस्तक घेतले.

"असं तोंड वासून पहात उभी काय राहलीस? जाऊन लवकर त्याला नेऊन कां नाही देत?" असं काकूने तिला थोडया करड्या स्वरात विचारले.

वल्ली घाईघाईने बाहेर गेली आणि मुलीला पहायला आलेल्यांना भेटून म्हणाली– "तुम्ही हे पुस्तक विसरून गेलात वाटतं?" आणि पुस्तक महेशच्या हातात दिलं.

महेशने तिच्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहिले. ती अगदी सामान्य पातळच नेसलेली होती. तरी तिचे नैसर्गिक सौंदर्य पाहून महेश चकितच झाला.

[illegible] माझ्या काकांची मुलगी. या गर्दीत मी सैंपाकाला मदत करायला म्हणून आले होते." असं मान खाली करून सांगून वल्ली तेथून परत निघून गेली.

चार दिवसांनंतर वल्लीला पहायला येत असल्याचे महेशच्या वडिलांनी मोठ्या भावाला कळविले. त्याने हुंडा एक पैदेखील मागितला नाही.

ते ऐकतांच धाकट्या भावाला व त्याच्या बायकोला पायाखालची जमीन सरकल्या-सारखं झालं. आपण ते पुस्तक देऊन यायला वल्लीला सांगितलं ही केवढी मोठी चूक झाली आपली? असा पश्चात्ताप करू लागली, तिची काकू.



[illegible] जो आनंद झाला तो एवढा तेवढा नव्हता.

लग्नाचा मुहूर्त दोन दिवसांनी होता. धाकटा भाऊ बायकोला म्हणाला–"आपण लग्नाला नाही जायचं. गेलं तर आपल्या ऐपतीला साजेल असा अहेर करावा लागेल. ते आपल्याला जमणार नाही."

"दुप्पट फायदा होईल! माझ्या मनात एक विचार आला आहे. तुम्ही तोंड उघडू नका, फक्त पहात रहा!" बायको म्हणाली.

थोरला भाऊ बायकोला म्हणाला– "धाकटा भाऊ लग्नाला येणार. त्याच्या बायकोला त्यांच्या ऐपतीला साजेल असे लुगडे, शालू काहीतरी दे. मी कोठेतरी जाऊन थोडे कर्ज मागून घेऊन येतो."

लग्नात धाकट्या भावाने नवऱ्या मुलीला एक चांदीचे 'केळीचं पान' अहेर म्हणून दिलं. मोठ्या भावाच्या बायकोने जावेला एक सुंदर शालू दिला.

तरी धाकट्या भावाच्या बायकोचे समाधान झाले नाही. लग्न सोहोळा संपल्यावर चारचौघांसमोर एकदम अंगात आल्यासारखी अंबाडा सोडून केस पिंजारून उभी राहून म्हणाली–"माझी काही फिकीरच नाही आणि मुलीचं लग्न करा-यला निघालास का दादा? मी या घरची मुलगी आहे, मुलीची आते आहे. मला एक पैठणी आणून दिली पाहिजेस, आतांच्या



आतां !" असे म्हणत मोठमोठ्याने आरडा ओरडा करू लागला. त्या दोघां भावांना एक धाकटी बहीण होती. ती दहा वर्षांची होऊन वारली. आतां भावजयीच्या अंगात आल्यासारखी तीच ओरडत होती.

मांडवात गोंधळ उडून गेला. प्रत्येक कोपऱ्यात किंवा बाजूला जाऊन लोक खुसपूस करू लागले. मोठा भाऊ भोळा होता. ती धाकटी बहीण त्याची फार लाडकी होती. म्हणाला–"अग, तुला कधी मी कमी पडू देईन का?" असे म्हणत तो पैशासाठी घरात गेला.

इतक्यात मांडवांत आणखी एक गोंधळ उडाला. तोंपर्यंत गुपचुप सर्व पहात बसलेला नवरामुलगा बाजूलाच केळीचा खांब होता तो खांद्यावर घेऊन भयंकर आवाज काढून ओरडत फिरत नाचू लागला.

"आणखी काय, नवरा मुलगाच हनुमान झाला. आतां येथे कोणी राहयलाच जागा नाही. वारा, धूळ यांनासुद्धां थारा नाही." सर्व म्हणू लागले.

[illegible] गुप्तपणे दांतओठ चावून नाइलाजाने मागे सरकली आणि तिच्या अंगातली तिची नणंद उतरली. लगेच नवऱ्या मुलाच्या अंगात आलेले सुद्धां नाहीसे झाले.

लग्न झालं त्याच्या दुसऱ्या दिवशी मोठा भाऊ महेशला विचारू लागला– "काय हो, तुमच्या अंगात असा देव येतो का?"

महेश हसून म्हणाला–"देव माझ्या अंगात नव्हता आला. तिच्या अंगातही तुमच्या बहिणीचे भूत नव्हते आले. भूतच मानले तर दहा वर्षांची मुलगी पैठणी मागेल का हो? तिचा दुष्टपणा ओळखून मींदेखील तिला धडा देण्यासाठी एक नाटक करून तिचे तोंड बंद केले."

देव अंगात येणारा जांवई मिळाल्या-बद्दल लोक अभिनंदन करू लागले म्हणजे मोठा भाऊ व भावजय म्हणत–"होय हो, आम्हांला देवासारखाच जांवई मिळाला आहे!"



# सत्संगती

एके दिवशी नारदाने विष्णूकडे जाऊन सत्संगती पासून मिळणारा फायदा काय, असे विचारले. विष्णू म्हणाला–"दंडकारण्यात एक किडा आत्तांआत्तांच जन्मला आहे. त्याला विचार."

नारदाने दंडकारण्यात जाऊन त्या किड्याचा शोध लावला आणि विष्णूला विचारलेला प्रश्नच त्याला विचारला. त्या किड्याने एकदां मान वर करून नारदाला खालपासून वरपर्यंत पाहून प्राण सोडला.

नारदाने घाबरून जाऊन घडलेला वृत्तांत विष्णूला सांगितला आणि त्याच्या शंकेचे समाधान न झाल्याचे सांगितले.

"काही हरकत नाही अमुक एका गावी अमुक ब्राह्मणाची गाय नुकतीच व्यायली आहे, त्या वासराला जाऊन विचार." विष्णू म्हणाला.

नारदाने त्या प्रमाणे जाऊन त्या वासराचा शोध काढून तो प्रश्न विचारला. वासराने मान वर करून नारदाला खालपासून वरपर्यंत क्षणभर पाहून जमिनीवर अंग टाकले.

नारदाने पुन्हां विष्णूकडे जाऊन घडलेले वृत्त सांगून त्याच्या शंकेचे निरसन न झाल्याचे सांगितले. "दक्षिणेकडील चोळ देशाच्या राजाला आत्तांच एक मुलगा झाला आहे. त्याला जाऊन विचार." विष्णू म्हणाला.

नारदाने चोळ देशाच्या राजकुमाराला भेटून भीतभीत तोच प्रश्न विचारला.

राजकुमार म्हणाला–"महात्मन्, मी एक किडा होऊन जन्मलो होतो. आपल्यासारख्या थोर पुरुषाचे दर्शन लाभल्याने वासरू होऊन जन्मलो. पुन्हां आपले दर्शन लाभले म्हणून हा राजकुमार म्हणून जन्मलो. सत्संगतीचा लाभ पाहून जास्त काय सांग?"





# मरावे परी कीर्तिरूपे उरावे

कर्पूर देशाचा राजा वसंतराय याच्या मनात त्याच्या प्रजेने त्याला एक मोठा राजा मानावे आणि थोर पुरुषां-सारखी 'आचंद्रदिवाकरी' कीर्ती प्राप्त व्हावी अशी इच्छा होती. कीर्ती संपादन करण्यासाठी त्याने प्रजेच्या हिताची अनेक कामे केली. त्याच्याविषयीं प्रजेला काय वाटते, या इच्छेने तो वेष पालटून राज-धानीतच नव्हे तर खेडोपाडी हिंडे. प्रजेच्या तोंडी आपली स्तुती ऐकून राजाला फार आनंद होई.

परंतु एका गावी रामराव नावाच्या माणसाला वसंतरायच्या बाबतीत तसं प्रशंसा करण्यालायक काही दिसलं नाही. ते राजाविषयी बेफिकीरपणेच बोलत म्हणाले—"फार ऐकले त्याच्या विषयी! पण त्याने आमच्या गावाकरितां काय केले हो?" वसंतरायाच्या मनाला ती गोष्ट फार लागली. त्याने त्या गावात कोणकोणत्या गोष्टींची उणीव आहे चवकशी केली. पाण्याची अडचण असल्याचे कळले. गावात एकच एक तलाव होता. पाऊस बरोबर पडला नाही की तो भरत नसे.

वसंतरायाने राजधानीला जाऊन मंत्र्यांशी बोलून त्यांचा सल्ला घेतला आणि त्या गावातून जाणारा एक कालवा खोदवला. कालवा खणून झाल्यावर गाव-कऱ्यांची पाण्याची गैरसोय दूर झाली.

राजा वेष पालटून त्या गावी गेला व रामरावांना भेटला. या खेपेस रामराव आपली खूप प्रशंसा करणार असे वसंत-रायाला वाटत होते. परंतु रामाराव म्हणाले—"काय हो एक कालवा खणला म्हणजे सर्व झालं का? आम्हांला पाण्याची गैरसोय होती ती खरी, पण दुसरी काही अडचण नाही का?"

श्री स. ना. मराठे

वसंतरायाने पुन्हा जास्त खोल जाऊन चवकशी करविली तेव्हां ते गाव एक खेडेगाव असल्याने मोठ्या रस्त्याला त्या गावाहून जायला यायला सोयीचा रस्ता नसल्याचे कळले. वसंतरायाने तसा रस्ता करवून दिला. आतां त्या गावाहून दुसऱ्या कोणत्याही गावाला जाणें येणे सोपे झाले.

तरीदेखील रामरावांनी राजाविषयी आपले असमाधानच व्यक्त केले. राजाने त्या गावात एक शाळा काढली आणि एक धर्मार्थ दवाखाना उघडून दिला. अशी अनेक गावकऱ्यांच्या सोयीची कामें वसंतरायाने करून दिली. एका खेडेगावाला शहराचे रूप आले. गावकरी राजाची खूप वाखाणणी करू लागले. परंतु रामरावांच्या तोंडी स्तुतीचा एक शब्ददेखील बाहेर पडला नाही.

शेवटी वसंतरायाने कंटाळून चिडून जाऊन विचारले–" मग काय हो रामराव? सर्व गाव वसंतरायाच्या कीर्तीचा स्तंभ आकाशापर्यंत बांधीत असतां तुम्ही एक देखील चांगला शब्द कां बोलत नाही?"

"राजापासून त्यांना फायदा झाला म्हणून ते तसं म्हणत आहेत. मी कशाला म्हणू त्याला चांगला म्हणु?" रामराव रागाने म्हणाले.

"राजाने प्रजाहिताची इतकी कामे केली, म्हणून प्रजा सुखी झाली. तुमचं एकट्याचं ब( झालं नाही म्हणतां का?" वसंतरायाने विचारले.



“होय तेच! कालव्याचा फायदा जमिनी असणाऱ्यांना झाला. मला जमीन नाही. रस्त्याचा फायदा व्यापाऱ्यांना झाला. मी व्यापार करीत नाही. शाळेचा फायदा ज्यांना मुलं आहेत त्यांना झाला. मला शिकण्याचं वय असलेले मूल नाही. धर्मार्थ दवाखाना आला. माझं कधी डोकं दुखत नाही की पोट दुखत नाही. शहरातल्यासारखी करमणुकीची उत्तम साधने झाली आहेत. ती पाहायला माझ्याकडे पैसे कोठे आहेत?” रामराव म्हणाले.

आतां रामरावांच्या परिस्थितीची वसंतरायाला खरीखुरी कल्पना आली. म्हातारपण आल्यानंतर त्याच्याकडे त्याची मुलं दुर्लक्ष करीत. राजाने रामरावांसाठी एक लहानसे घर बांधून दिले आणि सुखाने म्हातारपण जावे म्हणून पैशाची व्यवस्था करून दिली. या खेपेस भेटल्यावर रामरावांनी राजाची खूप स्तुती केली.

वसंतराय वेष पालटून संचार करीत आणखी एका गावी गेला. तेथे सोमेश्वरराव नावाचे गृहस्थ तसेच चिडल्यासारखे म्हणाले–“हा कोण मोठा राजा झाला हो? त्याने आमच्या गावासाठी काय केले?”

या खेपेस राजाने गावाच्या परिस्थितीविषयीच नव्हे तर सोमेश्वररावांच्या परिस्थितीविषयी देखील चवकशी केली. त्याने त्यांच्या सर्व गरजा भागविण्यासाठी योग्य ती तजवीज केली, दुसऱ्या खेपेस सोमेश्वररावांनी राजाची खूप वाखाणणी केली.

वसंतरायाचे डोळे उघडले की, किती कामे केली तरी ती करणाऱ्याला लोक मानीत नाहीत. प्रत्यक्ष त्या व्यक्तीच्या उपयोगी पडले तरच मान देतात. देशातल्या प्रत्येक व्यक्तीकडून अशी मान्यता मिळवायची झाली तर प्रत्येकाच्या व्यक्तिगत गरजा भागविल्या पाहिजेत. ते शक्य नाही. म्हणून दहा जणाना उपयोगी पडतील अशी कामे करणेच बरोबर. वसंतरायाने पुढे तेच केले. जिवंत असेपर्यंत त्याला मान मिळाला नसला तरी कर्पूरच्या वसंतरायांचे नाव मात्र चिरस्थायी झाले.



# निरुपयोगी कला

बालाजी नावाचा एक माणूस उतारवय होईपर्यंत चोऱ्या करून पुढे शहरात जाऊन एका सभ्य नागरिकासारखा राहू लागला. कोणी बरोबर असेल तर चोरी करणे अशक्य नाही, परंतु बरोबर दुसरा चोरच असेल तर त्यांत धोका आहे असे समजून त्याने कोणत्याही चोर साथीदाराला घेण्याचा विचार मनातून काढून टाकला.

एके दिवशी याच्या घरासमोरच्या उघड्या जागेवर डोंबाऱ्याचे खेळ सुरु झाले. त्या सर्व खेळात एका तरुण मुलाचे काम चोराला फार आवडले. उंचावरून उडी मारणे व लांब उडी मारणे या कामात त्याचे प्राविण्य पाहून बालाजी खुष झाला. तो मुलगा दिसायलासुद्धा बऱ्यापैकी होता. त्या मुलाशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले तर अष्टौप्रहर आपल्याबरोबर राहील असे वाटून त्याने तशी चवकशी केली. मुलगा तयार झाला आणि लग्न करून सासऱ्याच्या घरी रहायला तयार झाला.

एके दिवशी रात्री बालाजी आपल्या जावयाला बरोबर घेऊन एका श्रीमंत माणसाच्या घरी चोरी करायला गेला. “ही आवाराची भिंत ओलांडून आतून पुढचे दार उघड.” तो जावयाला म्हणाला.

“तशी उडी मारणे साधी गोष्ट आहे का मामा! खांब उभा केला पाहिजे, डफ वाजवायला हवा, लोकांच्या टाळ्यांचा आवाज ऐकायला आला पाहिजे. ते सर्व नाही आणि उडी मारणे म्हणजे सामान्य गोष्ट आहे का?” तो मुलगा म्हणाला.





# घराचा गौरव

एका जमिनदाराला तीन मुलगे होते. तिघांची लग्ने झाली होती व त्यांच्या बायका संसार करू लागल्या होत्या. जमिनदार फार लोभी स्वभावाचा होता, मुलांच्या हातात पैसा मुळीच येऊ देत नसे. म्हणून तिघांनी धनार्जन करण्यासाठी निरनिराळी कामे काढली. मुलांनी निरनिराळ्या चुली मांडवणे हे घराण्याच्या नावाला बट्टा लावण्यासारखे आहे, असे जमिनदाराचे म्हणणे होते. म्हणून सर्वांना एकत्र रहावे लागत होते.

जमिनदार स्वतःच्या प्रकृतीसाठी लहान मोठा आजार आला तर निसर्गोपचार करीत असे. जमिनदार दररोज स्नानाला कालव्यावर जाई. तेथे अंगाला ओली माती लावून बसे आणि दोनतीन तासांनी माती अंगावर वाळून गेल्यावर स्नान करीत असे.

जमिनदार सर्व मिळकत एका निराळ्या खोलीत कुलूप लावून ठेवी व किल्ल्या कनवठीला लावून ठेवी. आंघोळीला जातांना तो त्या किल्ल्या दुसऱ्या मुला-जवळ संभाळून ठेवायला सांगून जाई. इतर दोघांवर त्याचा एवढा विश्वास नव्हता.

एके दिवशी तो आंघोळीला निघाला त्या वेळी घरात एकदेखील मुलगा नव्हता. सुनांपैकी सर्वात धाकटी आपल्याला सर्वात जास्त मानते असे वाटत असल्यामुळे त्याने किल्ल्या तिच्याजवळ ठेवल्या व स्नान करून परत येईपर्यंत संभाळून ठेवायला तिला सांगितले.

परंतु थोडे अंतर चालून गेल्यावर धाकट्या सुनेवर इतका विश्वास टाकणे बरोबर नाही असे वाटून जमिनदर परतला आणि थोरल्या सुनेला गुप्तपणे धाकटीवर नजर ठेवायला सांगून पुन्हा स्नानाला निघाला. दोघी परस्परांना सामील झाल्या आणि चोरी केली तर? असा संशय येऊन म्हातारा पुन्हा परत आला आणि मधलीला गुप्तपणे दोघींवर कडक नजर ठेवायला सांगून निश्चित होऊन स्नानाला निघून गेला.

किल्ल्या हातात आल्या त्या क्षणापासून खोली उघडून आत काय आहे हे पाहण्याची धाकटीला घाई झाली. परंतु ती जेव्हां जेव्हां त्या खोलीकडे वळे त्या त्या वेळी थोरली काहीतरी काम काढून त्या बाजूला येई. मधलीची इतर दोघींवर नजर अस-ल्याचे देखील दोघींना स्पष्ट कळले.

तिघींनी परस्परांना बोलावून विचारले तेव्हां सासऱ्याला तिघींवर संशय असल्याची व त्याने केलेल्या युक्तीची गोष्ट कळून आली. तिघी एक झाल्या आणि खोलीचे दार उघडून तिजोरी उघडली. तिजोरीतून त्यांना हवा होता तो ऐवज काढून घेऊन त्यांनी पुन्हां तिजोरी बंद केली आणि खोलीच्या दाराला पहिल्यासारखे कुलूप लावून ठेवले.

त्यांच्या घराच्या शेजारीच एक कापडाचा व्यापारी रहात असे. तिघी त्याच्याकडे गेल्या आणि प्रत्येकीला एकेक नवे लुगडे घेऊन, नेसून सासरा परत यायच्या आत काही झालेच नाही अशी बतावणी करून गाणं गात गप्पा मारीत कामात गुंगून गेल्या.

तिघी नवी लुगडी नेसलेल्या दिसतांच सासऱ्याच्या मनात 'धस्स' झाले. परंतु त्याने मनातली गोष्ट बाहेर न दाखवितां



धाकट्या सुनेला विचारले–"कोठून ग आणली नवी लुगडी ?"

किल्लया सासऱ्याला परत आणून देत ती म्हणाली–"आपण तसे तिकडे गेलात आणि एक ज्योतिषी आपल्या घरी आला आणि म्हणाला–"जवळच एक धनाचा गुप्त ठेवा आहे आणि लवकरच तो माझा होणार आहे असे सांगून निघून गेला. तो गेल्यावर आपल्या ओळखीचा एक कपड्याचा व्यापारी आला आणि आम्हां तिघींची खूप प्रशंसा करून त्याने प्रत्येकीला एकेक लुगडे अशी तीन लुगडी गळ्यात बांधली. आम्ही काय करणार? किंमत विचारली तर म्हणाला–'तुमच्या सासऱ्याला घराण्याचा जो अभिमान आहे मला माहीत नाही का? मी मेलो आणि स्वर्गाला गेलो तरी तो मला परत बोलावून किंमत देईल, कधी उधार ठेवणार नाही." इतक्यात तुमच्या खोलीतून कोणीतरी आतून जोराने दार वाजविले. बांगड्या वाजल्या. लगेच कापडवाला म्हणाला–"बाई! धनलक्ष्मी आतून दार वाजविते आहे दार उघडायला!" आम्हां तिघींना भीती वाटली. तिघी मिळून दाराजवळ गेलो आणि दार उघडलं. चुडा असलेले दोन हात दाराच्या फटीतून बाहेर आले आणि आमच्या हातात पैसे ठेवून अदृश्य झाले. आम्ही लुगड्यांची किंमत देऊन टाकली.

त्याच वेळी तिघे मुलगे घरी आले. जमिनदाराचा जळफळाट झाला. कोठे आहे तो कापडाचा व्यापारी, पाहू दे मला!"

मोठी सून म्हणाली–"आपल्या घराण्याचं नाव काढीत तेव्हांच निघून गेला, मामंजी!"

जमिनदार एक शब्ददेखील बोलला नाही. सुनांना काही बोलावे तर मुलांना राग येईल व निराळं रहायचं आहे म्हणून हट्ट धरून बसतील व आपलं घराण्याचं नांव जाईल या विचाराने गप्प राहिला.

तिघे मुलगे उजाडल्याबरोबर घर सोडून जातात की काय या गोष्टीचे त्याला त्या नंतर स्वप्नदेखील पडले नाही.





# वैद्य आणि वैदू

दक्षिणेत मदुरा जिल्ह्यात कीर्तिपुर नांवाच्या गावी सुंदराचारी नावाचा एक वैद्य होता. वास्तविक तो वैद्य नव्हताच, अथर्वणाचार्य नावाच्या एका मोठ्या वैद्याचा मुलगा होता. अथर्वणार्य फक्त एक मोठे वैद्यच नव्हते तर त्यांनी कित्येक रसायने व भस्मे, लेह्य असावे, अरिष्टे तयार करून ठेवली होती. ते वारल्यावर वैद्यबुवांचाच मुलगा म्हणून तो गावकऱ्यांना औषधे देऊन वैद्यकी करू लागला.

काही दिवसांनी रामचंद्र नांवाचा एक तरुण वैद्यकशास्त्राचे पद्धतशीर शिक्षण घेऊन कीर्तिपुरला आला व तेथेच राहू लागला.

एकदां गावच्या पाटलांची मुलगी बाळंत झाली व तिला बाळंतपणात ताप आला. तेव्हां पाटलाने सुंदराचारीला बोलाविले. त्याने बाळंतिणीची नाडी पाहून एक औषध दिले आणि बाळंतीण अंथरुणावर थोडी पडली असेल तिच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. बाळंतिणीचे हातपाय गारठल्याचा ओरडा झाला.

ते कळताच पाटलांचा नोकर मागेपुढे न पाहता रामचंद्र वैद्याकडे धावला. रामचंद्रने नाडी परीक्षा करून आपल्या पिशवीतून कसले तरी भस्म काढून मधाबरोबर रोग्याला चाटायला दिले. थोड्याच वेळात तिने डोळे उघडून पाहिले.

त्या दिवसापासून रामचंद्रच त्या गावचा वैद्य म्हणून प्रसिद्ध झाला. अर्थातच सुंदराचारीच्या पोटावर पाय आला. त्याचा द्वेषाग्नी भडकला. त्याने आपल्या करटकाचारी नावाच्या मित्राचा सल्ला घेतला.

आपल्या मित्राच्या सल्ल्याप्रमाणे सुंदराचारीने सुब्रह्मण्यम् नावाच्या एका माणसाला हाताशी धरले. त्याला खूप पैसा चारला आणि त्याने काय करावयाचे हे देखील

सांगून पढवून ठेवले. तो सुब्रह्मण्यम् आणखी दोघां साथीदारांना बरोबर घेऊन सरळ रामचंद्र वैद्याच्या घरी गेला. त्यावेळी रामचंद्र गावच्या पाटलाशी बोलत बसलेला होता. सुब्रह्मण्यम् रामचंद्रला पोटशूल असल्याचे सांगून औषध मागू लागला. रामचंद्रने सुब्रह्मण्यमची वैद्यकीय परीक्षा करून पोटशुलीची लक्षणे नसल्याचे सांगितले आणि पोटदुखण्याचे कारण अजीर्ण झाले असावे असे म्हणाला. म्हणून त्याने त्याला लवण भास्कर औषध दिले.

सुब्रह्मण्यमने ते चूर्ण खाऊन टाकले व किंचाळ्या फोडून ओरडू लागला व जमिनीवर लोळू लागला. सुब्रह्मण्यम् बरोबर आलेले दोघे जण ओरडा करू लागले— "सुब्रह्मण्यम्चा जीव घेतला हो, हा वैद्य आहे की राक्षस?"

रामचंद्र वैद्याने लगेच सुब्रह्मण्यम्ची नाडी पाहिली व तो सोंग करीत असल्याचे ओळखून त्याची खोड मोडण्याचे ठरविले. म्हणाला—"ही पोटदुखी सामान्य नव्हे, जीवघेणी पोटदुखी आहे. याला औषध एकच आहे,—'विषस्य विषमौषधम्'! विषाला विषानेच मारावे लागणार. हे पहा मी ह्याच्या घशात घातल्या बरोबर पोटदुखी असेल तर बंद होईल.परंतु जर का पोटदुखी नसेल तर मात्र रोगी तडफडून मरून जाईल." त्याने पाटलाला साक्षी रहायला सांगितले.

असे सांगून रामचंद्र घरात गेला व घरातून कसले तरी औषध सांगून ग्लासात घेऊन आला. म्हणाला—"उघडा सुब्रह्मण्यमचे तोंड, धरा घट्ट त्याचे हातपाय!"

"नका हो, जीव घेऊ!" असा ओरडत सुब्रह्मण्यम् उठून उभा राहिला.

सुंदराचारीचा कट सुब्रह्मण्यमच्या तोंडी पाटलांच्या समोरच रामचंद्रने वदवून घेतला. सर्व गावभर ती बातमी पसरली. दुसऱ्या दिवशी सकाळी लोकांनी ऐकले की सुंदराचारी अथर्वणारींचे मोठे औषधालय तसेच सोडून व चंबूगबाळे घेऊन निघून गेला आहे.





# गुरूने शिकविलेला मंत्र

फार पूर्वी चंपावती नावाच्या एका शहरात पर्वतमल्ल नावाचा एक मल्ल तरुणांना मल्लविद्येचे शिक्षण देत असे. त्याच्या शिष्य वर्गात भार्गव आणि शूरवर्मा नावाचे दोघे तरुण मल्ल होते.

एके दिवशी दीर्घनाथ नावाचा एक मल्ल पर्वतमल्लाकडे येऊन म्हणाला— "वस्ताद, तुला जे चारपाच डावपेच येत आहेत तेवढेच शिकवून तुझे शिष्य अजिंक्य होतील असे तुला वाटते आहे का? पाहू तरदे तुझ्या शिष्यांपैकी एखाद्याचा प्रताप!"

गुरूचा अपमान करणारे ते आव्हान ऐकून भार्गव संतापला. त्याने दीर्घनाथाला कंबरेजवळ धरून उचलले आणि गरगर फिरवून खाली पाडले. दीर्घनाथाला कंबर मोडल्यासारखे झाले. तो उठला आणि एक शब्ददेखील न बोलता निघून गेला.

काही वर्षांनंतर भार्गव व शूरवर्मा यांचे शिक्षण पूर्ण झाले आणि दोघे उदरनिर्वाहाचे साधन म्हणून मल्लविद्येचा उपयोग करीत देशाटनाला निघाले. दोघे मगध राज्यात आले. राजधानीत प्रवेश केल्यावर त्यांना एक गोष्ट कळली. राजाच्या पदरी एक दरबारी मल्ल असतो, परंतु तो त्या पदावर कायम नसतो. जो कोणी त्याला मल्लयुद्धात पाडतो त्याची त्या पदावर नेमणूक करण्यात येते. भार्गव व शूरवर्मा दोघांनी आपल्या भाग्याची परीक्षा पहावयाचे ठरविले. शूरवर्माने भार्गवला पहिली संधी दिली.

भार्गव आणि दरबारी मल्ल दोघांचे मल्लयुद्ध ठरल्या वेळी सुरू झाले. बराच वेळ रेटारेटी, डावपेच होत राहिले. भार्गवने त्याला त्याच्या गुरूने शिकविलेले सर्व पेच वापरून पाहिले. परंतु दरबारी मल्ल सामान्य नव्हता. तो प्रति डावपेच टाकून भार्गवचे



प्रयत्न निष्फळ करीत होता. परंतु एवढे स्पष्ट होऊ लागले की दरबारी मल्लाची सरशी होणार, आणि तेच झाले. सुरवातीला दरबारी मल्ल स्वतःचे रक्षण कसे करावयाचे हे पहात होता. परंतु आक्रमक पवित्रा टाकून त्याने भार्गवला शेवटी माती चारली. भार्गव हारला.

शूरवर्माने दुसऱ्या दिवशी दरबारी मल्लाशी कुस्तीला तयार होऊन दंड थोपटला. तो जातांना भार्गवला भेटून गेला होता. दोघे मल्ल आखाड्यात उतरले. सलामीसाठी दोघांनी हात पुढे केल्याबरोबर शूरवर्माने चटदिशी दरबारी मल्लाला उचलले आणि आडवे घातले. तो आखाड्याच्या बाहेर जाऊन पडला. पुढे कुस्तीची गरजच राहिली नाही. शूरवर्माला दरबारी मल्लाची जागा मिळाली. जुना मल्ल एक शब्ददेखील न बोलतां निघून गेला.

भार्गवने, शूरवर्माने दाखविलेली युक्ती पाहून आश्चर्यचकित होऊन विचारले— "वर्मा! आपल्या गुरूने माझ्या नकळत तुला काही पवित्रे आणि पेच शिकवले आहेत. तू त्या दरबारी मल्लाला जिंकलेस तो पवित्रा मला गुरुजींनी शिकविला नाही."

शूरवर्मा ते चूक असल्याचे सांगून म्हणाला—"हा मंत्र मला गुरुजींनी शिकविलाच नाही. तो मी आणखी एका वस्तादाकडे शिकून घेतला." असे सांगून तो उस्ताद जेथे रहात असे ती जागादेखील सांगितली.

शूरवर्मा म्हणाला ते भार्गवला खरे वाटले नाही. तो त्या गावात गेला.

तो वस्ताद भार्गव म्हणाला ते सर्व शांतपणे ऐकून घेऊन म्हणाला—"हा पवित्रा मी शोधून काढलेला नाही. येथून जवळच प्रतिष्ठानपुर नावाचं गाव आहे. त्या गावातल्या एका खाटिकाशी माझी कुस्ती झाली. त्याने मला हा पेच टाकून पाडले. त्या पेचाचा मी अभ्यास केला आणि तुझ्या मित्राला मी तो शिकविला."

भार्गव प्रतिष्ठानपुरला त्या खाटिकाचा शोध काढीत निघाला. त्या उस्तादाने सांगितलेल्या खुणाखाणा ओळखून भार्गव त्या खाटकाच्या दुकानाजवळ गेला. तो खाटिक दुसरा तिसरा कोणी नव्हता, दीर्घनाथच होता. त्याला पाहून भार्गव चकित झाला.

दीर्घनाथसुद्धा भार्गवला पाहून आश्चर्यचकित होऊन येण्याचे कारण विचारू लागला. भार्गवने घडलेला सर्व वृत्तांत सांगून त्याच्या मनातली शंका विचारली.

दीर्घनाथ सर्व वृत्तांत ऐकून पोट धरून खूप हसून म्हणाला—"अरे तूच नाही का तो पेच माझ्यावर टाकला होतास? मी तुझ्या गुरूलाच आव्हान केले तेव्हां तू रागाने माझ्यावर उसळून आलास आणि मला उचलून फेकलेस, ते नाही का आठवत? तो पेच मला फार आवडला, तो डाव उत्तम पेच म्हणून मी चांगला शिकून घेतला.

"मी त्या दरबारी मल्लाबरोबर इतका वेळ मल्लयुद्ध केले, परंतु माझ्याच बरोबरीच्या शूरवर्माने एका क्षणात त्याला जमिनीवर लोळविले, ते कसे ते मला कळले नाही." भार्गव म्हणाला.

त्यात विचित्र, न कळण्यासारखे असे काय आहे? खऱ्या मल्लयुद्धपटूने करायचं कामच आहे ते! पहिल्याने तुला मल्लयुद्धाला पाठवून शूरवर्माने शत्रूच्या बलाबलाची कल्पना करून घेतली. तुमच्या गुरूने शिकविलेले सर्व डाव पेच निरुपयोगी ठरलेले प्रत्यक्ष पाहून त्याने स्वतः कुस्तीला गेला असतां सलामीच्या वेळी हा डाव टाकला. त्याने शत्रूला विचार करायला, शक्ती अजमावून घ्यायला संधीच दिली नाही. पहिल्याच पकडीत त्याला माती चारली.

काही म्हणा, शूरवर्मा आपल्याहून वस्ताद आहे आणि त्याला दरबारी मल्लाचे पद मिळाले याबद्दल त्याला आनंदच झाला.





# दहा हजाराचे इनाम

एका देशाच्या राजधानीत भीमू नावाचा एक अट्टल चोर रहात असे. राजाने त्याला धरण्यासाठी आकाशपाताळ एक केले, परंतु त्याला त्यात यश मिळाले नाही तेव्हां त्याने चोराला धरून देणाऱ्याला दहा हजारांचे बक्षिस जाहीर केले.

एकदां भीमू एका श्रीमंत गृहस्थाच्या वाड्यात चोरी करायला गेला. तो वरच्या मजल्यावर पोचतांच घरातल्या नोकरांनी त्याला पाहून 'चोर' 'चोर' म्हणून ओरडा केला आणि त्याला धरण्यासाठी जेवढ्या पळवाटा होत्या त्या अडवून उभे राहले. भीमूने घराजवळ एक आंब्याचे झाड होते त्यावर उडी घेतली आणि शेजारच्या घरच्या आवारात नाहीसा झाला. नोकर त्याला धरतां न आल्याबद्दल हात चोळू लागले.

खरोखर भीमू आंब्याच्या झाडाची फांदी हातातून सुटल्यामुळे खाली पडला होता. त्याला बरेच लागले होते. तो पडला होता ते आवार रामशास्त्री नावाच्या एका वैद्याच्या घराचे होते. भीमू लंगडत वैद्य बुवांकडे गेला आणि वांचवायला विनवण्या करू लागला. वैद्यबुवा भीमूच्या जखमा तपासून औषध आणायला म्हणून घरात गेले.

परंतु रामशास्त्री कंदील लावून घेऊन आणि मागच्या दाराने बाहेर निघाले. तेव्हां त्यांच्या बायकोने 'अवेळी कोठे निघालात' म्हणून चवकशी केली.

रामशास्त्री हळू आवाजात तिला म्हणाले—"अग, आपल्या नशिबाने भीमू दरोडेखोर स्वतः होऊन आपल्या घरी आला आहे. महाराजांनी दहा हजार रुपयांचे इनाम जाहीर केले आहे. मी येईन तोपर्यंत त्याच्यावर थोडी नजर ठेव."

रामशास्त्री बराच वेळ झाला तरी ते न आलेले पाहून भीमूला संशय आला. त्याने रामशास्त्र्यांच्या बायकोला सुरा दाखवून व दरडावून धमकी देत विचारले—"कोठे गेला ग, तुझा नवरा?"

रामशास्त्र्यांच्या बायकोने घाबरून खरे ते सांगून टाकले. भीमूने आपला जीव धोक्यात असल्याचे ओळखले व स्वतःला सावरून म्हणाला—"बाई! मला तुम्ही धरून दिलेत तर महाराज तुम्हांला दहाच हजार देतील, माझे तुम्ही रक्षण केलेत तर मी एक लाख रुपये देईन. मला कोठेतरी लपवून ठेवा."

रामशास्त्र्यांच्या बायकोच्या मनात लोभ वाढला. तिने भीमूला धान्याच्या कोठारात लपायला सांगितले आणि स्वतः केस पिंजारून नवरा शिपायांना घेऊन आल्याबरोबर ओरडली—"त्याने मला मारले आणि बडवून पळून गेला हो!"

राजाचे शिपाई निघून गेल्यावर भीमू बाहेर आला. बायकोने त्यांना सर्व सांगितले. रामशास्त्री भीमूच्या जखमांना औषध लावीत विचारू लागले—"आम्हांला पैसे कसे पोचते करणार रे तू? तुझ्या बरोबर येण्यात जिवाला धोका आहे!"

भीमू एक खुणेचा कागद देऊन म्हणाला—"हा कागद माझ्या अनुयायांना दाखवा. ते तुम्हांला एक लाख देतील. तुम्ही पैसे घेऊन परतल्यावर मला सोडवा."



असे सांगून कोठे कसे जायचे हे रामशास्त्रांना नीट समजावून सांगितले.

रामशात्री चोरांच्या गुप्त अड्ड्याकडे गेले. त्यांना एक लक्ष रुपये मिळाले. परंतु चोर पाठीमागून कळू दिल्या शिवाय आले व ते घरी पोचतांच त्यांचे हात पाय बांधून टाकून आपल्या नायकाला सोडविले. भीमू एक लक्ष परत घेऊन तर गेलाच, रामशास्त्र्यांच्या मुलाला उचलून नेत म्हणाला—"दहा हजार रुपये देऊन मुलाला सोडवून घ्या!"

रामशास्त्र्यांनी त्यांच्याजवळ वैद्यकशास्त्र शिकत असलेल्या शंभू नावाच्या एका तरुणाला मार्ग काढायला सांगितले. त्याने









एक युक्ती सुचविली. दोन दिवसांनी भीमूने येऊन रामशास्त्रांना विचारले— "मग काय ठरविलेत?"

"अरे, थोड्याच वेळा पूर्वी नाही का तुला मी दिले? तू आणखी दहा हजार घेऊन पडक्या शिवालयाजवळ या म्हणाला नव्हतास का? असं केलेस तर कसं रे?" रामशास्त्री रडकं तोंड करून विचारू लागले.

"मी आलो म्हणतां? केव्हां कोठे? सपशेल खोटे!" भीमू दरडावून म्हणाला.

"उद्यां मध्यरात्र उलटल्यावर यायला तू पुन्हांपुन्हां सांगितलेस...कदाचित तुझ्या अनुयायांपैकी कोणी तुझा वेष करून तर नव्हता आला?" रामशास्त्री चकित होऊन विचारू लागले.

भीमूला सुद्धां संशय आला. "उद्या रात्री मी येतो तर त्या जागी. खोटे ठरले तर हा सुरा पहालात ना?"

दुसऱ्या दिवशी रामशास्त्री शिवालया-जवळ गेले. एक बुरखेवाला येऊन विचारू लागला—"पैसे आणलेस का?"

"काल तू निघून गेल्यावर, स्वतःला भीमू म्हणून सांगत आणखी एक जण आला." रामशास्त्री म्हणाले.

"मीच रे खरा भीमू!" असे म्हणत बुरखेवाल्याने रामशास्त्रींच्या हातातली पैशाची पिशवी हिसकावून घेतली.

आड उभा राहून पहात असलेला खरा भीमू बुरखेवाल्यावर तुटून पडला. बुरखेवाला तयारच होता. त्याने भीमूला घट्ट आवळून धरले. रामशास्त्र्यांनी दोरीने भीमूचे हात-पाय बांधून टाकले.

शंभूने बुरखा काढून फेकला. दोघांनी मिळून भीमूला शिपायांच्या हाती कैद करविले. भीमूच्या पाठोपाठ त्याचे अनुयायी कैद झाले. रामशास्त्र्यांचा मुलगा घरी परत आला. त्यांना दहा हजारांचे इनाम मिळाले.

"वास्तविक हे तुलाच मिळाले पाहिजेत, शंभू!" रामशास्त्री म्हणाले.

"ही गुरुदक्षिणा म्हणून घ्यावी!" शंभू म्हणाला.





# मांत्रिकाचा पोपट

कौशिकपूरचे महाराज वीरसेन यांची पट्टराणी शचीदेवी हिची एक लाख रुपयांची हिऱ्याची माळ चोरीला गेली. परंतु चोरीचा पत्ता लावणे कठीण झाले. कारण अंतःपुरात काम करणाऱ्या दास-दासींची संख्या पन्नासावर होती.

महाराजांनी अंतःपुरातील सर्व नोकरांना बोलावून सांगितले की ज्या कोणी ती माळ पाहिली किंवा उचलली असेल त्याने आणून दिल्यास त्याला शिक्षा तर होणारच नाही, इनाम मिळेल.

एके दिवशी महाराज दरबारात बसले असतां कोणीतरी साधू एक पोपट घेऊन राजाच्या दर्शनास आला.

साधू म्हणाला—"महाराज, मी एक मांत्रिक आहे. महाराणी सरकारांची हिऱ्याची माळ गेली असल्याचे ऐकतो. मी आपल्या मंत्रबळाने या पोपटाकडून माल चोरून देणाऱ्या चोराचे नाव सांगू शकेन!"

ते ऐकून राज्यसभेत एकदम नवे चैतन्य आल्यासारखे झाले. राजाने सर्वांना शांत रहायला सांगून साधूला विचारले—"चोर कोण आहे हे कळण्यापूर्वी तुमची मंत्रशक्ती तर आम्हांला पाहू द्याल? ती पाहून अर्थातच आम्हांला आनंदच होईल."

साधूने पोपटाला राजाजवळ नेऊन ठेवला व म्हणाला—"महाराज, आपण पोपटाला काही प्रश्न विचारून पहावा. तो लगेच बरोबर उत्तर देईल."

"आमच्या अंतःपुरात किती नोकर आहेत?" राजाने पोपटाला विचारले.

"त्रेपन्न!" पोपट म्हणाला.

"त्यांच्यापैकी काही जणांची नावे सांगशील का?" राजाने पुन्हां विचारले.

पोपटाने फार वेळ न थांबतां तत्क्षण काही नावे सांगितली.




लगेच दरबारात एकदम आश्चर्याचा ध्वनी उमटला.

राजाने दरडावीत लोकांना संबोधन करून म्हटले–"मी अजून अवधी देतो, कोणी माळ चोरून नेली असेल तर ती त्याने आणून द्यावी. मी वचन दिल्याप्रमाणे त्याला शिक्षा करणार नाही; उलट चांगलेसे इनामच देईन. हा पोपट चोर कोण आहे विचारल्याबरोबर सांगेल. तरी चोराला शिक्षा करण्याचा विचार माझ्या मनातही नाही. म्हणून चोराने स्वत: पुढे येऊन आपला अपराध स्वीकारून माफी मागावी."

दरबारातील प्रत्येक व्यक्तीने महाराजांच्या औदार्याची खूप प्रशंसा केली.

त्या दिवशी रात्री महाराज भोजन वगैरे झाल्यावर विश्रांती घेत पडले असतां एक शिपाई भीतभीत पुढे येऊन माळ महाराजांना देत महाराजांचे पाय धरून बसला व क्षमा मागू लागला. माळ परत मिळाल्याच्या आनंदात महाराज त्या वेळी त्याला एका शब्दाने देखील काही बोलले नाही. त्यानंतर मात्र त्यांनी त्याला हद्दपारीची शिक्षा देऊन पाठवून दिले.

चोराला धरण्यासाठी महाराजांनी स्वत: व त्यांचा प्रधान देववर्मा दोघांनी मिळून केलेली युक्ती कोणाला माहीत नव्हती.

साधूचा वेष करून आलेला साधू महाराणी सरकारांचा धाकटा भाऊच, म्हणजे महाराजांचा मेहुणाच होता. तो त्या देशातला नव्हता. तो पोपट त्याने पाळलेला पोपट होता. त्याला लहानपणापासून बोलायला शिकविले होते. तो कोणत्याही परिस्थितीत चोराचे नाव सांगणे शक्यच नव्हते. परंतु अंत:पुरातील काही नोकरांची नावे त्याला शिकवून ठेवलेली होती.

पोपटाला जवळ ठेवूनही महाराजांनी चोराला स्वत:चा अपराध कबूल करायला सांगण्यात विशेष औदार्य असे काहीच नव्हते. पोपट चोराचे नाव नक्की सांगू शकेल एवढा विश्वास उत्पन्न व्हावा, एवढाच हेतू होता.





# महाबली हनुमान

रामाने रथात उभा राहून बाण सोडायला सुरवात केल्यावर रावणाने रौद्ररूप धारण करून रामावर गांधर्वास्त्रांचा प्रयोग केला. दिव्यास्त्राची तोड दिव्यास्त्रच आहे. त्याप्रमाणे रामाने गांधर्वास्त्राचा प्रयोग करून ते निरुपयोगी करून टाकले. त्यानंतर रावणाने सोडलेल्या दिव्यास्त्राचे उत्तर रामाने दिव्यास्त्राने देऊन तेसुद्धां निरुपयोगी करून टाकले.

या खेपेस रावणाने रामावर राक्षसास्त्र नांवाच्या एका भयंकर अस्त्राचा प्रयोग केला. त्या अस्त्रातून बाहेर निघालेले अनेक विषारी सांप तोंडातून ज्वाळा ओकीत होते आणि ते राम होता त्या दिशेने पुढे पुढे येऊ लागले. रामाने लगेच त्यांच्यावर गरुडास्त्राचा प्रयोग केला. त्यांतून निघालेल्या गरुडपक्ष्यांनी त्याविषारी सांपाना पंज्यात धरून फाडून फेकून दिले.

ते पाहून रावण जास्तच चिडला आणि त्याने रामाच्या रथाचा सारथी मातली त्याच्यावर शरवृष्टी सुरू केली. एक शक्तिशाली मंत्रवलेला बाण सोडून रावणाने रामाच्या रथाचा ध्वजस्तंभ तोडून टाकला. नंतर आणखी काही बाण सोडून रथाच्या घोड्यांना घायाळ केले. देव, गंधर्व व तुंबरू आकाशातून रामरावणांचे ते भयंकर युद्ध पहात होते. दुष्ट रावण रामाला अशातऱ्हेने त्रास देत असलेला पाहून आणि देवेंद्राच्या रथाचा चक्काचूर करण्याचा रावणाचा प्रयत्न चालू असल्याचे ओळखून



त्यांना फार वाईट वाटले. वानरवीरांना रामरावणयुद्धात रावणाचा हात वर होतो की काय याची शंका वाटू लागली.

रामाचा वध करायला हीच उत्तम संधी आहे असा विचार करून इंद्राच्या वज्रायुधासारखे एक शूल रावणाने हातात घेतले. त्यातून धुराचे लोट व ज्वाला बाहेर येत होत्या. ते शूल पहायलाच भयंकर होते. राक्षसांना ते पाहून परमानंद झाला आणि ते घोळका करून उभे राहून रावणाचा जयजयकार करू लागले.

रावणाने ते ज्वाला ओकणारे शूल हातात घेतले व रामाला ते दाखवून म्हणाला—"ए रामा! हा पहा तुझा मृत्यू येतो आहे! या क्षणाला मी तुला आणि तुझ्या धाकट्या भावाला ठार करून शूर वीर राक्षसांचा तुम्ही दोघांनी वध केल्याचा सूड उगवणार आहे." असे म्हणत त्याने ते शूल रामावर टाकले.

रावणाने टाकलेल्या शूलातून निघणाऱ्या ज्वाला प्रलयकाळातल्या मेघगर्जनेसारखा आवाज करीत व विजा चमकतात तसा प्रकाश पाडीत रामावर चालून आल्या. रामाने सोडलेले सर्व बाण त्यांना लागताच भस्मीभूत होत होते. त्यांची राख आकाशात उडत होती. तेव्हां रावणाने सोडलेले ते अस्त्र किती भयंकर आहे हे रामाने ओळखले आणि इंद्राने रथाबरोबर पाठविलेल्या एका अस्त्राचा त्या शूलावर प्रयोग केला. ती शक्ती लागताच ते शूल दोन तुकडे होऊन जमिनीवर आदळले.

त्यानंतर मात्र रामाला त्वेष चढला व त्याने रावणावर अनेक प्रकारच्या अस्त्रांचा प्रयोग सुरू केला. आपण टाकलेली भयंकर शक्ती रामाकडून 'निरुपयोगी' झाल्याचे पाहून रावणाला फार वाईट वाटले. त्याचा उत्साह एकाएकी थंड पडला, इतका की राम एका मागून एक अस्त्र प्रयोग करीत होता, परंतु त्यांच्या पासून स्वतःचे रक्षण करण्याचे भानही रावणाला राहिले नाही. रावणाच्या सारथ्याने ते ओळखले व रणांगणावरून रथ पळवून दूर घेऊन गेला. ते पाहून राक्षसांनी हाःहाकार सुरू केला.

आपला रथ रणांगणावरून एकाएकी असा दूर गेलेला पाहून रावण आपल्या सारथ्यावर चिडला व म्हणाला—"अरे दुष्टा! माझ्या परवानगीशिवाय तू रणांगणावरून माझा रथ कां दूर नेलास? मी कोणी भितरा, असमर्थ कापुरुष आहे, असे का वाटले तुला? मला अस्त्र प्रयोग करतां येत नाही, युद्धात शौर्य, पराक्रम व जरूर असलेले युद्धचातुर्य माझ्यात नाही, असे वाटले का तुला? मूर्खासारखे तू हे काय केलेस? शत्रूकडून लाच खाल्ली आहेस की काय? तू माझी सर्व कीर्ती व प्रतिष्ठा मातीमोल केलीस. चल, हाक रथ युद्धभूमीच्या दिशेने."

रावणाने केलेली ती निंदा व निभर्त्सना ऐकून सारथी लहान तोंड करून व मान खाली करून रावणाला म्हणाला—"तुझ्या हिताचे समजूनच तुझ्या संरक्षणासाठी रथ रणांगणावरून दूर घेऊन गेलो होतो. रामाने जितक्या त्वेषाने आपल्यावर शस्त्रास्त्राचा प्रयोग सुरू केला आहे तितक्या त्वेषाने आपल्याकडून प्रत्युत्तर जात नसलेले मी पाहिले. आपण दमलेले होतां. घोडेसुद्धा दमलेले दिसले. म्हणून आपल्याला व त्यांना थोडी विश्रांती मिळेल या हेतूने मी



रथ बाजूला नेला. रणांगणावर रथ कसा व केव्हां चालवावा कळत नसते तर मी आपला सारथी कसा झालो असतो? आतां आपली काय आज्ञा आहे?"

सारथ्याने इतक्या नम्रपणे सर्व गोष्टी सांगितल्यावर त्याच्या राजभक्तीची रावणाला खात्री पटली. त्याने सारथ्याच्या प्रसंगावधानाबद्दल त्याची पाठ थोपटली व त्याला एक सुवर्ण कंकण इनाम देत म्हणाला—"मी या क्षणाला रामाचे रक्त आपल्या बाणाला पाजायला जात आहे. मी दमलो आहे असे मुळीच समजू नकोस आणि रथ त्याच्या समोर नेऊन उभा कर."



सारथ्यानं त्याप्रमाणे रथ हाकला आणि रामाच्या समोर नेऊन उभा केला. त्या वेळी राम फार दमून गेलेला होता. म्हणून रावणाशी युद्ध करण्याची त्या वेळेस त्याची इच्छा नव्हती. रामरावण युद्ध पहायला आलेल्या देवांच्या बरोबर अगस्ती मुनी आले होते. त्यांच्या लक्षांत ती गोष्ट आली. ते त्रिकालज्ञानी होते. ते रामाच्या जवळ येऊन म्हणाले–"रामा, तू दमला आहेस, तुझा शीण दूर करून पुन्हां तुझ्यात नवीन युद्धोत्साह उत्पन्न करण्यासाठी आदित्यहृदय नावाचे एक स्तोत्र मी तुला शिकवितो. ते एक सर्वोत्तम स्तोत्र आहे. त्याचा जप करून पुन्हां सर्व शक्ती एकवटून रावणाशी युद्ध कर." असे सांगून अगस्त्यांनी रामाला आदित्यहृदय स्तोत्र शिकविले आणि तेथून निघून गेले.

रामाने त्या स्तोत्राचा तीनदां जप केला आणि नवीन व उत्साहाने धनुष्यबाण घेऊन युद्ध करण्यासाठी पुढे आला.

राम, रथाचा सारथी मातली याला म्हणाला–"मातली! मी आतांमात्र रावणाचा नक्कीच वध करतो. तू फार सावधपणे आणि हुशारीने रथ चालविला पाहिजेस. तू देवेंद्राच्या रथाचा सारथी आहेस तेव्हां वास्तविक तुला काही सांगण्याची गरजच नाही, हे मला माहीत आहे. तरी तू थोडे देखील दुर्लक्ष करतां कामा नये. फार सावधपणे रथ हाकीत रहावास म्हणून मी आठवण करून दिली एवढेच."

मातलीने रथाच्या घोड्यांना खूण करतांच रथ जोराने हालला आणि इतकी धूळ उडाली की रावण धुळीच्या खाली झाकून गेल्यासारखा झाला. रावणाला फार राग आला. त्याने त्या रागाच्या भरात रामावर बाणांचा वर्षाव केला. राम त्याच्याकडे इंद्राने पाठविलेले धनुष्य बाण घेऊन रावणाशी भिडला.

रामरावणांचे भयंकर युद्ध सुरू झाले. दोन्ही पक्षातील वीर त्या दोघांचे भयंकर द्वंद्वयुद्ध भयचकित होऊन पाहू लागले. राम



रावण दोघेही हे त्यांचे शेवटचे युद्ध असे समजून युद्ध करू लागले.

अशातऱ्हेने काही वेळ युद्ध होत राहल्यावर रामाने प्रयोग केलेला एक अत्यंत तीक्ष्ण बाण रावणाला लागला व त्याचे डोके धडावरून छाटले जाऊन जमिनीवर लोळू लागले. परंतु लगेच धडावर दुसरे डोके दिसू लागले. रामाने आणखी एक बाण सोडून ते डोके देखील छाटून टाकले. ते खालीपडेपर्यंत रावणाला आणखी एक डोके आले.

अशातऱ्हेने रामाने एकशे एक वेळां रावणाचा शिरच्छेद केला. परंतु लगेच रावणाच्या धडावर एक नवे डोके उगवत होते. ते पाहून रामाला आश्चर्य वाटले. मागे त्याने दंडकारण्यात विराधाला, क्रौंचारण्यात कबंधाला ठार करण्यासाठी उपयोगात आणलेले बाणरावणाचा वध करण्यास कां निरुपयोगी होत आहेत, रामाला कळेना.

राम व रावण अशातऱ्हेने एक क्षणभर देखील विश्रांती घेतल्या शिवाय सात दिवस आणि रात्री द्वंद्वयुद्ध करीत राहिले. मातली हे सर्व पहात होता. रामाचे बाण रावणाच्या अंगाला लागूनही कां व्यर्थ होत होते हे त्याला माहीत होते. कारण रावणाचा मरणकाळ अद्यापी जवळ आला नव्हता.

आठव्या दिवशी रावणाचा अंतकाळ जवळ आला असल्याचे कळतांच मातली रामाला म्हणाला–"रामा, हीच वेळ चांगली आहे. आतां थोडा वेळही न दवडतां रावणावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून त्याचा वध कर."

मातलीने अशातऱ्हेने सावध केल्या बरोबर रामाने सापासारखा एक मोठा बाण हातात घेतला. तो दैदीप्यमान बाण एकदां ब्रह्मदेवाने इंद्रासाठी निर्मिला होता. तो फार जड होता. त्याला मोठे पंख होते. वज्रासारखी अत्यंत तीक्ष्ण आयुधे देखील छेदण्याची त्याच्यात शक्ती होती. रामाने त्या सर्वशक्तिमान अशा अस्त्राला वेदांत सांगितल्याप्रमाणे मंत्रवून धनुष्यावर ठेवून ते रावणावर सोडले. ते रावणाच्या छातीला भेदून त्याच्या पाठीतून पलीकडे जाऊन बाहेर आले. रावणाच्या हातातील धनुष्य व बाण खाली गळून पडले. त्याचे प्राण गेल्यामुळे तो रथातून जमिनीवर पडला.

आपला राजा मेलेला पाहतांच राक्षस छाती बडवून हा:हाकार करीत लंकेकडे धावले. वानर जयजयकार करीत उपटलेले वृक्ष व इतर शस्त्रास्त्रे घेऊन त्यांचा पाठलाग करीत जे कोणी समोर दिसले त्यांना ठार करीत निघाले.

रावणाचा वध होताच देवांनी दुंदुभी वाजवायला सुरवात केली. आकाशातून पुष्पवृष्टी सुरू केली. वानरांबरोबर आकाशातील देव, गंधर्व मगध सर्वांनी रामाचे स्तवन सुरू केले. सुग्रीवाला व अंगदाला परमानंद झाला. बिभीषण व वानरप्रमुख रामाच्या चारीबाजूला घोळका करून उभे राहिले व रामाच्या शौर्याची प्रशंसा करू लागले.

बिभीषणाला त्याच्या मोठ्या भावाच्या मरणाने फार दुःख झाले. सीतेचे अपहरण केल्यामुळे त्याला असे दुःखी करणारे मरण आले हे खरे असले तरी तो एक थोर पुरुष होता यात तिळमात्रही शंका नाही.



त्याने फार मोठी तपश्चर्या केली होती; तो एक थोर विद्वान व कर्मठ ब्राह्मण होता आणि अलौकिक शक्तिशाली व पराक्रमी वीर होता.

मोठा भाऊ वारल्यामुळे दुःखी होऊन विलाप करीत असलेल्या बिभीषणाला पाहून त्याला सांत्वना देत राम म्हणाला–"रावणाला भित्र्यासारखे मरण आले नाही, शूर योद्धयासारखा युद्ध करीत असतां तो रणांगणावर पडला. किती मोठा वीर असला तरी शत्रूच्या हाती मरण हे येतेच. शूरासारखे मरण येऊन वीरगती ज्याला मिळते त्याच्यासाठी शोक करण्याचे कारण नाही."

त्यानंतर रामाच्या अनुमतीने बिभीषण आपल्या थोरल्या भावाची अंत्येष्टी शास्त्रोक्त पद्धतीने करण्यासाठी तयारीला लागला. रावणाच्या मृत्यूची वार्ता कळतांच त्याच्या सर्व बायका अंतःपुरातून बाहेर आल्या आणि उत्तरेकडच्या दाराने रणांगणावर येऊन रणांगणावर जेथे रावणाचा देह होता तेथे येऊन पोचल्या. त्या रावणाच्या देहावर पडून छाती बडवून विलाप करू लागल्या. 'बिभीषणाने सांगितल्याप्रमाणे सीतेला रामाकडे पोचते केले असते तर ही विपत्ती टळली असती', असे म्हणत आक्रोश करू लागल्या. "त्रिलोक जिंकून देवांसारख्यांना नेमविणारा तू शेवटी एका सामान्य मानवाच्या हाती मृत्युमुखी पडलास." असे म्हणत मंदोदरी आक्रोश करून रडू लागली.

रामाने बिभीषणाला जवळ बोलाविले व म्हणाला–"बिभीषणा, या सर्व स्त्रियांना अंतःपुरात पाठव आणि आपल्या भावाची उत्तरक्रिया लवकर उरकून टाक."

शेवटच्या क्षणाला बिभीषणाच्या मनात एक धर्मसंदेह उभा राहिला. त्याचा मोठा भाऊ इतर सर्व बाबतीत इतका धर्मपरायण आणि ज्ञानी विवेकवान असूनही एका परस्त्रीचे अपहरण केल्यानेच एक नीच व दुष्ट म्हटला गेला. अशा थोर पुरुषाला आपल्यासारख्याने अग्निसंस्कार वगैरे क्रिया करणे धर्मविहित कार्य होईल का?

तो धर्मसंदेह त्याने रामासमोर व्यक्त केला तेव्हां राम रावणाच्या इतर गुणांची प्रशंसा करून म्हणाला–"अशा भावाची उत्तर क्रिया तुझ्या हस्ते होणे सर्व प्रकारे धर्मविहितच आहे."

ब्राह्मणांनी चंदनाची लाकडे आणून चिता रचली व तिच्यावर एक घोंगडी अंथरली. रावणाचा देह सर्वप्रकारे प्रेत संस्कार योग्य पद्धतीने सजवून चितेवर ठेवण्यात आला. बिभीषणाने अग्नी दिला. त्यानंतर त्याने स्नान करून तर्पण केले आणि रावणाच्या स्त्रियांना लंकेला पोचवून रामाकडे परत आला.



# दोषी सुलतानाची चवकशी



बंगाल प्रांतावर राज्य करीत असलेला पठाण जातीचा सुलतान गियासुद्दीन याला शिकारीचा नाद होता. तो आपल्या भव्य महालाच्या आसपास असलेल्या अरण्यातच मुक्काम करून शिकारीस जाई.



एके दिवशी उजाडतांच सुलतान शिकारीसाठी अरण्यात गेला. तेथे त्याला एक हरण दिसले. परंतु पळत्या हरणाची शिकार करणे तेवढे सोपे नव्हते. सुलतानाने कांही अंतर पळत जाऊन हरणाचा पाठलाग केला आणि नेम धरून बाण मारला. परंतु नेम चुकला आणि एका मुलाला लागला.



मुलाची किंकाळी ऐकून त्याची आई धावत आली. मध्यंतरी सुलतान सरळ आपल्या महालात निघून गेला होता आणि जखमी झालेल्या मुलाच्या उपचारासाठी त्याने हकीमाला पाठविले होते. परंतु सर्व प्रयत्न फुकट झाले आणि तो मुलगा मरण पावला.



मुलाच्या आईला तिच्या मुलाला बाण मारणारा सुलतानच होता हे माहीत नव्हते. ती सुलतानाच्या महालाकडे धावत गेली आणि तिने न्यायदानाची घंटा वाजविली. सुलतान गच्चीवर येऊन उभा राहताच तिने ओरडून निवेदन केले–"माझ्या मुलाला बाण मारून कोणी तरी त्याचा वध केला. ते अरण्य आपले आहे. म्हणून तो माणूस आपल्या पैकीच कोणी असला पाहिजे. अपराध्याला शिक्षा करावी.

सुलतान शांतपणे म्हणाला–"बाई ! अपराध्याची चवकशी करून त्याला शिक्षा करण्याचे काम काजी साहेबांचे आहे. तू त्यांच्याकडे गाऱ्हाणे घेऊन जा."





ती काजीकडे गेली व घडलेली गोष्ट सांगितली. बाण लागून मुलगा मेला त्या जागेचे नाव ऐकताच तो बाण सोडणारे सुलतानच असावेत असा विचार करून काजी दचकला. कारण त्या अरण्यात सुलतानाला सोडून दुसरा कोणी शिकारीला जात नसे. त्यांच्या वाटेला जाण्याची कोण छाती

त्यानंतर थोड्याच वेळाने सुलतानाने आपल्या नोकराच्या हाती काजीच्या नावी एक पत्र पाठविले. त्यात लिहिले होते–"मी हरणावर सोडलेला बाण मुलाला लागून तो त्याच्या मृत्यूला कारण झाला. तुम्हाला जे करणे योग्य वाटेल ते करावे." काजी विचार करू लागला–"सुलतानाचा हेतू यात बाहेर गौप्यस्फोट होऊ नये असा आहे का ?"





काजीने बराच वेळ विचार करून निश्चय केला आणि सुलतानाकडे न्यायस्थानावर हजर होण्यास निरोप पाठविला. ही गोष्ट कानोकान पसरली. सुलतान न्यायस्थानाकडे निघालेले पाहून प्रजा त्यांच्या पाठोपाठ निघाली.

सुलतान तेथे आल्याबरोबर काजी-शिवाय इतर सर्व मंडळी उठून उभी राहली. काजी विचार करू लागला–"सुलतानाने आपल्याला शिरच्छेदाची शिक्षा दिली तरी फिकीर नाही. मी निर्भयपणे चवकशी करून मुलगा गेल्याच्या दुःखाने दुःखी झालेल्या स्त्रीला न्याय देणार."













सुलतान समोर येऊन उभे राहल्यावर काजी म्हणाला–"तू अपराध स्वीकार केला आहेस. तुझ्या चुकीमुळे त्या मुलाला मरण आले. त्या मुलाच्या आईने तुला क्षमा केली तरच तुला क्षमा होईल. नाहीतर योग्य ती शिक्षा द्यावीच लागेल.



सुलतानाने लगेच त्या मातेजवळ क्षमा प्रार्थना करून नुकसान भरपाई म्हणून त्या बाईला पुष्कळ सोने मोहरांच्या रूपे दिले. तिने खूष होऊन सुलतानाला तिने क्षमा केल्याचे सांगितले.



काजी म्हणाला–"हुजूर, चवकशी झाली. आपणाबरोबर माझेही समाधान झाले?" सुलतान स्मित करीत अंग-रख्यातून एक कोरडा बाहेर काढीत म्हणाला–"बरोबर चवकशी केली नसतीत तर आपल्याला या कोरड्याने फोडून काढण्याचे ठरवून आलो होतो. आपल्या बद्दल मला किती अभिमान वाटत आहे." असे सांगून सुलतान

# गोष्ट मथळा चढाओढ

## या गोष्टीला उत्तम मथळा सुचवून रु. २५ मिळवा!

?

राजाच्या दरबारी कवीला सोमशेखर नावाचा एक मुलगा होता. तो कुशाग्रबुद्धीचा होता म्हणून लहानपणीच तो एक चांगला विद्वान झाला. एकदां तो दोघां योद्ध्यांचे खड्गयुद्ध पहात असतां त्याला वाटले की, शुष्क पांडित्य संपादन करून काय उपयोग? खड्गयुद्धात जे सौंदर्य व पौरुष आहे ते देखील संपादन केले पाहिजे. त्याप्रमाणे महाराजांच्या अनुमतीने त्याने सेनापतीच्या नजरेखाली खड्गविद्या शिकून त्यातही अद्भुत प्राविण्य संपादन केले.

इतक्यात सरहद्दीवरच्या रानटी जातीच्या लोकांनी बंडखोरपणा सुरू केला तेव्हां त्यांच्याशी युद्ध करणे आवश्यक होते. सेनापतीने सोमशेखरला आपल्या बरोबर बंडखोरांचा बिमोड करण्यासाठी नेले. तोंपर्यंत सोमशेखरने युद्ध कसे असते ते पाहिले नव्हते.

या युद्धात दोन्ही बाजूचे योद्धे हताहत होऊन रक्ताचे पाट वाहू लागलेले आणि प्रेतांचे ढीग होऊ लागलेले पाहल्याबरोबर सोमशेखर बेशुद्ध होऊन पडला. —लक्ष्मीजोशी

  

वरील गोष्टीला उपयुक्त होईल असा एक सुंदर मथळा विचार करून एका कार्डावर स्वतःच्या पत्त्यासह लिहून "गोष्ट मथळा चढाओढ", 'चांदोबा', चंदामामा प्रकाशन, २ व ३ अर्काट रोड, वडपळणी मद्रास ६०००२६ या पत्त्यावर पाठवा.

२० ऑक्टोबर १९७७ च्या आत पोस्टकार्ड पोंचले पाहिजे. त्या कार्डावर 'फोटो चढाओढ परिचय' देता कामा नये.

चढाओढीचा निकाल डिसेंबर १९७७ च्या चांदोबात जाहीर करण्यात येईल.

---

ऑगष्ट महिन्यातल्या चढाओढीचा निकाल (मथळा) "योग्यतेचा योग्य न्याय"

नांव : **गीता शांताराम पांडलोस्कर,** परळ दत्त समाज बिल्डींग, गोलजी हील रोड, मुंबई



# अमरवाणी

धर्मात् प्रच्युत शीलम्हि,
पुरुषम् पाप निश्चयम्
त्यक्त्वा सुखमवाप्नोति
हस्ता दाशी विषम् यथा ॥ १ ॥

[ धर्मच्युत आणि पाप करण्याचा (जणु) निश्चयच केला आहे अशा माणसाला सोडताना जो आनंद होतो तो हाताला विळखा घालून बसलेल्या सापाला सोडल्यावर होणाऱ्या आनंदासारखा असतो. ]

हिंसा, परस्व हरणे,
परदारा भि मर्शनम्
त्याज्य माहु र्दुराचारम्
वेश्म प्रज्वलितम् यथा ॥ २ ॥

[ हिंसा, परधनअहरण आणि परस्त्रीगमन करणाऱ्या व्यक्तीला, आग लागलेल्या घराला जसे (आपण) सोडतो तसे सोडले पाहिजे. ]

परस्वानाम् च हरणम्
परदारा भि मर्शनम्
सुहृदा मति शंकाच
त्रयो दोषाः क्षयावहाः ॥ ३ ॥

[ परधनाचे अपहरण, परस्त्रीगमन आणि सुहृद मित्रांवरचा संशय हे तीन दुर्गुण (स्वतःला)



# कावळा आणि घुबड

[ ५१ ]

दुष्ट मांजराच्या बोलण्यावर विश्वास करून मूर्ख ससा व तीतरपक्षी त्याच्याजवळ गेले. मांजराने दोघांवर एकदमच झडप मारली. त्याने एकाला आपल्या पंज्याने ठार केले आणि दुसऱ्याला आपल्या जबड्यात धरून खाऊन टाकले.

कावळ्याने ही गोष्ट सांगितली व म्हणाला—"दिवसा आंधळा असणाऱ्या घुबडाला तुम्ही आपला राजा केलेत, म्हणून रात्री आंधळे असणाऱ्या तुम्हांला अंधारात डोळस असणाऱ्या घुबडाच्या हाती मरणच लाभेल, एवढे निश्चित. म्हणून विचार करून पुढे काय करायचे ते ठरवा."

ते ऐकून पक्षी विचार करू लागले—'कावळ्याचे म्हणणे बरोबर दिसते आहे. आपण पुन्हा एकदा पक्ष्यांची सभा बोलावून आपला राजा कोण असावा, याचा निश्चय करू या.' असा विचार करून सर्व पक्षी आपापल्या घरट्याकडे निघाले.

तेव्हा, घुबडाची बायको नवऱ्याला म्हणाली—"दिलवरा! तुमच्या राज्याभिषेकाला कावळ्याने असा मोडता घातला आहे. सर्व पक्षी आपापल्या मार्गाने निघून गेले आहेत. परंतु कावळा एकटाच अजून येथे का आहे, नकळे. तर उठा तुम्हांला मी घरी पोचती करते."

ते ऐकून घुबड चिंतित होऊन कावळ्याला म्हणाले—"काय रे दुष्ट कावळ्या! मी तुझ्याविरुद्ध असे काय केले रे, तू माझ्या राज्याभिषेकाच्या ऐन वेळी असा मोडता घालायला? आजपासून तुझ्या जातीशी आमच्या जातीचे हाडवैर होणार! रान कापून जाळून टाकले तरी पाऊस पडल्यावर पुन्हा पालवी येऊन टवटवीत होते व



सर्वत्र हिरवळ होते. परंतु कठोर वचनांनी हृदयाला जी घरे पडतात ती कधी भरून येत नाहीत." असे सांगून घुबड आपल्या बायकोबरोबर आपल्या निवासस्थानाकडे निघून गेले.

त्यानंतर कावळा विचार करू लागला– 'आज मी कठोर वचन बोलून स्वत:वर फुकटचे शत्रुत्व ओढवून घेतले. स्थान, वेळ आणि परिस्थिती यांचा विचार केल्या-शिवाय ज्या वायफळ गोष्टी बोलल्या जातात त्या स्वत:च्याच अहिताला कारण होतात. त्यात दुसऱ्याच्या मनाला दुख-विणाऱ्या आणि त्याचे दोष दाखविण्यासाठी ज्या गोष्टी बोलल्या जातात त्या विष कालवल्यासारख्या मनाला [illegible]. कोणी किती ही शक्तिशाली किंवा विवेकशील असला तरी त्याने कोणत्याही परिस्थितीत जाणून बुजून कोणाशी वैर काढू नये. कोणी शाहणा माणूस विष उतरवायचा उपाय कळला म्हणून विषपान करील का? बुद्धिमानाने चारचौघां समक्ष केव्हा ही कोणाचा अपमान करू नये.'

स्वत:शी असा विचार करीत कावळा आपल्या घरट्याकडे निघून गेला.

घुबडाच्या राज्याभिषेकाला विघ्न आल्याचे ऐकून कावळ्यांचा राजा मेघवर्ण दु:खी होऊन म्हणाला–"हे फार वाईट झाले. आपल्या जातीशी कायमचे हाडवैर असलेली एक जात उभी झाली. राज-नीतीन, चातुर्य वापरून किंवा लबाडी करून हुशार घुबडांच्या जातीशी पुन्हा मैत्री करून घेणे शक्य होईल का?"

"कां नाही? मागे ठकांनी एका हुशार ब्राह्मणाला फसवून त्याचा एक बोकड कसा बळकावला होता, ती गोष्ट तुम्हांला माहीत नाही का?" स्थिरजीवीने विचारले.

"ठक व ब्राह्मणाचा बोकड, ही गोष्ट ऐकू दे तरी." मेघवर्ण म्हणाला. तेव्हा स्थिरजीवीने ती गोष्ट सांगितली.

मित्रवर्मा नावाचा एक कर्मठ ब्राह्मण होता. माघ महिन्याची कडक थंडी पडली [illegible] आणि बारीक बारीक थेंब पडू लागले होते. तेव्हा त्या ब्राह्मणाने मेषयज्ञ करण्याचे ठरविले. यज्ञासाठी एक बोकड, आणण्या-साठी तो दूरच्या एका गावी गेला. त्या गावच्या एका श्रीमंत माणसाकडे जाऊन म्हणाला–"यजमान! येत्या अमावास्येला मेषयज्ञ करावा म्हणत आहे. त्या यज्ञासाठी एका बोकडाची गरज आहे. तरी आपण एक बोकड देण्याची कृपा करावी." तेव्हां त्या श्रीमंत गृहस्थाने एक मोठा गलेलठ्ठ बोकड दिला. ब्राह्मण त्या बोकडाला उचलून नेऊ लागला. पण बोकड नव्या अनोळखी माणसाबरोबर चालायला तयार होईना. म्हणून ब्राह्मणाने त्याला उचलून आपल्या पाठीवरून दोन्ही खांद्यावर धरून बसविले आणि दोन्ही हातांनी त्याचे पाय घट्ट धरून ठेवले आणि आपल्या गावी निघाला.

बोकडाने स्वत:ला सोडवून घेण्यासाठी धडपड सुरू केली. तेवढ्यात तीन ठक तेथे आले. बोकडाला पाहून तो कसा पळवायचा या गोष्टींचा ते विचार करू लागले. त्यांनी त्या ब्राह्मणाला फसवून तो बोकड बळक-वायचा ठरविले. त्यांनी त्यासाठी एक युक्ती योजली आणि निरनिराळ्या वाटेने निघून गेले.

ब्राह्मण मोठ्या मुश्कीलीने थोडे अंतर चालून गेला असेल, एक ठक शेतकऱ्याचे सोंग करून येऊन म्हणाला–"अहो भटजी! आपण खाजऱ्या कुत्र्याला खांद्यावर उचलून काय नेता आहां? कोणी पाहिले तर काय म्हणतील? थोरामोठ्यांचं म्हणणं आहे की कुत्रा, कोंबडा व चांडाळ हे अस्पृश्य आहेत. तेव्हां आपल्या सारख्या थोर कर्मठ ब्राह्मणाने याला शिवता कामा नये."

ब्राह्मणाने त्याला खिसकावून विचारले– "काय रे, मूर्खा! तू बोकडाला कुत्रा म्हणतोस? तुला दिसत नाही का?"

"गुरुजी! तुम्ही व्यर्थ कावता आहां. तुम्हाला हरकत नसेल तर न्या त्या घाणेरड्या कुत्र्याला, माझे काय जाते?" असे म्हणत तो ठक निघून गेला.
















# १८९. प्राचीन सीरियातील एक देऊळ

सीरियातील बल्बेक जवळचे हे "वाकस" देवालय सर्वांत सुंदर व कमी पडके आहे. या देवालयाच्या अगदी नजीकपर्यंत 'क्रूसेडरां'नी स्वाऱ्या केल्या होत्या, परंतु ते या देवालयाच्या वाटेस गेले नाहीत.





# माया सरोवर

[ २१ ]

[त्याचा द्वाडवैरी कुंभाणजित ह्याचा जीवभक्षी वृक्षाने बळी घेतल्यानंतर जयशील सिद्धसाधकाबरोबर मायासरोवराच्या शोधार्थ निघाला. सर्पनखही त्यांच्या पाठोपाठ निघाला एका गुहेतून बाहेर येत असलेल्या वनमाणसाला जलग्रह नावाच्या पाण्यातल्या हत्तीने सोंडेत धरले असलेले त्यांना दिसले. पुढे–]

जलग्रहाला पाहून जयशील व सिद्धसाधकाला फार आश्चर्य वाटले. सर्पनख जलाश्वावरून उतरण्याचा विचार करीत म्हणाला–"जलशील व सिद्धसाधका! हा जलग्रह नावाच्या पाण्यात निवास करणारा हत्ती मकरकेतूचे वाहन असून त्याच्या अंगात फार शक्ती आहे. मकरकेतूने आपल्या शौर्यपराक्रमांमुळे मायासरोवरेश्वराकडून सेवकोत्तम ही पदवी संपादन केली आहे."

सर्पनखाने ते म्हटल्याबरोबर सिद्धसाधक "जय महाकाळ!" असा जयघोष करीत म्हणाला–"अरे, पापमाणसा! तोंड बंद कर, पाहू! तो मकरकेतू किती शूर व पराक्रमी आहे, हे आम्हांला माहीत नाही असे समजू नकोस. माझे पुढे वाहन होणाऱ्या अशा वनमाणसाला ठार करायला निघालेल्या त्या हत्तीला पहिल्याने ठार करून त्यानंतर त्याच्या मालकाला महाकालाच्या पायांवर



बळी देणार आहे मी." असे म्हणत तो गुहेच्या बाजूला पळत जाण्यासाठी उभा राहिला.

"साधका, थांब, घाई करू नकोस!" असे म्हणत जयशील आपला जलाश्व त्याच्याजवळ नेऊन हलक्या बारीक आवा-जात म्हणाला—"आपण माया सरोवरापर्यंत पोचायला उत्तम संधी चालून आली आहे. त्या मकरकेतूशी गोड बोलून आपण महा-राजांना पळवून नेलेल्या त्या मायासरो-वरेश्वराच्या जवळ पोचले पाहिजे. तू थोडा गप्प राहिलास तर!"

सिद्धसाधकाने वर उचललेला त्रिशूल खाली केला व म्हणाला—"तो मकरकेतू अजून जिवंत असलेच कशावरून? त्याच्या [illegible] खांद्याला मारलेला बाण यांच्या जखमामुळे तो केव्हांच मेला असेल. मालक मेल्यामुळे हा जलग्रह रानावनात व डोंगराळ प्रदेशात हिंडत असेल."

जयशील व सिद्धसाधक असे बोलत असता तिकडे गुहेच्या समोरच्या उघड्या मैदानात जलग्रह व वनमाणूस मोठमोठ्याने ओरडत परस्परांना ठार करण्यात मग्न होते. वनमाणूस जलग्रहाच्या सोंडेतून स्वतःची सुटका करून घेऊन त्याच्या मागच्या बाजूने जलग्रहाच्या पाठीवर चढले आणि आपल्या मुठींनी हत्तीचे गंडस्थळ फाडू लागले. आणि त्याचबरोबर आपल्या बळकट हातांनी जलग्रहाची दोन्ही थोबाडे फोडू लागले. इतक्यात हत्तीने त्याला आपल्या सोंडेत धरून खाली ओढले व त्याला जमिनीवर पाडून पायाखाली दाबा-यला निघाला.

"साधका! हे दोन्ही रानटी प्राणी परस्परांच्या जोडीचेच दिसत आहेत. कदाचित दोघे एकदम मरतील. मकरकेतू मेला असेल असे तू कां म्हणतोस? ते पहा, तिकडे गुहेच्या वरच्या बाजूला एक नाही, चौघेजण दगडावर उभे राहून जलग्रह आणि वनमाणसाची झुंज पहात आहेत." जयशील म्हणाला.

[illegible] दृष्टी वळवून पाहिले. जयशीलने म्हटल्याप्रमाणे तेथे तिघेजण उभे होते. त्यांच्यापैकी एक त्याच्या कपड्यांवरून मकरकेतू असल्याचे साधकाने ओळखले. परंतु तेथल्या, मकरकेतू शिवाय न ओळखता येणाऱ्या दोघांपैकी एकजण आश्चर्याने आणि दुसरा भयभीत होऊन आ वासून पहात उभा राहिला.

मकरकेतू सर्वांच्याकडे एकदां सहेतुक पहात, त्यांच्यापैकी एकजण जो अंगावर छान उपरणे टाकून, काळी लहानशी दाढी असलेला आणि हिरे माणके जडलेली सोन्याची मूठ असलेला एक दंड हातात धरून उभा होता त्याला म्हणाला—"वैद्य देव! जलाश्वावर बसलेला तो तरुण माणूस आहे ना, तोच जयशील! त्रिशूल हातात घेऊन जमिनीवर उभा आहे तो सिद्धसाधक आणि तो तिसरा दिसतोच आहे नाही का माझ्या अनुयायांपैकी एक, या सर्पस्वराचा मोठा भाऊ."

"मी आपल्या मोठ्या भावाला तो जिवंत असतां भेटू शकेन असे मला कधीच वाटले नाही." म्हणत सर्पस्वर निघालेला पाहून मकरकेतूने रागाने त्याचा हात धरून त्याला मागे ओढले व म्हणाला—"काय रे सर्पस्वरा! तुझे डोके ठिकाणावर आहे का रे? तो जयशील व तो सिद्धसाधक ते दोघे



एका तऱ्हेने आपले शत्रूच आहेत. तरी मायासरोवरेश्वराच्या आज्ञेप्रमाणे आपण त्यांच्याशी गोडीगुलाबीनेच बोलायचे व वागायचे आहे. त्यासाठी काय करायचे ते थोडे सावधगिरीने विचार करून करायला हवे." या शब्दात थोड्या कडक शब्दात सर्पस्वराला दटावून, हिरेमाणके मढवलेला दंड हात असलेल्या व्यक्तीस म्हणाला—"वैद्यदेवा! तुम्हांला काय वाटते, बोलला नाहीत?"

ती वैद्यदेव नावाची व्यक्ती एकदां खालच्या बाजूला आश्चर्याने पहात म्हणाली—"मकरकेतू! तू त्या मैदानात काय होत आहे ते पाहिले नाहीस वाटते?



तुझे जलग्रह वनमाणसाच्या हातचा मार खाऊनच नव्हे तर तू म्हणालास त्या जयशीलच्या तलवारीचा मार बसल्याने जीव सोडणार की काय वाटते आहे!"

मकरकेतूने मैदानाकडे मान वळवून पहात म्हटले–"अरे हो की! मायासरोवरेश्वरा!" म्हणत मोठ्याने ओरडत खाली धावत उतरून जाऊ लागला. त्याच्या पाठोपाठ इतर लोक जाऊ लागले. त्यांच्यात एकजण सुमारे पंचवीस वर्षे वयांचा असेल. त्याच्या उजव्या तुटलेल्या पायाच्या जागी लाकडी पाय बसविलेला होता. तो एक जाडजूड काठी घेऊन तिच्या मदतीने हळूहळू खाली उतरू लागला.

[illegible] बाळगून घेण्याच्या विचारात सिद्धसाधक होता ते हत्तीसमोर टिकाव धरण्याची उमेद कमी होत गेलेली पाहून तो आपले त्रिशूल उचलून मैदानाकडे निघाला. जयशील त्याला सावध करीत म्हणाला–"सिद्धसाधका! आपल्याला या वेळी एकट्या मकरकेतूचाच नव्हे तर त्याच्या बरोबर आलेल्या आणखी तिघांचा सामना करावयाचा आहे, हे लक्षात ठेवून थोडा सावध रहा!"

"जयशीला! आपण या लोकात कोणाला भिण्याचे कारण नाही. साक्षात् महाकालाच्या दासाने स्वतःच्या हाताने दिलेली महा शक्तिशाली तलवार तुझ्या हातात असतां आणि माझ्या हातातल्या त्रिशूलाचा प्रताप सांगण्याची गरजच नाही, तुला!" सिद्धसाधक म्हणाला.

सर्पनख त्यांच्या पाठीमागून जलाश्वावरून येत मोठ्याने ओरडून म्हणाला–"ऐका हो! त्या दोन्ही पैकी तुम्ही पाहिजे तर त्या वनमाणसाला ठार करा, परंतु त्या जलग्रहाच्या जिवाला धक्का पोचेल, असे काही करू नका. त्याचा मालक शूर व पराक्रमी आहे."

"तू म्हणतोस त्या शूर व पराक्रम्याला मी आपल्या त्रिशूलाने ठार करून त्याचे [illegible] गप्प रहा!" असं म्हणत साधक दात ओठ चावीत "जय महाकाल!" असे म्हणत पुढे धावला.

तो झुंजत असलेल्या क्रूर जनावरांच्या अगदी जवळ पोचायच्या आत जयशील जलाश्वावर त्या जनावरांच्या अगदी जवळ पोचला आणि जमिनीवर चित्त पडलेल्या वनमाणसाला जलग्रह सोंडेने धरणार इतक्यात त्याच्या त्याने सोंडेवर. तलवारीच्या मुठीने जोराने मारले. त्या धक्कयामुळे जलग्रह थोडा चवताळून ओरडला आणि जयशीलला धरायला पुढे सरसावला. परंतु जयशीलने शिताफीने जलाश्वाला चटदिशी जलग्रहाच्या बाजूला नेऊन जलाश्वावरून हत्तीच्या पाठीवर उडी मारली.

तेव्हा जलग्रह त्याचा शत्रू वनमाणसाला सोडून जयशीलला आपल्या सोंडेने धरण्याची खटपट करू लागला. तो सोंड मागे बाजूला वळवून जयशीलला धरण्याची खटपट करीत असतां जयशीलने डाव्या हाताने त्याची सोंड घट्ट धरून उजव्या हातातल्या तरवारीच्या मुठीने गंडस्थल बडवू लागला.

त्याच वेळी मकरकेतू तिकडे धावत आला. त्याला पाहतांच जयशील त्याला म्हणाला–"केतू! पहिल्याने तुझ्या या जलग्रहाला ठार करून नंतर तुझ्या समाचाराला येतो. तुझ्यासाठी मी आणि हा





साधक रानोमाळ हिंडत किती कष्ट सहन केले आहेत?"

"जयशीला! तुला पुण्य लागेल, जलग्रहाला ठार करू नकोस! या क्षणापासून आपण दोघे मित्र झालो. तुला मायासरोवराकडेजाण्याची वाट पाहिजे आहे, आणि तेथे पोचावयाचे आहे, होय ना? ती वाट मी दाखवितो." मकरकेतू म्हणाला.

ते ऐकतांच जयशील जलग्रहाच्या पाठीवरून उडी टाकून खाली आला व म्हणाला–"मला फक्त मायासरोवराला जायची वाटच नव्हे, तर तेथे बंदीस्त असलेल्या कनकाक्ष महाराजांच्या राज-

हवी आहे. तुला त्यासाठी येथे कोठल्या तरी गुहेत बांधून बंदी करून ठेवून, तुझ्याबरोबर आलेले हे मित्र आहेत त्यांच्या द्वारे मायासरोवरेश्वर कोठे आहे त्याची माहिती काढून घेतली तर कसे होईल?"

मकरकेतू काही उत्तर देणार तेवढ्यात साधक मोठ्याने म्हणाला–"जय महाकाळ!" आणि जयशीलाला पुढे म्हणाला–"तू म्हणतो आहेस ते काम फारच चांगले होईल! हा पळून जाऊ नये म्हणून याची शेंडी आणि केस कापून याला याचे हात पाय बांधून गुहेत फेंकून देऊ या, आणि या तिघांना वनमाणसाला आहारासाठी त्याच्या पुढे टाकू या." असे म्हणत वनमाणसाच्या छातीला कान लावून ऐकून आणि त्याची नाडी पाहून म्हणाला–"हे मेले नाही, पण त्या पाण्यातल्या हत्तीचा मार खाऊन बेशुद्ध होऊन पडले आहे. कोठे आहेस रे जलपक्षा सर्पनखा! धाव लवकर आणि कोठून तरी पाणी किंवा काहीतरी कापड पाण्यात खूप भिजवून घेऊन ये!"

सर्पनखाला अनावर राग आला, परंतु तो आवरून त्याने त्याची काय आज्ञा आहे या हेतूनें मकरकेतूकडे पाहिले. ते ओळखून सिद्धसाधक त्रिशूल घेऊन त्याच्या जवळ येऊन

मी! हं, तर चल आटप काम!"

मकरकेतू आतां एक शब्द देखील बोलल्याशिवाय गप्प उभा राहून किंकर्तव्य विमूढ स्थितीत असलेला पाहून सर्पनख लगेच निघाला आणि थोड्याच अंतरावरच्या ओढ्याकडे गेला. सिद्धसाधक मकरकेतूजवळ जाऊन म्हणाला–"काय रे केतू! तू आपल्याबरोबर आणखी तिघां पाणमाणसांना आणलं आहेस वाटतं?" असं म्हणत पुढे येत असलेल्या त्या तिघांना पाहून त्याने विचारले–"आश्चर्यच आहे, आणखी बरोबर एक लाकडी पाय घालून चालणाऱ्या लंगड्याला कशासाठी आणला आहेस?"

मकरकेतू म्हणाला–"साधका! तो आमच्या सारखा मायासरोवरात जन्माला येऊन वाढलेला नाही. तुमच्या सारखाच माणूस आहे. तो सुद्धा त्याला शक्य होईल तितका प्रयत्न करून तुमच्या कनकाक्ष महाराजांच्या मुलांना शोधत निघाला आणि रानांत वाघाशी झुंज झाल्यावर एक पाय घालवून बसला. त्याचे नाव मंगलवर्मा आहे."

"हिरण्यपूरच्या सेनापतींचा मुलगा मंगलवर्मा? जयशीलबरोबर प्रतिस्पर्धा करायला निघाला आणि वाघांसमोर टिकाव न लागल्याने भित्र्यासारखा पळालेला मूर्ख?" म्हणत सिद्धसाधक आश्चर्याने म्हणाला–"जयशीला, पाहिलंस,



हा लाकडी पाय घालून आलेला मंगलवर्मा आहे रे! ओळखलंस का?"

जयशीलने त्यापूर्वीच मंगलवर्माला ओळखले होते. परंतु मकरकेतू ज्याला 'वैद्यदेव' म्हणत होता त्या व्यक्तीला ओळखून आश्चर्यचकित झाला. मनात म्हणाला–"हा तर देवशर्मा!" आणि तोंडाबाहेर तो शब्द पडू न देता, ते ओळखलेल्या वैद्यदेवाला त्याने हळूच खूण केली की तुला मी ओळखले असल्याचे दाखवू नकोस?"

पाण्यासाठी ओढ्यावर गेलेला सर्पनख एक कापड भिजवून घेऊन आला आणि सिद्धसाधकाला त्याने ते दिले. साधकाने घाईघाईने ते पाणी नेऊन वनमाणसाच्या डोक्यावर पिळले व तळहाताने त्याच्या डोक्यावर जोराने थापटी मारून मोठ्याने ओरडला–"अरे वनमाणसा, तू खात्रीने जिवंत आहेस. ऊठ, ऊठ! या साधकाच्या तोंडातून निघालेली गोष्ट कधी खोटी ठरणार नाही!"

उघडले व चारी बाजूला एकदा पाहिले. नंतर दूर ओढ्याच्या काठी सोंड वर करून उभा असलेल्या जलग्रहाला पाहिले आणि मोठ्याने आरोळी ठोकून उठू लागले.

सिद्धसाधक त्याचा खांदा धरून त्याला थांबवीत म्हणाला–"अरे वनमाणसा! शांत हो! मी तुला प्राणदान दिले. या क्षणापासून तू माझा दास झालास, माझे वाहन झालास बरे का!"

वनमाणूस उठून उभे राहून, डोळे वटारून, दात किचकिचावून सिद्धसाधकावर झडप घालणार इतक्यात साधकाने त्याच्या कपाळावर जोराने एक चापट मारली. ती चापट मर्मीच बसली, इतकी की वनमाणूस थोडी कळ सोसून मागे फिरले व पळून जाण्याच्या बेतात पुन्हा मागे वळले व सिद्धसाधकाच्या समोर उपडे हात वर करून पडून राहिले. सिद्धसाधक स्वतःचा आनंद आवरू शकला नाही आणि आनंदाच्या भरात पोट धरून हसू लागला. (क्रमशः)





# ब्रह्मज्ञान

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, काही लोक स्वतःच्या योग्यतेबाहेर वागू लागतात व अपमानित झाल्यानंतर स्वतःची पायरी ओळखून आपला मान व प्रतिष्ठा यांचे थोडे फार रक्षण करू शकतात. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला जमदग्नी नावाच्या वेदांत सांगणाऱ्या व्यक्तीची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

प्राचीन काळी लक्ष्मीपूर नावाच्या गावी जमदग्नी नावाचा एक ब्राह्मण रहात असे. गरीबीने गांजून गेल्यामुळे त्याचे मन विरक्त झाले आणि त्याने एका थोर गुरूजवळ वेदांताचा अभ्यास केला. संन्यासाश्रमात दयानंद



हे नाव ग्रहण केले व विचार केला की आपल्या या ब्रह्मज्ञानाचा उपदेश आपल्या गावकऱ्यांना करून त्यांचा उद्धार केला पाहिजे. असे ठरवून तो आपल्या गावी परतला.

आपल्या गावातला एक उडाणटप्पू मुलगा एक ब्रह्मज्ञानी होऊन परतलेला पाहून गावकऱ्यांनी त्याचा यथायोग्य आदरसत्कार केला. दररोज संध्याकाळी गावातल्या देवळात त्याचे प्रवचन होऊ लागले. त्याच्या विद्वत्तेचा व ब्रह्मज्ञानाचा परिणाम गांवकऱ्यांवर फार पडला.

मानवाच्या आयुष्याचे ध्येय परमात्मा असे जे ब्रह्म आहे त्यात विलीन होणे हे आहे. फक्त मानवालाच ते शक्य होते, [illegible] गुरफटून राहण्यापेक्षा ईशचिंतनातच आपला वेळ घालविला पाहिजे. काम, क्रोध आदी षड्रिपूंना जिंकले पाहिजे. सर्व वेळ आध्यात्मिक कार्यात खर्च केला पाहिजे. तो निरनिराळी उदाहरणे व कथा सांगून आपली प्रवचने खूप रंगवीत असे. अशा तऱ्हेने दयानंदस्वामींची ख्याती जवळपासच्या पंचक्रोशीत खूप पसरली.

दयानंदाच्या प्रवचनांचा परिणाम असा झाला की गावकऱ्यांनी पोटापाण्यासाठी करावी लागणारी कामे कमी केली आणि पूजा, अभिषेक आणि भजनपूजनात जास्त मग्न होऊ लागले.

त्या गावात आधुनिक विज्ञानशास्त्राचा अभ्यास केलेला रघुनाथ नावाचा एक सुसंस्कृत माणूस होता. त्याला हे सर्व आवडले नाही. त्याने दयानंदस्वामीला भेटून विचारले–"लोक अकर्मण्य झाले आणि सर्वत्र आळसाचे राज्य पसरले तर जगाची कामे होणार कशी? भक्ती असावी परंतु नित्यनियमित कामेदेखील होत राहिली पाहिजेत." परंतु दयानंदस्वामीने त्याला असे सांगून गप्प केले की, जो देवाची मनोभावे सेवा करतो, त्याला देव कोणतीही उणीव भासू देत नाही. परंतु रघुनाथला ते कसे पटणार? गाव-

[illegible] टाकून त्यांना आळस सोडून आपली सर्व ऐहिक कर्तव्ये पुरी करण्यासाठी जरूर तो प्रयत्न करण्याचे त्याने मनाशी ठरविले. परंतु दयानंद गावात असेपर्यंत ते शक्य नाही हे ओळखून त्याने दुसऱ्या गावातील आपल्या मित्रांना सांगून दयानंदला त्यांच्या गावी निमंत्रण देवविले. दयानंदस्वामीने मोठ्या आनंदाने त्या गावी प्रस्थान केले.

दयानंद गाव सोडून गेल्याबरोबर रघुनाथने एका माणसाला देव अंगात आल्याचे सोंग करायला सांगितले. त्या माणसाने देव अंगात आल्यावर गांवकऱ्यांना सांगितले की ज्याच्या शेतात सर्वोत्तम पीक निघेल, देव त्याला प्रत्यक्ष दर्शन देणार आहे.

त्याचा परिणाम असा झाला की गावकरी आळस सोडून कामाला लागले. प्रत्येकाला वाटे की देवाचा साक्षात्कार आपल्यालाच घडला पाहिजे. त्या वर्षी शंभुदास नावाच्या शेतकऱ्याचे पीक सर्वोत्तम निघाले.

कापणी होऊन जेव्हा भात घरी आले त्याच्या दुसऱ्या दिवशी एक ब्राह्मण शंभुदासच्या घरी भिक्षेला आला. शंभुदासाने भरपूर भिक्षा घातली. ब्राह्मणाने प्रसन्न होऊन आशीर्वाद दिला की शंभुदासाला दीर्घ आयुरारोग्य लाभेल व लक्ष्मी सदैव त्याच्या घरी नांदेल.

त्या ब्राह्मणाला रघुनाथ गावाच्या वेशीवर भेटला व त्याने उत्तम प्रकारे कामगिरी बजावल्याबद्दल त्याला इनाम





दिले. त्यानंतर रघुनाथाने शंभुदासाच्या घरी येऊन त्याला एक अद्‌भुत चमत्कार घडल्याचे सांगितले.

शंभुदासाने कुतूहलाने विचारले—"असा काय चमत्कार घडला हो? ऐकू द्या तरी!"

रघुनाथ सांगू लागला—"मी आता थोड्या वेळेपूर्वी गावाच्या वेशीवर एका तेजःपुंज ब्राह्मणाला पाहिले. मी नमस्कार केला तेव्हा ते म्हणाले—'तुमचं गाव मला फार आवडलं, कारण येथे सर्वच लोक खूप मेहनत करून काम करताना दिसले.' मी त्यांना त्याचे कारण सांगितले आणि असे ही सांगितले सर्वात उत्तम

[illegible] शेतकरी शंभुदास आहे आणि तो ईश्वराचा साक्षात्कार व्हावा म्हणून वाट पहात आहे. तेव्हा ते म्हणाले—'मेहनत हीसुद्धा पूजाच आहे. शेतकरी शेतात काम करतो म्हणजे भूदेवीची पूजाच करतो. त्याच्या भक्तीबद्दल प्रसन्न होऊन अन्नपूर्णेने उत्तम पीक दिले. आजच त्याला देवाचा साक्षात्कार झाला आहे.' ते ऐकून मी चकित होऊन त्यांना विचारणार होतो की त्या साक्षात्काराची गोष्ट त्यांना कशी कळली? परंतु पापणी लवण्याच्या आत तो ब्राह्मण अदृश्य झाला. हा चमत्कार घडल्यावर मी विचार केला की येऊन तुम्हांला विचारावे की देवाचा साक्षात्कार तुम्हांला आज झाला होता का?"

तेव्हा शंभुदासाला वाटलं की आपल्या घरी आज भिक्षेसाठी आलेला ब्राह्मण देवच होता तर! त्याने तोच ब्राह्मण भिक्षा मागण्यासाठी आल्याचे सांगितले.

ती बातमी गावभर पसरली. देवाची वाणीच शंभुदासाने ऐकली होती. शेतात काम केल्याने अन्नपूर्णा प्रसन्न होते. सर्व गावकरी देवाच्या त्या वाणीवर विश्वास करू लागले. आणि अंग मोडून शेतकाम करण्याचे त्यांनी ठरविले.

काही महिन्यांनी दयानंदस्वामी आपल्या गावी परतले. त्यांना हे पाहून वाईट

[illegible] वेळ घायचे सोडून पुन्हा ऐहिक कर्मात गुंतलेले आहेत. त्यांनी पुन्हा आपल्या प्रवचनाला सुरवात केली. परंतु त्यांचे पहिलेच प्रवचन चालू असता रघुनाथने त्यांना प्रश्न विचारून पुरेसे करून सोडले. त्याने स्वामीजींना पहिला प्रश्न केला—"स्वामीजी! इतके मोठे जग पडले आहे, ते सोडून तुम्ही याच गावी प्रवचन करायला कसे काय आलात?"

"का, हे माझं जन्मस्थान आहे!" दयानंदस्वामींनी सहजी उत्तर दिले.

"म्हणजे तुम्हांला तुमच्या गावावर मोह व आसक्ती आहे. जर तुमच्या सारख्या थोर ब्रह्मज्ञानी पुरुषांना मोहापासून मुक्ती मिळाली नाही तर आमच्या सारख्या 'सामान्य जनांना ते कसे काय शक्य होईल?" रघुनाथाने विचारले.

"तसं म्हणशील तर मला अमुक अशा गावाचा मोह आहे, असे मुळीच नाही. मला कोठे तरी सुरवात करायला हवीच, नाही का?" दयानंदांनी आपली बाजू संभाळण्याखातर असे म्हटले.

"तुम्ही म्हणता इच्छा आणि वासनावर विजय मिळविला पाहिजे. मग तुम्ही म्हणलात तीसुद्धा तुमच्या मनातली एक इच्छाच तर आहे. अशी इच्छा करणे बरोबर आहे का?" रघुनाथने विचारले.

"निस्वार्थ बुद्धीने इच्छा करणे चुकीचे होणार नाही." दयानंद म्हणाले.














"तुमचं हे म्हणजे बरोबर आहे, तर या गावातले लोक जी अंगमेहनत करीत आहेत ती स्वतःच्या स्वार्थासाठी आहे असे कसे म्हणता येईल? ते आपल्या आई-वडिलांसाठी, बायका मुलांसाठी काम करीत आहेत. कोणी व्यक्ती दुसऱ्या एका व्यक्तीच्या सुखासाठी सेवा भावनेने काम करीत असेल तर ती ईश्वराची सेवाच नव्हे का? शेतात राबल्याने जो शरीर कष्ट होतो त्यामुळे परमार्थच होतो. ही ईश्वरसेवा नव्हे का?" रघुनाथने विचारले.

हे सर्व प्रश्न ऐकून दयानंदस्वामी संतापून म्हणाले—"तू आपल्या वितंडवादाने देवाची निंदा करीत आहेस. तुझ्यासारख्या मूर्खाच्या नादाला लागूनच लोक बिघडत चालले आहेत."

"तुम्ही षड्रिपूंना वश केलेत, परंतु तुमचे म्हणणे कोणी मान्य केले नाही तर तुम्हांला असा क्रोध कां येतो? आम्ही सर्व मेहनत करून, जी मिळकत होते तिच्यातील काही भाग तुमच्या सारख्यांना दान धर्म करण्यासाठी काढावाच लागतो. तेव्हां तुम्ही सांगू लागलात की आम्ही आपली सर्व कामे सोडून टाळकुटीत बसावे तर त्याबद्दल आम्हा सामान्य लोकांना किती राग यायला हवा, तुम्हीच विचार करा." रघुनाथ थोडासा त्वेषानेच म्हणाला.

दयानंदांजवळ या प्रश्नाचे उत्तर नव्हते. ते नरमले व हात जोडून नमस्कार करीत ते रघुनाथाला म्हणाले—"हे पहा, आजपर्यंत माझी समजूत होती की मी ब्रह्मज्ञानाचा अभ्यास करून वेदांताचे सार ओळखले आहे व प्रजेची थोडी फार सेवा करू शकेन. परंतु आतां माझा भ्रम दूर झाला आहे. माझं ब्रह्मज्ञान कोरेच ठरले आहे. मी यापुढे संन्यास आश्रमाचा त्याग करून सामान्य मानव जीवित जगण्याचा यत्न करीन."

रघुनाथाने त्यांना निराश न होता, गावातल्या मुलांना शिकविण्याचे काम [illegible] साठी गावकऱ्यांकडून आवश्यक सर्व तजवीज करून दिली.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! आपल्या अर्धवट वेदांताच्या भांडवलावर प्रजेला फसविणाऱ्या दयानंदाला मार्गावर आणून रघुनाथाने त्याला कर्मयोगी कां केले आणि त्याच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था कां करून दिली? तर्क करून त्याचा पराभव केला यासाठी का? की त्याच्या विद्वत्तेबद्दल त्याच्या मनात जो थोडा आदरभाव उत्पन्न झाला होता त्यामुळे? या प्रश्नांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर, तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"रघुनाथाने जमदग्नीच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था केली त्याची अनेक कारणे आहेत. पहिले कारण म्हणजे, जमदग्नीचे त्याच्या जन्मस्थानावर अपार प्रेम होते. त्या गावातच त्याला कळून आले की तो लोकांना कितीही ब्रह्मज्ञान सांगत असला तरी स्वतः कोरडा पाषाणच राहिला. त्याच्या सारख्या विद्वानाला मुलांना शिकविण्याचे काम देणे ही एक शिक्षाच म्हणावी लागेल. परंतु त्यानंतर दुसऱ्या गावात जाऊन आपल्या कोऱ्या ब्रह्मज्ञानाचा प्रचार करायला तो गेला नाही, हा फायदा झाला. म्हणूनच रघुनाथाने त्याला शिकविण्याचे काम देऊन गुंतविले होते. ज्या गावात जमदग्नी एक उडाणटप्पू मानला जात होता तो पुढे संन्यासी होऊन कोरा वेदांत सांगू लागला व लोकांना आळशी अकर्मण्य करू पहात होता. त्याच गावात शिक्षक म्हणून लोकादरास पात्र झाला हा त्याचा उद्धारच झाला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# विस्तवाची धग

गोपाळ राजा महेंद्रवर्मा याच्या दरबारातला एक विदूषक होता. तो फार हुशार व मस्कऱ्या होता. म्हणून महेंद्रवर्माच्या दरबारात नेहमी आनंदी वातावरण असे. राजा आपल्या विदूषकाला फार मान देई आणि कधी कधी त्याचा सल्ला घेत असे. त्याच्या गैरहजेरीत राजाला मुळीच करमत नसे.

हे सर्व असले तरी गोपाळच्या अंगात एक दुर्गुण होता. हात राखून त्याला खर्च करण्याची संवय नव्हती. तसा त्याला पगार चांगला मिळत होता. शिवाय त्याला पुष्कळ इनामे व बक्षिसे मिळत. परंतु त्याच्या हात नेहमी रिकामाच राही.

दिवाळीचा सण जवळ येत चालला होता. त्याला आपल्या जावयाला दिवाळसणासाठी बोलावणे आवश्यक होते. म्हणजे अहेर करायला हवा, पंचपक्वान्नांची जेवणे व्हायला हवीत. परंतु सर्व पगार पंधरादिवसातच संपून गेला आणि तो अक्षरशः 'ठणठण गोपाळ' झाला होता. तेव्हां त्याने आपला मित्र सोमनाथ जादुगाराचा सल्ला घ्यायचे ठरविले.

सोमनाथाने राजाकडून पैसे मिळवायला गोपाळला एक युक्ती चांगली शिकवून दिली.

गोपाळला दररोज दरबारात हजर व्हावे लागे. त्याने गमतीदार चुटके सांगून हसविल्याशिवाय दरबार संपतच नसे. परंतु एके दिवशी तो दरबारात आलाच नाही. त्याच्या गैरहजेरीचे कारण विचारून यायला राजाने नोकरांना पाठविले. नोकरांनी परत येऊन एक विचित्र गोष्ट राजाला सांगितली. म्हणे गोपाळने आपल्या घराच्या तुळईला एक शिंके बांधून त्यावर एका भांड्यात भात शिजवायला ठेवला आहे [illegible] पेटवून ठेवविली आहे. सैपाक झाल्यावर जेवून खाऊन तो दरबारात येणार आहे.

ते ऐकून राजाने विचारले—"गोपाळचे डोके तर फिरलं नाही ना? तुळईला बांधलेल्या शिंक्यावरचे भांडे जमिनीवरच्या विस्तवाने कसे काय तापणार?" असे म्हणत राजा स्वतः गोपाळच्या घरी गेला. गोपाळ खरोखरच तुळईला भांडे बांधून ठेवून त्याच्या खाली जमिनीवर विस्तव पेटवीत बसला होता.

गोपाळने चकित होऊन विचारले—"सरकारस्वारी स्वतः आली आहे? ह्या भांड्यात भात शिजल्याबरोबर मी जेवून सेवेला हजर होणार होतो!"

"गोपाळ! तू ही काय थट्टा चालविली आहेस? या विस्तवाची धग त्या भांड्यापर्यंत कशी रे पोचणार? आयुष्यभर तू वाट पहात राहलास तरी भात शिजणार नाही." राजा म्हणाला.

परंतु गोपाळ लगेच म्हणाला—"आपण असे कां म्हणतां? आंच पोचली नाही तर मी आपले नाव बदलून देईन."

"तू दरबारात येऊन हे सिद्ध करून दाखविलेस तर मी तुला शंभर मोहारा इनाम देईन." महाराज म्हणाले.

गोपाळला तेच हवे होते. म्हणाला—"महाराज! मी उद्यां भरल्या दरबारात हे सिद्ध करून दाखवितो. आज मी जेवल्याशिवायच आपल्याबरोबर निघतो."



दुसऱ्यादिवशी गोपाळ दरबारात एक भांडे, झाकण आणि थोडे तांदूळ घेऊन आला. त्याने भांडे प्रधानाला देऊन नीट पाहून घासून साफ करवून घ्यायला सांगितले. नंतर त्याने त्यात तांदूळ घालून पाणी ओतले आणि झाकण घालून बंद केले. ते भांडे एका शिक्यात ठेवून ते शिंके धरून उभे रहायला एका दरबाऱ्याला सांगितले. नंतर आठ दहा फुटांवर एक मेणबत्ती पेटवून ठेवली.

"या मेणबत्तीची धग लागून भांड्यांतले तांदूळ शिजून भात तयार होणार आहे." गोपाळ म्हणाला.

त्यानंतर त्याने शिंके धरून उभा असलेल्या दरबाऱ्याला विचारले–"भात खदखदण्याचा आवाज ऐकू येतो आहे का?"

दरबारी जवळ कान नेऊन चकित होऊन म्हणाला–"महाराज! खरोखरच खदखदण्याचा आवाज येतो आहे!"

महाराजांनी भांड्याला हात लावून पाहिला ते चांगले तापले होते. ते गो[illegible] वचन दिल्याप्रमाणे या शंभर मोहोरा!" असे सांगून त्याला शंभर मोहरा दिल्या.

दिवाळसण छान थाटाने झाला. गोपाळच्या जावयाबरोबर जेवायला इतर मित्र मंडळीसुद्धा हजर होती. मेजवानीला सोमनाथसुद्धा हजर होता. गोपाळने सोमनाथला दहा मोहरा प्रेमाची भेट म्हणून दिल्या.

सोमनाथने गोपाळला सांगितली ती युक्ती काय होती? पांढऱ्या चुन्याचे खडे फोडून तांदळा एवढे बारीक केले आणि ते तांदुळात मिसळून ठेवून दिले. वरवर पाहणाराला तांदूळच दिसतात चुन्याचे खडे दिसत नाहीत. पाणी ओतून झाकण बंद केले व मेणबत्ती पेटवून कोठेही ठेवली तरी चुन्याचे खडे पाण्यात विरघळण्यापूर्वी खदखदण्याचा आवाज होणार व भांडे गरम होणारच!

मात्र महाराजांना व दरबाऱ्यांना वाटले की भात शिजतो आहे.

# खरं पिशाच

एकदा स्मशानात भुतांच्या मनांत ही शंका उत्पन्न झाली की पिशाच जास्त दुष्ट असतात की माणसे? सर्व तरुण भुतांचं म्हणणं होतं की भुतांची शक्ती माणसांपेक्षां फार जास्त आहे. भुतेच जास्त दुष्ट व क्रूर असतात.

ते ऐकून एका वृद्ध पिशाचाने सुचविले की प्रत्यक्ष अनुभव घेऊनच या गोष्टीचा निर्णय करणे शक्य आहे. म्हणून दोघातिघा भुतांनी माणसांच्या वस्तीत काही काळ राहून आपला अनुभव सांगावा. ती परत आल्यावरच खरं काय ते कळेल. त्याने तिघां अनुभवी पिशाचांना त्या कामावर नेमले. भुतांनी परत येऊन माणूसच जास्त दुष्ट असल्याचे सांगितले. त्यांपैकी एक म्हणाले–"माणसे चोरी करतात, जुगार खेळतात व दारू पितात. आपल्याला या तिन्हीपैकी एकाचीही माहिती नाही."

दुसरे म्हणाले–"माणूस दुसऱ्याला फसवितो, दुसऱ्याचे वाईट चिंतितो."

तिसरे म्हणाले–"आपल्यात जशी मैत्री व भ्रातृभाव आहे तसा माणसात नाही. ते आपल्या भाईबंदांना त्रास देतात."

ते ऐकून वृद्ध पिशाचाने निवाडा दिला–"खरे पिशाच माणूसच आहे!"











# सल्लागार

फार पूर्वी एका राजाच्या पदरी राजाला सल्ला देण्यासाठी एक सल्लागार काम करीत असे. त्याला साठावे वर्ष लागले होते. नियमाप्रमाणे साठावे वर्ष पूर्ण होताच प्रत्येक सरकारी नोकराला निवृत्त व्हावे लागे. त्या नियमाप्रमाणे राजाच्या सल्लागाराने आपल्या जागी दुसऱ्याला नेमण्याची राजाला विनंती केली. म्हणाला–"महाराज! मी गेली पसतीस वर्षे मनोभावे आपली सेवा केली आहे. गेली दहा वर्षे मी आपल्या मुलाला आवश्यक शिक्षण देत आलो आहे. त्याने या पदावर काम करण्यालायक योग्यता संपादन केली आहे. तेव्हां त्यालाच आपण आपला सल्लागार नेमण्याची कृपा करावी."

राजा हसून म्हणाला–"तुम्ही माझे सल्लागार आहांत, आणि तुमचा तसा सल्ला असेल तर तो मला मान्यच आहे. मी तुमच्या मुलाला सल्ला विचारीत जाईन आणि त्याच्या कामाबद्दल मला खात्री झाली म्हणजे मी त्याला या जबाबदारीच्या पदावर काम करायला नेमेन."

त्याप्रमाणे वृद्ध सल्लागाराच्या पदावर त्याचा मुलगा तात्पुरता काम करू लागला.

काही दिवसांनी राजाने आपल्या नव्या सल्लागाराला बोलावून विचारले–"मला हेराकडून कळले आहे की शेजारचा राजा स्वारी करण्यासाठी तयारी करीत आहे. तर या परिस्थितीत आपण काय करावे?"

नव्या सल्लागाराने सल्ला देण्याऐवजी विचारले–"आपल्या मते काय करणे बरोबर होईल?"

राजा म्हणाला–"शत्रू स्वारी करील त्या पूर्वीच आपण स्वारी करावी?"

"फार छान! तेच योग्य होईल!" नवा सल्लागार म्हणाला.

[illegible] जगाला कसा कळेल? लोक आपलीच चूक दाखवितील. आपलीच प्रजा दोष देईल की विनाकारण शेजाऱ्यावर स्वारी करून त्याचे शत्रुत्व आपण स्वतःवर ओढवून घेतले आहे. प्रजा आपल्या विरुद्ध उलटेल ही!" राजा म्हणाला.

"आपले म्हणणे रास्त आहे. प्रजेची सहानुभूती हवी असेल तर आपल्याला तसे करणे बरोबर होणार नाही." नवा सल्लागार म्हणाला.

"आपण स्वारी न करता रसद, दारूगोळा तयार ठेवून गुप्तपणे शत्रूला तोंड देण्यासाठी सर्व तयारी केली तर बरे होणार नाही का? शत्रूने अकस्मात् स्वारी केली तर त्याला पिटाळून लावून त्याच्या-वरच उलटी स्वारी करता येईल! तुम्हांला काय वाटते?" राजाने विचारले.

"ही कल्पना फारच चांगली आहे. याला म्हणतात चाणक्यनीती!" नवा सल्लागार म्हणाला.

राजाने आपल्या नव्या सल्लागाराला निरोप दिला व जुन्या सल्लागाराला बोल-वून म्हणाला–"हे पहा, मी विचार करून अनुभव आल्याने सांगत आहे, सल्लागाराचे पद वंशपरंपरागत होऊ शकत नाही. कारण सल्ला देण्याची योग्यता ही वंश-परंपरागत नसते. जात्याच एकेक व्यक्तीत असते. तुम्ही आपल्या मुलाला निर-निराळ्या परिस्थितीत काय करावे याचे शिक्षण दिले असेल. परंतु कोणत्या प्रसंगी कोणता उपाय करावा हे तुमच्या मुलाला कळलेले नाही. त्याला एखाद्या प्रसंगी सल्ला विचारावा तर शेवटी आम्हांला स्वतःच त्या प्रसंगातून बाहेर पडण्यास तोड सांगावी लागत आहे. एकाच समस्येची निरनिराळ्या प्रसंगी निरनिराळी उत्तरे होऊ शकतात. त्यातले बरोबर उत्तर निव-डण्याचा विवेक सल्लागारात असला पाहिजे. तो आपल्या मुलात मुळीच नाही. तेव्हा या पदावर मी त्याला नेमले नाही. त्याच्या लायक दुसरे काम शोधून त्याला नेमतो













# अघटित

फार प्राचीन काळी कलिंग देशावर आनंदवर्धन नावाचा राजा राज्य करीत असे. त्याच्या पट्टराणीला अनेक वर्षे काही मूल झाले नाही तेव्हां सिंहासनाला वारस हवा म्हणून राजाने दुसरे लग्न केले. त्यानंतर लवकरच दुसरी राणी गरोदर असल्याचे कळले. राजा व प्रजा दोघांच्या आनंदाला पारावार नव्हता. त्याच सुमारास थोरली राणीसुद्धा गरोदर असल्याची शुभवार्ता कळली. सर्वांचा आनंद द्विगुणित झाला.

राजाचे प्रेम दोघां राण्यांवर सारखे होते. त्याच सुमारास एक अघटित घडल्याची बातमी राजवाड्यात पसरली, म्हणे एका हत्तिणीला एक घोडा झाला. ती बातमी ऐकून सर्व चकित झाले. परंतु कलियुगात असे काही अघटित घडले नाही तरच आश्चर्य!

नंतर काही दिवसांनी दोघी राण्या एकाच दिवशी आणि एकाच वेळी बाळंत झाल्या. थोरल्या राणीला एक सुंदर पुत्ररत्न झाल्याचे कळले, परंतु धाकट्या राणीच्या पोटी एक मांजर जन्मल्याचे समजले. लोकांनी विचार केला कलियुगात हत्तिणीच्या पोटी घोडा जन्मला तशी धाकट्या राणीच्या पोटी एक मांजर जन्मले असेल. परंतु सिंहासनाला वारस जन्मला होता, म्हणून राजा खूष होता.

हे अघटित घडल्यानंतर काही दिवसांनी एक ज्योतिषी राजाच्या दरबारात आला. त्याला भूत भविष्य काळातल्या गोष्टी सांगता येत होत्या, म्हणे. राजाने त्याला आपल्या युवराजाची जन्मकुंडली तयार करायला सांगितले.

ज्योतिषी थोरल्या राणीच्या महालात गेला व युवराजाची जन्मकुंडली तयार करून म्हणाला—"महाराणी! युवराज आपल्या मातेच्या मांडीवर वाढणार नसून दुसऱ्या कोणत्यातरी स्त्रीच्या दुधावर वाढणार आहे. नंतर मुलाची जन्मकुंडली ग्रहदोषांनी भरलेली आहे. म्हणून त्याला वाढविणारी त्याची ही सावत्र आईसुद्धा फार दिवस जगणार नाही."

ते ऐकून थोरली राणी घाबरून विचारू लागली—"या संकटातून सुटका व्हायला काही तोड नाही का?"

ज्योतिषी म्हणाला—"महाराणी! शांत करून दुष्ट ग्रहांना प्रसन्न करणे फुकट आहे. फसवून काही तरी थातुर मातुर करून पैसे मिळविणारा फसव्या ज्योतिषी मी नाही.

"मग काय तो मार्ग तुम्हीच सुचवा ना!" राणी म्हणाली.

"या मुलाला पाळणारी बाई मेली तर या मुलावर त्यानंतर कोणतीही आपत्ती येणार नाही. तेव्हां मुलाला वाचविण्यासाठी एका बाईचा बळी दिलाच पाहिजे." ज्योतिषी म्हणाला.

मोठ्या राणीने थोडे पैसे देऊन ज्योतिष्याला निरोप दिला आणि तान्ह्या युवराजाला घेऊन धाकट्या राणीच्या महालात गेली. धाकटी राणी आपल्या पोटी मांजर जन्माला आल्याबद्दल दुःखी मनाने बसलेली होती. तिला थोरली म्हणाली—"हे पहा, बाई! मी सर्व ऐकले, त्याबद्दल मला फार वाईट वाटत आहे. हा मुलगा आपणां दोघींचा आहे. तुम्हीच ह्याला आपल्या मांडीवर वाढवा."











धाकटी राणी थोडी रागाने म्हणाली– "बाई! दुष्ट ग्रह असलेल्या मुलाला वाढवून मी आपल्या जीविताचे वाटोळे करू म्हणता का?"

थोरली राणी पेचात पडली. तिला खरी गोष्ट उघड करून सांगणे आवश्यक वाटले. म्हणून म्हणाली–"बाई! मी खरी-गोष्ट सांगितली नाही, त्याबद्दल मला क्षमा करा! हा मुलगा खरोखरी तुमचाच आहे. तुम्ही गरोदर राहिलात. तेव्हां माझ्या पोटात गोळा उठला. तुम्ही राजमाता झालात तर मला कोण विचारणार? म्हणून मी एक नाटक रचले. मीसुद्धा गरोदर असल्याची अफवा उडवली. माझ्या बोलण्यावर कोणाचा अविश्वास होऊ नये यासाठी मी आणखी एक अफवा उडविली की एका हत्तिणीच्या पोटी घोडा जन्मला आहे. मी तुमच्या बाजूला मांजराचे पिल्लू ठेवून तुमच्या मुलाला आपल्या खाटेवर आणविले. मला त्याबद्दल फार वाईट वाटते. तुम्ही स्वतःच्याच मुलाला संभाळा!"

धाकट्या राणीने आपल्या मुलाला मांडीवर घेतले व म्हणाली–"अक्का! तुम्ही ती गोष्ट मनाला लावून घेऊ नका! पहिल्याने माझ्या मनात तुमच्यावर थोडा-देखील संशय नव्हता. परंतु माझ्या खाटे-वर मांजराचे पिल्लू पाहून व माझ्या पोटी ते जन्मलेले ऐकून तुमच्यावर मला संशय वाटू लागला. नंतर जुन्या गोष्टी आठवल्या. तुमच्या गर्भारपणाची व हत्तीच्या पोटी घोडा जन्मल्याची गोष्ट खोट्या बातम्या असल्याचे कळल्यावर संशय जास्तच वाढला. खरी गोष्ट कळावी म्हणूनच मी एकाला ज्योतिषी म्हणून तुमच्याकडे पाठविले होते. त्याने मी देऊ केलेल्या इनामा खातर मी सांगितल्याप्रमाणे केले. मी रचलेले नाटक यशस्वी झाले. तुमच्या म्हणण्याप्रमाणे हा मुलगा आपल्या दोघींचा आहे. तेव्हां तुम्हांला यापुढे मनाला लावून घेण्यासारखे काही उरलेच नाही. माझे नाटक हे तुमच्या नाटकाचे फक्त उत्तर होते. म्हणून झाले गेले विसरून जा."





# किंजल्प पक्ष्यांचे जोडपे

फार प्राचीन काळी काशीच्या राजाच्या पदरी उग्रसेन नावाचा एक मंत्री होता. त्याचा मुलगा जयसेन एक उडाण-टप्पू खुशालचेंडू तरुण होता. एकदां तो आपल्या गुंड मित्रांबरोबर काशीच्या गल्लघातून फिरत असता त्याची नजर राजपुरोहित पुष्य यांची पत्नी पद्मिनीवर पडली. तिचे अप्रतिम सौंदर्य पाहून त्याने तिची शिकार करण्याचे मनाशी ठरविले.

काशीनगरीत तटिल्लता नावाची एक कुंटीण होती. ती दोघां परकी स्त्रीपुरुषांच्या भेटीगाठी करवून देण्यात हुशार होती. जय-सेनने तिला पद्मिनीला त्याच्या जाळ्यात फस-विण्यासाठी सांगितले. तिने विचार केला मदत केल्याचा फायदा पुढेमागे काहीतरी होईलच. परंतु मंत्र्याला कळविल्याशिवाय उलाढाल्या केल्या तर आपलाच गळा फसू नये या हेतूने तिने उग्रसेनाला भेटून त्याचे मत विचारले.

मंत्री ते ऐकून रागावण्याऐवजी थोडा खूषच झाला. त्याने तटिल्लतेला ती कामगिरी चोख बजावायला प्रोत्साहन आणि अगाऊ इनामही दिले. महाराजांची मर्जी मंत्र्यापेक्षा पुरोहितावरच जास्त होती. त्यामुळे पुष्य त्याच्या डोळ्यात सलत होता. त्याच्यावर काहीतरी कुभांड रच-ण्याच्या विचारात तो असता ही नवीन संधी चालून आली. पुष्य व पद्मिनी दंपती आदर्श पतिपत्नी म्हणून राजधानीत प्रसिद्ध होते. बायकोमुळेच पुष्यचा नाव-लौकिक वाढला होता. तेव्हा पुष्यची बायको दुराचरणी आहे हे सिद्ध झाले तर पुष्यचा काटा दूर होईल असे त्याला वाटत होते.

तटिल्लता पद्मिनीला भेटायला गेली. परपुरुषगमनार्थ तिचे मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहिला. पद्मिनीने जास्त



विरोध केला नाही. फक्त एवढेच विचारले की तिच्याशी प्रेम करणारी ती व्यक्ती कोण आहे? तटिल्लता आनंदाने म्हणाली– "तुझ्यावर जीव ओवाळून टाकायला तयार झालेली व्यक्ती म्हणजे मंत्री उग्रसेनाचा मुलगा जयसेन आहे."

"परंतु कोणी हे पाहिले किंवा कोणाला ते कळले तर?" पद्मिनीने विचारले. परंतु तटिल्लतेने त्या बद्दल तिला निश्चिंत रहायला सांगितले.

त्यानंतर तटिल्लता उग्रसेन मंत्र्याला म्हणाली–"आपण कारण काढून पुरोहिताला चार दिवस राजधानीबाहेर पाठविण्याचा उपाय करावा."

उग्रसेन लगेच महाराजांच्या दालनात गेला. म्हणाला–"महाराज! मी किंजल्प नावाच्या पक्ष्यांच्या एका विचित्र जोडप्यां-विषयी ऐकले आहे. ते माणसांच्या भाषेत बोलतात. ज्या राजाच्या जवळ तो किंजल्प पक्षी असतो तो चक्रवर्ती होतो. आपण लवकरच तो पक्षी मिळविला पाहिजे."

"ते पक्षी कोठे राहतात?" राजाने औत्सुक्याने विचारले.

"हिमालयातल्या एका गुहेत राहतात. त्यांना मंत्रबळाने वश करावे लागते. आपल्या राजपुरोहितांना हे काम करतां येण्यासारखे आहे." मंत्री म्हणाला.

त्यानंतर किंजल्प पक्ष्याला आणायला राजपुरोहिताला हिमालय पर्वतात पाठ-वायचे ठरले. राजाची आज्ञा होताच पुरोहित घरी आला. त्याच्या चेहऱ्यावर काळजी दिसत होती. ती ओळखून पद्मिनीने कारण विचारले. पुष्य म्हणाला–"किंजल्प पक्षी ही काय भानगड आहे, मला माहीत नाही. परंतु राजाज्ञेचे पालन करण्यासाठी मला हिमालययात्रेला निघाले पाहिजे."

"त्यात महाराजांचा हात जास्त असेलसे मला वाटत नाही. आपण हिमालय प्रवासाला निघण्याचे सकाळी सोंग करून निघा आणि काळोख पडल्यावर रात्री घरी [illegible] गोष्ट मी पाहून घेते." पद्मिनी म्हणाली.

पुरोहित बायकोच्या सल्लाप्रमाणे दुसऱ्या दिवशी उजाडताच हिमालय यात्रे-साठी निघाला आणि मध्यरात्र उलटल्यावर वेष पालटून घरी परतला. बायकोने सुचविलेल्या जागी तो लपून बसून राहिला.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी तटिल्लता जयसेनला बरोबर घेऊन राजपुरोहिताच्या घरी आली. पद्मिनी नटून थटून तयार होऊन बसली होती. तिने स्मित करून दोघांचे स्वागत केले. एका सुंदर रेशमी शाल अंथरलेल्या जागी दोघांना बसायला सांगितले. त्या आसनावर पाऊल टाकताच दोघे एका खड्ड्यात जाऊन पडले आणि ओरडू लागले. बसायला जी गादी घातली होती ती एका खड्ड्यावर अंथरलेली होती. पद्मिनीने त्या खड्ड्यावर फळी वगैरे टाकून तो खड्डा बंद केला. त्या दोघांना तीन दिवस त्या खड्ड्यातच पडून राहू दिले. दररोज दुपारी त्यांना खायला काहीतरी आणून खड्ड्यात टाकीत असे.

चवथ्या दिवशी तिने राजाकडे निरोप पाठविला की तिच्या पतीने मंत्रबळाने हिमालय पर्वतावर किंजल्प पक्ष्याचे एक जोडपे धरले आहे आणि राजधानीला परत येत आहेत. ती बातमी राजधानी भर पसरली. किंजल्प पक्ष्यांना पाहण्यासाठी राजाच्या पाठोपाठ प्रजादेखील निघाली. इकडे पद्मिनीने आपल्या नोकरांकरवी



आपल्या कैद्यांना खड्ड्यातून बाहेर काढविले. त्यांच्या अंगाला विविध रंगांच्या पक्ष्यांची पिसे चिकटविली आणि दोघांना लाकडाच्या एका पिंजऱ्यात बंद करून पिंजरा जंगलात नेऊन ठेवविला.

दुसऱ्या दिवशी राजपुरोहित किंजल्प पक्ष्यांना घेऊन आल्याचे व जंगलात राजधानी बाहेर पोचला असल्याचे वृत्त राजधानीभर पसरले. ती बातमी कळल्यावर महाराजांबरोबर मंत्री दरबारी आणि प्रजा सर्व पक्षी पहायला निघाले. पुरोहित पिंजऱ्यासह राजासमोर आला.

राजपुरोहित पुष्याने पुढे येऊन निवेदन केले–"महाराज! हेच ते पक्ष्याचे जोडपे आहे. यांपैकी एक नर आहे व एक मादी. दोन्ही माणसांच्या भाषेतच बोलतात. राजाने पिंजऱ्याच्या अगदी जवळ जाऊन पक्ष्यांकडे लक्षपूर्वक पाहिले. दोन्ही पक्ष्यांच्या कां कोणास ठाऊक माना खालीझालेल्या होत्या.

राजा म्हणाला–"परंतु मला तर ते अद्भुत पक्षी दिसत नाहीत. पक्ष्यांची पिसे

आहेत."

"महाराज किंजल्प पक्ष्यांची बरोबर माहिती आपले मंत्री उग्रसेन यांनाच आहे. त्यांच्याकडूनच सर्व माहिती विचारून घेण्याची कृपा करावी!" पुरोहित म्हणाला.

राजाने लगेच उग्रसेनाला समोर यायला सांगितले. आपल्या मुलाला व तटिल्लतेला पिंजऱ्यात त्या स्थितीत पाहून उग्रसेन थरथर कापू लागला आणि मान खाली करून काही बोलल्या शिवाय स्वस्थ उभा राहिला.

तेव्हा पद्मिनीने घडलेले सर्व वृत्त अथपासून इतिपर्यंत सांगितले. राजाने पद्मिनी व पुष्य दोघांची पाठ थोपटली. दुष्टांचा मानभंग इतक्या चातुर्याने साधल्याबद्दल पद्मिनीचा सत्कार केला.

उग्रसेनाला मंत्रीपदावरून काढून टाकण्यात आले आणि त्याचा मुलगा जयसेन याला आणि तटिल्लतेला तंबी देऊन राज्याबाहेर पाठवून दिले.



# मरणाची भीती

एकदा एका साधूच्या एका शिष्याने गुरूला आपल्या घरी भिक्षेसाठी बोलाविले. साधूला पंचपक्वान्नांचे जेवण घालून त्याने आपल्या गुरूला विचारले–"बुवा! सकाळपासून संध्याकाळपर्यंत अनेक पापे हातून घडतात. मग आपण पापरहित जीवन कसे काय घालविता?

"हे सर्व राहू दे! प्रथम हे लक्षात ठेव की तुझ्या घरात कोणीतरी एका आठवड्यात मृत्यूच्या दाढेत सापडणार आहे!" असे सांगुन साधू निघून गेला.

शिष्य घाबरून गेला. त्याने आपल्या कुटुंबातील सर्व लोकांना एकत्र करून, कुटुंबावर कोणाचे किती कर्ज आहे आणि कोणाकडून किती येणे आहे, हे सविस्तर समजावून सांगितले. त्यानंतर तो जपतप व अनुष्ठानाला बसला. रात्रंदिवस सर्व वेळ त्याने त्यातच घालविला. एक आठवडा संपला. साधूने सांगितलेला दिवस उजाडला.

साधूला भेटायला शिष्य निघाला. तेवढ्यात साधू येऊन पोचला.

साधूने शिष्याला विचारले–"बेटा! तू या आठवड्यात किती पापे केलीस?"

"बुवा! मृत्यूला समोर पाहून पापाकडे मन कसे वळणार? मी एकदेखील पाप केलेले नाही." शिष्य म्हणाला.

"मी, तुला मरण येईल असे सांगितले होते का? आज उद्या तुझी म्हातारी गाय मरणार आहे. तूच आपल्या प्रश्नाचे उत्तर दिले आहेस. माझ्यासारखे लोक मृत्यूला एक क्षणभरही विसरत नाहीत म्हणून पाप केल्याशिवाय जगता येते."





# कट

रामपूर गावातले शेतकरी अशिक्षित व भोळेभाबडे होते. कोणी त्यांच्यावर थोडा जरी उपकार केला तर ते दुप्पट किंवा तिप्पट प्रत्युपकार करीत व आयुष्यभर त्याच्याशी कृतज्ञ रहात. या भोळ्याभाबड्या शेतकऱ्यांना लुबाडणारे तीन जण त्या गावात रहात. पहिला होता, व्यंकोबराव कुळकर्णी, दुसरे होते गुणाजी पाटील व तिसरे होते दीक्षित वैद्यबुवा.

व्यंकोबराव शेताचे खरेदी व विक्रीखत तयार करताना काही तरी कारण सांगून म्हणे–"हे शेत असे कसे विकणार हो? नव्या कायद्याप्रमाणे वारसाने लिहून दिलेले हे अधिकारपत्र कुचकामाचे आहे.......... शिवाय तुम्ही कर जमा करायला जो उशीर लावला त्याचा दंड भरावा लागेल." परंतु तो मोठा देवभक्त असल्याचे सोंग उत्तम करी. लोकांचा त्याच्या भक्तीवर विश्वास पण बसे.

गुणाजी पाटील स्वतःला मोठा दानशूर म्हणवी. तो, गरीब शेतकऱ्यांच्या घरी कोणी मेले, लग्नकार्य असले किंवा शेतीची कामे थांबली असली तर कर्ज देई व दामदुप्पट व्याज वसूल करी. तो सहानुभूतीचा आव आणून म्हणे–"हे बिचारे कर्ज मागायला येतात. मी तरी ही एवढी इस्टेट बरोबर घेऊन जाणार आहे का?"

वैद्यबुवा लहानसहान ताप आला की तापांची निरनिराळी नावे घोकू लागत. नको ते औषध देऊन ताप वाढला म्हणजे म्हणत–"आतां सामान्य औषधे देऊन भागणारी गोष्ट नाही. सुवर्णभस्म द्यावे लागणार. माझ्या मेहनतीखातर काही खर्च करण्याचे कारण नाही. सुवर्णभस्म तयार करायला जो गोवऱ्यांचा व इतर खर्च होईल तेवढाच मी घेईन."

लुबाडीत. असाच एकदा व्यंकोबरावांचा मुलगा नरहरी एकाएकी आजारी पडला. त्याच्या लग्नाची तयारी चालू होती. अशा परिस्थितीत व्यंकोबरावांनी वैद्यबुवांकडे बोलावणे पाठविले.

वैद्यबुवा नरहरीची नाडीपरीक्षा करून सुस्कारा सोडीत म्हणाले–"व्यंकोबराव! हा आजार भयंकर आहे. सर्व अंगात विष व्यापलेले आहे. उशीर लावला तर जिवाला धोका आहे. अगस्त्यशास्त्रात वर्णिल्याप्रमाणे सुवर्णभस्माचा प्रयोग करावा लागणार. फक्त चार तोळे सोन्याची गरज आहे."

आपल्या मुलाच्या अंथरुणाजवळ उभी राहून सर्व प्रकार ऐकत असलेल्या पद्मावतीने चटदिशी हातातल्या पाटल्या काढून वैद्यबुवांच्या हातात दिल्या. बायको, विचारले तर काही कमी जास्त बोलेल या विचाराने व्यंकोबराव गप्प राहले.

एक आठवडाभर नरहरीच्या तब्येतीत फारशी सुधारणा झाली नाही. परंतु दुसऱ्या आठवड्यात ताप उतरला.

पुढे काही दिवसांनी वैद्यबुवा व्यंकोबरावांच्या घरी धावऱ्या धावऱ्या येऊन म्हणाले–"अहो व्यंकोबराव! माझ्या घरात चोरीझाली हो. चांदीसोन्या बरोबर मुलीच्या नावावर तिच्या नावाने पांच एकराची



नारळाची बाग लिहून ठेवली होती तो कागददेखील उचलून नेला हो! मी ती बाग तिच्या लग्नाच्या वेळी हुंडा म्हणून देणार होतो."

"वैद्यबुवा! माझ्याकडे तक्रारी आल्या आहेत की तो कागद खोटा आहे. तो कागद तुम्हीच लिहून तयार केलात आणि बहीण वारल्यावर तिच्या अंगठ्याचा खोटा ठसा त्यावर उमटवून ठेवलात. पोलीस ठाण्यावरून माझ्याकडे ठाणेदाराचे चवकशी करायला पत्र आले आहे." व्यंकोबरावांनी थाप मारली.

वैद्यबुवा घाबरले. रडक्या स्वरात म्हणाले–"वहिणीचे दीर व सासरची इतर

मंडळी तिच्या इस्टेटीचे वाटोळे करतील म्हणून मला हे सर्व करावे लागले. आतां तुम्हीच उद्धार केलात तर होणार."

व्यंकोबराव थोडा वेळ गंभीर विचारात गढल्यासारखे होऊन म्हणाले–"हे पहा, तुमच्या मुलीच्या नावावर लिहून ठेवलेला कागद कोणाच्या हाती लागला तरी त्याचा त्याला फायदा होणार नाही. परंतु तो हातात नसल्यामुळे तुमचा बागेवरचा अधिकार मात्र राहणार नाही. मी जिल्ह्याच्या कचेरीत जाऊन कोतवालाच्या हातावर काहीतरी ठेवून तुमचा कागद चोरणाऱ्याला कैद करवितो. तुमचा कागद नक्की तुम्हांला परत मिळेल. परंतु ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळतां कामा नये. या करितां खर्च फार करावा लागेल, एवढं लक्षात असू द्या.

"माझे चांदीसोने सर्व चोरीला गेले. तेव्हां गुणाजीकडून कर्ज घेणे हा एकच मार्ग उरला आहे. मी एक हजार घेतो. तुम्हीच या संकटातून मला वांचवा." वैद्यबुवा म्हणाले.

"वैद्यबुवा! अहो एका हजाराने काम भागण्यासारखे आहे का? या पोलीसांचा खावया तुम्हांला माहीतच आहे! म्हणून मी तुम्हांला एक उपाय सुचवितो. तुमचं नुकसान होणार नाही आणि मला विनाकारण धावपळ करावी लागणार नाही. तुम्हांला ती युक्ती मान्य आहे का सांगा!" व्यंकोबरावांनी जाळे टाकले. वैद्यबुवांना त्यांची अट मान्य करावी लागली.

दुसऱ्या दिवशी अर्धी रात्र लोटल्यावर वैद्यबुवांच्या घराला आग लागली. गावकऱ्यांनी आग विझवायला धावपळ केली. परंतु घर जळून गेले.

वैद्यबुवांची बायको छाती बडवून खूप रडली. "आम्ही मुलीच्या लग्नासाठी जे थोडे जमा केले होते सर्व जळून कोळसा झाले. आता मुलीचे लग्न कसे व्हायचे?"

"ऐक ग, एक क्षणभरदेखील यापुढे या गावात आपण रहायचे नाही. मी आजपर्यंत मोफत औषधे वाटली आणि हेच लोक आता माझ्यावर असे उलटले. न्याय नावाची गोष्ट जगात राहली नाही." असे म्हणत नवराबायको गाव सोडून जाण्याच्या तयारीला लागले.

गावकरी आश्चर्यचकित होऊन ते सर्व दृश्य पहात उभे होते. तेव्हां पाटीलसाहेब ओरडून म्हणाले–"वैद्यबुवा! कोठे निघालात गाव सोडून? कोणातरी दुष्टाची ही कामगिरी आहे. त्यासाठी सर्व गावकऱ्यांना नावे ठेवणे बरोबर होणार नाही. आम्ही सर्व गावकरी मिळून तुम्हांला एक टुमदार घर बांधून देतो, म्हणजे चोरांची किंवा आगीची भीती उरणार नाही. तुम्ही गाव सोडून निघून गेलात तर गांवकऱ्यांचा इलाज कोण करणार?" वैद्यबुवा मौनपणे सर्व ऐकत बसून राहिले.

पाटलाने गावकऱ्यांकडे वळून विचारले–"मी म्हणतो आहे, ते मान्य आहे का सर्वांना?"



